व-ग्रंथमाला—पुष्प १११ वें.

# मुक्तात्म

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )



नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते

—भगवान् श्रीकृष्ण

---

लेखक

**गजानन त्र्यंबक माडखोलकर**

---

सन १९३३

---

ांधणी रु. २-०-० ]   किंमत [ कापडी बांधणी रु.

# मु क्ता त्मा



## प्रकरण १ लें

## मातृदेवता



"बाळ, थांब जरा; इतक्या घाईनं वाचूं नको."

पार्वतीचे हे शब्द ऐकतांच, केशवनें आपल्या हातांतील पुस्तक मिटलें; व किंचित् वरमून आईकडे पाहिलें. वाऱ्याच्या झुळकेनें कंप पावणाऱ्या सरोवराच्या पाण्यांत जशी संध्याराग आणि ढगांच्या सांवल्या यांची सरमिसळ व्हावी, तशा पार्वतीच्या त्या विशाळ नेत्रांत या वेळीं वात्सल्य आणि ईषद्रोष यांच्या छटा मिसळून गेल्या होत्या. तिचे डोळे पाण्यानें भरून येत आहेत, असा भास केशवला झाला; व त्याच्या स्वतःच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. आणि, कांहीं तरी बोलावयाचें म्हणून तो म्हणाला, "आई, मी घाईनं वाचीत नव्हतों ग; तुला उगाच तसं वाटलं." पण, हे शब्द उच्चारीत असतांना त्याचें त्यालाच ओशाळल्यासारखें होऊन, त्याचे गाल लालबुंद झाले.

कांहीं वेळ तीं मायलेकरें स्तब्ध होतीं. सूर्य या वेळीं झाडांआड गेला होता; व त्यांच्या गर्द पर्णराजींतून निसटलेले त्याचे किरण खिडकींतून आंत येऊन भिंतीवर पडले होते. त्यांच्या परावर्तित प्रभेमुळें पार्वतीचें तोंड उजळ दिसत होतें. ती पांढऱ्या शुभ्र लोडाला ओठंगून बिछान्यावर पडली होती. तिचें सर्व शरीर झिजून पिचून गेलेलें होतें. पण, तिच्या तोंडावरील मार्दव आणि कांति मात्र यत्किंचितही कमी झालेली नव्हती. वेलीचा खालचा भाग जरी सुकून कोळ होत आलेला असला, तरी तिचें दंवानें भिजलेलें फूल जसें सकाळच्या

कोंवळ्या उन्हांत टवटवीत दिसावें, तसें पार्वतीचें तोंड दिसत होतें. तिच्या भुंवया किंचित् विरळ पण बांकदार होत्या; व त्यांच्या कमानीखालीं तिचे ते खोल गेलेले टपोरे डोळे एरवीं स्वच्छ असलेल्या क्षितिजावर ढगाच्या काळसर रेषेखालीं शोभणाऱ्या चंद्रबिंबासारखे दिसत होते.

तिच्या पलंगाजवळ असलेल्या खुर्चीवर केशव बसला होता. त्याचें तोंड म्हणजे पार्वतीच्या सुंदर मुखमंडलाचें केवळ प्रतिबिंबच होतें. त्याला केस विंचरण्याचा मनस्वी कंटाळा होता. त्यामुळें पिंगट, मृदु केसांच्या झुपकेदार कुरळांनीं झांकलेलें त्याचें मस्तक मोठें मनोहर दिसत असे. त्याचें कपाळ इतकें उंच होतें कीं, अतिशय विशाल असलेलेही त्याचे डोळे त्यामुळें अगदीं बेताचे वाटत. प्रसाद, मार्दव आणि अनघता हीं त्या डोळ्यांत एकवटलेलीं होतीं; आणि, तो जेव्हां विचारांत मग्न होई, त्या वेळीं इतरांना अदृश्य असे रमणीय आलोक त्याच्या दृष्टीपुढून जात असून, त्यांच्या अवलोकनांत त्याचे डोळे गढलेले आहेत, असा भास होत असे. त्याचें गोरेपण कोंवळ्या आम्रपल्लवांच्या तांबूस रंगावर होतें. त्याला नुकतेंच सोळावें वर्ष लागलेलें असल्यामुळें शैशवसहज अशी कोमलता अद्याप त्याच्या अवयवांना सोडून गेली नव्हती; व रागानें किंवा लाजेनें जेव्हां तो क्षुब्ध होई, तेव्हां रात्या कमळाच्या गाभ्याचा लालपणा त्याच्या नाजूक गालांवर खेळत असे.

"पुन्हां वाच बरं तो श्लोक बाळ" पार्वती म्हणाली. तिच्या आवाजांत आणि डोळ्यांत या वेळीं पराकाष्ठेचें मार्दव उत्पन्न झालें होतें. ती बिछान्यावर उठून बसली; पांढऱ्या शुभ्र कपाळावर झेंपावणारे केंस तिनें मागें सारले; व आपली भावपूर्ण दृष्टि मुलाकडे रोंखून ती त्याला म्हणाली, "सुटीच्या दिवसांत सुद्धां मी तुला सकाळ संध्याकाळ वाचायला बसवतें, म्हणून तुला माझा मोठा राग येतो नाहीं रे?"

"तसं नाहीं ग आई," केशव म्हणाला. त्याच्या डोळ्यांत उभे राहिलेले अश्रुबिंदु आतां गालावर आले होते. तो विषय टाळण्याच्या हेतूनें त्यानें पुस्तक उघडलें; व मगाशीं अपुराच राहिलेला 'उत्तररामां'तील श्लोक वाचावयाला आरंभ केला—

**क्व तावानानंदो निरतिशयविस्रंभबहुलः**
**क्व वाऽन्योन्यप्रेम क्व च नु गहनाः कौतुकरसाः**
**सुखे वा दुःखे वा क्व नु खलु तदैक्यं हृदययोः**

पण तो श्लोक ऐकतां ऐकतां पार्वतीच्या मनांत एकदम काय आलें कोण जाणें !– ती केशवला म्हणाली, " ठेव जरा तें पुस्तक खालीं; आणि माझ्या अगदीं जवळ बैस बरं. आज तूं फिरायला जाऊं नको. पुष्कळ दिवसांपासून तुला कांहीं तरी सांगायचं माझ्या मनांत आहे. तें आज सांगेन म्हणतें."

केशवनें लगेच उठून खुर्ची पलंगाला आणून भिडविली; व तो आईकडे उत्सुकतेनें पाहूं लागला.

पण पार्वतीचें लक्ष त्याच्याकडे नव्हतें. ती खिडकींतून बाहेर पहात होती; व तिचें चित्त अर्धवट स्वतःच्या विचारांत आणि अर्धवट सृष्टीची शोभा पाहाण्यांत गढून गेलेलें होतें. सूर्य या वेळीं मावळला होता. त्याच्या ईषदरुण तेजानें क्षितिजाची नील पार्श्वभूमि रंगून जाऊन अत्यंत सौम्य अशा गुलाबी प्रकाशाची छटा सृष्टीवर पसरली होती. वाऱ्याच्या मंदोष्ण झुळकांनीं हलणाऱ्या झाडांच्या उंच उंच फांद्या त्या पार्श्वभूमीवर हलत्या रेषाचित्रांसारख्या दिसत होत्या. वाऱ्यानें पानें हललीं, तरी हृदयांत खळबळून उठणाऱ्या अनिर्वचनीय भावनांप्रमाणें, त्यांचा आवाज मात्र मुळींच होत नव्हता; आणि, मनाला पर्युत्सुक करणारी शांतता सर्वत्र भरली होती. क्वचित् मधून मधून मोटेचें पाणी कोसळल्याचा शब्द, नदीकांठीं बसलेल्या बगळ्याचा कर्कश आवाज किंवा कोकिळाचा भेदक सूर कानांवर पडे, तेवढाच. त्यामुळें त्या शांततेची हृदयाला व्यथित करणारी संवेदना दुणावे मात्र. क्षितिजावर उठलेल्या तेजःछटा, समुद्राच्या पाण्यावरील फेसाप्रमाणें, त्याच्या अस्मानी रंगांत हळुहळू विलीन होत होत्या. आणि, संधिप्रकाश जसजसा फिका पडत होता, तसतसें शांततेचें गांभीर्य वाढत जाऊन मन अधिकाधिकच व्याकुळ होत होतें.

हें प्रशांतरम्य दृश्य पहाण्यांत पार्वती इतकी तल्लीन झाली होती कीं, तिचे ते जात्याच तेजस्वी असलेले डोळे संध्येची सुषमाच जणूं कांहीं शोषून घेत आहेत, असें तिच्याकडे पहाणाराला वाटलें असतें. खिडकीकडे वळलेल्या तिच्या तोंडाच्या

अर्ध्या भागावर आतां संधिप्रकाश पडून तें अतिशयच रमणीय दिसत होतें; व त्यामुळें तिच्या डोळ्यांत येऊन थबकलेल्या विचारांची उदासता तीव्रतेनें जाणवत होती. केशव तिच्याकडे अनिमिष लोचनांनीं पहात होता. त्याची दृष्टि तिच्या मुखावर स्थिर झाली होती; व चित्त ती काय सांगते तें ऐकावयाला आतुर झालें होतें. पण त्या विचारसमाधींतून तिला जागें करण्याचें धैर्य मात्र त्याला होईना.

शेवटीं ' आई ' म्हणून त्यानें हळूच हांक मारली. त्याबरोबर, त्या विचारतंद्रींतून जागृत होऊन, पार्वतीनें एक उसासा टाकला. तेव्हां केशवनें तिला हळूच विचारलें, " आई, तूं मला काय सांगणार होतीस बरं ? "

पार्वतीनें पुन्हा एकदां उसासा टाकला आणि ती म्हणाली, " तसं कांहीं विशेष नाहीं;—पण मला अलिकडे तुला कांहींतरी सांगावंसं वाटतं, एवढंच. माझे आतां कांहीं फार दिवस जातील, असं दिसत नाहीं. तुझ्या काकांचा तुझ्यावर फार जीव आहे; तेव्हां तशी कांहीं काळजी नाहीं. पण त्यांची इच्छा तुझ्या कानांवर घातलेली बरी;—अन् शिवाय मलाही तुला कांहीं सांगायचंय—"

इतकें बोलून ती क्षणमात्र थांबली. बोलतां बोलतां तिचा आवाज करुणपूर्ण होत गेल्यासारखा वाटून केशवचे डोळे भरून आले. पण तो कांहीं बोलणार, तोंच पार्वती म्हणाली, " तुला जन्मभर दधात पडूं नये अशी व्यवस्था त्यांनीं करून ठेवली आहे. तुला एंजिनियरिंग कॉलेजांत घालायचा त्यांचा बेत होता;—तसं ते मजजवळ नेहमीं बोलतही असत. पण मला मात्र, बाळ, तें कधीं पटलं नाहीं. बापाचा धंदा मुलानं पुढं चालवावा, ही रीतच आहे. तेव्हां त्यांना तसं वाटत असे याबद्दल मला कांहीं म्हणायचं नाहीं. पण त्याबरोबरच मुलाच्याही मनोवृत्तीकडे कांहीं लक्ष द्यायला नको का ?—मी लहानपणापासून पहात्येंय,—तुझा ओढा कांहीं त्या बाजूला नाहीं. म्हणून मी त्यांना नेहमीं म्हणत असें कीं, तुम्ही कांहीं याला आपल्या धंद्यांत घालूं नका. माझ्या या बोलण्याचा त्यांना मनस्वी राग येई; व एकदां तर ते म्हणाले सुद्धां—'आपल्या वडिलांप्रमाणेंच आपला मुलगा सुद्धां नाद़ी अन् भ्रमिष्ट व्हावा अशी तुझी इच्छा आहे.' तेव्हांपासून मी पन्हां कधीं तो विषय काढला नाहीं. पण त्यांची इच्छा काय होती, हें मी तुला

आज सांगितलं. तूं आतां कांहीं लहान नाहींस. आणखी वर्ष सहा महिन्यांनीं तूं कॉलेजांत जाशील. तुझं तुला सारं कळतंच आहे—"

बोलतां बोलतां ती पुन्हा थांबली. काय बोलावयाचें हें तर तिच्या मनानें पक्कें ठरविलें होतें; पण तें एकदम बोलून टाकण्याचा हिय्या मात्र तिला होईना. तिचें वैवाहिक जीवन तिच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें; हृदयांत दडपून ठेवलेल्या स्मृति उफाळून उठल्या; आणि, त्यांच्या आवेगानें प्रेरित होऊन, तिनें पुन्हां बोलावयाला सुरवात केली.

"बाळ, तुला माहितच आहे माझा स्वभाव;" ती क्षणैक घोंटाळली. तिच्या आवाजांत कंप-उत्पन्न होऊन तो किंचित् खालावला; व ती हळूच म्हणाली, "आमचं कधींच फारसं जमलं नाहीं.—त्यांचा सारा जीव त्यांच्या धंद्यांत गुंतलेला असे.—आणि, मला तर गाण्याचं अन् पुस्तकांचं अति वेड. त्यांना मी अतिशय आवडत असें;—तसं त्यांचं माझ्यावर फार प्रेम होतं;—पण माझ्या गाण्याच्या अन् वाचण्याच्या छंदाचा मात्र त्यांना तिटकारा होता; अन् तो त्यांनीं कधीं लपविलाही नाहीं. आमच्या नानांची अगदीं गरीबी होती. कीर्तनांत जें काय मिळेल किंवा विद्यार्थी जें काय देतील, त्यावर आमचं कसं तरी चाले. मी जर दिसायला चांगली नसतें, तर त्यांनीं कांहीं मला करून घेतली नसती. नानांकडून हें गाण्याचं न् काव्याचं वेड माझ्याकडे अन् माझ्याकडून तुझ्याकडे आलं. तुला पाहिलं,–तुझे हे डोळे न् कपाळ पाहिलं–म्हणजे मला केव्हां केव्हां तेच माझ्या पोटीं आले, असा भास होतो.—नानांच्या वर्षश्राद्धाच्या दिवशींच बाळ तुझा जन्म झाला.—पण या गोष्टी त्यांना कधीं आवडल्या नाहींत.—त्यांनीं तसं मला फार फार सुखांत ठेवलं.—पण माझं माहेर–नानांची आठवण–माझ्या हृदयांतून बुजून जावी, असंच जणूं कांहीं त्यांना वाटे. चंद्र ज्या तारकेजवळ जातो, तिचं अस्तित्व तो लुप्त करतो, म्हणतात. तसंच माझं झालं. अन् केवळ स्वभाववैषम्यामुळें मला तळमळत दिवस काढावे लागले. माझ्या जीवनाचा, माझ्या आकांक्षांचा, माझ्या अभिरुचींचा अगदीं कोंडमारा झाला; अन् त्यांनीं इतकं प्रेम करून सुद्धां ज्याला हृदयांचं ऐक्य म्हणतात, तें मी कधीं अनुभवलं नाहीं. बाळ, लता आणि तूं–तुम्ही दोघं जर नसतां, तर माझं जिणं दुःसह झालं असतं; अन् संसार मला खायला उठला असता—"

तिला पुढें बोलवेना. तिनें आपले दोन्ही हात डोळ्यांवर ठेवले; व वेलीच्या पानांतून जसे पावसाचे थेंब खालीं ठिबकावे, तसे त्यांतून अश्रुबिंदु खालीं पडूं लागले. जें दुःख तिनें आजवर आपल्या हृदयांत खोल खोल दडवून ठेवलें होतें, तें त्या दिवशीं तिनें प्रथमच बोलून टाकलें. एक प्रकारच्या आवेगाच्या भरांत ती या सर्व गोष्टी बोलून गेली.—जणूं कांहीं ती स्वतःशींच बोलत होती.—आणि, त्या गोष्टींचा मनावरील भार हलका होतांच, तिला तिच्या इच्छेविरुद्ध रडें कोसळलें. आपण हें काय बोलून गेलों, बोललों हें वाईट केलें कीं चांगलें केलें, हें तिचें तिलाच समजेना. मातापितरांच्या वैवाहिक जीवनांतील वैगुण्य मुलांना कळणें अनिष्ट तर नाहीं ना, असाही विचार तिच्या मनांत येऊन गेला. पण तो क्षणभरच. तिचें तिलाच लगेच वाटलें कीं, आपल्या व्यक्तित्वाचा जसा कोंडमारा झाला, तसा मुलाच्या व्यक्तित्वाचा होऊं नये, म्हणून या गोष्टी त्याच्याजवळ बोलणें इष्टच होतें. आपली हृदयव्यथा आपण कांहीं दुर्बलतेनें किंवा सहानुभूतीच्या अपेक्षेनें त्याच्याजवळ व्यक्त केली नाहीं; तर केवळ त्याला सावध करण्यासाठीं सांगितली, अशी कल्पना तिच्या मनांत आली. आणि हळुहळू त्याचा क्षोभ कमी होत गेला.

बिचारा केशव तर अगदीं भांबावून गेला होता. आईला अशा रीतीनें स्वतः-विषयीं बोलतांना किंवा धीर सुटून रडतांना त्यानें पूर्वी कधींच पाहिलें नव्हतें. लहानपणीं आपल्या बहिणी वारल्या तेव्हां, किंवा दोन वर्षांपूर्वी आपले अप्पा वारले त्या वेळीं, तिनें किती धैर्यानें त्या प्रसंगांना तोंड दिलें, याची त्याला आठवण होती. त्यामुळें तिचा हा अकस्मात् झालेला दुःखोद्रेक पाहून तो स्तंभित झाला. आई हेंच त्याच्या सर्व प्रेमाचें आणि विचारांचें केंद्र होतें. यशवंतराव दिवसभर आपल्या उद्योगांत गुंतलेले असत. मुलाच्या भवितव्याविषयीं नुसते विचार प्रदर्शित करण्याव्यतिरिक्त त्यांनीं अधिक कधींच कांहीं केलें नाहीं. अर्थात् त्यांच्या स्वभावाविषयीं केशवला कांहींच कल्पना नव्हती. आणि, जी आज आली, ती अशा रीतीनें. त्याला काय बोलावें, हें सुचेना; व केवळ सहानुभूतीनें त्याच्याही डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

कांहीं वेळ तीं मायलेकरें त्याच स्थितींत अगदीं स्तब्ध होतीं.

शेवटीं पार्वती भानावर आली. तिच्या उद्वेगाचा आवेग ओसरला; व संथपणानें तिनें पुन्हा बोलावयाला सुरवात केली. ती म्हणाली, " मी हें सारं आज तुला मुद्दामच सांगितलं. बाळ, तुझ्या भावी आयुष्याविषयीं मी जेव्हां जेव्हां विचार करतें, तेव्हां तेव्हां माझं मन अगदीं गांगरून जातं. तुझ्या बुद्धीला धर नाहीं. कोणत्याही प्रबळ कल्पनेची छाप तुझ्यावर तेव्हांच पडते. स्वतःच्या आयुष्याला इच्छेस येईल तसं वळण लावण्याचा आम्हां बायकांना नसलेला हक्क तुम्हां पुरुषांना आहे. त्या हक्काचा योग्य उपयोग केल्यानंच आयुष्याचं सार्थक होतं. तूं पुढें काय करावंसं मला वाटतं तें मी तुला सांगितलंच आहे.—शिवाय तुझे काकाही तुला सांगायला आहेतच.—पण, मी काय किंवा त्यांनीं काय, सांगितलेलं तुला पटलं नाहीं, अन् त्यापेक्षां अधिक श्रेयस्कर मार्ग जर तुझ्या अंतःकरणप्रवृत्तीनं तुला दाखविला, तर तूं खुशाल त्या वाटेनं जा. आपला आवडता व्यवसाय करण्यांत जरी अपेश आलं तरी पत्करलं. त्या अपेशांत सुद्धां हृदयाच्या हांकेला ओ दिल्याचं—स्वतःच्या बुद्धीनं दाखविलेल्या ध्येयाला अनुसरल्याचं समाधान असतं. त्या समाधानाला जगांत उपमा नाहीं. स्वतःच्या मनाला तळमळत ठेवून अन् बुद्धीच्या संवेदनांना दाबून टाकून केलेल्या व्यवसायांत यश मिळालं, तरी त्यांत सुख नाहीं,–त्यांत आत्मविकासाचा आनंद नाहीं. आणि त्या आनंदासाटींच तर माणसानं जगायचं. माझे नाना—त्यांनीं वेळेवारी मधुकरी सुद्धां मागितली; अन् झाडाच्या आसऱ्याला निजून रात्री काढल्या. पण संगीतसमाधीचा जो आनंद त्यांनीं जन्मभर भोगला, त्यापुढं सारं त्रिभुवन तुच्छ होतं. लहानपणीं त्यांच्याबरोबर गांवोगांव हिंडतांना मी एखादे वेळीं कंटाळलें, म्हणजे ते म्हणायचे, "अग पोरी, कुबेर ज्याचा भांडारी अन् अष्टसिद्धि ज्याच्या दारांत उभ्या, तो कैलासराणा सुद्धां हातांत नरोटी घेऊन भिक्षा मागतो. मग आपल्याला कसली आली आहे त्यांत लाज? आत्मानंदासाठीं त्या देवाधिदेवानं स्मशानवास पत्करला. त्याच्यापेक्षां का आपण अधिक आहों?" माझं लग्न न करतां मला तशीच ठेवण्याचा त्यांचा विचार होता. पण, हें आयतं चांगलं स्थळ आपण होऊन चालत आलं, म्हणून नानांनीं मला देऊन टाकली.—"

ती पुन्हा घोंटाळली; पण क्षणभरच. तिनें एक उसासा टाकला; दुःखद स्मृतींच्या उद्रेकानें तिचें हृदय भरून आलें; व कांपऱ्या आवाजानें ती म्हणाली,

"त्यांनीं मला फार फार सुखांत ठेवलं.—शिकण्यासवरण्याची माझी प्रत्येक हौस त्यांनीं पुरवली.—लग्न होऊन या घरांत आल्या दिवसापासून मी ऐश्वर्यांत लोळतें आहें. पण नानांच्या सहवासांतला आनंद,—तो आनंद कांहीं मला पुन्हां कधीं लाभला नाहीं. आणि, स्त्रीच्या जीवनाला ज्याच्यामुळं पूर्णता येते, तें हृदयांचं ऐक्यही मी अनुभवलं नाहीं. विषम स्थितींत वाढलेल्या माणसांना एकमेकांच्या सहवासापासून सुख होत नाहीं, हेंच खरं. केव्हां केव्हां मला असं वाटतं कीं, नानांच्या इच्छेप्रमाणें मी तशीच राहिलें असतें तर ?—पण आतां त्याचं काय ? माझं झालं तें झालं.—मी किती झालं तरी स्त्री.—स्त्रीला निदान आपल्या समाजांत तरी पतीशिवाय दुसरी गति नाहीं. पण तूं मात्र आपल्या हृदयाचा कोंडमारा करून घेऊं नकोस.—"

इतकें बोलून ती थांबली. तिचें तिलाच वाटलें कीं, आपण भलतीकडेच वाहवलों;—आपलें बोलणें याला कदाचित् कळणारही नाहीं. शिवाय तिला थकवाही आला होता. म्हणून तिनें आपल्या पायांवर पांघरूण ओढून घेतलें; आणि ती मुकाट्यानें बिछान्यावर पडली.

केशव तिथून उठून आंगणांत आला; व टांकींतील थंड पाणी आपल्या डोक्यावर घालून, केंस मागें सारीत त्यानें वर पाहिलें. चंद्र या वेळीं मध्यावर आला होता; व वाऱ्यानें हलणाऱ्या झाडांच्या पानांतून खालीं पडणारे त्याच्या शुभ्र चांदण्याचे कवडसे भुईवर नाचत होते. तें मनोहर दृश्य पाहून केशवचें चित्त प्रसन्न झालें.

त्यानंतर लवकरच, उन्हाळ्याची सुटी संपत आल्यामुळें, तो मुंबईस आपल्या काकांकडे निघून गेला.

---

## प्रकरण दुसरें

# वठलेलें प्रेम, पिचलेल्या महत्त्वाकांक्षा



"बाबू, अरे बाबू," भगवंतरावांनीं डोळ्यांपुढें धरलेला 'इव्हनिंग न्यूज' चा अंक दूर न करतां, खुर्चीवर पडल्या पडल्याच हांक मारली. ते दिसावयाला

किंचित् उग्र होते. भव्य कपाळ, दाट भुंवया, उंच नाक, रुंद तोंड व ओठांना झांकणाऱ्या रुबाबदार मिशा यांना धिप्पाड बांध्याची जोड मिळालेली असल्या-मुळें, त्यांची गंभीर मूर्ति बघितल्याबरोबर मनांत वचक उत्पन्न होत असे. भुंव-यांच्या त्या गर्द रांगांखालीं असलेले त्यांचे लहानसेच पण पाणीदार डोळे झाडीनें आच्छादिलेल्या डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या तळ्यांसारखे दिसत असत. उग्रता आणि उदासपणा यांचें ते डोळे म्हणजे एक कायमचें निवासस्थानच होतें; व क्रोधाच्या तड्दिीप्तीनें ज्या वेळीं ते झळाळत नसत, त्या वेळीं विषण्ण विचारांच्या गडद छायेनें त्यांचें स्वाभाविक तेज झांकोळून गेलेलें असे.

आपल्या हांकेला उत्तर येईल अशा अपेक्षेनें ते क्षणभर थांबले. पण त्यांची निराशा झाली. तेव्हां ' न्यूज 'चा अंक त्यांनीं टेबलावर फेंकला; व चिरूटाच्या तोंडावर सांचलेली राख रक्षापात्रांत झटकीत पुन्हां किंचित् जोरानें हांक मारली. " बाबू, अरे बाबू—केशव, केशव,—काय नादिष्ट पोर आहे हा ! एकदां पुस्त-कांत डोकं खुपसून बसला, म्हणजे भोंवतालच्या जगाची याला शुद्ध बुद्ध म्हणून कशी ती उरत नाहीं—"

ते पुन्हां कांहीं वेळ थांबले. आतां रागानें त्यांच्या कपाळावर आठ्या चढूं लागल्या होत्या. हातांतला जळका चिरूट त्यांनीं रक्षापात्रांत टाकला; आराम-खुर्चीवर अस्ताव्यस्त पसरलेलें शरीर सांवरल्यासारखें केलें; व फिरून जोरानें हांका मारावयाला सुरवात केली. " लता, अग लता—ललिता—"

या वेळीं मात्र त्यांना थांबावें लागलें नाहीं. त्यांच्या तोंडांतून तिसऱ्यांदा तें नांव बाहेर पडतें न पडतें, तोंच यौवनाच्या यक्षभूमींत पदार्पण करण्याच्या बेतांत असलेल्या एका अल्लड कुमारिकेनें त्या दिवाणखान्यांत प्रवेश केला.

तिच्या सलील आगमनामुळें नियतकालिकांच्या फायली, पुस्तकांचीं कपाटें व कायद्यावरील ग्रंथ यांनीं व्यापिलेल्या त्या दिवाणखान्याच्या अभ्यासजड वातावर-णांत एकदम लालित्याच्या लहरी उठल्या. दिव्याच्या झगझगीत प्रकाशांत तिचा गौरवर्ण उज्ज्वल दिसत होता. तिच्या ओठांचीं दळें स्मितबुद्धीनें किंचित् विभा-गलीं होतीं; व विस्फारित नेत्रांतील हंसऱ्या किरणांची कोमल द्युति गालांवर पसरून, इंद्रधनुष्य पडून आरक्त झालेल्या क्षितिजासारखे ते दिसत होते. पण, वडिलांच्या डोळ्यांतील रागाची चमक पहातांच, तिच्या तोंडावरील तें खेळकर

स्मित एकदम मावळून, प्रसन्नता आणि विभ्रम यांची केवळ मूर्तीच अशी ती किशोरी गंभीर झाली.

वडील आपण होऊन कांहीं बोलतात कीं काय हें अजमावण्यासाठीं ती क्षण-भर घोंटाळली; व नंतर अर्धवट गुंफलेल्या सुताच्या फुलांशीं इतका वेळ खेळत असलेले आपले हात वक्षःस्थलापर्यंत उचलल्यासारखे करून तिनें हळूच विचारलें, " कशाला हांक मारली मला, दादा ?—"

" बाबू कुठं आहे ? " भगवंतरावांनीं तीव्र स्वरांत उलट विचारलें.

" कुठं म्हणजे ?—खोलींतच आहे आपल्या—"

" पाठवून दे त्याला इकडे, " भगवंतराव तिच्याकडे न पहातांच उद्गारले.

त्याबरोबर लगेच ती केशवच्या खोलींत गेली. तो या वेळीं वाचनांत अगदीं गढून गेलेला होता. तिनें हळूच पाठीमागून जाऊन त्याच्या समोरील पुस्तकावर आपला हात ठेवला. तेव्हां तिचा तो हात तसाच आपल्या हातांत धरून केशवनें म्हटलें, " हें काय ग ताई ? "

" तूं मला कबूल केलं होतंस ना रे मी अभ्यासाला येईपर्यंत कांहीं वाचणार नाहीं म्हणून ? "

" हो—पण हें पुस्तक अभ्यासाचं कुठं आहे ? मी फक्त तुझ्याशिवाय अभ्यास करणार नाहीं असं कबूल केलंय तुजजवळ. " केशवनें तिला हंसत हंसत उत्तर दिलें.

त्याबरोबर तिनें त्याच्या हातांतलें पुस्तक ओढून घेऊन त्याचें नांव पाहिलें. ती लॉर्ड लिटन याची 'रिएंझी' ही कादंबरी होती.

इतक्यांत केशव म्हणाला, " चंद्राकडून आणली आहे ही कादंबरी मी. लता, तूं सुद्धां वाचली पाहिजेस बरं का ही;—यांतला नायक रिएंझी,—तो तर तुला आवडेलच. पण नायिका निना,—तिच्यासारख्या आपल्या प्रियकराच्या ध्येयाशीं समरस होणाऱ्या मुली जर आपल्या समाजांत निपजल्या—"

पण त्याचें तें वाक्य पुरें होण्यापूर्वीच ललिता त्याला म्हणाली, " तें सारं मागाहून पाहूं—तूं उठ बरं आधीं. दादांनीं किती हांका मारल्या रे तुला ! ते तुझी वाट पहाताहेत. थोडे रागांतच आहेत बरं का—"

हें त्याला सांगत असतांनाच तिनें आपल्या गोऱ्यापान, नाजूक मानेवर रेल-लेल्या नागाकृति डौलदार वेणींतील मुचकुंदाच्या फुलाची एक पाकळी खूण म्हणून त्या पुस्तकांत घालून तें टेबलावर ठेवलें.

केशव ताबडतोब दिवाणखान्यांत आला. त्याला पहातांच, चंद्रोदयाच्या वेळीं सुटलेल्या वाऱ्याच्या झुळकेनें क्षितिजावर सांचलेले अभ्रखंड पांगले जावे, त्या-प्रमाणें भगवंतरावांच्या कपाळावरील आंठ्या साऱ्या दूर झाल्या; व क्षणभरापूर्वी त्यांच्या मनांत आलेले रागाचे विचार वितळून जाऊन, ते त्याला म्हणाले, " तूं पत्र पाह्यलंस का रे संध्याकाळीं घरून आलेलं ? "

" हो, पाह्यलं. "

" मग चलतोस का उद्यां तूं माझ्यावरोबर ? "

" आलों असतों;—पण माझा साराच अभ्यास अन् त्यांतून गणित तर सग-ळंच व्हायचंय;–मग येऊन कसं चालेल ? "

" हो, तूं म्हणतोस तें बरोबरच आहे. तुझ्या आईची प्रकृति तशी कांहीं फार बिघडलेली दिसत नाहीं. शिवाय तूं नुकताच जाऊनही आला आहेस. पण आतां कांहीं या दुखण्याचा भरंवसा नाहीं. म्हणून तुला न्यावंसं वाटतं. पण मी मात्र जाऊन येणार आहें. जान्हवीनं जर तसं कांहीं दर्शवलंच, तर मात्र मग मी तुला तार करीन—"

आपल्या आईचें तें माहेरचें नांव काकांच्या तोंडून बाहेर पडलेलें ऐकतांच, केशवनें एकदम चमकून वर पाहिलें. तेव्हां सदा गंभीर असणाऱ्या त्यांच्या त्या डोळयांत एक प्रकारची आर्द्रता उत्पन्न होत असल्याचा भास त्याला झाला. पण तो कांहींच बोलला नाहीं. थोड्या वेळानें ते आपण होऊनच उद्गारले, " ठीक आहे; " व त्यांनीं एक उसासा टाकला. तेव्हां भाषण संपल्याचा तो इषारा आहे असें समजून केशव परत फिरला.

तो गेल्यावर भगवंतराव खुर्चीवरून उठले; व टेबलावरील सुंदर हस्तिदंती केसमधील चिरूट शिलगावून, त्याचे झुरके घेत घेत त्यांनीं येरझारा घालावयाला प्रारंभ केला. त्यांच्या उग्र चेहऱ्यावर या वेळीं करुणाच्या रेषा उमटल्या होत्या; व त्यांचे डोळे भूतकाळांतील कांहीं तरी विशिष्ट दृश्यें एकाग्रतेनें निरखून पहाण्यांत गुंतल्यासारखे दिसत होते. कांहीं वेळानें ते आपल्या लिहावयाच्या छोट्या टेबला-

जवळ आले; व त्याचा कप्पा उघडून त्यांतून एक जुनी रोजनिशी त्यांनीं बाहेर काढली.

ती रोजनिशी चाळावयाला सुरवात करितांच, स्वतःचें पूर्वायुष्य डोळ्यांपुढें उभें राहून, त्यांच्या चेहऱ्यावरील करुणाच्या रेषा अधिक सांद्र होत गेल्या. जणूं कांहीं, तिच्या प्रत्येक पानावर त्यांच्या आयुष्यांतील एक एक संस्मरणीय प्रसंगच चित्रित केलेला होता; व आपल्या गत जीविताचीं तीं चित्रें पहातांना, त्या रोजनिशींत न रेखाटलेले पण स्मृतिसंबद्ध असे अनेक अवर्णनीय आलोक त्यांच्या डोळ्यांपुढून झपाट्यानें जात होते. अशा रीतीनें कांहीं पानें चाळल्यावर, शेवटीं एका पानावर त्यांची दृष्टि स्थिर झाली; व त्यांतील मजकूर वाचावयाला त्यांनीं प्रारंभ केला.

"जगाच्या दृष्टीनें माझें तुझ्यावरील प्रेम निंद्य ठरेल; व म्हणून मी तें आजपर्यंत माझ्या कृतींतच काय, पण उक्तीत किंवा दृष्टींत सुद्धां कधीं व्यक्त होऊं दिलें नाहीं. पण, जगापासून जरी मी तें प्रेम लपविलें असलें, तरी, जान्हवी, स्वतःपासून मात्र मी तें कधींही लपविलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपल्या मस्तकांतील मणि एकांतांत असतांना समोर काढून ठेवून, त्याच्या दीप्तीनें मोहित होऊन डुलणाऱ्या नागाप्रमाणें माझ्या आयुष्यांतील सारे निवांत क्षण मी त्या प्रेमाचें चिंतन करण्यांत घालविलेले आहेत. त्या प्रेमांत खरोखरी असें काय आहे कीं, ज्याची मला लाज वाटावी ? धाकट्या भावाच्या बायकोकडे अभिलाषबुद्धीनें पहाणें हें पाप असेल,—नव्हे आहेच. पण, तिच्यावर निरभिलाष प्रेम करणें,—तिच्या सौंदर्याचें केवळ ध्येयबुद्धीनें चिंतन करणें, यांत खचित पाप नाहीं. तुझ्याविषयीं मी जेव्हां जेव्हां विचार करितों, तेव्हां तेव्हां माझ्या हृदयांत फक्त उदात्त अशाच भावना उचंबळून येतात; व त्यांच्या उद्रेकांत तुझ्या पार्थिव रूपाचा विलय होऊन, शैशवाच्या सुषुप्तींतून बुद्धि जागृत झाल्या क्षणापासून माझ्या ध्येयासक्त मनानें अविरत चिंतिलेली सौंदर्याची अशरीरी अधिदेवता माझ्या डोळ्यांपुढें उभी राहते.

मला पक्कें आठवतें. अप्पाची नियुक्त वधू म्हणून मी जेव्हां त्याच्याबरोबर, जान्हवी, तुला प्रथम पाहावयाला आलों, तेव्हां स्त्री म्हणून नव्हे, अभिलषणीय वस्तु म्हणून नव्हे, तर सौंदर्याचा अनघ आविष्कार म्हणूनच तुझी

मूर्ति माझ्या हृदयांत अधिष्ठित झाली. आजपर्यंत कधीं न बघितलेली अशी रमणीयता मूर्तावस्थेला आलेली आपण पाहात आहोंत, एवढाच फक्त संस्कार त्या वेळीं माझ्या मनावर झाला. मला तेव्हां असें वाटलें कीं, यौवनांतील ज्या स्वप्नमूर्तीचें वर्णन शेलेनें इतक्या कसोशीनें केलेलें आहे, आणि जिच्या साक्षात्काराचा ध्यास कलासक्त मनाला सतत लागलेला असतो, तीच आपल्यापुढें आज प्रत्यक्ष अवतीर्ण झालेली आहे. आणि, माझ्या प्रमाथी मनानें त्या क्षणींच न कळत अशी प्रतिज्ञा केली कीं,—'I would dedicate my powers to thee—'

आणि ती प्रतिज्ञा किती भीषण रीतीनें खरी झाली आहे ! कॉलेजांत असतांना माझ्या आकांक्षा किती उच्च होत्या, आणि आज माझें कर्तृत्व कसें पिचून गेलेलें आहे, हें मनांत आलें म्हणजे दुरंत प्रेमाच्या विदारक दुर्विलासाचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. त्या आकांक्षांविषयीं जेव्हां कधीं मी आतां विचार करितों, तेव्हां कालगतीनें उध्वस्त झालेल्या ओसाड अशा एखाद्या प्राचीन राजधानींतूनच आपण संचार करीत आहोंत, असा भास माझ्या मनाला होतो !—इतक्या त्या आकांक्षा आतां मला पारख्या झालेल्या आहेत. जान्हवी, यांत तुझा कांहीं अपराध नाहीं किंवा माझाही कांहीं अपराध नाहीं. ज्या उपरोधप्रिय नियतीनें माझ्या भावाची वाग्दत्त वधू म्हणून तुला माझ्यासमोर आणून उभी केली, तिनेंच माझ्या आकांक्षांवर निखारा ठेवला. आणि, ज्या प्रेमामुळें माझ्या बुद्धीचा विकास व्हावयाचा, तेंच तिच्या विकृतीला कारण झालें. कळीला जर उमलण्याची संधि मिळाली नाहीं, तर कुजून गळून पडणें, हेंच तिचें भवितव्य होऊन बसतें. माझ्या अंतःकरणांत वसत असलेल्या प्रेमाला जेव्हां असें दिसून आलें कीं, त्याला कधींही आणि कोणत्याही रीतीनें प्रगट होणें शक्य नाहीं, तेव्हां त्या कोंडमारा झालेल्या प्रेमानें, भूगर्भातील उष्णतेनें आंतर वस्तुजात भाजून काढावें त्याप्रमाणें, माझ्या सर्व शक्तींची आहुति घेतली. वाईट एवढेंच वाटतें कीं, इतक्या अनन्य भावानें मी तुजवर प्रेम करीत आलों, हें तुला कधींही कळणार नाहीं. पण, जें प्रेम जन्मतःच निष्फळ, त्याला असल्या निष्क्रिय समाधानाचा सुस्कारा टाकण्याची संधि तरी कां मिळावी ?"

वाचतां वाचतां भगवंतरावांचे डोळे पाण्यानें भरून आले. त्यांची उग्र चर्या पाहिल्यावर, असला उत्कट प्रेमोद्रेक त्यांच्या हृदयांत सळसळत असेल, असें कोणालाही वाटलें नसतें. कुशाग्र बुद्धीचा कायदेपंडित आणि प्रतिपक्षाचा मर्मभेद करणारा टीकाकार म्हणून महाराष्ट्रांत त्यांची सर्वत्र ख्याति होती; व घरांत, कोर्टांत आणि साहित्याच्या क्षेत्रांत त्यांचा दरारा सारखाच असे. पण त्यांची ही उग्रता स्वाभाविक नव्हती. नदीच्या पृष्ठभागावरील पाण्याचें जरी गोठून बर्फ झालें, तरी त्या बर्फाच्या थराखालीं जशी तिच्या प्रवाहाची हालचाल चालू असते, तशी त्या उग्रतेच्या आवरणाखालीं त्यांच्या हताश हृदयाच्या दुखावलेल्या अतृप्त भावनांची तळमळ सारखी चाललेली असे. सार्वजनिक दृष्टीनें त्यांचें आयुष्य जितकें यशस्वी झालेलें होतें, तितकेंच वैयक्तिक दृष्टीनें तें अपेशी झालेलें होतें. [विवाह आणि व्यवसाय या मानवी जीवितांतील दोन महत्त्वाच्या घटना असतात; व त्या मनासारख्या घडून आल्यास जशी जीवनाला पूर्णता येते, तशाच त्या मनाविरुद्ध घडून आल्यास तें वठून गेल्याशिवाय राहात नाहीं. या दोन्हीही बाबतींत भगवंतरावांची फसवणूक झालेली होती.]

कॉलेजांत असतांना बहुतेक सर्वच तरुणांच्या आकांक्षा थोड्याबहुत काव्यमय असतात. विद्यार्थिदशेच्या त्या अंतिम काळांत मिळणारें बेजबाबदार स्वातंत्र्य इतकें उन्मादक असतें कीं, त्याचा कैफ बहुधा प्रत्येक बुद्धिमान् विद्यार्थ्याच्या डोळ्यांवर चढून, अव्यवहार्य आकांक्षांच्या साफल्याचीं स्वप्नें त्याच्या डोळ्यांपुढें तरंगूं लागतात. त्यांतून भगवंतराव हे तर अतिशयच कल्पक आणि भावनाप्रधान होते. बायरन, शेले आणि मॅझिनी यांच्या वाङ्मयाच्या व्यासंगानें त्यांची तरल बुद्धि इतकी भडकून गेली होती कीं, स्वतःच्या भवितव्याविषयीं विचार करितांना आपल्या पायांखालच्या व्यवहाराच्या भूमीकडे ढुंकून पहाण्याची त्यांना कधींसुद्धां गरज वाटली नाहीं. पण, मानवी संकेत असा होता कीं, त्यांची एकही आकांक्षा सफल होऊं नये. त्यांची स्वतःची इच्छा प्रोफेसर होऊन वाङ्मयसेवेंत आयुष्य घालविण्याची होती. पण, वडिलांच्या हेकेखोरपणापुढें त्यांचें कांहींही चाललें नाहीं. एलएल. बी. च्या परीक्षेचा पायरीसारखा उपयोग करून आपण जसें ऐन तारुण्यांत न्यायासन गांठलें, तसेंच आपल्या मुलानेंही करावें, अशी त्या करारी म्हाताऱ्याची महत्त्वाकांक्षा होती; व ती तृप्त करण्यासाठीं भगवंतरावांना

आपल्या काव्यमय आकांक्षांचा बळी द्यावा लागला. लग्नाच्या बाबतींतही असाच प्रकार घडला. वडिलांच्या हट्टामुळें स्वतःला नापसंत असलेल्या मुलीशीं कॉलेजांत असतांनाच त्यांना लग्न करणें भाग पडलें.

या दुहेरी निराशेमुळें भगवंतरावांच्या जिवाची अतिशय तडफड झाली. पण त्यांचा स्वभाव पराकाष्ठेचा जिद्दी होता. अंगावर पडलेलें कोणतेंही काम यशस्वी करून दाखवावयाचें, अशी त्यांची वृत्ति होती. त्यामुळें अनिच्छेनें पत्करलेल्या वकीलीच्या धंद्यांत त्यांनीं आपलें मन इतकें हिरीरीनें घातलें कीं, लवकरच मुंबईतील प्रमुख वकिलांत त्यांची गणना होऊं लागली; व जिचा संबंध त्यांच्यावर अनिच्छेनें लादण्यांत आला, त्या पत्नीशींही ते इतक्या व्यवस्थितपणानें वागत कीं, त्यांच्या वैवाहिक जीवनांत कांहीं वैगुण्य आहे, अशी शंकाही कधीं कुणाला आली नाहीं. पण, या साऱ्या गोष्टी कर्तव्यबुद्धीनें करीत असतांना, आपण आपल्या आकांक्षांची प्रत्यहीं पायमल्ली करीत आहोंत, ही जाणीव त्यांच्या मनांत सतत जागृत असे. त्यामुळें त्यांच्या आंतर जीवनाला एक प्रकारचा शोष लागल्यासारखा झाला. विशेषतः, त्यांच्या स्वतःच्या लग्नानंतर दोन वर्षांनीं जो प्रकार घडला, त्यामुळें तर त्यांच्या जिवाची फारच होरपळ झाली. त्यांचे धाकटे बंधु यशवंतराव यांनीं एका आप्ताच्या घरीं एका फटिग हरदासाची तरुण मुलगी पाहिली, व तिच्या रूपावर लुब्ध होऊन तिच्याशीं लग्न करण्याचा ध्यास त्यांनीं घेतला. भगवंतरावांचे वडील अर्थातच या गोष्टीला अगदीं प्रतिकूल होते. पण, स्वतःची या बाबतींत झालेली निराशा लक्षांत घेऊन, निदान आपल्या भावाचा तरी प्रीतिविवाह घडावा, या हेतूनें भगवंतरावांनीं हट्टानें तें लग्न जुळवून आणलें.

पण, दैवयोग असा होता कीं, या विवाहाचा त्यांच्या स्वतःच्या वैवाहिक जीवनावर अत्यंत विदारक परिणाम व्हावा. लग्नापूर्वी वडिलांच्या आग्रहावरून ते जान्हवीला बघण्यासाठीं गेले असतां, तिचें बुद्धिप्रधान सौंदर्य पाहून त्यांच्या मनांत तिच्याविषयीं एकदम गाढ अनुराग उत्पन्न झाला. पण त्यांनीं आपलें मन निग्रहानें आवरलें; व स्वतःशीं जितकें म्हणून निष्ठुर होणें शक्य होतें तितकें होऊन, बंधु आणि पति या दोनीही नात्यांनीं त्यांनीं आपलें कर्तव्य निष्ठेनें बजावलें. तथापि त्यांच्या मनाची तगमग मात्र दिवसेंदिवस वाढतच गेली. विशेषतः पार्वती आणि यशवंतराव यांच्या स्वभावांतील मूलभूत वैषम्यामुळें पार्वतीच्या

कलासक्त मनाचा सतत होत असलेला कोंडमारा पाहून, त्यांच्या मनाला अतिशय वेदना होत. केशवच्या जन्मानंतर त्यांच्या मनांतील तिच्याविषयींच्या बौद्धिक प्रेमाचा हा ओघ आपल्या मातेची केवळ प्रतिमाच अशा त्या मुलाकडे वळला. वस्तुतः, केशवच्या चार पांच महिने आधीं जन्मलेली त्यांची स्वतःची मुलगी ललिता ही कांहीं कमी मोहक होती, असें नाहीं. तिचा चेहरा चंद्रासारखा नव्हता किंवा डोळे कमळासारखे नव्हते, हें खरें, पण, चंद्राच्या सुषमेंतील उज्ज्वलता तिच्या गौर तनूंतून ओसंडत होती; व कमलाच्या कांत्तींतील मार्दव तिच्या अवयवांतून मुसमुसत होतें. आणि, तिच्या विलोल वृत्तींत अशी कांहीं अनिर्वचनीय जादू भरलेली होती कीं, तिला पहातांच शैशवांतील मधुर स्मृतींबरोबरच यौवनांतील अस्फुट आकांक्षा मनांत जागृत होत असत. तथापि, पत्नीविषयीं जी अढी त्यांच्या मनांत बसली होती, तिच्यामुळें त्यांना ललितेविषयीं कधींच फारसें प्रेम वाटलें नाहीं; व केशव हेंच त्यांचें एकमेव प्रेमनिधान होऊन बसलें. अशा रीतीनें त्यांच्या पोळलेल्या जिवाला जरी हा एक प्रकारचा विरंगुळा उत्पन्न झाला, तरी एका घरांत जन्म घालवूनही आपलें प्रेम कधीं सुद्धां प्रगट करणें शक्य नाहीं, या कल्पनेनें त्यांच्या मनाची अतोनात तळमळ होत असे. त्यामुळें त्यांच्या मनाला समाधान नाहींसें झालें; त्यांना निद्रानाशाचा विकार जडला; आणि मृदु भावनांची सतत होरपळ होत गेल्याकारणानें त्यांचा मूळचा कोमल आणि काव्य-मय स्वभाव हळुहळू कठोर आणि खुनशी बनत गेला. पण आपल्या हृदयांत सतत डांचणारें हें दुःख त्यांनीं कधींही कोणापाशीं व्यक्त केलें नाहीं. त्यांची रोजनिशी हाच त्यांचा एकमेव सुहृद् होता;—किंबहुना वाङ्मय स्वरूप धारण केलेलें तें त्यांचें मूर्तिमंत हृदयच होतें म्हटलें तरी शोभेल. कोणत्याही कारणामुळें त्यांचें चित्त विचलित किंवा व्यथित झालें, म्हणजे ते तिच्याशीं हितगुज करीत असत. त्यांतलाच आजचा प्रसंग होता.

तो मजकूर वाचून झाल्यावर ते खुर्चीवरून उठले; व मध्यंतरीं विझलेला चिरूट पुन्हा शिलगावून त्यांनीं येरझारा घालावयाला प्रारंभ केला. त्यांच्या मुद्रे-वरील करुणाच्या रेषा या वेळीं लुप्त झाल्या होत्या; व हृदयांत उफाळून उठलेल्या भावनांच्या धगीनें डोळे उद्दीपित झाले होते. मधून मधून ते आपल्या कपाळा-वरून किंचित् आवेशानें हात फिरवीत. जणू कांहीं, त्या क्षणीं त्यांच्या मनांत

घोळत असलेल्या कल्पनेला अननुकूल असलेले विचार ते रागानें बाजूला सारीत होते. कांहीं वेळानें ते पुन्हां खुर्चीवर येऊन बसले; व त्या जुन्या रोजनिशींतच त्यांनीं नवा मजकूर लिहावयाला सुरवात केली—

"जान्हवी, तूं आज मृत्युशय्येवर पडलेली आहेस. अशा वेळीं जर माझ्या अंतःकरणांत इतके दिवस खोल दडवून ठेवलेले विचार मी तुजजवळ व्यक्त केले, तर तें अयोग्य होईल काय ?—खचित नाहीं. कदाचित् त्यामुळें सहानुभूतीच्या अभावापायीं कोळपून गेलेल्या तुझ्या हृदयाला या शेवटच्या क्षणीं मिळाली तर शांतीच मिळेल. मनुष्य अव्यक्ताच्या उंबरठ्यावर जाऊन उभा राहिला, म्हणजे या व्यक्त आणि व्यावहारिक जगांतील नीतिअनीतीच्या आणि पापापुण्यांच्या कल्पनांच्या पलीकडे जाऊन तो पोंचतो. अशा वेळीं जर त्यानें किंवा त्याच्या सुहृदांनीं आत्मनिवेदन करावयाचें नाहीं, तर मग तें केव्हां करावयाचें ?"

इतकें लिहून त्यांनीं हातांतील पेन खालीं ठेवलें.

---

प्रकरण ३ रें

# न आवडणारा स्नेह



"आज कांहीं शाळेंत जायचा बेत नाहीं दिसत आपला ?" ललितेनें हातांतील जुगदानाशीं खेळत हंसत हंसत विचारलें; व टेबलावरील पुस्तकें त्यांत भरावयाला सुरवात केली.

"कां बुवा ? बेत नसायला काय झालं ?" केशवनें तिला उलट विचारलें; व हातांतील पुस्तक मिटून तो टेबलाजवळ येऊन उभा राहिला. त्यानें तिच्याकडे निरखून पाहिलें. त्याबरोबर त्याच्या डोळ्यांत हास्याची चमक खेळून तो तिला खट्याळपणानें म्हणाला, "आज कांहीं तरी विशेष दिसतंय; तरी म्हटलं एवढी घाई कां चालली आहे शाळेंत जायची ?—इन्स्पेक्शन आहे का ग आज ?"

ललितेनें उत्तरादाखल फक्त आपल्या नाजूक भुंवया हलविल्या; व डोळे किंचित् विस्फारित करून प्रश्नार्थक बुद्धीनें त्याच्याकडे पाहिलें. वाऱ्यानें कमळ हलल्यामुळें

त्यावरील भ्रमर क्षणमात्र उठल्यासारखे व्हावे, तशी तिच्या डोळ्यांची ती हाल-चाल केशवला वाटली; व त्यानें पुन्हा खोंचून विचारलें, “ मग ही एवढी तयारी कसली ?”

“ समजलें बरं का आतां ? माझ्या अंबाड्यांतल्या गुलाबावर डोळा दिसतोय तुझा !--आज सकाळीं मी सुमाकडे गेलें होतें;—तिनं घातला हा गुलाब माझ्या वेणींत; अन् काल माझा वाढदिवस होता ना ?—म्हणून हा अंजिरी ब्लाऊझ तिनं मला दिला.”--बोलतां बोलतां ललितेनें अंबाड्यांत अर्धवट खोंचलेलें गुलाबाचें टपोरें सपर्ण फूल झटकन काढून त्याच्यासमोर धरलें.

केशवनें त्या फुलाचा अंतःकरणपूर्वक वास घेतला; व तो तिला म्हणाला, “राहूं दे तें,—जिथलं तिथंच चांगलं दिसतं ! पण काय ग, तूं नेहमीं तुझ्या त्या नव्या मैत्रिणीची तारीफ करीत असतेस आमच्याजवळ;—पण अजून कांहीं ओळख नाहीं कधीं करून दिलीस. दृष्टीस तरी पडूं द्या तुमची ती आवडती सुमा एकदां आमच्या—”

“ करायची आहे काय ओळख करून देऊन तिची ? ती कांहीं तुमच्या त्या नाटक-कादंबऱ्यांतली शकुंतला नाहीं, महाश्वेता नाहीं, जूलियट नाहीं कीं निना नाहीं. आहे अशीच एक आपली काळी सांवळी मुलगी;-जरा हुशार आहे एवढंच काय तें !—”

“ म्हणजे ?—मी काय तिच्या रूपाच्या दृष्टीनं तिची ओळख करून घ्यावी म्हणतों वाटतं ?—”

“ नाहीं तर काय ? कोणत्याही मुलीविषयीं विचार करतांना पहिल्यांदा तुम्ही पुरुष तिच्या रूपाकडं पाहातां !”

“ बरं बुवा, तसं कां होईना !—पण काळी सांवळी असली म्हणून काय झालं ? गोरेपणांत सौंदर्य असलं, तरी तें एकदां पाहिल्यावर मन तृप्त होऊन जातं. पण नीलवर्णांत भरलेली सुंदरता इतकी गूढ आणि इतकी असीम असते कीं, जों जों तिच्याकडे समरस होऊन पहावं, तों तों तिच्यांतून रमणीयतेच्या नवनवीन ऊर्मि उसळतांना दिसतात. मनाला गुंग करून सोडणारी जी जादू संध्येच्या सुनील सुषमेंत आहे, ती कांहीं उषेच्या गालांवरील गहिऱ्या गुलाबांत खास नाहीं.

म्हणून तर निसर्गानं सगळ्या विशाल वस्तूंना नीलवर्ण बहाल केला असून, आपल्या पुराणांतून सुंदरता आणि नीलिमा यांचा मेळ घातलेला आहे. कीट्‌सचं तें सॉनेट तुला आठवत नाहीं का, लता?—Blue! 'tis the life of heaven—"

"पुरे पुरे तुझा तो कीट्‌स;—माहित आहे त्याला निळा रंग एवढा कां आवडत होता तो! येऊन जाऊन सारं शेवटीं बायकांच्या रूपावरच यायचं. जरा बोलायला सुरवात केली कीं उपमा न् अलंकार,—दुसरं कांहीं सुचतच नाहीं तुला—"

"स्त्रीजातीचा प्रभावच मुळीं असा आहे कीं, तिच्याविषयीं बोलूं लागलं, म्हणजे प्रतिभा पल्लवित होऊन मनुष्याला आपोआप काव्य सुचूं लागतं. त्याला काय करणार? शिवाय मुलींकडे पहाण्याचा आणि त्यांच्याविषयीं बोलण्याचा तर आम्हां मुलांना जन्मसिद्ध हक्कच आहे मुळीं! जीमूतवाहनाचं तें सूत्र तुला माहीत नाहीं का, ताई?–त्यानं म्हटलंय, "निर्दोषदर्शना हि कन्यका!" ज्यांच्या दर्शनांत दोष नाहीं, त्यांच्या चिंतनांत न् चर्चेत तरी दोष का असावा? अन् काय ग, तुम्ही मुली आम्हांला नांव ठेवतां, पण तुम्ही नाहीं का कधीं मुलांच्या रूपाविषयीं विचार करीत?"

"बरं बरं करतों हो;–नाहीं कोण म्हणतं?—पण आम्ही कांहीं फाजीलपणा नाहीं करीत बसत त्याच्याविषयीं. सौंदर्याविषयीं नुसता विचार करायला काय हरकत आहे? सौंदर्याचा स्वभावच मुळीं दुसऱ्याला आपल्याविषयीं विचार करायला लावण्याचा आहे. पण, तुम्ही पुरुष मुलींच्या रूपाविषयीं जेव्हां विचार करतां, तेव्हां तुमची बुद्धि कधीं तरी सरळ असते का? हें गुलाबाचं फूलच घे;–या फुलाचं सौंदर्य पाहून गुंग होणं अन् एखाद्या स्त्रीचं रूप पाहून मोहित होणं, यांत वास्तविक फरक कां असावा? सौंदर्य हें सर्व इथून तिथून सारखंच. मनाला आकर्षित करणं अन् आनंद देणं हें त्याचं कार्य. मग फुलाचं सौंदर्य पाहून जे भाव मनांत येतात, त्याच्या अगदीं उलट भाव स्त्रीचं सौंदर्य पाहून तुमच्या मनांत कां यावे? आणि तुम्हांला फाजीलपणा करण्याची बुद्धि कां व्हावी? याचं कारण एकच. स्त्रीच्या सौंदर्याविषयीं जेव्हां तुम्ही विचार करतां, तेव्हां तुमच्या

मनांत तिच्या सौंदर्यापेक्षां सुद्धां ती स्त्री आहे हीच भावना अधिक प्रबळ असते. खरोखरी, एकाद्या तरुण मुलीचं अव्याजमनोहर रूप पाहून, ज्याच्या मनांत वाईट विचार येतील, तो मनुष्य पशूच समजला पाहिजे.—" धिग् धिग् त्या कळली अगाध हरिची नाहींच कारागिरी, " हें जें तांबेकवींनीं म्हटलंय, तें अगदीं खरं आहे. दादांनीं आपल्याला शिकवलेली ती वर्डस्वर्थची कविता तुझ्या लक्षांत आहे ना ?–शेतांत कापणी करणाऱ्या मुलीला पाहून, त्या कवीच्या हृदयांत जे उदात्त विचार उचंबळून आले, तशा प्रकारचे विचार एकाद्या मुग्ध किशोरीचं सौंदर्य बघून किती तरुणांच्या मनांत येत असतील ? स्त्रीच्या सौंदर्या-कडे केवळ ती स्त्री आहे या दृष्टीनं पहाण्याचं जोंपर्यंत तुम्ही सोडीत नाहीं, तोंपर्यंत स्त्रियांविषयीं टारगटपणानं बोलण्याची तुमची संवय सुटणं अशक्य आहे. सौंदर्याविषयीं निर्मल मनानं विचार करायला पुरुषजात केव्हां शिकेल कोण जाणे !—"

" चुकीचा आहे बरं का तुमचा हा सारा कोटिक्रम, पंडिताबाई ! कवींनीं आपल्या काव्यांत भरकटून ठेवलेलीं अर्धवट सत्यं प्रमाण मानून चाललं, म्हणजे विचारांचा असा गोंधळ व्हायचाच. कवींचं काय जातं उदात्त विचारांचे नुसते फवारे उडवायला ? पण त्यांनीं आपल्या काव्यांत उधळलेलीं तीं फसवीं सत्यं आपण जरा तारतम्यानंच घेतलीं पाहिजेत. अन् कोणी सांगितलं ग तुला, सौंदर्य सारं इथून तिथून एक असतं म्हणून ?—विविधता हा तर मुळीं सौंदर्याचा आत्मा आहे. टिळक कवींनीं सृष्टीला कामरूपिणी म्हटलं आहे. पण मी तर सौंद-र्याला कामरूपी म्हणतों. फुलाचं सौंदर्य, स्त्रीचं सौंदर्य, समुद्राचं सौंदर्य, धबधब्याचं सौंदर्य, गर्द झाडीचं सौंदर्य, पर्वताच्या शिखरांचं सौंदर्य,–हीं काय सारीं एक असतात ? तसंच, कांहींचं सौंदर्य मनाला आकर्षित करीत नाहीं, तर स्तिमित करतं; आनंद देत नाहीं, तर धाक उत्पन्न करतं. तुला आठवतं का लता, आपण लोणावळ्याला असतांना तूं एकदां काय बोलली होतीस तें ? खंडाळ्याच्या सड-केवरून संध्याकाळीं फिरून परत येत असतां, अवचित सूर्याचें ऊन काळ्याभोर ढगांनीं घेरलेल्या डोंगराच्या कड्यावर पडलं. अन् तें दृश्य पाहून आईनं सहज म्हटलं, ' किती सुंदर दिसतोय हा देखावा ! ' तुझ्या ध्यानांत आहे का तूं काय म्हणाली होतीस तेव्हां तें–"

" हो, आहे ना,–ध्यानांत न असायला काय झालं? मी म्हटलं, ' मला तो देखावा पाहून कससंच वाटतं, ' म्हणून. अन् तें खरंच आहे. काळोख्या रात्रीं समुद्रावर हिंडायला जायला तुला केवढा उल्हास वाटतो ! पण अंधारांत घोंघावणारं दर्याचं तें काळंभोर पाणी पाह्यलं, म्हणजे माझ्या अंगावर शहारे येतात. एकदां मे महिन्यांत आपण कोंकणांतून परत येत असतां, तूं मला चंद्रोदय दाखवण्यासाठीं अपरात्रीं मुद्दाम उठवलंस. पण खवळलेल्या समुद्राच्या त्या भयंकर लाटा अन् बोटीच्या हेलकाव्याबरोबर तिला येऊन भिडतंसं वाटणारं तें आकाश बघून, मी अगदीं भिऊन गेलें. असले देखावे पाहून मला आनंद होत नाहीं; अन् मी त्यांना सुंदर म्हणायलाही पण तयार नाहीं. जें आनंद देत नाहीं, तें सौंदर्य कसलं?—"

" वा, मोठी अजबच आहे म्हणायची तुझी ही सौंदर्याची कल्पना ! मनांत कोमल भाव उत्पन्न करतील, तेवढ्याच वस्तु काय त्या तुझ्या दृष्टीनं सुंदर;– बाकीच्या वस्तूंना कांहीं तूं तुझ्या सौंदर्याच्या कल्पनेंत थारा द्यायला तयार नाहींस. बाकी स्त्रीस्वभावाला शोभण्यासारखीच आहे तुझी ही सौंदर्याची व्याख्या. पण ती संकुचित आहे एवढंच. मी तर म्हणतों कीं, प्रत्येक वस्तूचं सौंदर्य वेगवेगळं असतं आणि त्याचे मनावर होणारे परिणामही पण भिन्न असतात. त्या वस्तूच्या त्या निराळेपणांतच तिच्या सौंदर्याचं वैशिष्ट्य सांठविलेलं असतं. पुरुषाच्या सौंदर्यातून त्याचं पौरुष वजा करा अन् पहा मग त्यांत बघण्यासारखं काय शिल्लक राहतं तें ! भवभूतीनं केलेलं लवाचं वर्णन आपल्याला कां आवडतं? पुरुषाच्या ठिकाणीं जे गुण असावेत असं आपल्याला वाटतं, ते त्यांत लवाच्या ठिकाणीं दाखवलेले आहेत म्हणूनच ना? हाच नियम सर्व वस्तूंना लागू आहे. मग स्त्रीकडे ती स्त्री नाहीं अशा समजुतीनं पाहून कसं चालेल? स्त्रीच्या सौंदर्यातून जर स्त्रीपणा काढून टाकला, तर त्या सौंदर्याचं वैशिष्ट्यच मुळीं नाहींसं करून टाकल्यासारखं होईल. स्त्रीकडे पहावयाचं तें ती स्त्री आहे ही भावना मनांत जागृत ठेवूनच पाहिलं पाहिजे. किंबहुना तिचं तें विशिष्ट सौंदर्य पहातांच ती भावना मनांत तीव्रतेनें जागृत होते ! स्त्रींतून स्त्रीपणा काढून टाकणं म्हणजे निसर्गाच्या विरुद्ध जाणं आहे—"

" मग तुला कांहीं सुमा आवडणार नाहीं बरं आमची ! ती कीं नाहीं सफेजेट

आहे हो!—ती म्हणते, स्त्रीपणा ही पुरुषांनीं निर्माण केलेली एक कृत्रिम चीज आहे. स्त्रिया आणि पुरुष यांच्यांतला भावनांचा, रहाणीचा अन् पोषाखाचा बनावट भेद नाहींसा झाल्याशिवाय स्त्रियांचा दर्जा सुधारून त्या पुरुषांच्या बरोबरीला कधींही येणार नाहींत. तिचं म्हणणं असं आहे कीं, मतलबी पुरुष कवींनीं स्त्रीला अबला, भीरु, प्रमदा, रमणी अशीं विशेषणं देऊन जगांतले सारे मोह आणि सारीं भयं तिच्या मूर्तीला चिकटवलीं; अन् तिला पुरुषाचं निव्वळ खेळणं बनवून सोडलं आहे. पुरुषांनीं तिच्यावर स्वतःच्या सोईसाठीं बळेंच लादलेलं हें भीरुत्व, अबलत्व, प्रमदत्व तिनं झुगारून दिल्याशिवाय ती कधींच त्यांच्या बरोबरीला येणार नाहीं. आणि तूं तर म्हणतोस कीं, स्त्रीनं आपलं वैशिष्टय झुगारून देणं म्हणजे निसर्गाच्या विरुद्ध जाणं आहे;—मग तुला कशीं पटणार तिचीं तीं मतं? अन् ओळख तरी करून घेऊन काय उपयोग तिच्याशीं?" ललितेनें हंसत हंसत म्हटलें.

"वा, वा, छान सबब!—मतं पटण्याचा संभव नसला, तरी ओळख करून घ्यायला काय हरकत आहे? शिवाय तुझ्या मैत्रिणीच्या मतांत जर कांहीं तथ्य असेल, तर आम्हांला आमच्या मतांतले दोष तरी कळून येतील तिची ओळख झाल्यावर;–हा फायदा नाहीं का? माझं तर बुवा असं मत आहे कीं, निरनिराळ्या मतांच्या माणसांशीं नेहमीं बोलण्याचा योग येत गेला, म्हणजे आपल्या विचारसरणींतले दोष कळून आपल्या मतांची प्रगति होत जाते."

"बरं, बरं, व्याख्यान नको कांहीं द्यायला पुन्हा आतां या विषयावर! लवकरच देईन मी तुझी ओळख करून सुमाशीं. ती सुद्धां म्हणत होती.—पण गडे, कपडे कर ना तूं आतां आधीं. शाळेंत नाहीं का जायचं आज आपल्याला?" असें बोलून कोपाच्या लटक्या फणकाऱ्यानें तिनें त्याचीं सारीं पुस्तकें त्याच्यासमोर ठेवलीं.

"मग खरं सांगूं?—राग नाहीं ना येणार तुला, ताई? आज खरोखरीच शाळेंत जाण्याचा विचार नाहीं माझा." केशवनें गंभीरपणानें म्हटलें. "पहिल्या तीन तासांना चाट देणार आहें मी आज;—पण तुझ्याबरोबर मात्र येणार आहें तुझ्या शाळेपर्यंत—"

"कशाला?–मला एकटीला जायला काय भीति वाटते होय? शिवाय वाटलीच भीति, तर जातां जातां मी सुमाला घेईन हांक मारून माझ्या बरोबर." ललितेच्या या तुटक वाक्यांत आतां रागाची झांक स्पष्ट उमटली होती. "पण हें कांहीं ठीक नव्हे, बाबू! गणिताच्या तासांना तर तूं नेहमींच चाट देतोस; अन् आतां तर संस्कृत–इंग्रजीचाही कंटाळा आलेला दिसतोय तुला. कांहीं झालं तरी यंदां आपल्याला पास हें झालंच पाहिजे—"

"नाहीं कोण म्हणतो?—मी तर मुळीं प्रतिज्ञाच करून बसलोंय पास होण्याची," तिचें तें बोलणें थट्टेवर नेण्याच्या उद्देशानें केशव म्हणाला. "तूंच सांग,—आतांशा मी बाहेरचं वाचन बहुतेक सोडूनच नाहीं का दिलेलं? अन् तुझ्याबरोबर अभ्यासाला बसायला कधीं तरी टाळाटाळ केली आहे का मी, ताई?—"

पण ललितेचें त्याच्या त्या आर्जवयुक्त बोलण्याकडे लक्ष नव्हतें. ती स्वतः-च्याच विचारांत गर्क होती. म्हणून केशवनें पुस्तकावर टेंकलेल्या तिच्या हातावर हळूच आपला हात ठेवला. त्याबरोबर एकदम भानावर येऊन ती उद्गारली, "मला शाळेपर्यंत पोंचवून मग दुसरीकडे कुठं तरी जाण्याचा तुझा बेत आहे, बाबू,—खरं ना?"

"होय,–तुला पोंचवून मी चंद्रशेखरच्या घरीं जाणार आहें अन् तिथून नंतर मी शाळेंत जाईन. आज सुटी आहे त्याच्या कॉलेजला कुठल्याशा ख्रिस्ती संताची पुण्यतिथि असल्यामुळं;—म्हणून मीही घेतलीय सुटी थोडीशी—"

बोलतां बोलतां त्यानें किंचित् हंसून स्मिताच्या अपेक्षेनें ललितेकडे पाहिलें. पण ती अगदीं गंभीर झालेली त्याला दिसली. तेव्हां तो थोडासा ओशाळून झटकन् उठला व अंगांत कपडे घालीत तिला म्हणाला, "एकाद दिवशीं संस्कृत-इंग्रजीचे तास बुडवले, तर तो अगदीं लगेच गाल फुगवण्यासारखा गुन्हा होतो का, ताई?"

"तूं तास बुडवल्याबद्दल राग नाहीं आला मला;—पण चंद्रशेखरच्या घरीं तूं शाळा बुडवून जावंस हें मात्र मला मुळींच पसंत नाहीं. त्याचा न् तुझा स्नेह आणि त्याच्या घरीं तुझं तें नेहमीं नेहमीं जाणं;—मला वाटतं, काकीलासुद्धां या गोष्टी कळल्या तर बरं वाटणार नाहीं. तुमच्या स्नेहाविषयीं मी कांहीं बोलूं इच्छित नाहीं;—पण त्याच्या घरीं तूं जावंस हें मात्र चांगलं नव्हे, बाबू."

"कां बरं?—त्याची आई नायकीण आहे म्हणून होय? पण एकादी स्त्री नायकीण झाली म्हणजे ती काय अगदीं माणसांतून उठते? शिवाय ती नायकीण आहे यांत तिचा बिचारीचा काय अपराध? आपल्या हिंदुधर्मानं गोव्याकडल्या स्त्रियांसाठीं उत्पन्न करून ठेवलेला त्यांचा तो जन्मजात व्यवसाय आहे. अन् तिनं गाणंसुद्धां अलिकडे किती तरी वर्षं सोडलंय, हें सारं मी तुला सांगितलेलं नाहीं का? तरीसुद्धां तूं असं बोलावंस? पुरुषांनीं जर स्त्रियांविषयीं कुत्सित बुद्धीनं विचार केला, तर त्यांत फारसं आश्चर्य नाहीं. पण एका स्त्रीनं दुसऱ्या स्त्रीविषयीं अनुदारपणानं विचार करावा, याचं मात्र, लता, मला नवल वाटतं. कुलीनपणाच्या दृष्टीनं वाटल्यास चंद्राच्या आईला तुम्ही कमी लेखा. पण, माता म्हणून,—मुलाला जन्म देऊन त्याच्या सर्व शक्तींची जिवापलिकडे जोपासना करणारी आई म्हणून तिला कमी लेखण्याचा आपल्याला काय अधिकार आहे? नुसता स्त्रीपणा हा असा उपभोगाचा तसाच एक वेळ उपहासाचाही कदाचित् विषय होऊं शकेल. पण, आईपणा ही अशी गोष्ट आहे कीं, ज्याच्यापुढं सर्व जगानं कृतज्ञतेनं मस्तक नमवावं. स्त्री ही माता झाली, म्हणजे समाजाच्या ऋणांतून ती मुक्त होते;—नव्हे, समाजच उलट तिचा ऋणी होतो. आणि जिनं समाजाला ऋणी केलं, त्याची परंपरा पुढं चालू ठेवायला हातभार लावला, तिला समाजानं कमी लेखणं कृतघ्नपणाचं होणार नाहीं काय? तूं आतांच मला म्हणालीस ना ताई, कीं स्त्रियांकडे पहाण्याची पुरुषांची दृष्टि बदलली पाहिजे म्हणून?—तें तर खरंच आहे. पण स्त्रियांनींही स्वतःच्या जातीविषयीं विचार करण्याची दृष्टि बदलणं सुद्धां तितकंच जरूर आहे. तुझ्या किंवा माझ्या आईपेक्षां चंद्राच्या आईची योग्यता आपण कां म्हणून कमी मानायची? आज रूढ असलेल्या कुटुंबपद्धतीला सोडून तिचा संसार झालेला आहे एवढ्याच कारणामुळं ना? पण, तिच्या जीविताविषयीं मी जों जों विचार करतों, तों तों मला ती अधिकच आदरणीय वाटते. आपल्या मुलावरलं तिचं तें निस्सीम प्रेम पाहिलं, त्याच्यासाठीं तिनं केलेला स्वार्थत्याग लक्षांत घेतला, म्हणजे जगांतल्या साऱ्या वात्सल्याची, साऱ्या प्रेमळ भावनांची ती मूर्ति आहे, असं मला वाटतं. आणि माझ्या आई-इतकीच मला ती पूज्य वाटते. पुरुषाप्रमाणं तिला सुद्धां बेजबाबदार होतां आलं असतं. पण नाहीं;—तिनं आपली आईची जबाबदारी उत्तम रीतीनं पार पाडली.

आणि तरीसुद्धां हा अपवाद?—चंद्राला पाहिल्यावर कधीं तरी, लता, तुला वाटलंय का तो कुलीन नाहीं म्हणून? त्याच्यांत आणि माझ्यांत तूं असा काय फरक पाहिलास कीं, तुला तो माझ्यापेक्षां हिणकस वाटावा? अन् माझं त्याच्या घरीं जाणं इतकं कडू लागावं?–"

"अरे,—पण तूं इतका चिडून कां बोलतोस, बाबू? मी कधीं तरी त्याच्याविषयीं अनादर दाखवलेला तुला आठवतो का? मला काय त्याचे गुण दिसत का नाहींत? पण तरीसुद्धां त्याचा न् तुझा स्नेह मला आवडत नाहीं—"

"कां बरं? त्यांत न आवडण्यासारखं काय आहे? तूं असं अर्धवट बोलूं नकोस, लता;–त्यामुळं मागाहून फार त्रास होतो माझ्या मनाला! बोलून टाक एकदां तुला काय बोलायचंय तें." संताप आणि दुःख यांनीं केशवच्या आवाजांत यावेळीं विलक्षण आर्तता उत्पन्न झाली होती.

"नाहीं,–तें इतकं सहज बोलण्यासारखं नाहीं; अन् मला कदाचित् सांगतांही येणार नाहीं नीट या वेळीं," ललितेनें अगदीं तुटकपणानें म्हटलें. आणि, त्याला पुढें बोलावयाला संधि न देण्याच्या हेतूनेंच कीं काय, तिनें लगेच गड्याला मारून म्हटलें, "आमचीं हीं पुस्तकं न् छत्र्या घेऊन तूं नीघ;—आम्ही आ मागोमाग–"

इतकें बोलून ती लगेच खोलींतून बाहेर पडली.

---

प्रकरण ४ थें

## दोन गुरु



केशवला नको होतें तेंच संकट त्याच्यापुढें दत्त म्हणून उभें राहिलें. शेखरच्या घरून तो शाळेंत जावयाला निघाला, त्या वेळीं त्याला कल्पनाही नव्हती कीं, गुप्तेमास्तर आपल्याला वाटेंत भेटतील; व त्यांची ती पुस्तकें छातीशीं धरून चाललेली ताठर, उग्र मूर्ति दृष्टीस पडतांच, तो त्यांना चुकविण्यासाठीं एकदम रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला झाला. पण मास्तरांची दृष्टि गरुडासारखी तीक्ष्ण होती. त्यांतून केशव हा तर त्यांचा आवडता शिष्य. त्यामुळें

त्याला पाहिल्याबरोबर त्यांनीं एकदम थबकून हांक मारली, " पाध्ये, अरे पाध्ये—"

त्यांची ती कठोर हांक कानांवर पडतांच, केशव चपापून त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला; व एक शब्दही न बोलतां त्यानें विनीत दृष्टीनें त्यांच्याकडे बघितलें. त्याच्या त्या बघण्याचा अर्थ लक्षांत येऊन मास्तर स्वतःशींच हंसले. त्यांच्या सांवळ्या, गंभीर मुद्रेवरील तें हास्य काळसर ढगावर परावर्तित झालेल्या रश्मिरेषांसारखें दिसत होतें; व मनाच्या स्वाभाविक आर्द्रतेबरोबरच विवेकानें त्याला येणारी परुषताही त्यांत प्रतिबिंबित झालेली होती. त्यांनीं केशवकडे रोखून पहात त्याला विचारलें, " काय रे, आज वर्गांत दिसला नाहींस तूं मला, केशव ? अलीकडे तूं गीतेचेसुद्धां तास टाळायला लागलास—"

केशव त्यांना अत्यंत नम्रतेनें म्हणाला, " मी आज चंद्रशेखरकडे गेलों होतों. त्यामुळं उशीर झाला मला इतका—"

" त्याच्याकडे जाणं हें कारण होत नाहीं शाळेंत वेळेवर न यायला," मास्तर रले. त्यांच्या आवाजांत पुन्हां कठोरपणा डोकावला. " अन् आतां निघा- कुठं तूं ? मधली सुटी तर इतक्यांतच झाली. एव्हांपासून शाळेंत जाऊन करणार तूं ?—"

कांहीं नाहीं—" केशवनें वरमून म्हटलें.

' मग घरीं चलतोस का माझ्याबरोबर ?" मास्तरांनीं विचारलें; व त्याच्या ी वाट न पाहतां त्यांनीं चालावयाला सुरवात केली. थोडा रस्ता । गेल्यावर त्यांनीं बरोबर मुकाट्यानें येत असलेल्या केशवला विचारलें, ा म्हणत होता, चंद्रशेखर ?"

कांहीं विशेष नाहीं.—आपण तें पालबाबूंचं ' एम्पायर अँड नॅशनॅलिटी ' : वाचायला सांगितलं होतं ना त्याला,—त्याच्याचबद्दल बोलत होतों आम्ही—"

"अरे वा,—" मास्तर साश्चर्य उद्गारले. "मोठाच गहन विषय निघाला होता म्हणायचा ! अन् तूं कविता न् नाटकं सोडून या रुक्ष राजकारणांत कधीं- पासून शिरलास ? मग चंद्रा काय म्हणत होता बिपिनबाबूंच्या ' आयसोलेटेड इंडिपेंडन्स'च्या तत्त्वाबद्दल ?"

"काय म्हणणार ? त्या पुस्तकांतला साराच कोटिक्रम भ्रामक आहे असं म्हणत होता तो—"

"तुला नसेलच पटलं त्याचं तें म्हणणं." असे उद्गार काढून ते स्वतःशींच हंसले. केशवनें त्यांना कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्याच्या चेहऱ्यावर मात्र एकदम विषादाची छाया पसरली.

ते बोलत बोलत लॅमिंग्टन रोडवरील एका चाळीजवळ आले.

या चाळीच्या चौथ्या मजल्यावरील शेवटच्या खोलींत गुप्तेमास्तर राहत असत. गिरगांवांतील विद्यार्थिवर्गांत ते फार प्रसिद्ध होते. त्यांचा स्वभाव खडकाळ पण जलगर्भ जमिनीसारखा होता; व विद्यार्थ्यांच्या अनुभवाला त्यांच्या अंतर्गूढ आर्द्रतेपेक्षां दर्शनी कठोरपणाच नेहमीं जास्त येत असे. ते अतिशय बहुश्रुत आणि चिकित्सक होते; व कोणत्याही विषयावर विवेचन करितांना, विद्यार्थ्यांच्या पूर्वग्रहांना कोंपरखळ्या देऊन, त्यांची बुद्धि जागृत करणें त्यांना फार आवडत असे. मॅट्रिकच्या सर्व वर्गांचें इंग्रजी ते घेत असत. त्या वर्षी प्रवेशपरीक्षेला जेन ऑस्टीन हिची 'प्राइड ॲण्ड प्रेजुडिस' ही कादंबरी नेमलेली होती. तिच्यांतील पहिलेंच वाक्य असें आहे कीं, 'It is a truth universally acknowledged that a single man in possession of a good fortune must be in want of a good wife.'—या वाक्याचें विवेचन करितांना, त्यांनीं लग्न आणि लग्नसंस्था यांच्यावर विदारक टीका करून, हुंड्याच्या चालीनें गांजलेल्या हिंदु समाजांतच केवळ नव्हे, तर सुधारलेल्या युरोपियन समाजांतही लग्नाला कसें निव्वळ बाजारी स्वरूप आलें आहे, याची विद्यार्थ्यांना यथार्थ कल्पना आणून दिली.

केशव ज्या खासगी हायस्कुलांत जात असे, त्याच्या संस्थापकांपैकीं गुप्ते हे एक होते. कॉलेजांत असतांना रानडे-भांडारकरांचीं व्याख्यानें ऐकून, शिक्षणांत धर्माला प्राधान्य मिळाल्याशिवाय भारतीयांच्या पुनरुज्जीवनाचा मार्ग सुकर होणार नाहीं, अशी त्यांची भावना झाली; व आपल्या कांहीं मित्रांच्या सहाय्यानें त्यांनीं हें हायस्कूल स्थापन केलें. मिशनरी शाळांतील बायबलच्या वर्गाप्रमाणें

या हायस्कुलांतील पहिला तास धर्मशिक्षणासाठीं ठेवलेला असे. त्या वेळीं वर्गाचे शिक्षक बहुधा गीतेच्या कोणत्या तरी एका अध्यायांतील श्लोकावर यथाशक्ति प्रवचन करीत असत. पुष्कळदां असें होई कीं, मुलांप्रमाणें मास्तरांनाही गीतेची ओळख होण्याचा योग या शाळेंत आल्यावरच प्रथम येत असे. अर्थात् अशा मास्तरांचें गीतेवरील प्रवचन दहा पांच मिनिटांतच आटोपून, बाकीचा सारा वेळ कांहीं तरी गप्पा टप्पा छाटण्यांतच जावयाचा. एकदां तर असें झालें होतें कीं, मुलांनीं 'हा संजय कोण ?' असा प्रश्न विचारतांच, महाभारताविषयीं अगदींच अनभिज्ञ असलेल्या एका नवीन मास्तराची " मुखं च परिशुष्यति " अशी स्थिति होऊन, त्याच्या हातांतून गीतेचें पुस्तक गळून पडलें; व कुरुक्षेत्रावरील शंखनादाचा थोडासा मासला त्याला खुर्चीवर बसल्या बसल्याच अनुभवावयाला मिळाला. दुसऱ्या एका युनिव्हर्सिटीच्या चरकांतून नवीनच बाहेर पडून, वकीलीच्या अभ्यासाच्या सोईसाठीं, या शाळेंत येऊन दाखल झालेल्या मास्तराला, " या निशा सर्व भूतानाम्" या श्लोकाचें स्पष्टीकरण विचारलें असतां तो म्हणाला, " हें पहा, ज्ञानी लोकांचं असं असतं कीं, रात्रीची वेळ शांत असल्यामुळं ते रात्रभर जागून काम करतात अन् दिवसा झोंप काढतात. तुम्ही नाहीं का परीक्षेच्या दिवसांत रात्रभर जागून अभ्यास करीत ?—तसंच हें. म्हणून तर ग्रीक पुराणांत ज्ञानी माणसाला घुबडाची उपमा दिली आहे. " हें अजब भाष्य ऐकून एका वात्रट मुलानें विचारलें, " सर, माझे वडील रेल्वेंत रात्रभर ड्यूटीवर असतात. मग त्यांना मुनि कां म्हणूं नये ? "

गुप्ते मास्तर हे फक्त मॅट्रिकच्या वर्गाला गीता शिकवीत असत. शिवाय दर शनिवारीं त्यांचें सर्व शाळेसाठीं म्हणूनही एक धर्मपर व्याख्यान होत असे. या व्याख्यानांत अनेक धार्मिक आणि सामाजिक प्रश्नांचा ऊहापोह ते करीत असत. त्यांचीं सामाजिक मतें आगरकरी वळणाचीं असल्यामुळें, त्यांत विद्वत्तेप्रमाणेंच उत्कटताही ओतप्रोत भरलेली असे; व महाराष्ट्रांतील संतांनीं धर्मसुधारणेसाठीं केलेल्या प्रयत्नांचें स्वरूप विशद करितांना, ते कर्मठांवर कोरडे उडवावयाला कधींही चुकत नसत. पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेंत त्यांचें एकदां तुकारामावर व्याख्यान झालें होतें. त्या वेळीं त्यांनीं ब्राह्मण्यावर केलेली कडक टीका श्रोत्यांना इतकी झोंबली कीं, त्यांनीं व्याख्यान पुरें करण्याची तसदी मास्तरांना दिली

नाहीं; व अध्यक्षस्थान भूषित करणाऱ्या हरिभक्तिपरायणांनीं, त्यांचा तुकारामाचा व्यासंग संप्रदायशुद्ध नसल्याचा शेरा मारून, संतांच्या कामगिरीवर बोलावयाला ते अनधिकारी असल्याचें जाहीर केलें. यानंतर मास्तरांनीं पुन्हा कधीं सार्वजनिक व्याख्यान दिलें नाहीं. शिवाय, धर्माच्या प्राधान्यावर त्यांचा पूर्वीइतका कटाक्ष आतां राहिलेला नव्हता. अलिकडे समाजसत्तावादाकडे त्यांचा कल झपाट्यानें झुकत चालला होता. तथापि, हें तत्त्वज्ञान त्यांना एवढयाच पुरतें मान्य होतें कीं, समाजांत कोणत्याही प्रकारची आर्थिक वा जातीय विषमता नसावी. बौद्धिक विषमता ही निसर्गसिद्ध असल्यामुळें ती केव्हांही कायमच राहणार, असें त्यांचें मत होतें; व राज्यसूत्रें हीं सदैव बुद्धिमंतांच्याच हातीं राहिलीं पाहिजेत, असें ते नेहमीं आग्रहानें प्रतिपादित असत. गीतेंतील तत्त्वज्ञान आपल्या या विचारांना पोषक आहे अशी त्यांची समजूत असल्यामुळें, त्यांची तिच्यावरील श्रद्धा मात्र अविचलित राहिली होती; व गीतांतर्गत समाजसत्तावादावर एक ग्रंथ लिहि-ण्याच्या उद्योगांत ते या वेळीं गढलेले होते.

त्यांची खोली म्हणजे एक अव्यवस्थित ग्रंथसंग्रहालयच होतें. खिडक्या, आलमाऱ्या, टेबलें, खुर्च्या,—सारांश ज्या ज्या वस्तूवर म्हणून पुस्तकें ठेवणें शक्य होतें, त्या त्या सर्व वस्तूंवर पुस्तकांचे ढीग रचलेले होते; व त्यांपैकीं बहुतेकांवर धुळीचा थर सांचलेला होता. मास्तर नैष्ठिक ब्रह्मचारी असल्यामुळें पुस्तकें हीच त्यांची सर्व संपत्ति आणि त्यांचें सर्व सामान होतें. त्यांचें आचरण इतकें शुद्ध होतें कीं, गेल्या पंधरा वर्षांत त्यांची एकुलती एक बहीण व तिच्या मुली यांच्याशिवाय अन्य कोणत्याही स्त्रीचें पाऊल त्या खोलींत पडलेलें नव्हतें. केशव केव्हां एकटा तर केव्हां चंद्रशेखरसह अनेकदां त्या खोलींत आलेला होता. आपले विचार दुसऱ्याजवळ व्यक्त करण्याची मास्तरांना अतिशय हौस होती; व ते एकदां बोलूं लागले कीं, त्यांना कोणत्याच प्रकारचें भान राहत नसे. त्यांचें तें बोलणें म्हणजे एक प्रकारचें स्वगत भाषणच असे. केशवनें त्या उद्बो-धक स्वगताचा श्रवणानंद आजपर्यंत कितीदां तरी लुटला होता.

खोलींत प्रवेश करितांच मास्तरांनीं कपडे काढून अंगांत एक हाफशर्ट व पायांत खडावा घातल्या; आणि, आंतल्या खोलींत जाऊन स्टोवर आधण ठेवलें. नंतर ते जवळच उभ्या असलेल्या केशवकडे वळून म्हणाले, "आज वर्गांत एक

महत्त्वाचा विषय निघाला होता. हल्लीं चौपाटीवर गोऱ्या मिशनऱ्यांचीं व्याख्यानं होतात, हें माहीत आहे ना तुला ?—तिथं काल एका मिशनऱ्यानं गीतेवर व्याख्यान देतांना असं सांगितलं म्हणे कीं, गीता ही कांहीं श्रीकृष्णांनीं लिहिलेली नाहीं. त्याबद्दल एका मुलानं प्रश्न विचारला मला 'हें खरं का' ? म्हणून—"

इतक्यांत आधणाला उकळी आल्यामुळें त्यांना थोडा वेळ थांबावें लागलें. यथाविधि चहापान झाल्यानंतर, मास्तरांनीं खोलींत येरझारा घालीत पुन्हा बोलावयाला प्रारंभ केला.

"त्याच्या त्या प्रश्नाला मी काय उत्तर दिलं असेन असं वाटतं तुला ?—उत्तर अगदीं सरळ आहे. गीताच कशाला, जगांतील कोणत्याच धर्माचा आधारभूत ग्रंथ त्या धर्माचा प्रवर्तक म्हणून मानलेल्या व्यक्तीनं लिहिलेला नाहीं. सध्यां आपण वाचतों ही गीता कांहीं श्रीकृष्णाच्या तोंडची नव्हे. ती कृष्ण द्वैपायनानं म्हणजे व्यासानं रचलेली आहे. बायबल हें जसं स्वतः ख्रिस्तानं लिहिलेलं नसून, त्याच्या मृत्यूनंतर अनेक वर्षांनीं त्याच्या शिष्यांनीं रचलेलं आहे, तसाच प्रकार गीतेचाही आहे. गिरिगीता उपदेशिणाऱ्या ख्रिस्ताप्रमाणं भगवत्‌गीता रचणारा आपला हा व्यास सुद्धां कुमारीचाच पुत्र होता. किंबहुना जगांतील सर्वच धर्मप्रवर्तक हे जारज किंवा स्वतः जार होते. व्यासाच्या जन्माची कथा मोठी रोमँटिक आहे. त्याचे वडील पराशर महर्षि हे एका कोळ्याच्या तरण्या बांड मोहक पोरीवर फिदा झाले; व तिच्या पोटीं या भागवत धर्माच्या प्रवर्तकाचा जन्म झाला. त्या कोळणीनं लोकापवादाच्या भीतीनं उपजतां क्षणींच या मुलाला गंगेंतील एका बेटांत टाकून दिलं. म्हणून त्याला पुढं द्वैपायन असं नांव पडलं. मिश्रविवाहापासून होणाऱ्या संततींत दोन निरनिराळ्या जातींच्या गुणांचा कसा सुंदर मिलाफ होतो, याचा व्यास हा एक उत्कृष्ट नमुना आहे. प्राचीन काळीं ब्राह्मणांचं जीवन ध्येयमय असे. हल्लींच्या ब्राह्मणांवरून तत्कालीन ब्राह्मणांची कल्पना करणं चुकीचं होईल. आतां ब्राह्मण्य केवळ जन्मावर येऊन बसलं आहे. तपस्या आणि तत्त्वचिंतन यांच्या जोरावर प्राचीन काळीं कोणालाही ब्राह्मण होतां येत असे. ब्राह्मणाचा निरपेक्ष ध्येयवाद आणि कोळ्याचं बेडर व्यवहारचातुर्य यांचा रमणीय संगम गीतेंतील निष्काम कर्मयोगाच्या कल्पनेंत झालेला आहे. कर्तव्य अविरत करीत रहावं, पण फळाची

आसक्ति मात्र धरू नये, ही कल्पना ब्राह्मणापासून कोळणीला झालेल्या मुला-लाच सुचणं शक्य होतं. जातिवंत ब्राह्मणाला ती कधींही सुचली नसती. तो कर्मसंन्यासाच्याच तत्त्वाला उराशीं कवटाळून बसला असता. पण इथं मासे धरण्यासाठीं रोज पाण्यांत होडी घालणाऱ्या कोळ्याचं निर्भय व्यवहारचातुर्य कामाला आलं. मासे मिळोत वा न मिळोत, पाणी शांत असो वा क्षुब्ध असो, तो आपला रोज पाण्यांत होडी ही लोटायचाच. या त्याच्या बेडर कर्तव्य-निष्ठेला ब्राह्मणाच्या ध्येयवादाची जोड देऊन व्यासानं कर्मयोगाची कल्पना काढली—"

मास्तरांच्या वक्तृत्वाचा ओघ अशा रीतीनें अनिरुद्ध चालू असतां, केशवनें त्यांना हळूच प्रश्न केला, "सर, गीता श्रीकृष्णांनीं सांगितली नाहीं असं कळल्यावर तिच्याविषयींची पूज्यबुद्धि कमी होणार नाहीं काय?"

तेव्हां मास्तर आवेशानें उद्गारले, "—नाहीं; कां व्हावी? एकादा ग्रंथ जो आपण आवडीनं वाचतों, तो त्यांतील विचार आपल्याला मोहित करतात किंवा मान्य होतात म्हणून. अमूक एका व्यक्तीनं तो लिहिला म्हणून वाचतों असं थोडंच? आपला हिंदुधर्म हा ख्रिस्ती किंवा मुसलमानी धर्माप्रमाणं व्यक्तिनिष्ठ नाहीं. व्यास हा कोळणीचा मुलगा आहे हें कळल्यामुळं गीतेंतील कर्मयोगाची किंमत कां कमी व्हावी? तुला माहित नाहीं,-आपले सारेच वैदिक ऋषि हे स्वैरा-चारी—मनःपूत वागणारे होते. द्रष्टा म्हणजे सत्पुरुष नव्हे. किंबहुना तो सत्पुरुष कधींच नसतो आणि त्याच्या वर्तनांत सुसंगतीही फारशी नसते. लोक सत्पुरुष कोणाला म्हणतात?—तर समाजानीं, नीतीनीं आणि धर्मानीं युगानुयुगं चालत आलेलीं अनुशासनं मरेपर्यंत निमूटपणं पाळणाऱ्या मनुष्याला. उलट, समाजाचीं आणि नीतीचीं जीं अनुशासनं स्वतःच्या बुद्धीला पटणार नाहींत, तीं बेलाशक लाथाडून द्रष्टा आपला मार्ग काढतो. त्याचं द्रष्टेपण हें त्याच्या लोकोत्तर अव-लोकनावर आणि अनुभवांवरच अवलंबून असतं. जगांतील साऱ्या रूढ कल्पनांच्या पलीकडे जाऊन तो पहातो, म्हणूनच तो द्रष्टा. व्यास काय, बुद्ध काय किंवा ख्रिस्त काय, जगांतील सर्वच नवीन धर्मांचे आणि तत्त्वांचे प्रवर्तक फक्त स्वतःच्या अंतःकरणप्रवृत्तीला प्रमाण मानून वागणारे होते,—वाटल्यास तुम्ही त्यांना स्वैरा-चारी म्हणा. आणि, ते तसे होते, म्हणूनच त्यांना जगाला कांहीं तरी नवीन संदेश

देतां आला. सामान्य लोक ज्या नीतिनियमांनुसार आयुष्य कंठितात, ते नीतिनियम अलौकिक प्रतिभेच्या व्यक्तींना लागू करण्यांत अर्थ नाहीं. सामान्य मनुष्य ज्या समाजांत जन्माला येतो, त्या समाजांतील रूढ कल्पनांच्या कोंडींतच त्याचं मन जन्मभर अडकून पडतं. तसं द्रष्ट्याचं नाहीं. त्याचा आत्मा मुक्त असतो. आणि, तो स्वतः मुक्तात्मा असतो, म्हणूनच तो जगाला रूढ विचारांच्या बंधनांतून मुक्त करण्याचा प्रयत्न करतो. ज्या संस्कृतींत आणि ज्या समाजांत तो जन्मतो, त्यांचे पाश तोडून त्याची प्रतिभा मुक्त होते; व तिला नवीन मंत्रांचा—नवीन ध्येयांचा साक्षात्कार घडतो. व्यास हा बद्धात्मा नव्हता. तुमच्या नैतिक आणि सामाजिक कल्पनांचीं बंधनं त्याच्यावर लादणं योग्य होणार नाहीं. तो द्रष्टा होता आणि त्याच दृष्टीनं त्याच्या उक्तींकडे आणि आयुष्याकडे पाहिलें पाहिजे. एका पाश्चात्य तत्त्वज्ञान्यानं असं म्हटलं आहे कीं, प्रतिभाशाली मनुष्याची बुद्धि विकृत झालेली असते. किंबहुना बुद्धीच्या विकृतीचा अत्युच्च प्रकार म्हणजेच प्रतिभा. आणि, प्रतिभावंतांच्या या बौद्धिक विकृतींतूनच नवीन कल्पनांचा—नवीन तत्त्वांचा उदय होत असतो. पण, बौद्धिक विकृति म्हणजे तरी काय ?—तर विचारांच्या रुळलेल्या मार्गांत रखडण्याचं नाकारून स्वतंत्र स्फूर्तीनं नवा मार्ग—नवा मनु निर्माण करण्याचा उन्मुक्त बुद्धीचा प्रयत्न–"

हें त्यांचें आवेशपूर्ण व्याख्यान आणखी किती वेळ चाललें असतें, कोण जाणे. पण केशवचें अर्धें लक्ष त्यांच्या भाषणाकडे आणि अर्धें घड्याळाकडे होतें; व सुटी संपावयाला पांच सात मिनिटें उरलेलीं दिसतांच, त्यानें नाइलाजानें हळूच म्हटलें, " सर, आतां मला गेलं पाहिजे—"

त्याच्या त्या वाक्यानें मास्तरांना त्या आविष्ट स्थितींतून बाहेर काढून त्यांचें लक्ष घड्याळाकडे वेधलें. त्याबरोबर ते उद्गारले, "अरे, आतां पांच मिनिटांत कसा पोंचणार तूं वेळेवर ? मला अगोदर कां नाहीं म्हटलंस ?—बरं, आतां झपाझप जा—"

केशव ताबडतोब बाहेर पडला. त्यानें आपल्याकडून झपाट्यानें चालण्याची अगदीं शिकस्त केली. तरीसुद्धां त्याला शाळेपर्यंत पोंचावयाला पांच मिनिटें उशीर लागलाच. आपल्याला उशीर झालेला दिसतांच, केशवच्या पोटांत धस्स

झालें. कारण, या वेळीं मराठीचा तास होता; व या तासाच्या शिक्षकाची त्याच्या-वर अतिशयच गैरमर्जी होती. या गृहस्थाकडे सर्व शाळेचें मराठी सोंपविलेलें होतें. पेन्शनांत निघून या हायस्कुलांत येण्यापूर्वी तो एका मराठी शाळेचा मुख्याध्यापक होता. एवढाच काय तो त्याचा व मराठी भाषेचा ऋणानुबंध. पण, मराठी हा त्या वेळीं केवळ शाळेंत शिकवावयाचा विषय असल्यामुळें, त्याची सगळीच्या सगळीच गोणी या म्हाताऱ्या वारूवर लादावयाला शाळेच्या चाल-कांना कांहीं धास्ती वाटली नाहीं. शिकवितांना पुस्तकाच्या पलीकडे तो चुकूनही कधीं जात नसे; व विद्यार्थ्यांनीं प्रश्न किंवा शंका विचारलेलीही त्याला खपत नसे. एकदां असें झालें कीं, मोरोपंतांच्या आर्यांचा अन्वयार्थ सांगतांना 'लेख' आणि 'लेखर्षि' या शब्दांचे अर्थ या मास्तरांनीं 'लेख' आणि 'लेख लिहिणारे ऋषि' असे केले. त्याबरोबर केशवनें उठून, "हा अर्थ बरोबर नाहीं, 'लेखर्षि' या शब्दाचा अर्थ 'देवर्षि' असा होतो," असें त्यांना सांगितलें; व आपल्या या विधानाला आधार म्हणून लगेच 'अमरां'तील "आदितेया दिविषदो लेखा अदितिनंदनाः" हा श्लोक म्हणून दाखविला. मास्तरांच्या लक्षांत ताबडतोब आपली चूक आली. पण, ती सरळ कबूल न करितां त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, "तूं सांगितलास तो अर्थ बरोबरच आहे. पण मी सांगितला तसाही त्या शब्दाचा अर्थ होतो; व तोच इथं लागू पडतो." पण केशव एवढ्यावरच थांबला नाहीं. त्यानें दुसऱ्या दिवशीं आर्याभारत आणून मास्तरांची चूक सर्व वर्गासमक्ष त्यांच्या पदरांत घालून दिली. तरीही त्यांनीं आपला हट्ट कांहीं सोडला नाहींच.

केशव ज्या वेळीं वर्गाच्या दाराशीं येऊन उभा राहिला, त्या वेळीं मास्तर उप-रण्यानें आपलें तोंड पुशीत होते. त्यांची मूर्ति अशी होती कीं, मुलें त्यांना केव्हां पंतोजी, तर केव्हां 'कंझम्शन' म्हणत असत; व या दोन्ही नांवांना शोभेल असाच त्यांचा एकंदर थाट होता. डोक्यावर बनातीची काळी टोपी, अंगांत सोलापूर चेकचा आंखूड कोट व त्यावर हरदासी पद्धतीनें खालीं सोडून दिलेला उपरण्याचा गळफांस असा त्यांचा पोषाख असे. ते जितके उंच तितकेच किडकिडीत होते; व गालांचीं हाडें उंच असूनसुद्धां, भोंवतालचा प्रदेश खोल-गट असल्यामुळें, त्यांचें नाक होतें त्यापेक्षांही जास्त उंच वाटे. नाकाच्या या वाश्याच्या टोकावर जस्ती कड्यांचा चष्मा ते अशा खुबीनें ठेवीत कीं, जरूर

तेव्हां दृष्टि खालवून त्यांना त्याच्यांतून वाचतां येत असे; व ती उंचावून त्याच्या पद्धतीशिवाय जगाकडे पाहातां येत असे. ते स्वतः कधीं हंसत नसत; व वर्गातील कोणी हंसलेलें त्यांना खपत नसे. ते चुकून एकादे वेळीं उपरोधानें जेव्हां हंसत, तेव्हां पडक्या वाड्याच्या भंगलेल्या भिंताडावर चांदणें पडलें असतां तो जसा भयाण दिसावा, तसें त्यांचें तोंड दिसत असे.

केशवनें आंत येण्याची परवानगी मागतांच मास्तरांनीं आपलें सर्व शरीर मोठ्या कष्टानें वळवून त्याच्याकडे पाहिलें. त्याबरोबर त्यांच्या चेहऱ्यावर तुच्छतागर्भ हास्याच्या सुरकुत्या पडल्या; व ते उद्गारले, "आतां उदय झाला वाटतं आपला शाळेंत!—या, नाहीं कोण म्हणणार तुम्हांला?—आपलीच आहे शाळा!—

केशव आंत येऊन मुकाट्यानें आपल्या जागेवर बसला. तोंच मास्तर गरजले, "आंत यायची परवानगी म्हणजे कांहीं बसायची परवानगी नव्हे बरं कां, शिष्ट!—आज उभेच रहा तुम्ही. एरवीं तुम्हांला तास चुकवण्याचं न् वर्गांत वेळेवर न येण्याचं सुख कळणार नाहीं."

इतकें बोलून मास्तरांनीं समोर पडलेला पेपरांचा गठ्ठा सोडून, त्यांतील एक एक पेपर साभिप्राय परत करावयाला प्रारंभ केला. ते पेपर मराठी निबंधाचे होते. केशवला आपल्या पेपरच्या भवितव्याची कल्पना होती. पण त्याच्या त्या कल्पनेलाही चीत करणारा प्रकार आज घडला. इतर सर्व पेपर दिल्यावर उरलेला शेवटचा पेपर हातांत घेऊन, मास्तर मोठ्या उल्हासानें उद्गारले, "आतां एका महापंडिताचा पेपर मी वाचून दाखवणार आहें बरं कां! तुम्हांला कदाचित् माहीत नसेल कीं, आपल्या वर्गांत एक जाडे विद्वान् आहेत म्हणून. माझ्या देखील हें झांकलं माणीक आजच दृष्टोत्पत्तीस आलं! हं, ऐका तर आतां—"

असें म्हणून त्यांनीं तो पेपर वाचावयाला प्रारंभ केला.

पहिलीं चार पांच वाक्यें वाचल्यावर मास्तर उद्गारले, "कुठल्या पुस्तकावर दरवडा घालून दडपलंत हें सारं, केसोपंत? तुमच्या स्वतःच्या डोक्यांतून तर कांहीं हें बोरघाटाचं वर्णन खास निघालेलं नव्हे! हे जे जाडे जाडे शब्द न् उपमा यांत घातल्या आहेत, त्यांचा अर्थ तरी कळतो कां तुम्हांला?" इतकें बोलून त्यांनीं अत्यंत तुच्छतेनें विकट हास्य केलें.

लडिवाळपणानें म्हणतही असे कीं, " तूं आतांशा माझ्याशीं मोकळ्या मनानें बोलत नाहींस. "

अर्थात् आपल्या आजच्या दुःखांत अन्य कोणी वांटेकरी असेल किंवा होऊं शकेल, असें केशवला वाटलें नाहीं. पण, तो ज्या वेळीं दुःखानें समुद्रावर तळमळत होता, त्या वेळीं भगवंतरावांच्याही जिवाची तडफड चाललेली होती. परंतु, त्या दोघांच्या दुःखाचें कारण जरी एक असलें, तरी त्याचें स्वरूप मात्र अगदीं भिन्न होतें. भूकंपाच्या धक्क्यामुळें पुष्कळदां असा चमत्कार घडतो कीं, एका ठिकाणीं स्फटिकासारख्या शुभ्र पाण्याचें रम्य सरोवर निर्माण होतें, तर दुसऱ्या ठिकाणीं अग्निरसाचीं केवळ कारंजींच अशीं उन्हाळीं उडूं लागतात. त्याप्रमाणें केशवच्या हृदयांत ज्या दुःखानें मृदु भावनांच्या ऊर्मि उचंबळून आल्या, त्याच दुःखानें भगवंतरावांच्या अंतःकरणांत दाहक विचारांचें काहूर उत्पन्न केलें. आणि तें स्वाभाविकही होतें. केशवचें दुःख अपरिमित असलें, तरी असह्य मात्र मुळींच नव्हतें. त्या दुःखाशीं इतक्या मधुर स्मृति संलग्न झालेल्या होत्या कीं, नदीच्या प्रवाहावर धुक्याचें दाट छत पसरावें, त्याप्रमाणें त्यांच्या माधुरीचा तवंग त्या दुःखाच्या उद्रेकावर पसरून त्याला एक प्रकारची अवीट अशी गोडी आली होती. प्रेमाला आशेचें अधिष्ठान असलें, तरच त्यांतून मनाला उल्लसित करणारें मृदु भावनांचें अमृत स्रवूं शकतें. आणि, मग मृत्यूनें जरी प्रेमविषय हिरावून नेला, तरी त्याच्या चिंतनामुळें इतके मधुर भाव मनांत उद्भूत होतात कीं, त्याच्या अप्रत्यक्ष साहचर्याचा आनंद विरही जीवाला सदैव उपभोगितां येतो. उलट हताश प्रेमांत मदिरेच्या उन्मादकतेप्रमाणेंच तिची जलाल दाहकताही भरलेली असते; व त्याच्या चिंतनामुळें प्रेमिकाच्या मनांत इतक्या तीव्र भावना जागृत होतात कीं, त्यामुळें त्याच्या जिवाला एकसारखी जळजळ लागून रहाते. भगवंतरावांचें प्रेम निराशेंत जन्मलेलें होतें; व त्या निराशेची सारी भीषण कटुता त्या प्रेमाच्या प्रत्येक कलेंत सांठविलेली होती. त्यामुळें, पार्वतीच्या मृत्यूची बातमी वाचतांच, त्यांच्या हृदयांत शोकाच्या उमाळ्याऐवजीं संतापाचा आवेगच अधिक जोरानें उत्पन्न झाला.

त्या दिवशीं शनिवार असल्यामुळें, ते कोर्टांतून सुटतांच आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें प्रथम 'प्रबोधन' पत्राच्या कचेरींत जाऊन, नंतर घरीं आले

आल्याबरोबर ललितेनें त्यांना ती तार दाखविली. ती पाहून केशवप्रमाणें ते स्तिमित झाले नाहींत. पार्वतीचा मृत्यु अगदीं जवळ येऊन ठेपला आहे, याची जाणीव त्यांना, ते तिला भेटून आले त्याच वेळीं, झाली होती. इतकेंच नव्हे, तर तिची ती आसन्नावस्था पाहून त्यांना असेंही वाटलें होतें कीं, अशा स्थितींत आपण तिला सोडून जाऊं नये. पण एक प्रकारच्या मनलज्जेमुळें त्यांना तसें करण्याचा धीर झाला नाहीं. ती तार वाचल्याबरोबर त्यांच्या मनांत कोणत्या एका विकाराचा आवेग जर प्रथम उठला असेल, तर तो स्वतःविषयींच्या तिट-काऱ्याचा. नीतीच्या आणि कर्तव्याच्या भलत्याच कल्पनांना बळी पडून, आपण आजपर्यंत आपली वंचना करून घेतली, असें त्यांना केव्हां केव्हां वाटत असे; व ती तार वाचल्यावर या आत्मवंचनेच्या भावनेनें त्यांच्या मनांत इतका जोर केला कीं, त्या दुःखानें शोकाकुल न होतां उलट त्याच्या शोधक प्रकाशांत त्यांनीं आपल्या हताश जीवनाचें समालोचन करावयाला सुरवात केली. त्यामुळें त्यांचा मनस्ताप वाढतच गेला. त्यांनीं आपल्या सर्व रोजनिशा बाहेर काढल्या; व त्या नवीन दुःखाच्या दृष्टीनें आपल्या जीवनग्रंथाचीं सारीं पानें चाळलीं. मानवी जीवन ही आशा आणि निराशा यांची नृत्यभूमि आहे; व त्या भूमीवर या जुळ्या बहिणी एकमेकींच्या गळ्यांत लडिवाळपणानें हात घालून, अहर्निश नृत्य करीत असतात. त्यांच्या सलील पदक्षेपानें तुडविल्या जाणाऱ्या हृदयांना ज्या संमिश्र संवेदना होतात, त्यांनाच आपण सुखदुःखें म्हणतों; व संध्यारागांत ज्याप्रमाणें प्रकाश आणि छाया यांची मनोहर सरमिसळ झालेली असते, त्याप्रमाणें सुखदुःखांच्या समप्रमाण मिश्रणानें मानवी जीवनाला एक प्रकारची उदास माधुरी येते. परंतु भगवंतरावांचें जीवन म्हणजे केवळ निराशेची नृत्यभूमि होती; व त्यांच्या रोज-निशीचें प्रत्येक पान म्हणजे हताश हृदयाचें एकांतांतील अश्रुमोचन होतें. त्याच्या अवलोकनानें त्यांच्या हृदयाचा दाह शांत होण्याऐवजीं उलट वाढतच गेला.

त्या संतापाच्या भरांत त्यांना केशवची आठवण झाली नाहीं; वेळेचें भान उरलें नाहीं; किंवा आपल्या आवडत्या चिरुटाचेंही स्मरण झालें नाहीं. सर्व रोजनिशा चाळून झाल्यावर ते उठले; व मनाला अतिशय थकवा आल्यासारखा वाटल्या-मुळें, खिडकीशेजारीं ठेवलेल्या कोचावर येऊन पडले. या वेळीं बाहेर वारा जोरानें वहात होता; व त्याच्या झोतावरोबर पावसाचे थेंब आंत येत होते.

त्या वाऱ्याच्या गार झुळका मस्तकाला लागतांच, त्यांच्या संतापाचा आवेग कमी होऊन, त्यांच्या मनांत कोमल भावनांची हालचाल सुरू झाली. इतका वेळ त्यांनीं फक्त स्वतःच्याच जीवनाच्या दृष्टीनें पार्वतीच्या मृत्यूचा विचार केला होता. पण, आतां खुद्द तिचेंही जीवित किती निराशामय होतें, याची आठवण होऊन त्यांचें सहानुभवी हृदय अनुकंपेनें भरून आलें; व त्यांचा सारा संताप त्या सानुकंप शोकांत विरघळून गेला. अखेर ते कोचावरून उठले; व त्या रोज-निशींतील एक रोजनिशी उघडून, तींत लिहावयाला त्यांनीं प्रारंभ केला.

"तुझ्या मृत्यूनें माझ्या भावमय जीवनाची आज अखेर झाली आहे. फूल बागेंत कुठें फुललेलें आहे हें जरी दिसलें नाहीं, तरी त्याच्या परि-मळानें वातावरण दरवळून जावें, त्याप्रमाणें तुझ्या सान्निध्याच्या कल्पनेनें माझ्या वठलेल्या जीवनाला माधुरी आली होती. ती माधुरी आतां काय-मची लुप्त झाली आहे. गेलीं पंधरा वर्षें तूं किती दारुण मनस्ताप सोस-लास, याची मला जाणीव आहे. जान्हवी, आपण समदुःखी होतों. पण, योगायोग असा होता कीं, या दैवदलित हृदयाला नुसतें निवेदनाचें सुद्धां समाधान लाभूं नये. तुझी स्मृति हाच यापुढें मला चिरंतन विसांवा होऊन बसेल."

इतकें लिहून झाल्यावर भगवंतराव पुन्हा कोचावर येऊन पडले. रोजनिशीशीं हितगुज केल्यामुळेंच कीं काय, त्यांचें मन आतां अगदीं शांत झालें होतें. त्यांनीं चिरूट शिलगावला व ललितेला हांक मारली.

त्याबरोबर ती आंत आली. तिला पाहतांच कोचावरून किंचित् उठल्यासारखें करून ते म्हणाले, "बाबू काय करतोय ग ?"

"आतांच बाहेरून आला––आंघोळ करतोय," ललितेनें सांगितलें. नंतर किंचित् घुटमळल्यासारखें करून तिनें हळूच विचारलें, "दादा, तुम्ही स्नानाला उठतां ना ?"

तिच्या त्या प्रश्नाचा रोंख ओळखून भगवंतराव म्हणाले, "हें बघ, मला कांहीं आज जेवायचं नाहीं. तुम्ही जेवून घ्या आतां लवकर.–पण बाबूला पाठव बरं जरा इकडे––"

ललिता परत फिरली. त्याबरोबर भगवंतरावांनीं उठून दिवा अगदीं कमी केला; व ते खिडकीजवळ येऊन बाहेर पहात उभे राहिले.

इतक्यांत त्यांना कोणीतरी आंत येऊन उभें राहिल्यासारखें वाटलें. म्हणून त्यांनीं हांक मारली—

—'बाबू'

आपल्या डोळयांत या वेळीं उभे असलेले जे अश्रु भगवंतरावांनीं मोठ्या निग्रहानें आवरले होते, त्यांतील सारी आर्द्रता त्या हांकेंत ओतप्रोत भरली होती.

त्या हांकेंतील कंप केशवच्या अगदीं काळजाला जाऊन भिडला व त्याला जोराचा हुंदका आला.

त्याबरोबर भगवंतरावांनीं पुढें होऊन त्याला जवळ घेतला; व कांहीं तरी बोलावें एवढ्याच भावनेनें ते म्हणाले, "बाबू, बाळ असं काय करतोस ?—तूं समजुतदार आहेस—"

पुढें बोलणें त्यांना अशक्य होऊन ते कोचावर येऊन बसले.

आणि केशवही तिथें उभें राहणें योग्य नाहीं असें वाटून परत फिरला.

त्या रात्रीं त्यांचें जेवण अगदीं मुकाट्यानें झालें. केशवच्या मनाचा क्षोभ आतां पुष्कळच कमी झालेला होता; व ललितेशीं बोलण्याचीही त्याची उत्कट इच्छा होती. पण, आपण होऊन बोलावयाला आरंभ करावा, असें मात्र त्याला वाटेना. उलट, ललितेला आपण काय बोलावें हें न सुचल्यामुळें, तीही कांहीं बोलली नाहीं.

जेवण आटपल्याबरोबर, डोक्यावर थंड पाण्याचा शिडकावा करून, केशव आपल्या अभ्यासाच्या खोलींत आला. संध्याकाळीं घरांतून बाहेर पडल्यापासून आतांपर्यंत त्यानें त्या खोलींत पाऊल ठेविलेलें नव्हतें. पण आतां तींत प्रवेश करितांच त्याच्या हृदयांतील दबलेलें सारें दुःख पुन्हा चाळवलें. त्या खोलींत अशी एकही वस्तु नव्हती कीं, जिला पार्वतीचा हात लागलेला नव्हता किंवा जिच्याशीं तिची स्मृति संलग्न झालेली नव्हती. वैधव्य आल्यानंतर तिनें आपलें सारें आयुष्य तिथें कंठिलेलें होतें. तिचा लाडका दिलरुबा, तिचा आवडता फोनो, तिच्या नित्य पाठांतलें उत्तररामचरित, तिला प्रिय असलेल्या पुस्तकांचा संग्रह, तिनें गुरुस्थानीं

मानलेल्या रामकृष्ण परमहंसांचें भव्य तैलचित्र,—सारांश त्या खोलींतील प्रत्येक वस्तूंत तिची अभिरुचि आणि आकांक्षा व्यक्त झालेल्या आहेत, असा भास त्याला झाला; व खिडकींतून आंत डोकावणाऱ्या चमेलीच्या शुभ्र फुलांनीं आपल्या मंद नर्तनानें तिच्या अपत्यनिरपेक्ष वात्सल्याची स्मृति त्याच्या हृदयांत जागृत केली. याच खोलींत बसून भारतीय वीरांच्या रोमहर्षण कथा त्यानें तिच्या तोंडून कितीदां तरी अतृप्त मनानें ऐकिल्या होत्या; व इथेंच, तिनें वाजविलेला दिलरुबा बिछान्यावर पडून ऐकत असतां, त्याच्या संगीतलहरींनीं गुंगून जाऊन त्यानें कितीदां तरी न कळत स्वप्नभूमींत प्रवेश केला होता. आतां तिची ती मूर्ति, तें संगीत आणि तें संभाषण यांना आपण कायमचे मुकलों, असा विचार त्याच्या मनांत आला; व त्याचे डोळे पुन्हा अश्रूंनीं भरून आले.

तो आंत आल्याबरोबर खुर्चीवर बसला. टेबलाच्या उजव्या हाताला असलेल्या काळ्याभोर सुंदर बदामाकृति मेजावर ठेविलेल्या दिव्याचा झगझगीत प्रकाश त्याच्या तोंडावर पडला होता; व त्याच्या दोन्ही डोळ्यांच्या कडांवर अश्रुबिंदु येऊन थबकलेले दिसत होते. तो खोलींत येऊन बसतो न बसतो, तोंच ललिता हळूच आंत आली; व समोर असलेल्या खुर्चीच्या कमानीवर हात टेकून स्तब्ध उभी राहिली. तिच्या डोळ्यांतील सारा आनंद या वेळीं लुप्त झालेला असून, ते किंचित् आरक्त आणि फुगीर दिसत होते. खुर्चीच्या शेजारीं येऊन उभें राहिल्याबरोबर, तिनें आपलें अंग किंचित् शहारल्यासारखें करून, तोंडावर झेंप घालणारे मोकळे केंस दोन्ही हातांच्या अंगुलींनीं मागें सारले; व केशवच्या चिंतनमग्न मुखावर आपली दृष्टि स्थिर करून, ती अगदीं मंद मृदु आवाजांत म्हणाली, " बाबू—"

केशवनें दचकून वर पाहिलें, पण तो कांहींही बोलला नाहीं.

तेव्हां ललितेनें हळूच विचारलें, "तुला राग तर नाहीं ना आला माझा ?—"

" कां बरं ? मी कशाला रागावेन तुझ्यावर लता ?—"

" तसं नाहीं रे,–मी मघांशीं तार टाकून तशीच गेलें;–पण मी तरी काय करूं ?–मला कांहीं सुचेच ना—"

केशवनें यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. क्षणभर थांबून तिनें पुन्हा बोलावयाला प्रारंभ केला.

" बाबू, आपण जर या वेळीं तिथं असतों, तर किती बरं झाल असतं !— पण तूं नको म्हणालास म्हणून राह्यलं. "

भाषणाचा रुद्ध झालेला ओघ पुन्हा कसा तरी सुरू करावा, एवढयाच केवळ हेतूनें ललितेनें हे शब्द उच्चारिले होते. पण त्याचा परिणाम मात्र विपरीत झाला. केशवचें इतका वेळ आंतल्या आंत गदमदत असलेलें दुःख, तिचे ते शब्द कानांवर पडतांच, एकदम अश्रुधारांच्या रूपानें बाहेर पडलें; व लगेच तोंड लपविण्यासाठीं त्यानें आपलें डोकें टेबलावर टेंकलें. त्याबरोबर ललिता झटकन पुढें आली; त्याचें मस्तक तिनें वर उचललें; व त्याच्या तोंडावर आलेले केंस मागें सारून, तिनें एकदम त्याच्या कपाळाचें चुंबन घेतलें.

तीं दोघें त्या स्थितींत फार तर अर्ध क्षण असतील. तिच्या मृदुलोष्ण ओंठांचा सांद्र स्पर्श केशवच्या थंड कपाळाला जाणवतांच, तो भानावर आल्यासारखा होऊन, आपल्या खांद्यावरील तिचे लुसलुशीत हात त्यानें आपल्या हातांत घट्ट धरले; व ते आपल्या दोन्ही डोळयांवर ठेवून, तो हुंदके दाबीत उद्गारला, " लता, आतां मला या जगांत कसलाही आधार उरला नाहीं—"

ललितेचे हात त्याच्या आंसवांनीं भिजून चिंब झाले होते; व तिच्या स्वतःच्या डोळयांतील अश्रु एकसारखे त्याच्या केंसांवर पडत होते. तिनें हळूच आपले हात त्याच्या डोळयांवरून काढून घेतले; व अत्यंत प्रेमानें त्याच्या विस्कटलेल्या केंसांवरून हात फिरवीत ती म्हणाली, " असं कां बरं म्हणतोस, बाबू ? निदान मी असतांना तरी तूं असं बोलूं नयेस—"

केशवनें तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घट्ट धरले; व आपली साश्रु दृष्टि तिच्या स्निग्ध दृष्टींत मिळविली. चंद्र या वेळीं पुष्कळच वर आला होता; व पूर्वेकडील आकाश आतां बहुतेक निरभ्र झालेलें असल्यामुळें, त्याचे हंसरे किरण खिडकींतून आंत आले होते.

## प्रकरण सातवें

# मानलेली बहीण



ललितेनें तें पत्र कितीदां तरी वाचलें असेल. पण तिच्या मनाचें समाधान म्हणून होईना. गांभीर्याची गर्द छाया तिच्या तोंडावर पसरली होती; व डोळयांत येणारे अश्रु आवरण्याचा प्रयत्न केल्यामुळें, तिच्या पापण्या दंवानें भिजलेल्या सूर्यफुलाच्या कोमल केसरांसारख्या दिसत होत्या. ती पुनःपुन्हा त्या पत्राकडे पाहून उसासे टाकीत होती. तिच्या एका हातांत तें पत्र होतें; व दुसऱ्या हाताच्या तळव्यावर गाल टेकून ती कोचावर अर्धवट रेलली होती. तोंडाचा भार सहन करावा लागल्यामुळेंच कीं काय, तिच्या हाताचा तो नाजुक तळवा आणि कोचाच्या हातावरून एक पाय अधर सोडल्यामुळें साडीच्या जरीकांठी चुण्यांनीं लपेटलेलें तिचें गोरेंपान नितळ पाऊल इतकें लाल दिसत होतें कीं, नुकत्याच फुललेल्या गुलाबाचा रक्तिमा त्याच्यापुढें फिका पडला असता. सूर्य या वेळीं मावळण्याच्या बेतांत होता; व त्याच्या मंदारुण प्रभेचे लोट खिडकींतून आंत आले होते. त्या गुलाबी प्रकाशांत अस्मानी साडी नेसलेल्या त्या किशोरीची उदास मूर्ति पाहून, अभ्रखंडावर आरूढ झालेली साक्षात् संध्याबालाच इथें अवतीर्ण झाली आहे कीं काय, असा भास कोणालाही झाला असता.

तिनें पुन्हा एकवार वाचण्यासाठीं म्हणून तें पत्र समोर धरिलें. इतक्यांत तिच्या अर्धोन्मीलित नेत्रांतून खळकन दोन अश्रुबिंदु तिच्या गालांवर पडले. ते पुसून ती पत्र वाचावयाला प्रारंभ करणार, तोंच पांढऱ्या चांफ्याच्या कळयांसारख्या चिमुकल्या, गोंडस बोटांनीं आपले डोळे झांकण्याचा प्रयत्न होत असल्याचें तिला कळून आलें. त्याबरोबर, मनाच्या तशा त्या उद्विग्न अवस्थेंतही, वात्सल्यमिश्र अशा आनंदानें उल्लसित होऊन ललिता उद्गारली, "ओळखलं, ओळखलं बरं;— कुमा, कुमा,—अग लबाडे, बरी सांपडलीस ! नेहमीं म्हणत असतेस नाहीं का, तुला पापा देणार नाहीं म्हणून ?—आतां बघ—"

असें म्हणत, कोचाच्या पाठीवरून आपल्या अंगावर झुकलेल्या त्या बालिकेचे हात डोळ्यांवरून काढून, ललितेनें आपल्या ओंठावर ते अगदीं हळूच दाबले; व

झटकन तिला आपल्या मांडीवर घेऊन, तिच्या केसांचे, कपाळाचे, डोळ्यांचे आणि गालांचे पटापट मुके घेतले. ते इतके कीं, त्या गोड जुलमाचा प्रतिकार करण्यासाठीं, कुमुदनें अखेर तितक्याच गोड लडिवाळपणानें आपले दोन्ही हात तिच्या तोंडावर ठेवून, हंसत हंसत तिला मागें ढकलण्याचा प्रयत्न केला; व अद्यापपर्यंत कौतुकानें तें दृश्य पहात कोचाच्या मागें उभ्या असलेल्या व्यक्तीला उद्देशून ती म्हणाली, "अत्ता, अत्ता, ताई ललत होती बलं ता द ?"

त्याबरोबर ललिता तिच्यासह कोचावरून उठत उठत कोपाच्या आविर्भावानें म्हणाली, "अग लवाडे, दुसऱ्याच्या डोळ्यांत बोटं खुपसून, पुन्हा आणखी वर ताई रडत होती म्हणून साळसूदपणानं सांगतेस कां ? थांब,—तुला मुळीं आज आतां मी इथंच ठेवून घेतें; अन्—"

पण, तिचें तें वाक्य पुरें होण्यापूर्वीच, कुमुदनें आपल्या आक्काकडे पहात मोठ्या ऐटीनें म्हटलें, "तशी थेवतेस बधूं बलं ? मादी अत्ता आहे ना माद्या बलोबल;—ती नाई मला घेतल्याशिवाय जानाल ?—थलं ना द अत्ता ?

"माहिती आहे तुझी अक्का ! मी तुझ्या अक्काला सुद्धां ठेवून घेणार आहे आज इथं.—मग काय करशील ग ?" ललितेनें तिचा गालगुच्चा घेत तिला हंसत हंसत विचारलें. पण नंतर लगेच ती थोडी गंभीर होऊन म्हणाली, "किती दैववान् आहेस तूं सुमा ?"

"असं कां बरं बोलतेस तूं, ताई ? देवानं तुला काय कमी दिलं आहे तर तूं असं म्हणावंस ? अग, आम्ही किती झालं तरी पोरक्या मुली;—आईशिवाय दुसरं कोण बरं आहे आम्हांला जगांत ?"

"अग पुष्कळ दिलं आहे;—मी कुठं नाहीं म्हणतें ? पण मला कीं नाहीं धाकट्या भावंडाची लहानपणापासून फार हौस. पण नशिबीं हवं ना ? माझ्या पाठीवर मुळीं मूलच झालं नाहीं; अन् बाबूच्या साऱ्या बहिणी लहानपणींच गेल्या. तुझ्या या कुमाला पाहिलं कीं नाहीं—" बोलतां बोलतां ललितेच्या आवाजांत कंप उत्पन्न होत गेला.

"पण कुमा तरी तुझी बहीणच नाहीं का, ताई ? माझ्यापेक्षां तुझाच लळा तिला जास्त आहे. बहीण व्हायला काय एका आईच्या पोटीं थोडंच जन्माला

यावं लागतं ?—" इतकें बोलून सुमति तिच्या अगदीं जवळ गेली; व अत्यंत प्रेमानें आपला एक हात तिच्या खांद्यावर ठेवून म्हणाली, "पण ताई, आम्ही आलों, त्या वेळीं तूं एवढी कोणत्या विचारांत गढली होतीस ग ?"

तिचा तो अनपेक्षित प्रश्न ऐकतांच ललिता किंचित् गोंधळली. पण लगेच तिनें हंसून उत्तर दिलें, "तसं कांहीं विशेष नाहीं ग; आतांशा काकी गेल्यापासून कीं नाहीं संध्याकाळच्या वेळीं मला अगदीं उदास आणि कसंसंच वाटतं—"

सुमतीनें आपली भेदक दृष्टि तिच्या दृष्टींत मिसळली; व तिच्याकडे टक लावून पहात ती म्हणाली, "अशा उत्तरानं का माझं समाधान होणार आहे, ताई ? तूं कांहीं म्हण गडे, पण तुला आज कांहीं तरी होतंय,—तुझ्या मनाला कीं नाहीं कांहीं तरी टोंचतंय;—तुला सांगायचं नसलं तर सांगूं नको गडे,—माझा आग्रह नाहीं;—पण असल्या बोलण्यानं कांहीं मी फसायची नाहीं—"

"थांब जरा; मी कीं नाहीं हिला आईजवळ देऊन येतें. म्हणजे बाईसाहेबांचं सारं यथास्थित होऊन, त्या अगदीं खूष होऊन जातील." असें हंसत हंसत बोलून ती कुमुदसह आंत गेली.

ती गेल्यावर सुमति खिडकीजवळ येऊन उभी राहिली. चंद्राची कोर या वेळीं पश्चिमेच्या क्षितिजावर तळपत होती. आकाशांत, गर्द म्हणतां येतील असे, ढग फारसे नव्हते. पण तांबूस अभ्रांची अगदीं विरविरीत झालर क्षितिजावर पसरली होती. त्यांच्या त्या नीलारुण पार्श्वभूमीवर ती चंद्राची कोर, तिचा शुभ्रपणा लुप्त होऊन, पाचूच्या फिक्या खड्याप्रमाणें लखलखत होती; व तिच्या जवळच असलेला शुक्राचा तारा टपोऱ्या, तेजस्वी मोत्यासारखा दिसत होता.

चंद्रकलेची ती क्वचितच दिसणारी शोभा पहाण्यांत सुमति निमग्न झाली होती. ललितेच्या मानानें ती कृश होती; व तिचा वर्ण काळ्यांतच मोडण्यासारखा होता. पण, तिचा बांधा इतका कमनीय होता आणि अंगकांति इतकी सतेज होती कीं, एकदां पाहिल्यावर तिच्या सांवळ्या मूर्तीचा विसर पडणें शक्य होत नसे. तिच्या या विलोभनीय रूपविशेषामुळें कॉलेजांतील तरुण विद्यार्थ्यांत ती 'श्यामला' या नांवानें प्रसिद्ध होती; व चौपाटीवर जेव्हां ती ललितेबरोबर सायंकाळीं फिरावयाला जात असे, तेव्हां ते 'या पहा आल्या सख्या-पार्वत्या' असे उद्गार

त्यांच्याविषयीं आपसांत रसिकतेनें काढीत असत ! तिचे डोळे विशाल आणि बुद्धिप्रभ होते; व कृष्णपक्षांतील रात्रीचा, तारकांच्या मंद तेजामुळें मधुर वाटणारा, गभीर नीलिमा त्यांत सांठविलेला होता. तिच्या ओठांच्या किंचित् आंत मुरडलेल्या नाजूक पाकळ्या तिच्या निग्रही स्वभावाची साक्ष देत असत.

क्षितिजावरील तें रमणीय दृश्य पाहाण्यांत ती इतकी मग्न झालेली होती कीं, ललिता दिवा घेऊन खोलींत आल्याचें तिला बिलकुल समजलें नाहीं. वाऱ्याच्या स्रोतानें तिचे केंस मागें उडत होते; व पदरही खांद्यावरून ढळून खालीं आला होता. पण तिला कशाचेंच भान नव्हतें. अंशतः क्षितिजाची शोभा पहाण्यांत, अंशतः विचारांत आणि अंशतः कांहीं तरी गुणगुणण्यांत ती या वेळीं गर्क झालेली होती. ललितेनें हळूच तिच्या मागून येऊन तिच्या खांद्यावर हात ठेविले. त्याबरोबर तिच्याकडे पाहून सुमतीनें अत्यंत मधुर असें स्मित केलें. त्या स्मितामुळें, कानांतील कुड्यांच्या मोत्यांचे किरण पडून आधींच उजळलेल्या गालांवर, शुभ्र दंतपंक्तीची प्रभा पसरून, तिच्या मुखमंडलावर अवर्णनीय अशा चारुतेचे तरंग उठले. तिच्या त्या स्मितांत प्रेम, अनुकंपा आणि उत्कंठा यांच्या छटा मिसळलेल्या होत्या.

ललितेनें तिला विचारलें, " का ग ? कसला विचार करित होतीस एवढा ?"

"तसं विशेष कांहीं नाहीं. तुझ्याविषयींच विचार करित होतें;—म्हटलं आमच्या ताईच्या मनाला आज बोंचतंय तरी काय एवढं ?—"

पण, तिनें फिरून काढलेला तो विषय टाळण्याच्या उद्देशानेंच कीं काय, ललितेनें तिला म्हटलें, " सुमा, कांहीं तरी म्हणून दाखव गडे तूं आज;—मला कीं नाहीं कसं सारखं उदास उदास वाटतंय—"

" काय म्हणूं ?—तूं सांग ना ? "

" तुला काय वाटेल तें म्हण. कसलंही गाणं असलं, तरी तें तुझ्या गळ्यांतून बाहेर पडलं म्हणजे गोडच वाटतं. "

सुमति लगेच पेटीजवळ जाऊन बसली; व तींतून इष्ट सूर निघतांच तिनें अत्यंत एकाग्र चित्तानें पुढील पद म्हटलें—

पसरे चोंहिकडे गंध तरूंचा ।
गंध न ज्या मनुजकराचा
मनुजोच्छ्वासाचें ज्या नच वारें ।
स्वच्छंदें वाहति वारे
परकी असती जे मनुजरवांना ।
पक्षी ते गाती गाना
धरणी मनुजाच्या स्पृष्ट न पायीं ।
नभ सौधीं खंडित नाहीं
वन हें पाचूचें रत्न धरेचें ।
संस्कारें भ्रष्ट न साचें ।

तिच्या मुखांतून बाहेर पडणाऱ्या संगीतलहरींनीं त्या खोलींतील वातावरण भरून जाऊन, विरागाचे सकरुण असे सूक्ष्म तरंग त्यांत उठले. तिचा आवाज मंजुळ तर होताच. पण, त्यांत अशी कांहीं एक झार होती कीं, जिच्यामुळें तिच्या कंठांतून निघणारे आलाप करुणाला अनुकूल असे कोमल भाव अंतःकरणांत जागृत करित असत. गात असतांना तिची शुद्ध इतकी हरपली होती कीं, त्या गीताच्या कल्लोळांत तिचें देहभान विरून गेल्यासारखें दिसत होतें; व केवळ आंतरिक प्रेरणेनें तिचीं बोटें त्या पेटीच्या पट्ट्यांवरून तरलतेनें फिरत होतीं. आणि तिचे ते सोत्कंठ नेत्र !—त्या नेत्रांत ती गात असलेल्या गीतांतील सारे व्यक्त आणि सूचित भाव प्रतिबिंबित होऊन, मार्दवपूर्ण अशी एक प्रकारची विलक्षण आकर्षकता त्यांत उत्पन्न झाली होती.

ललिता अगदीं तन्मय होऊन ऐकत होती. तिचे कान तें गीत ऐकण्यांत आणि डोळे सुमतीच्या नेत्रांतील भावतरंग निरखण्यांत गुंग झाले होते. पद पुरें होतांच, भानावर येऊन, सुमतीनें तिच्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें. तेव्हां ललिता तिला म्हणाली, " उगाच म्हटलंस तूं हें पद, सुमा ! त्यानं माझ्या मनाचा उदासपणा कमी होण्याऐवजीं उलट तो वाढला मात्र. मनुष्यजातिविषयींच्या तिटकाऱ्याशिवाय या पदांत दुसरं काय भरलेलं आहे ग ?—"

" असं कसं म्हणतेस तूं, ताई ? वनवासांतील स्वतंत्रतेच्या सुखांचं किती सुंदर वर्णन केलं आहे त्या पदांत ? "

"पण मी तरी कुठं नाहीं म्हणतें ? अग, किती झालं तरी कोल्हटकरांचं पद तें;—तें सुंदर असायचंच. पण ज्या सौंदर्यामुळं मनांत उदास विचारांचं उधाण उचंबळून येतं, तें सौंदर्य काय कामाचं ? संसारांतल्या दुःखांचा विसर पडून मनाला थोडा तरी विसांवा मिळावा, म्हणूनच आपण सुंदर वस्तूंकडे वळतों ना ? अन् त्या सुंदर वस्तु पाहून सुद्धां जर मनांत दुःखाचे उमाळे येऊं लागले, तर मनुष्यानं मग जगायचं तरी कसं ? कलावंतांचा जन्म काय जगाच्या दुःखांत भर घालण्यासाठीं का आहे ? मानवी जीवित हें जात्याच मुळी आर्धी दुःखमय. कवींनीं त्या दुःखांत भर घालायची कीं त्याचा भार कमी करायचा ? व्यवहारांत मनुष्य पदोपदीं इतक्या ठेंचा खात असतो कीं, निदान कल्पनेच्या सृष्टींत तरी त्याचं पाऊल गुलाबांच्या गालिच्यावरच पडलं पाहिजे. या अपूर्ण जगाला पूर्णता देण्यासाठींच कलावंतांचा अवतार आहे ना ? मग कवींच्या सृष्टींत तरी गुलाबाला कांटे नसावेत, चंद्राला कलंक नसावा, स्त्रीला वैधव्य नसावं, सौंदर्याला विनाश नसावा आणि प्रेमाला निराशा नसावी. मला कीं नाहीं उदास वस्तु आणि उदास विचार अगदीं आवडत नाहींत. अन् या असल्या वेळेला तूं हें पद निवडलंस ? मला केव्हां केव्हां असं वाटतं कीं, बाबूप्रमाणं तुलासुद्धां सुमा, उदास विचारांत रमण्याचं वेडच आहे-"

"पण यांत आमचा तरी काय दोष ? ताई, मनुष्य हा परिस्थितीनं बनत असतो. मी ज्या परिस्थितींत वाढलें, त्या परिस्थितींत जर तूं वाढली असतीस, तर तुझ्या मनांत सुद्धां उदासीनतेनं कायमचं ठाणं दिलं असतं. अग, बाबांनीं रोज संध्याकाळीं दारू पिऊन यावं अन् एवढया तेवढया कारणावरून आईच्या अंगावर हात टाकावा, हें पहाण्यांत माझं सारं बाळपण गेलं. त्यांना एवढा थोरला पगार असून, केवळ त्यांच्या व्यसनीपणामुळं औषधपाणी वेळेवर पोचलं नाहीं, म्हणून माझीं लहानीं भावंड गेलीं. अन् ते वारल्यावर, आई कोनांतली बाळंतीण असतांना तिला घराबाहेर काढून, काकांनीं आमचं होतं नव्हतं तें सारं लुबाडण्याचा घाट घातला होता. काकांच्या या कसाबकरणीमुळं बाबांना मरून पुरते सहा महिने झाले नाहींत, तोंच आईला शाळाखात्यांत नोकरी धरावी लागली. आमची आई जर शिकलेली नसती, आणि जनलज्जेच्या भलत्याच कल्पनांना बळी न पडण्याचं धैर्य जर तिनं दाखविलं नसतं, तर आज आमचे

हाल कुत्रा खाता ना! आईच्या डोळ्यांतून अहोरात्र वाहणाऱ्या आंसवांच्या पाण्यावर माझ्या साऱ्या भावनांची जोपासना झाली आहे. ताई, ताई, तुला कल्पना नाहीं ग;—अंतःकरणांतल्या मृदु भावना जर बाळपणीं बेसुमार दुखावल्या गेल्या, तर मनुष्याच्या मनाला उदास विचारांचं कायमचं ग्रहण लागतं; अन् दुर्दैवाच्या अवकळेची मनावर एकदां पडलेली ती दुष्ट सांवली जगांतला कोणताही आनंद मग पूर्णपणं दूर करूं शकत नाहीं—"

बोलत असतांना सुमतीचा आवाज प्रत्येक वाक्यागणिक सारखा चढत होता; व कांहीं क्षणांपूर्वी मृदुतेचें माहेरघर बनलेले तिचे ते डोळे आतां आवेशानें विस्फारित होऊन, संतापाचे स्फुलिंग त्यांतून बाहेर पडतात कीं काय, असें वाटत होतें. तिचें बोलणें पुरें होतांच, तिला काय वाटलें कोणाला ठाऊक, ती एकाएकीं खुर्चीवरून उठून ललितेच्या जवळ आली; व तिचे दोन्ही हात आपल्या हातांत धरून तिनें तिला अत्यंत प्रेमानें म्हटलें, "तुला लागावं म्हणून नाहीं बरं बोललें मी हें ताई;—तूं म्हणालीस म्हणून माझ्या जें मनांत आलं, तें मी आपलं तुला सांगितलं एवढंच—"

तेव्हां ललिता तिला म्हणाली, "तुझा असा का समज आहे सुमा, कीं माझ्या मनाला दुःखाचा कांहींच कांच नाहीं म्हणून ? मी बोलून दाखवीत नाहीं एवढंच. अग, मघांशीं तुला जें मी दैववान् म्हटलं, तें उगाच नव्हे बरं. माझी आनंदी वृत्ति पाहून तुम्हां साऱ्यांनाच असं वाटतं नाहीं ग, कीं माझं मन नेहमीं सुखी भावनांत डुंबत असतं म्हणून ? पण माझ्या या निष्प्रेम संपन्न जीवनापेक्षां तुझं तें गरीब पण प्रेममय जीवन किती तरी स्पृहणीय आहे. तुझ्या आईचं अन् कुमाचं तुझ्यावरलं प्रेम बघितलं, म्हणजे मला कीं नाहीं तुझा केव्हां केव्हां फार हेवा वाटतो. तुझ्या मानानं मी किती कमनशिबी !—माझ्या पाठीवर मूल झालं नाहीं, म्हणून आईचा माझ्यावर राग; अन् दादांना सुद्धां !—काय सांगूं सुमा तुला मी ?–बाबूला पहातांच प्रेमार्द्र होणाऱ्या त्यांच्या त्या डोळयांतील प्रखरताच तेवढी माझ्या वांट्याला कां यावी, हें कोडं मला अजून उलगडलेलं नाहीं. आई जुन्या मताची;—तिच्या दृष्टीनं मी तिचा खरोखरीच अपराध केला आहे. पण दादांची माया मला पारखी व्हायला माझ्या दुर्दैवाशिवाय दुसरं काय कारण आहे ? अग, ज्यांच्या पोटीं जन्माला यावं, त्यांनींच जर आपला कंटाळा केला, तर मग तो जन्म म्हणजे एक शापच नव्हे का ? बाबूचं प्रेम जर माझ्यावर

नसतं, तर सुमा, माझा कांहीं या घरांत निभाव नव्हता. पण अलिकडे त्याचं प्रेम सुद्धां मला दुरावत चाललं आहे—"

बोलतां बोलतां ललितेचे डोळे पाण्यानें भरून आले; व इतका वेळ आवरून धरिलेला मनस्ताप बाहेर पडूं नये, म्हणून दुःखावेगानें थरथरणारे आपले ओंठ घट्ट दाबून तिनें कोचावर अंग टाकलें.

त्याबरोबर, "ताई असं काय बरं बोलतेस तूं हें आज ?" असें म्हणत, सुमतीनें उशींत तोंड लपवून स्फुंदणाऱ्या ललितेच्या मस्तकाखालीं एक हात घालून, तिला अलगत वर उचलल्यासारखें केलें. आणि, तिच्या केंसांवरून हात फिरवीत सुमति तिला म्हणाली, "ताई, ताई, हें काय बरं हें ? मलासुद्धां नाहीं का तूं आपल्या मनांतलं दुःख सांगणार ? परवां वाढदिवसाच्या दिवशींच तूं मजजवळ कबूल केलंस ना ग, यापुढं मी तुला आपली बहीण मानीन अन् तुझ्यापासून कांहीं लपवून ठेवणार नाहीं म्हणून ? तें सारं उगाचच का ? खरंच, पण मी तुझ्या आईच्या पोटीं जन्माला आलें नाहीं, हा माझा केवढा अपराध ! ताई, ताई, सांग ना मला तुझ्या मनाला एवढं काय बरं बोंचतंय तें ? माझा तुझ्यावर कांहींच का ग हक्क नाहीं ?—"

तिच्या डोळ्यांतील अश्रु टपटपां ललितेच्या वक्षःस्थलावर पडूं लागले.

ललितेनें आपला एक हात तिच्या गळ्यांत घातला; आणि, ओंच्यांतून तें पत्र काढून तिच्या हातीं दिलें.

सुमतीनें लगेच दिव्याजवळ जाऊन तें पत्र वाचावयाला सुरवात केली.

---

प्रकरण ८ वें

## पत्र कीं प्रेमाकर्षण ?



त्या पत्रांत काय होतें ?

केशवला मोठीं पत्रें लिहिण्याची संवयच होती. विशेषतः ललितेला तर तो नेहमींच फार विस्तृत पत्रें लिहीत असे. जणुं कांहीं, आपल्या हृदयपुष्पाची एक एक पाकळीच तो तोडून तिच्यापुढें ठेवित असे.

सुमतीच्या हातांत असलेलें आजचें हें पत्र अशाच प्रकारचें होतें. त्यांत त्यानें लिहिलें होतें:—

"इथें आल्यापासून मी तुला एकही पत्र घातलें नाहीं, म्हणून ताई, तूं मजवर खचित रागावली असशील. पण मी तरी काय करूं ? या ठिकाणीं पाऊल ठेवल्यापासून हें घर,—जिथें आईच्या सान्निध्यांत तुझें आणि माझें बाळपण गेलें तें हें आपलें घर मला कसें अगदीं खायला उठलें आहे. आणि, माझ्या अंतःकरणांत दुःखद स्मृतींचें इतकें काहूर उसळलें आहे कीं, इतके दिवस फक्त निद्रेच्या तंद्रेंतच स्वप्नसृष्टींत भटकणाऱ्या माझ्या मनाला, आतां जागेपणीं उघड्या डोळयांपुढें सुद्धां, सारखीं स्वप्नें दिसत असतात. मृत्यूनें मला आज अशा स्थितींत आणून सोडलें आहे कीं, इथून पुढें मला स्वतःलाच आपला मार्ग काढला पाहिजे; व त्या दृष्टीनें स्वतःच्या भवितव्याविषयीं मी जेव्हां जेव्हां विचार करितों, तेव्हां तेव्हां माझें यापुढचें आयुष्य अगदीं निराळ्या रीतीनें जाणार, असें मला वाटतें.

लता, मी आतां तो पूर्वीचा बाबू राहिलेलों नाहीं. आजपर्यंत आईच्या प्रेम-छत्राखालीं, वेलीच्या फांदीवर फुललेल्या आवळया जावळया फुलांप्रमाणें, आपण आपलें आयुष्य हंसण्यांत अन् खेळण्यांत, गप्पांत अन् फिरण्यांत, वाचण्यांत अन् गाण्यांत घालविलें. पण त्या वेळचा तो केशव,—काव्यांत रमणारा अन् संगीतांत तरंगणारा तो तुझा बाबू आतां राहिलेला नाहीं. लता, आयुष्य हें कांहीं केवळ पुनवेचें चांदणें नव्हे कीं, ज्यांत कमलांनीं फुलून एकमेकांचें स्पर्श-सुख अनुभवीत वाऱ्याच्या झुळकेबरोबर स्वच्छंद डुलावें. आयुष्य हें किती तरी बिकट आणि भीषण आहे. या जाणीवेनें माझें जीवन अलीकडे पूर्णपणें बदलून गेलें आहे. माझ्या मनोवृत्तींत झालेला हा बदल आईजवळ बोलून दाखविण्याचा धीर मला झाला नाहीं. आणि तुझ्याजवळ—जिच्यापासून आजपर्यंत मी कांहीं-ही लपविलें नव्हतें—त्या माझ्या बालमैत्रिणीपाशीं सुद्धां मी तें बोलूं शकलों नाहीं.

का बोलूं शकलों नाहीं ? त्याचें कारण जर मी लिहिलें, तर तुला राग येईल, अन् वाईटही वाटेल. पण मी तें आज मुद्दामच लिहीत आहें. लता, तुझ्यापासून आपले विचार मी सुखासुखी कसा लपवीन ? फुलानें आपला परिमळ वाऱ्याच्या

झुळकेपासून कधीं तरी लपविला आहे का ? आपल्या मनांतील विचार तुला सांगावे, म्हणून मी कितीदां तरी उत्कंठेनें तुझ्याजवळ आलों असेन. पण, पंख फुटून नुकतेंच उडायला लागलेलें पांखरूं, चुकून भलत्याच घरट्याजवळ गेलें असतां, जसें गांगरून माघारें फिरावें, तशी माझी अवस्था त्या वेळीं होत असे. मजवर सदा स्नेह-सुधा वरसणारे तुझे ते डोळे;—पण त्या डोळ्यांत असे कांहीं परके भाव मला तेव्हां आढळत कीं, माझी ती सारी उत्कंठा अगदीं जिरून जात असे. लता, मला वाटतें, आपले स्वभाव सारखे नाहीत;—आपल्यांत कांहीं तरी आडपडदा, कसला तरी दुजेपणा आहे. तो कसला आहे हें मलाही अद्याप पुरतें कळलेलें नाहीं, तुलाही कळलेलें नसावें. आपल्यांतला एक फरक मात्र मला नेहमीं जाणवतो. आईनें मला लहानपणापासून महत्त्वाकांक्षी बनविलें. आपला जन्म विशिष्ट कार्यासाठीं आहे, अशी भावना माझ्या मनांत सतत जागृत असते. तुझा स्वभाव तसा नाहीं. आपल्या आवडत्या माणसांच्या सहवासांत स्वर्गसुख मानणारी तूं आहेस; व त्यांच्यावर जिवाभावानें प्रेम करण्यापलीकडे दुसरें कर्तव्य तूं ओळखीत नाहींस. हें जें अंतर आपल्या भावनांत आहे, तोच तर हा आडपडदा नसेल ना ?

तो आडपडदा शक्य तर दूर करावा, म्हणून मी आज माझ्या मनोवृत्तींतला फरक तुला स्पष्ट स्पष्ट लिहिणार आहें. बाळपणापासून तुम्ही सर्वांनीं जें ध्येय माझ्यापुढें ठेवलें होतें, त्या ध्येयावरील माझा विश्वास अलीकडे उडाला आहे. आईची काय, दादांची काय किंवा तुझी काय, इच्छा एवढीच कीं, मी उत्तम लेखक, कवि किंवा कादंबरीकार व्हावें. दादा नेहमीं म्हणतात कीं, समाजांतील कोणतेंही परिवर्तन घडून येण्यापूर्वीं त्याला पोषक अशी मनोवृत्ति प्रभावशाली लेखकांनीं आधीं निर्माण केली पाहिजे. क्रियावंताच्या भूमिकेपेक्षां ते विचारवंताची भूमिका श्रेष्ठ समजतात. कदाचित् तसें असेलही. पण नुसत्या वाङ्मयसेवेनें देशाभिमानी मनुष्याचें समाधान कसें होईल ? परतंत्र राष्ट्र हें दास्यमुक्त होईपर्यंत सदैव युध्यमान स्थितींत असतें; व म्हणून त्या राष्ट्रांतील प्रत्येक समंजस मनुष्याचें त्या युद्धांत भाग घेणें हें आद्य कर्तव्य आहे. तें कर्तव्य नुसता लेखक झाल्यानें कसें साधणार ? त्या कर्तव्याच्या पूर्ततेचा मार्ग मी सध्यां शोधीत आहे. ताई, अद्याप माझ्या मनाचा निश्चय झालेला नाहीं. पण कदाचित् चंद्रशेखर

जात आहे, त्या मार्गानें मी जाईन. त्याच्या सहवासामुळेंच माझ्या जीवनांत हा फरक झाला,—तुला माहीतच आहे; व त्यानें काढलेल्या संघांत सामील होऊन मी एका परीनें त्याच्या मार्गावर पाऊल टाकलेंच आहे. त्या मार्गांतलीं संकटें मी जाणून आहें; आणि, तुम्हांला कोणालाच तो मार्ग पसंत पडणार नाहीं, याचीही मला जाणीव आहे. तरी सुद्धां त्या मार्गानें जाण्यांतच जीविताचें खरें सार्थक, खरी देशसेवा आहे, असें मला अलीकडे वाटूं लागलें आहे. त्याला मी काय करूं ?

लता, हे सारे विचार तुला चमत्कारिक—कदाचित् अप्रियसुद्धां वाटतील. कारण आपण आजपर्यंत अगदीं निराळ्या वातावरणांत वाढलेलों आहों. आईजवळ मी या गोष्टी कधीं बोललों नाहीं,—त्याबद्दल मला वाईट वाटतें;—त्याला इलाज नव्हता. विशिष्ट वय झाल्यानंतर मुलांचीं आणि आईबापांचीं विचारक्षेत्रें अगदीं भिन्न होतात; व त्यांच्यांतील मोकळेपणा त्यामुळें हळूहळू नाहींसा होत जातो, असें अलीकडे मला वाटूं लागलें आहे. पण तुझें तसें नाहीं. आपण समवयस्क आहों. आपल्या जीवनाचे ओघ लहानपणापासून इतके मिसळलेले, इतके एकजीव झालेले आहेत कीं लता, जगांतील कोणतीही गोष्ट, कोणतीही शक्ति मला तुझ्यापासून फार काळ दूर ठेवूं शकणार नाहीं. माझे हे विचार तुला चमत्कारिक वाटले, तरी अपरिचित खास नाहींत. लता, तुला आठवतें का ? मूरच्या—

Oh ! say wilt thou weep when they darken the fame
Of a life that for thee was resign'd.

या ओळी वाचीत असतांना चापेकर बंधूंवरील त्या गाण्याची आठवण होऊन तुझ्या डोळ्यांतून कसे घळघळां अश्रु आले ते ! त्या तुझ्या अश्रूंवर आतां माझी सारी भिस्त आहे."

तें पत्र वाचून सुमति अगदीं मोहित होऊन गेली. इतकी कीं, ललिता आपल्याकडे उत्सुकतेनें पहात आहे, याची जाणीव तिला झाली नाहीं. त्या पत्रांत आणि तें लिहिणाऱ्या व्यक्तींत कांहीं तरी विशेष प्रकारची जादू—मोहनी भरलेली आहे, असें तिला वाटलें. केशवला तिनें बऱ्याच वेळां पाहिला होता; व त्याच्या गुणांचें वर्णन तर तिनें अनेकदां ऐकिलें होतें. तिची आणि ललितेची ओळख होऊन फार तर सहा महिनेच झाले असतील. पण, त्या

दोघींचीं मनें इतकीं जुळलेलीं होतीं कीं, ललिता आपल्या साऱ्याच गोष्टी नेहमीं तिच्याजवळ बोलत असे. आणि, ललितेचें आंतर जीवन बहुतेक केशवनें व्यापिलेलें असल्यामुळें, त्याच्याविषयीं त्या दोघींचें कांहीं ना कांहीं बोलणें रोजच होई. केशवशीं तिची ओळख करून देण्याची इच्छा ललितेनें कितीदां तरी व्यक्त केली होती. पण, एक प्रकारच्या शालीनतेमुळें आणि त्याहीपेक्षां केशवला पाहिल्यापासून त्याच्याविषयीं आपल्या मनांत उत्पन्न झालेल्या आकर्षणाला अडथळा करावा या हेतूनें, तिनें ती ओळख बुद्धिपुरःसर टाळली होती. पण, आज तें पत्र वाचून पूर्ण होतांच, तिच्या मनांत असा सोत्कंठ विचार आला—

तोंच ललितेनें तिला विचारलें "वाचलंस पत्र ?"

तिच्या त्या प्रश्नानें सुमतीला त्या उत्कंठेच्या स्वप्नांतून जागें केलें. ती बावरली; आणि, आपल्या मनांत कोणते विचार येत होते याची जाणीव झाल्यामुळें, अननुभूत अशा लज्जेचे कोमल कंप तिच्या शरीरांत उसळले.

पण ती लगेच उठून ललितेच्या जवळ जाऊन तिला म्हणाली, "वाचलं; पण ताई, तुला एवढं वाईट वाटण्यासारखं काय आहे ग त्यांत ?"

तिचें तें प्रश्नार्थक उत्तर ऐकतांच ललिता किंचित् क्षुब्ध होऊन म्हणाली, "असं कसं म्हणतेस तूं ? सुमा, तुला आमच्या प्रेमाची कल्पना नाहीं, म्हणून असं विचारतेस तूं. अग, त्या पत्रांत असं काय नाहीं कीं, जें वाचून माझ्या हृदयाला पीळ पडूं नये ? बाबूंत अन् माझ्यांत जो आडपडदा उत्पन्न झाला आहे म्हणून तो म्हणतो, तोच जणुं त्या पत्राच्या रूपानं त्यानं माझ्यापुढं ठेविला आहे ! तो मी कसा सहन करीन ? सुमा, तुला कल्पना नाहीं ग, माझं त्याच्यावर किती प्रेम आहे तें ! चुलतभावंडांचं एकमेकांवरलं प्रेम;—हें थोडं उत्कट आहे एवढंच,—असं तूं समजत असशील. तसं असतं तर खरोखरीच फार बरं झालं असतं. पण तसं नाहीं ग.—शैशवांतला सहचर अन् कौमार्यांतला खेळगडी,—त्याच्याविषयींची आवड कोणत्याही मुलीच्या मनांत जन्मभर कायम रहाते,—पण नुसत्या एवढ्याच कारणामुळं बाबू मला प्रिय नाहीं. सुमा, माझं त्याच्यावर किती अन् कोणत्या प्रकारचं प्रेम आहे, तें मी तुला कसं सांगूं ?—माझी मला सुद्धां त्याची पुरी ओळख पटलेली नाहीं ! त्याचं रूप, त्याचं भाषण, त्याच्या

कविता, त्याची वाद घालण्याची पद्धत;–त्याची अशी कोणती गोष्ट आहे कीं, जी मला प्रिय नाहीं ? 'त्याला पाहिल्याबरोबर, त्याची आठवण होतांक्षणींच अन् त्याच्याविषयीं विचार मनांत येतांच इतके कोमल, इतके उन्नत भाव माझ्या अंतःकरणांत उचंबळून येतात कीं, माझं स्वतःचं सारं अस्तित्व त्यांत विरून जातं. जगाच्या दृष्टीनं तो माझा भाऊ आहे;—मलासुद्धां एका काळीं तसंच वाटत होतं;—पण अलीकडे या वर्ष सवा वर्षांत मला हें पक्कं कळून चुकलं कीं, मला जो तो इतका आवडतो, तो कांहीं केवळ भाऊ म्हणून नव्हे किंवा प्रियकर म्हणूनही नव्हे. प्रियकराविषयीं ज्या प्रकारच्या भावना मनांत उत्पन्न व्हाव्या लागतात, तसल्या भावना त्याच्याविषयीं माझ्या मनांत कधींही आलेल्या नाहींत. मग मी त्याला प्रियकर तरी कसा म्हणूं ? एकाद्या तरुणाला प्रियकर न मानतांही त्याच्यावर अगदीं निराळ्या प्रकारचं उत्कट प्रेम करणं स्त्रीला अशक्य आहे का ? कधीं कधीं मला असं वाटतं कीं, द्रौपदीचं श्रीकृष्णावर जसं प्रेम होतं,—काकी नेहमीं सांगत असे कीं, पिता, पति आणि पुत्र यांच्यापेक्षां द्रौपदीला श्रीकृष्ण जास्त प्रिय होता;—तसं माझं त्याच्यावरलं प्रेम आहे.—त्या प्रेमाला नांव नाहीं, रूप नाहीं अन् सीमा नाहीं ! माझी मीच त्याच्याविषयीं विचार करूं लागलें म्हणजे गोंधळून जातें. पण एवढं मात्र खरं कीं, त्या प्रेमाशिवाय मला जगणं अशक्य आहे. बाबू मला कायमचा अंतरण्यासारखी परिस्थिति ज्या क्षणीं उत्पन्न होईल, त्या क्षणीं–सुमा,–त्या क्षणींच माझे प्राण मला सोडून जाण्यासाठीं धडपडूं लागतील, हें तूं पक्कं समज—"

"ताई, ताई, काय बोलते आहेस तूं हें ? अग, तुला झालंय तरी काय आज ? तुझं हें सारं बोलणं कीं नाहीं मला कसं अगदीं चमत्कारिक वाटतं—"

"होय, सुमा; मला स्वतःला सुद्धां या प्रेमाविषयीं विचार करूं लागलं म्हणजे कसंसंच वाटतं," ललितेनें अगदीं संथपणानें उत्तर दिलें. इतका वेळ मनांत गदमदत असलेले विचार बाहेर पडल्यामुळेंच कीं काय, ती आतां पुष्कळच शांत झाली होती. तिनें लगेच पुढें बोलावयाला सुरवात केली, "सुमा, अग हें पत्र म्हणजे आमच्या आयुष्यांतल्या पुढच्या साऱ्या अनर्थांचं मूळ आहे, असंच मला वाटतं. बाबू कम्युनिस्टांच्या नादीं लागून गुप्त कटांच्या फंदांत पडला हें ऐकून काकीला काय वाटलं असतं ? अन् दादांना तरी काय वाटेल ? चंद्राचं ठीकच आहे.

मनुष्याचं तत्त्वज्ञान त्याच्या भोंवतालची परिस्थिति बनवीत असते. उगाच नाहीं हा चंद्रशेखर कम्युनिस्ट झाला बरं! बोलून चालून नायकिणीचा मुलगा;—त्याला जात ना गोत!—कोणीही झाला तरी आपल्या पथ्यावर पडेल, तेंच तत्त्वज्ञान उचलीत असतो.—चंद्रानं कम्युनिस्ट होऊं नये तर काय करावं?"

"अग पण ताई, कम्युनिझममध्यें इतकं वाईट काय आहे? अन् हा कसला आला आहे गुप्त कट? विद्यार्थ्यांच्या वादविवादाच्या सभा का कुठं राज्यांच्या उलथापालथी करीत असतात?--"

"तुझ्या या बोलण्याचं नवल नाहीं वाटत सुमा मला! किती झालं तरी तूं गुप्तेमास्तरांची भाची;—तुला रोजच त्या मतांची संथा मिळत असते, हें मी विसरलें! पण कम्युनिझममध्यें जरी भिण्यासारखं कांहीं नसलं, तरी चंद्रामध्यें मात्र भिण्यासारखं पुष्कळ आहे. सुमा, तुला माहीत नाहीं,—तो किती निग्रही अन् धाडसी आहे तें. तूं त्याला पाहिलास अन् केशवच्या तोंडून जर त्याच्या एक एक गोष्टी ऐकल्यास तर थक्क होऊन जाशील. त्याला कळायला लागून आईचा धंदा किती वाईट आहे याची जाणीव झाल्यावर, त्यानं पुष्कळ दिवस तो सोडण्याबद्दल तिला नाना प्रकारं सांगून पाहिलं. अन् त्या सांगण्याचा कांहीं उपयोग होत नाहीं असं दिसतांच, शेवटीं असा हट्ट धरला कीं, 'उद्यांपासून तूं हा धंदा सोडला नाहींस, तर मी जीव देईन!' पहिल्यांदा हें सारं बोलणं त्या बाईनं थट्टेवर नेलं. पण त्या दिवशीं रात्रीं ती गायला बसतांच चंद्रानं भर बैठकींत येऊन तिच्यासमोर चाकूनं आपली करांगळी तोडली!—त्या दिवसापासून तिनं बिचारीनं गाणं सोडलं. सुमा, सुमा, त्याची ती तुटलेली करांगळी बघितली, म्हणजे खरोखरी मला भीति वाटते; अन् असं वाटतं कीं, हा काय करील न काय नाहीं! अग, प्रिन्सिपॉलची त्याच्यावर कोण मर्जी;--पण बायबलवर व्याख्यान देतांना एकदां तो हिंदुधर्म, टिळक अन् होमरूलची चळवळ यांच्याविषयीं कांहीं वाईट बोलला. तेव्हां यानं तिथल्या तिथं उठून त्याला अपमानास्पद प्रश्न विचारले; अन् आपली स्कॉलरशिप गमावली! खरोखरीच, त्याच्या डोक्यांत एकाद्या गोष्टीचं वेड शिरलं, म्हणजे तो काय करील अन् काय नाहीं!—सुमा, तूं त्याला एकदां पहाच,—त्याच्यांत खरोखरीच कांहीं तरी विशेष,—कांहीं तरी चमत्कारिक

आहे असं त्याला पाहिल्याबरोबर वाटतं;—म्हणजे मी तुला म्हणतें याची कल्पना येईल—"

"होय. जरूर पाहीन," सुमति म्हणाली; व लगेच तिनें पुढील वाक्य उच्चारलें, "अन् तुझ्या आग्रहाप्रमाणं ताई, मी तुमच्या बाबूरावांचीही पण ओळख करून घेईन. मामासुद्धां फार तारीफ करतात त्यांची—"

येवढेंच बोलून ती थांबली. तें शेवटलें वाक्य उच्चारतांना, तिच्या आवाजांत जी सकंप मृदुता उत्पन्न झाली होती, ती स्वतःच्याच विचारांत निमग्न असलेल्या ललितेच्या लक्षांत आली नाहीं.

ललितेचें सारें चित्त त्या पत्रावर केंद्रित झालें होतें. ती सुमतीला म्हणाली, "सुमा, तुला कल्पना नाहीं;—हें सारं जर दादांना कळलं तर त्यांना किती वाईट वाटेल;—त्यांची सारी भिस्त बाबूवर आहे. आपला वकिलीचा धंदा अन् लेखनाचा व्यवसाय त्यानं पुढं चालवावा अशा दृष्टीनं त्यांनीं त्याला आतांपर्यंत शिकवलं सवरलं;—त्यांच्या मनाची या गोष्टी ऐकून केवढी निराशा होईल! ते रानड्यांचे अनुयायी;—आमचं घर म्हणजे वाङ्मयाच्या अन् सुधारणेच्या चळवळींचं केंद्र. दादांची ही परंपरा बाबूनं पुढं चालवायची कीं कम्युनिस्टांच्या नादीं लागून आपल्या आयुष्याचं मातेरं करून घ्यायचं ? त्याचा हा छांदिष्टपणा;—काकांना नेहमीं भीति वाटे कीं, हा आपल्या आजोबासारखा छांदिष्ट होईल म्हणून;—काकांचं तें भाकित खरं ठरायचा प्रसंग—"

"अग ताई, यांत कसला आला आहे छांदिष्टपणा ? अन् तुमचा तरी असा आग्रह का ग, कीं बाबूरावांनीं तुझ्या दादांची परंपरा पुढं चालवावी ? खरोखरी हें आईबापांची अन् घराण्याची परंपरा पुढं चालविण्याचं वेड आमच्यांतून जितक्या लवकर नाहींसं होईल तितकं चांगलं ! प्रत्येकानं आपली अंतःकरणप्रवृत्ति जो मार्ग दाखवील त्यानं जावं; मग त्यामुळं कितीही संकटं येवोत.—असल्या धाडसी अन् स्वतंत्र वृत्तीनंच जगांत सुधारणा घडून येत असतात. प्रत्येक मुलगा जर आपल्या बापासारखा निपजत गेला अन् बापाचाच धंदा करीत राहिला, तर जगाची कधीं तरी प्रगति होईल का ? मुलांनीं आपल्या आईबापांची निव्वळ नेभळट नक्कल बनावं असं तुला वाटतं तरी कसं, ताई ? तूं स्वतः तरी आपल्या

आईसारखी आहेस का ग ? त्यांना आवडत नाहीं;—पण तूं आमच्या घरीं येऊन जेवतेस ना ? अन् इथं आल्यावर मला हट्टानं आपल्या पंक्तीला घेऊन बसतेस ना ? जुन्या काळांत, जुन्या कुटुंबांत,—आपल्या वाडवडिलांची परंपरा जर जशीच्या तशीच चालत आली असती, तर यांतली एक तरी गोष्ट शक्य होती का, ताई ? अन् तुझ्या दादांनीं तरी कुठं ग आपल्या वडिलांचं ऐकलं ? तूंच नेहमीं अभिमानानं सांगतेस ना, कीं त्यांनीं घरीं आयती चालत आलेली बऱ्या हुद्द्याची नोकरी लाथाडली म्हणून ? मग आतां बाबूरावांवरच का तुमचा एवढा जुलूम—"

ती पुढें आणखी कांहीं बोलणार, तोंच कुमुदनें तिला दारांतूनच ओरडून विचारलें, "अत्ता, अत्ता, आद धलीं नाई ता द दायतं आपल्याला ? तित्ती उशिल धाला द ? आई लादावेल ना आपल्यावल !"

इतकें बोलून, त्या दोघींच्या वर्तनाविषयीं नापसंती दर्शविण्यासाठींच कीं काय, चिमुकल्या कुमुदनें आपल्या मानेला असा कांहीं नाजुक झटका दिला कीं, तिची ती ऐट पाहून त्यांना हंसूं आल्याविना राहिलें नाहीं. एका हातानें आपला भुईला भिडलेला झगा तिनें किंचित् वर उचलून धरला होता; व दुसऱ्या हातानें आपल्या कानावर सोडलेल्या वेणींतील रिबनचें सैल झालेलें फूल ती नीट बसविण्याचा प्रयत्न करीत होती.

ललितेनें तिला जवळ घेऊन हंसत हंसत म्हटलें, " तर तर;-बाईसाहेबांचा तळिराम यथास्थित गार झाल्यावर आतां आईची अन् घराची आठवण झालेली दिसतेय.-तें कांहीं नाहीं;—आज जायचं नाहीं बरं का घरीं, सुमा. पाहूं या एका माणसावर आई कशी रागावते ती !-"

पण तिच्या त्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत कुमुदनें तिला विचारलें, " ताई, तूं ता ललत होती द मदाशीं ? थलंच देलं ता द मादं बोत तुया दोल्यांत ? थांब मी तिनाई फुंतल धालतें हो. आई म्हनते, बाऊ धाला म्हंजे फुंतल धालावी—"

असें बोलून कुमुदनें खरोखरीच ललितेच्या अंगावर झेंप टाकून, आपले चिमुकले हात तिच्या गळ्यांत घातले; व गुलाबाच्या उमलण्याच्या बेतांत अस-

लेल्या कळीसारखा आकार आपल्या ओंठांच्या पाकळ्यांना देऊन, ललितेच्या डोळ्यांत फुंकर घालण्यासाठीं आपली हनवटी तिच्या गालावर टेकली.

तिनें एक फुंकर डोळ्यांत मारतांच, ललितेनें तिच्या गालाचा मुका घेत घेत तिला म्हटलें, "झाला बरं माझा डोळा बरा, बाळ. याच्याबद्दल तुला आतां मी काय बक्षिस देऊं, सांग बरं मला?—"

"बच्छीस? तूंच आमच्या धलीं चल आद लहायला? अन् मी तिनई तुद्या दल्यांत हात धालून निदीन तिथं; अन् मद तूं मला एत थानदालशी दोत्त थांग ताई—" कुमुदनें उत्तर दिलें.

तोंच सुमति तिला म्हणाली, "मग चलायचं ना घरीं आतां, कुमा? कीं आज ताईच्या कडेवरच मुक्काम करायचा बेत आहे आपला?"

"तल ना? मी तुथं नाई म्हनतें? तूंच तल उशील तेला—" असें म्हणत ललितेच्या कडेवरून उतरून कुमुदनें सुमतीचें बोट धरलें; व त्या तिघी आंत गेल्या.

त्या दोघी बहिणी गेल्यावर, ललिता पुन्हा खिडकीपाशीं येऊन उभी राहिली. बाहेर या वेळीं अंधार पसरला होता. क्षितिजाच्या आतां अगदीं कडेवर आलेल्या चंद्रकलेचा अर्धा अधिक भाग काळ्याभोर ढगानें गिळल्यामुळें, त्याच्या तडाक्यांतून सुटलेलें तिचें चकचकीत निमुळतें टोंक रानडुकराच्या सुळ्यासारखें दिसत होतें. तो भयाण अंधार, चंद्राची ती विच्छिन्न कोर आणि झाडांच्या त्या अक्राळविक्राळ सांवल्या पाहून ललितेचें मन अधिकच उदास झालें. सुमतीचें तें सारें बोलणें तिच्या मनांत या वेळीं घोळत होतें. त्यांतलीं कांहीं वाक्यें तिला आठवलीं; व केशवप्रमाणें तिच्यांत आणि आपल्यांतही आडपडदा उत्पन्न होणार नाहीं ना, अशी तीव्र शंका तिच्या आज आधींच बेसुमार दुखावलेल्या मनाला स्पर्श करून गेली. त्याबरोबर तिच्या अंगावर शहारे येऊन, तिच्या डोळ्यांत पुन्हा अश्रु उभे राहिले.

---

प्रकरण ९ वें

# गिरगांवांतील गांवठी नॉर्थक्लिफ



" हें पहा, नानासाहेब, आतां ही भीड बीड पुरे झाली. तुम्ही एकदां भगवंतरावांना स्पष्ट सांगून टाका कीं, बळवंतरावजींविरुद्ध टीकेची झोड उठवायला जर तुम्ही तयार असाल, तरच तुमचा न् आमचा संबंध यापुढं कायम राहील;– नाहीं तर तुम्ही भले न् आम्ही भले ! स्वपक्षाच्या तेजोभंगाला कारण होणारं असलं हें शल्याचं सारथ्य नको आम्हांला !—"

प्रो. राळे आपली डावी भुंवई, डावा गाल आणि डावा खांदा एकसमयावच्छेदेंकरून उडवीत उद्गारले. त्यांचे पिचके, हिरवट डोळे, गाजरासारखें लाल, वाटोळें नाक आणि लोंबते, जाड ओंठ पाहून त्यांच्या मत्सरी आणि विषयासक्त स्वभावाची ओळख ताबडतोब पटत असे. ते एका मिशनरी कॉलेजांत इंग्रजीचे अध्यापक होते; व आपल्या विद्वत्तेचीं निदर्शक अशीं दोन तीन इंग्रजी अवतरणें सुरवातीला दिल्याशिवाय ते कोणताही मराठी लेख लिहावयाला प्रारंभ करित नसत, अशी मुंबईत त्यांची ख्याति होती. आपल्या विद्वत्तेप्रमाणेंच त्यांना आपल्या मार्मिक भाषणपद्धतीचाही मोठा अभिमान होता. आणि, ते जेव्हां एकादें, त्यांच्या दृष्टीनें, खोंचदार असें वाक्य उच्चारीत, तेव्हां स्फूर्तीचा झटका आल्यामुळेंच कीं काय, त्यांची डावी भुंवई, डावा गाल व डावा खांदा हे एकदम स्फुरण पावत असत. त्यांचें हें वामांगस्पंदन मुंबईच्या विद्यार्थिवर्गांत त्यांच्या विद्वत्तेइतकेंच प्रसिद्ध होतें.

पण व्यवहारचतुर नानासाहेबांवर त्यांच्या या खोंचदार वक्तृत्वाचा कांहींच परिणाम झाला नाहीं. ते अगदीं संथपणानें म्हणाले, " अहो, पण एवढा उत्तम लेखक गमावून कसं चालेल आपलं आज ? ते आज आपल्या पत्राचे संपादक आहेत, म्हणून आपण 'केसरी' शीं सामना देऊं शकतों आहों; अन् गिरगांवांत आपल्याला उभं रहायला तरी जागा मिळते आहे. आपल्या पक्षांत आहे का

कुणी इतकं चांगलं मराठी लिहिणारा इसम ? असता, तर ‘सुधारका’ची एवढी कुतरओढ कां झाली असती ? अन् इतक्या वर्षांचं आयुष्य गांठीं असून ‘ज्ञान-प्रकाश’ तरी निव्वळ मिण मिण करित कां राहिला असता ?—”

“नसेल, आज नसेल! पण उद्यां तयार होईल;—त्याच्यांत काय एवढं मोठंसं ?—गातां गळा, शिंपतां मळा आणि लिहितां लेखनकळा!” हें वाक्य उच्चारतांना पुन्हा एकदां प्रोफेसरसाहेबांच्या वामांगाचें जोरानें स्फुरण झालें. त्याला वाव देण्यासाठींच कीं काय, क्षणभर थांबून ते उद्गारते झाले, “नाना-साहेब, मला नवल वाटतं तुमच्या या बोलण्याचं. आज इतके दिवस तुम्ही फेरो-जशहांच्या बरोबर काम केलं;--पण तुमची दृष्टि कांहीं गिरगांवाच्या पलीकडे म्हणून जात नाहीं! तुम्हांला आपलं असं वाटतं कीं, हिंदुस्थानाचं सारं राजकारण गिरगांवांत अन् नारायणपेठेंत भरलेलं आहे;—अन् म्हणून तुम्हांला मराठीचं एवढं महत्त्व वाटतं! अहो, मराठी मराठी म्हणजे काय घेऊन बसला आहांत तुम्ही ?—आमच्यांत नाहीं का हरिभाऊ निघाला ? आहे का त्याच्यासारखा एक तरी फर्डा कादंबरीकार या नाशनिष्ठांच्या टोळक्यांत ? अहो, मराठी ही बोलून चालून बायाबापड्यांची, भटाभिक्षुकांची आणि तेल्यातांबोळ्यांची भाषा;—म्हणून तिच्याकडे आम्ही दुर्लक्ष केलं,--करतों. हरिभाऊंना बायकांची सुधारणा करा-यची होती, म्हणून त्यांनीं वळलीं आपल्या गोष्टींचीं गंगावनं मराठींत; अन् आम्हांलाही पुनर्विवाह हवेत, स्त्रीशिक्षण हवं, स्त्रियांनीं पुरुषांत मिसळायला हवं, म्हणून आम्ही त्यांच्या कादंबऱ्यांचं कौतुक करतों;--नाहीं तर आहे काय त्यांत ? टॉलस्टॉय, बॅल्झॅक, ह्यूगो हे तर राहोतच;--पण डिकन्स, थॅकरे यांच्या तरी पंक्तीला बसण्याची हरिभाऊची योग्यता आहे का ? जशी तुमची ती मराठी भाषा, तसा तुमचा कादंबरीकार! आम्ही मनांत आणतों, तर आम्हांला सुद्धां आलं असतं फर्डं मराठी लिहायला.—पण करतो कोण एवढी यातायात ?--आम्हांला कुठं भटाभिक्षुकांत आणि तेल्यातांबोळ्यांत पुढारी म्हणून मिरवायचंय! आमचं राजकारण पार्लमेंटकरतां आहे, ब्रिटिश मुत्सद्यांकरतां आहे!—इंग्रजी ही जगाची भाषा;—जगाचं सारं राजकारण इंग्रजींतून चालतं;—आपला नित्याचा संबंध इंग्रजांशीं;—अन् म्हणे मराठींत लिहा! पण प्रसंग आला, तर त्यालाही पुरे पडूं! भितां कां तुम्ही एवढे ?”

"हें पहा, प्रोफेसरसाहेब, तुमचं म्हणणं तुमच्या दृष्टीनं खरंच आहे;—मी कुठं नाहीं म्हणतों ? तुमचं राजकारण आहे फोर्टमध्यें;—पण आम्हांला या गिरगांवांत जगायचंय, हें तुम्ही विसरतां. अन् जोंपर्यंत आम्हांला गिरगांवांत नांदायचंय, तोंपर्यंत तरी भगवंतरावांना सोडून आमचं चालणार नाहीं. शिवाय, टिळकांवर आतां आम्ही झोड तरी कशाबद्दल उठवायची ? पूर्वी आपण शिष्टमंडळं नेलीं, तेव्हां ते आपल्याला हंसले;—पण आतां ते स्वतः शिष्टमंडळ घेऊन गेले आहेत, साक्षी देताहेत, अधिकाऱ्यांना भेटताहेत, पार्ट्यांना जाताहेत;—ज्या ज्या गोष्टी केल्याबद्दल त्यांनीं गोपाळरावांना इतकं निंदलं, त्या त्या साऱ्या गोष्टी ते आज स्वतः करताहेत ! नुसत्या भाषेच्या जहालपणाशिवाय काय राहिलं आहे आतां त्यांच्याजवळ ? परवां सत्यमूर्तींनीं तरी लंडनच्या सभेंत हेंच नाहीं का त्यांना त्यांच्या तोंडावर सांगितलं ? अहो, आतां मवाळांना बरं म्हणायची पाळी येणार आहे लोकांवर कांहीं दिवसांनीं यांचे हे सारे थेर पाहून ! आपल्या कर्मांनींच मरणार आहेत ते;—मग उगाच का त्यांना झोडपून लोकांचा राग ओढवून घ्या आपल्यावर ?"

"नानासाहेब तुमचं चुकतं तें इथंच ? अहो, हे नाशनिष्ठ मरू घातले असले, तरी सुद्धां डरकाळ्या फोडायला चुकायचे नाहींत. म्हणून त्यांचा हा सारा दांभिकपणा चवाठ्यावर आणला पाहिजे. उगाच नाहीं भीम अर्धमेल्या दुर्योधनाच्या डोक्यावर नाचला ! तुम्हांला माहित नाहीं;—उद्यां बळवंतराव विलायतेहून परत आले, म्हणजे असा आव घालतील कीं, जणुं कांहीं स्वराज्याची सनदच त्यांनीं आपल्या विजारीच्या खिशांतून आणली आहे. म्हणून एव्हांपासून आपण त्यांना अपशकुन करण्याची तयारी ठेवली पाहिजे. मी तर ठरवून टाकलं आहे अगदीं कीं, बळवंतरावांचा पाय मुंबईच्या धक्क्याला लागण्याच्या बेतास त्यांच्या झाडून साऱ्या कृतकर्मांचा पाढा 'टाइम्स'मधून वाचायचा ! परवांच मी सर जीवनलालांच्या चेंबरमध्यें अप्पासाहेबांना सांगून टाकलं कीं, तुमच्या 'प्रागतिका'नं जरी तुम्हांला या वेळीं दगा दिला, तरी हा 'पोलिटिकस्' कांहीं आपल्या ब्रीदाला जागल्याशिवाय रहात नाहीं. नानासाहेब, तुम्ही राजकारणाचा विचार नेहमीं आपल्या पत्राच्या खपाच्या दृष्टीनं करीत असतां—"

नानासाहेबांना त्यांच्या या साऱ्या बोलण्याचा मनांतून अतिशयच राग आला.

पण, आपल्या चेहऱ्यावरील धंदेवाईक मंद हास्य बिलकूल मावळूं न देतां तें म्हणाले, " बरं, बुवा, तसं का म्हणा ना ? आम्ही आपले पोटभरू हैं तर झालंच. पण अप्पासाहेबांनीं, नानासाहेबांनीं आणि जीवनलालांनीं तरी असे काय ध्वज लावले आहेत कीं, त्यांनीं आमच्यावर एवढं रागवावं ! डेक्कन लिबरल क्लबांत किंवा सर्व्हंटांच्या दिवाणखान्यांत एकाद दुसरं व्याख्यान वर्षाकांठीं दिल्यानं का कुठं पक्ष जिवंत रहातोय ? त्याला बेझंट आणि टिळक यांच्या-प्रमाणं व्याख्यानांचा पाऊस पाडावा लागतो; अन् प्रांतोप्रांतीं दौरे काढावे लागतात. इथं पहावं तर जो तो आपआपल्या धंद्यांत म्हणा, गव्हर्नरच्या कानाशीं लागण्यांत म्हणा किंवा एकाद्या कमिशनवर जागा पटकावण्याच्या म्हणा, उद्योगांत चूर ! अहो, उद्यां सुधारणा कायदा अमलांत आल्यावर, यांच्यापैकीं एक तरी मोकळा सांपडायचाय का लोकांत चळवळ करण्यासाठीं ? कुठल्या ना कुठल्या तरी जागेवर आपली टिक्की लावण्यासाठीं हे सारे इतकी धडपड करतील कीं, भाकरीच्या तुकड्याला लगटणारीं कुत्रींसुद्धां यांच्यापेक्षां फार बरीं ! एवढी जर यांना देशभक्तीची न् लोककल्याणाची चाड असती, तर नेमणुका अन् नोकऱ्या मिळवण्यांत यांचे अर्धे जन्म वायां कां गेले असते ? पण, प्रांतिक कौंसिलांतील नेमणुकीपासून प्रारंभ करायचा अन् शेवटीं इंडिया कौन्सिलांत जाऊन नामशेष व्हायचं, हेंच तर मुळीं यांचं सारं राजकारण ! अशा लोकांचा पक्ष जिवंत कसा रहावा ? अन् त्यांची तळी उचलून न धरल्याबद्दल त्यांनीं 'प्रागतिका'वर तरी कां जळफळावं ?—

" उगाच नाहीं जळफळत,—हक्कानं जळफळतात ते ! अहो, फेरोजशहानीं तुम्हांला पैसे दिले, म्हणून तुम्ही आज गिरगांवांत उभे आहां !—नाहीं तर या एकट्या भगवंतरावांच्या लेखणीनं काय व्हायचं होतं ?" प्रोफेसरसाहेब आवेशानं उद्गारले. या वेळीं त्यांच्या वामांगाचें वेपन फारच जोरानें झालें.

त्यांचे हे उद्गार ऐकून मात्र नानासाहेबांची व्यावहारिक शांतता अखेर ढळली. लोडाच्या आधारानें पसरलेलें आपलें अंग सांवरून ते एकदम उठून बसले; हातांतील प्रुफाची गॅली त्यांनीं खालीं टाकली; व तो प्रश्नार्थक बुद्धीनें जोरानें हल-वून ते उद्गारले, " कोणाचे पैसे ? आणि असे किती पैसे दिले होते फेरोजशहांनीं ?"

तुम्हांला माहीत नाहीं, आमच्या ‘ प्रागतिक ’ काढण्याच्या कल्पनेची सरसाहेबांनीं प्रथम कशी बोळवण केली, तें! आपण त्या वेळीं झग्यांतून बाहेर पडायचे होतांत, प्रोफेसरसाहेब! टिळकांनीं स्वराज्यसंघ काढल्यावर ‘ केसरी’शीं सामना देणारं आपलं एक साप्ताहिक मुंबईंत असावं, म्हणून मी अप्पासाहेबांबरोबर त्यांना मुद्दाम जाऊन भेटलों. पहिल्यांदां ते आमची ही कल्पनाच मुळीं ऐकून घेईनात. त्यांची अशी समजूत कीं, एकट्या ‘क्रॉनिकल’वर आपलं सगळं काम भागेल. शेवटीं मोठ्या माराकुटीनं त्यांनीं आम्हांला पैसे दिले; अन् त्याबरोबरच अट अशी घातली कीं, ठाकुरद्वारच्या त्या रावसाहेबाला संपादक करा! कारण काय?—तर तो म्हणे दर शनवारच्या शनवारीं यांच्या चेंबरचे उंबरठे झिजवतो! लेकाला मराठी गद्याच्या चार ओळी तरी सरळ लिहितां येत असतील तर शपथ! मी साफ सांगितलं, हें जमणार नाहीं म्हणून. बरें, पैसे तरी किती दिले म्हणाल, तर फक्त पांच हजार रुपये! अन् एकदां दिलेल्या या पैशाच्या जोरावर ते आम्हांला जन्मभर आपलं तुणतुणं वाजवायला सांगणार. आम्ही भगवंतरावांना संपादक केलं ही गोष्ट कांहीं मेथासाहेबांना आवडली नाहीं. त्यांनीं अप्पासाहेबांजवळ कितीदां तरी तक्रार केली, आपलं पत्र सोशॅलिस्टांच्या हातीं गेलं म्हणून. पण भगवंतरावांचं नांव पत्रावर होतं, म्हणून तें चाललं तरी! नाहीं तर पांच हजारांच्या पुंजीनं काय होणार होतं? पण एवढा विचार आहे कुणाजवळ? तुमची अशी कल्पना आहे का, कीं आम्ही त्यांच्या जोरावर पत्र काढलं म्हणून? अहो, ज्यानं आज पंधरा वर्षं स्वतःच्या पदराला खार लावून ‘ प्रबोधना ’सारखं मासिक चालवलं, त्याला ‘ प्रागतिक ’ चालवणं कांहीं जड नव्हतं. प्रोफेसरसाहेब, सर फेरोजशहा विद्वान् असतील, कायदेपंडित असतील, अन् गडगडणारे पुढारीही पण असतील;—पण त्यांच्या ठिकाणीं माणुसकी अगदीं नव्हती;—आमच्यासारखे गोरगरीब त्यांना अगदीं कःपदार्थ वाटत! हा त्यांचा गुण तुमच्या साऱ्या पुढाऱ्यांनीं उचलल्यामुळंच आज सरकारच्या कानांशीं लागण्यापलीकडे दुसरं राजकारण तुम्हांला उरलेलं नाहीं! लोकसंग्रह करावा बळवंतरावजींनींच. त्यांनीं लहानसहान माणसं हाताशीं धरून आपलं बस्तान हिंदुस्थानांत बसविलं; अन् तुमचं सारंच आसन उखडण्याची पाळी आली आहे आज तुमच्या या गुणांमुळं!—खरोखरी, भगवंतराव म्हणतात तें कांहीं खोटं नव्हे;—

आपला हा मवाळ पक्ष म्हणजे फक्त स्वतःची तुंबडी भरण्यापुरतंच राजकारण करणाऱ्या भांडवलवाल्यांचा पक्ष आहे—"

नानासाहेबांच्या संतापाचा पारा या वेळीं फारच चढला होता. त्यांना मार्मिक उत्तर देण्याच्या ईर्ष्येनें प्रोफेसरसाहेबांचें वामांग जोरानें स्फुरण पावत होतें. पण, त्यांच्या संतापाचा आवेग आणि त्याहीपेक्षां आपल्याला साधावयाच्या कार्याचें महत्त्व लक्षांत घेऊन, त्यांनीं मोठ्या दूरदर्शीपणानें आपल्या जिभेला लगाम घातला.

हा संवाद गिरगांवांतील सुप्रसिद्ध 'प्रबोधन' कचेरीच्या दिवाणखान्यांत चालला होता. 'प्रबोधन' मासिक आणि 'प्रागतिक' साप्ताहिक हीं भावंडें होतीं; व नानासाहेब हे त्यांचे जनक आणि चालक होते. त्यांची मूर्ति, कीर्ति आणि प्रकृति वैचित्र्यपूर्ण होती. अवसेच्या अंधाराला लाजविणारा त्यांचा तेलिया रंग, कुत्सित कल्पना मनांत येतांच काजव्याप्रमाणें लुकलुकणारे त्यांचे पिंगट डोळे, विकटपणें हंसल्याबरोबर विजेप्रमाणें चमकणारी त्यांची शुभ्र दंतपंक्ति, झाडांच्या निष्पर्ण फांद्यांच्या अंधारांतील हेलकाव्यांप्रमाणें भासणारे त्यांचे हात-वारे आणि कोल्हेकुईची आठवण देणारे त्यांचे कोंकणी हेल—इत्यादि कारणांमुळें एकदां पाहिल्यावर त्यांची मूर्ति हृदयफलकावरून सहसा अंतर्धान पावत नसे. मुंबईत ते गांवठी 'नॉर्थक्लिफ' या नांवानें प्रख्यात होते; व या अभिधानाला शोभेल असाच त्यांचा आजपर्यंतचा इतिहास होता. 'प्रबोधन' मासिक हें मूळ त्यांच्या मामानें काढून आपल्या लेखनकामाठीच्या जोरावर नांवारूपाला आणलें होतें. त्याच्या मृत्यूनंतर नानासाहेबांनीं मोठ्या हिकमतीनें त्या मासिकाची मालकी संपादन केली. ते स्वतः विद्वान् नव्हते किंवा युनिव्हर्सिटीच्याही शिक्षणाचा संस्कार त्यांच्यावर झालेला नव्हता. पण, मासिक चालवावयाला अवश्य असलेले सर्व व्यावहारिक गुण त्यांच्या ठिकाणीं भरपूर असल्यामुळें, एका युरोपियन फर्ममध्यें कारकून असलेला हा ज्ञानलवदुर्विदग्ध लवकरच मुंबईतील दोन प्रतिष्ठित नियत-कालिकांचा चालक आणि मराठी वाङ्मयाचा आधारस्तंभ होऊन बसला.

नानासाहेबांचीं मतें सामान्यतः सर्वच बाबतींत प्रतिगामी होतीं. या अनुदार मतांना जातिविद्वेषाचाही दर्प मधून मधून येत असे. वस्तुतः ते स्वतः ब्राह्मणच

होते. पण, देशस्थ, कोंकणस्थ, सारस्वत आणि कऱ्हाडे या ब्राह्मणांच्या चार मुख्य पोटजातींपैकीं कोणांतच त्यांची गणना होत नसे; व पुण्याच्या ब्रह्मवृंदानें तर अनेकदां त्यांच्या जातीच्या ब्राह्मण्याविषयीं शंका उपस्थित केली होती. त्यामुळें पुणेरी ब्राह्मणांवर आणि विशेषतः चित्पावनांवर त्यांचा फार दांत होता. 'प्रबोधनां'त येणाऱ्या टीकांतून ही त्यांची विशिष्ट द्वेषबुद्धि सदैव व्यक्त होत असे. ते नेहमीं म्हणत कीं, चित्पावन-कल्टची स्थापना करण्यासाठीं शास्त्रीबुवांनीं 'निबंधमाला' काढली; व त्या कल्टचें ऐतिहासिक दृष्टीनें स्तोम माजविण्या-साठीं राजवाड्यांनीं संशोधनाचा उपद्व्याप चालविला आहे. 'प्रबोधनां'तून या दोघां लेखकांवरील टीकेचें सत्र सारखें चालू असे. आपल्याला पसंत नसलेल्या नवमतवादी ग्रंथकारांवर, अश्लीलतेची खोटीच हांकाटी माजवून, हल्ला करण्या-चाही त्यांचा ठरीव प्रघात होता. खरें पाहिलें, तर ते स्वतः नाचगाण्याचे मोठे शोकी होते; व कोंकणांतील त्यांच्या गांवामधला शिमग्याचा मांड बंद व्हावा, म्हणून ग्रामस्थ सुधारकांनीं केलेली चळवळ त्यांनीं सनातन्यांच्या मागें दडून मोठ्या शिताफीनें हाणून पाडली होती. पण कलेचे हे धर्मातील थेर वाङ्मयांत चालूं द्यावयाला मात्र ते मुळींच तयार नव्हते.

त्यांना राजकीय बाबतींत मतें अशीं खरोखरी कांहीं नव्हतींच. पण, प्रत्येक प्रतिष्ठित मनुष्याला पक्ष हा असलाच पाहिजे, असें मात्र त्यांचें ठाम मत होतें; व म्हणून मवाळ पक्षांत सामील होणें हेंच एकंदरींत आपल्याला सोईचें आहे, असा विचार करून ते त्या पक्षाला चिकटले होते. सर फेरोजशहांच्या बंगल्यावर किंवा चेंबरमध्यें राजकीय परिस्थितीचा खल करण्यासाठीं मुंबईतील शेलक्या मवाळांच्या ज्या बैठकी कधीं काळीं होत असत, त्यांत सरसाहेबांच्या मर्जीतील आपल्या एका बड्या मित्राच्या वशिल्यानें प्रवेश मिळवून, हिंदुस्थानाच्या राज-कारणाचें ज्ञान ते संपादन करीत असत. मुंबईच्या कॉंग्रेस कमेटीनें जेव्हां 'काळ' कर्त्यांच्या जहाल मतांमुळें त्यांना हद्दपार करण्याचा ठराव केला, तेव्हां 'प्रबोधना'नें त्या ठरावाचा जोरानें पुरस्कार केला होता; व खाडिलकरांच्या 'कीचकवध' नाटकाकडे मुंबईसरकारचें लक्ष वेधावयाला 'प्रबोधनां'तील त्यावरील सूचक टीकाच मुख्यतः कारण झाली होती. नानासाहेबांची अशी उत्कट इच्छा होती कीं, आपण एक साप्ताहिक काढावें; व म्हणून 'केसरी'ला

तोंड देऊन मवाळ पक्षाची बिनी सांभाळण्यासाठीं एक मराठी साप्ताहिक काढणें फार जरूर आहे, असें ते आपल्या नेमस्त मित्रमंडळींत नेहमीं आग्रहानें प्रतिपादित असत. तथापि, राष्ट्रीय पक्ष जोंपर्यंत अज्ञातवासांत होता, तोंपर्यंत मुंबईच्या मवाळाग्रणींनां त्यांच्या या कल्पनेकडे लक्ष देण्याची गरज भासली नाहीं.

पण, टिळक मंडालेहून परत आल्यानंतर जेव्हां राष्ट्रीय पक्ष प्रबळ होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं, तेव्हां मुंबईच्या सिंहांना, शृगालांना आणि सारमेयांना साहजिकच मराठी साप्ताहिक काढणें आवश्यक वाटलें; व एके दिवशीं सर फेरोजशहांच्या चेंबरमधील मवाळांच्या खासगी सभेला हजर रहाण्यासाठीं नानासाहेबांना पाचारण करण्यांत येऊन, तिथें वर्तमानपत्र काढण्याकरितां त्यांच्या हातावर पांच हजार रुपये ठेवण्यांत आले. पण, नानासाहेबांनीं मनाचा मोठा हिय्या करून, सरसाहेबांना असें स्पष्ट सांगितलें कीं, एवढया थोड्या पुंजीवर 'केसरी'शीं सामना देऊं शकेल, असें वर्तमानपत्र काढणें शक्य नाहीं. शेवटीं बरीच घासाघीस होऊन असें ठरलें कीं, मुंबई कार्पोरेशनच्या सर्व जाहिराती या साप्ताहिकाला देण्यांत याव्या. शिवाय, दारूची मक्तेदारी करणाऱ्या एका पारशी खानबहादुरांनीं नानासाहेबांना असें आश्वासन दिलें कीं, मी तुम्हांला विलायती दारूच्या जाहिरातींचा भरपूर पुरवठा करीन. पण, त्याबरोबरच या बहादुरानें अशीही एक अट घातली कीं, कौन्सिल व कार्पोरेशन यांच्या निवडणुकींच्या वेळीं तुमच्या साप्ताहिकानें मला बिनशर्त पाठिंबा दिला पाहिजे! दारूच्या जाहिराती आणि त्याही अशा अटीवर छापणें, हें स्वतःच्या नीतिनिष्ठेचा तोरा मिरविणाऱ्या नानासाहेबांच्या जिवावर आलें; व अशा प्रकारच्या जाहिराती छापल्यास आपल्या पत्राचा दुर्लौकिक होईल, अशीही भीति त्यांनीं भीत भीत व्यक्त केली. त्याबरोबर मुंबईच्या सिंहाच्या रक्तांत खेळणारी शांपेन क्षुब्ध होऊन, तो एकदम गुरगुरला, "Silly, silly! what an orthodox mentality!—मूर्ख, अगदीं मूर्ख! काय जुनाट मनोवृत्ति आहे पहा!". तेव्हां, बिचाऱ्या नानासाहेबांनीं असा विवेक केला कीं, आपल्या पत्रांतून आपण मद्यपानबंदीचा पुरस्कार करून, दारूच्या जाहिराती छापण्याच्या या पापाचें क्षालन करूं. अशा रीतीनें तडजोड होऊन एकदांचे पांच हजार रुपये त्यांच्या पदरांत पडले; व 'प्रागतिका'चा जन्म झाला.

फेरोजशहांच्या चेंबरमधील तो उपमर्दकारक प्रसंग आज पुन्हा नानासाहेबांच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. महत्त्वाकांक्षी मनुष्य हा कार्यलोभास्तव जरी अपमान गिळल्यासारखा दाखवीत असला, तरी तसले प्रसंग त्याच्या अंतःकरणांत अगदीं खोलवर घुसून, सतत शल्यासारखे डांचत रहातात. प्रो. राळे यांच्या त्या कुत्सित भाषणानें नानासाहेबांच्या हृदयांतील तें शल्य चाळविलें जाऊन, त्यांच्या मनाला अतिशयच वेदना झाल्या; व मवाळ पक्षावरील आपला सारा राग एकदां यथास्थित बाहेर पडूं दिल्यावर, ते कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसून राहिले.

पण प्रोफेसरसाहेबांना मात्र फार वेळ गप्प बसणें शक्य नव्हतें. ते आज विशिष्ट हेतूनें आलेले होते. म्हणून, आपल्या आवाजांत इतका वेळ खेळत असलेली तुच्छतेची तीव्रता अजीबात काढून टाकून, त्यांनीं अगदीं नरमाईच्या सुरांत पुन्हा बोलावयाला प्रारंभ केला.

"हें पहा, नानासाहेब, आजपर्यंत झालं तें झालं;—त्या गोष्टी उकरून काढण्यांत आतां काय फायदा?" ते नानासाहेबांच्या किंचित् जवळ सरकून म्हणाले, "सर फेरोजशहा गेले अन् त्यांचं तें अरेरावी राजकारणही गेलं. आतां हे लोकशाहीचे दिवस आलेले आहेत; अन् तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं आम्ही जर लोकसंग्रह केला नाहीं, तर खरोखरीच आमचा पक्ष नाहींसा होऊन जाईल.—त्याबद्दलच आपला सल्ला घेण्यासाठीं मी आज मुद्दाम आलों होतों. काल सर माणेकजींच्या बंगल्यावर आम्ही सारे जमलों होतों पुढल्या निवडणुकीविषयींचं धोरण ठरविण्यासाठीं. तिथं असं ठरलं कीं, आजपर्यंत आपल्या ताब्यांत असलेलीं कौन्सिलं कांहीं झालं तरी बळवंतरावांच्या हातीं कांहीं जाऊं द्यायचीं नाहींत. पण, हें नुसतं ठरून काय उपयोग? नानासाहेब, आपल्यासारख्या माणसांच्या मदतीवर तर आमच्या साऱ्या उड्या! सर माणेकजींचं म्हणणं असं आहे कीं, 'प्रागतिका'नं आतां सहा महिने दुसरं तिसरं कांहीं न करतां बळवंतरावांविरुद्ध सारखी झोड उठवावी अन् आमचं काम जोरानं लोकांच्या नजरेपुढं आणावं! हें पहा, नानासाहेब, आपण आधींच नकार भरण्याची घाई नका करूं. माझं पुरतं ऐकून तर घ्या! सर माणेकजींच्या मनांत फार आहे कीं, 'प्रागतिक' हें आपल्या पक्षाचं मुखपत्र करावं. नाहीं तरी 'ज्ञानप्रकाश' आमच्या उपयोगी पडत नाहींच.—तिथं

सारें ब्राह्मणी राज्य आहे ! आपण रोटरी घेण्याच्या विचारांत आहां असं नुकतंच त्यांच्या कानांवर आलं; अन् ते कालच मला म्हणाले कीं, ‘ मी तुम्हांला रोटरी घेऊन द्यायला तयार आहें, असा माझा निरोप नानासाहेबांना सांगा.’—त्यांची फार इच्छा आहे आपल्या कचेरीला एकदां भेट देण्याची ! ”

“प्रोफेसरसाहेब, तुम्ही म्हणतां तें सारं खरं.—आमच्या कचेरीला भेट देण्याची माणेकजीसाहेबांना एवढी इच्छाच असेल, तर त्यांना खुशाल येऊं द्या !—पण, तुम्हांला माहितच आहे कीं, मी जरी पत्राचा मालक असलों, तरी सत्ता सगळी भगवंतरावजींच्याच हातांत आहे. त्यांना विचारल्याशिवाय मी कांहींही करूं शकत नाहीं. तुम्ही त्यांनाच सांगा ही आपली सारी कल्पना—”

“ नानासाहेब, आपणच असं म्हटल्यावर मग काय करणार ? आपल्याला माहितच आहे भगवंतरावांचा स्वभाव;—ते आहेत थोडे एककल्ली ! अन् अशा महत्त्वाच्या, नाजूक कामांत त्यांची ती तत्त्वनिष्ठा हटकून आड—”

प्रोफेसरसाहेब पुढें आणखी कांहीं बोलणार, तोंच भगवंतराव आल्याची वर्दी गड्यानें आणली. त्याबरोबर अर्थातच तें भाषण तितक्यावरच थांबलें.

---

## प्रकरण १० वें

# सी. आय. डीं. तील देशभक्त



“ यावें, यावें, यावें ! ”—असें उद्गारत नानासाहेब एकदम उठून उभे राहिले.

त्यांचा त्या वेळचा तो उल्हास पाहून, प्रोफेसरसाहेबांच्या मनांत अशी कल्पना आली कीं, या गृहस्थाला देवानें जर आणखी दोन पाय अधिक दिले असते, तर केवढी बहार झाली असती ! भगवंतरावांना व विशेषतः त्यांच्या मागाहून येणाऱ्या व्यक्तीला पाहिल्यावर, नानासाहेबांची धवल दंतपंक्ति साकल्यानें प्रकट होऊन, त्यांच्या डोक्यावरील वाऱ्यानें उडणाऱ्या किंचित् सोनेरी छटा असलेल्या शुभ्र केसांचा धवलिमा द्विगुणित झाला. स्वागताच्या आविर्भावानें आपले दोन्ही हात पुढें करून ते पुन्हा उद्गारले, “ यावें, यावें, यावें !—अरे वा, आज बाबूरावालाही आणलाय तुम्हीं आपल्या बरोबर !—छान, छान;

काय रे,..तूं चालवणार ना आपल्या दादांची गादी ? आतांपासून शिक्षण घेतलं पाहिजे बरं कां तुला इथं येऊन.—" नंतर त्यांचे ते सारे हावभाव मत्सरमूलक कुतूहलानें पहात असलेल्या प्रोफेसरसाहेबांकडे दृष्टिक्षेप करून ते म्हणाले, "हा आमचा पुतण्या—यशवंतरावांचा मुलगा;—बिचारा पोरका आहे! भगवंतरावां-नींच केलं सारं त्याचं;—मोठा बुद्धिमान् आहे आपल्या चुलत्यासारखा!—मी तर एव्हांपासूनच ठरवून टाकलंय कीं, बाबूराव आमचे पुढचे संपादक होणार म्हणून! काय रे बाबू, खरं का नाहीं?" नानासाहेब पुन्हा एकदां मनःपूर्वक मोठ्यानें हंसले.

त्यांच्या त्या व्यक्तदंत हास्यांत कावेबाजपणापेक्षां आत्मीय बुद्धीचाच अंश निदान या वेळीं तरी जास्त होता, यांत शंका नाहीं. त्यांचा आणि भगवंतरावांचा स्नेहसंबंध हें मुंबईतील पुष्कळ लोकांना एक मोठें कोडें होऊन बसलेलें होतें. नानासाहेबांचें शील मुंबईत सर्वश्रुतच होतें. उलट भगवंतरावांची ख्याति करारी, तत्त्वनिष्ठ आणि स्वातंत्र्यप्रिय म्हणून होती. त्यामुळें ते जेव्हां नानासाहेबांनीं काढलेल्या साप्ताहिकाचे संपादक झाले, तेव्हां पुष्कळांना तो योग साहजिकच शनिगुरूंच्या युतीसारखा वाटला. त्यांच्या स्नेहाचें अधिष्ठान समान शील किंवा समान व्यसन हें अर्थातच नव्हतें. भगवंतरावांचे वडील केशवराव आणि नाना-साहेब यांचें कोंकणांतील मूळ गांव एक होतें; व त्या दोघांच्या वयांत जरी अंतर बरेंच होतें, तरी नानासाहेबांच्या संग्राहक स्वभावामुळें त्या ग्रामबंधुत्वाचें रूपांतर हळुहळू स्नेहांत आणि घरोब्यांत झालें. भगवंतरावांवर तर पहिल्या-पासूनच त्यांचा वडील भावासारखा लोभ होता. या लोभाला पुढें सहकारितेची जोड मिळाल्यामुळें त्याचें पर्यवसान एक प्रकारच्या भक्तींत झालें. कवि आणि लेखक या नात्यांनीं भगवंतरावांनीं कॉलेजांत मिळविलेली कीर्ति कानांवर येतांच, नानासाहेबांनीं त्यांना 'प्रबोधना'च्या लेखकवर्गांत ओढलें; व हळुहळू त्याच्या संपादनाची सर्वच जबाबदारी त्यांच्यावर टाकली. वस्तुतः त्या दोघांच्या मतांत कोणत्याच प्रकारचें साम्य नव्हतें. नानासाहेबांच्या साऱ्या मतांचा जन्म स्वा-र्थाच्या पोटीं झालेला होता; उलट भगवंतरावांचे सारे विचार ध्येयवादांतून उत्स्फूर्त झालेले होते. पण, मतांच्या बाबतींत नानासाहेबांना आग्रह असा कोणत्याच प्रकारचा नसल्यामुळें आणि भगवंतरावांच्या बुद्धिमत्तेसंबंधी त्यांना

वात्सल्यमिश्र आदर असल्यामुळें, एरवीं इतरांची कोणतीही आगळीक सहन न करणारी एकादी तापट बाई आपल्या लाडक्या मुलाचे जसे सारे चाळे मुकाट्यानें चालूं देते, त्याप्रमाणें नानासाहेब क्वचित् आपल्या स्वार्थालाही नडणाऱ्या त्यांच्या विचारस्वातंत्र्याचा उपद्रव कौतुकानें सोशीत असत. शिवाय, भगवंतरावांविषयीं त्यांना थोडा धाकही वाटे. ज्याला स्वतःला तत्त्व किंवा शील नसतें, अशा मनुष्याला तत्त्वनिष्ठ आणि सुशील मनुष्याविषयीं एक प्रकारचा आदरमूलक धाक नेहमींच वाटतो.

भगवंतरावांचीं मतें ऐकांतिक नव्हतीं. त्यांचा स्वभाव प्रगमनशील तर होताच, पण, शिवाय त्यांत आणखी अशीही एक प्रवृत्ति होती कीं, जिच्यामुळें उदात्त भासणाऱ्या अशा कोणत्याही कल्पनेची छाप त्यांच्यावर तावडतोब पडत असे. त्यांच्या नैसर्गिक सौंदर्यासक्तीचाच तो एक प्रकार म्हणतां येईल. परंतु, या आसक्तीवर चिकित्सक बुद्धीचा दाब असल्याकारणानें कोणत्याही मताच्या ओघांत ते वाहून असे मात्र कधींच जात नसत. कॉलेजांत असतांना ते टिळक–चिपळूणकरांचे अभिमानी होते. पण, सामाजिक सुधारणेला विरोध करण्याच्या टिळकांच्या धोरणामुळें, ते तेवढ्यापुरते हळुहळू रानडे–आगरकरांच्या पक्षाकडे खेंचले जाऊन, टिळकांविषयीं फक्त राजकारणापुरताच आदर त्यांच्या ठिकाणीं शिल्लक राहिला. कालांतरानें आदराच्या त्याही भागांतील उत्कटता कमी झाली. विद्यार्थिदशेंत मॅझिनी आणि रूसो व पुढें टॉलस्टॉय आणि कार्ल मार्क्स यांच्या अध्ययनामुळें त्यांचा समाजसत्तावादावर विश्वास बसून, हिंदी राजकारणांतील प्रायः कोणत्याच पक्षाविषयीं त्यांना आपलेपणा उरला नाहीं. त्यांतल्या त्यांत रानडे यांच्याविषयींचा त्यांचा आदर मात्र बराच अविचलित राहिला. त्याचें कारण असें कीं, भगवंतरावांच्या महत्त्वाकांक्षा शमप्रधान असून, क्रियावंतापेक्षां विचारवंताची भूमिकाच श्रेष्ठ आहे अशी त्यांची भावना असल्यामुळें, तेवढ्यापुरती रानडे यांच्या दुर्बल ध्येयवादाची मोहनी त्यांच्या मनावर शेवटपर्यंत शिल्लक राहिली.

म्हणून, नानासाहेबांनीं 'प्रागतिका'चें संपादकत्व स्वीकारण्याबद्दल जेव्हां त्यांना गळ घातली, तेव्हां मवाळांच्या तत्कालीन राजकारणासंबंधीं जरी त्यांना यत्किंचितही आदर नव्हता, तरीं अंशतः ऋणानुबंधाच्या ओढीनें व अंशतः

आपल्या विचारांचा प्रसार करण्याची संधि मिळेल या समजुतीनें, त्यांनीं त्या पत्राची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली; व रानडे यांनीं घालून दिलेल्या तात्त्विक विचारांच्या मार्गापासून डोळ्यांवर येण्याइतकें दूर न जातां, त्यांनीं मोठ्या कुशलतेनें तें साप्ताहिक चालविलें. नानासाहेबांना त्यांचें हें धोरण पसंत होतें, असें नाहीं. पण, त्या दोघांचा जणुं असा एक संकेतच न कळत ठरून गेला होता कीं, एकानें दुसऱ्याच्या व्यवहारांना ढका न पोंचेल अशा बेतानें आपल्या विचारांचा प्रसार करावा; व दुसऱ्यानें त्याच्या विचारस्वातंत्र्याला दुःसह होईल अशा तऱ्हेचा कोणताही व्यवहार सहसा करूं नये. या स्वयंभू जाणिवेमुळें 'प्रागतिक' उत्तम रीतीनें चाललें होतें. टिळकांच्या राजकीय मतांवर जरी नव्हे, तरी राष्ट्रीय पक्षाच्या सामाजिक धोरणावर अगदीं कडक टीका 'प्रागतिकां'तून नेहमीं येत असे. त्यामुळें व्यक्तिद्वेष हाच ज्यांच्या राजकीय मतांचा पाया होता, अशा पुण्यामुंबईच्या मवाळांना त्याच्याविषयीं आपलेपणा वाटे. आणि, ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्या नानासाहेबांना मनांतून असा आनंद वाटे कीं, एका कर्कोटकाला हाताशीं धरून आपण कोब्र्याचें डोकें ठेचीत आहों, ही आपली केवढी शहामत !

तथापि, भगवंतराव आणि त्यांचें कुटुंब यांच्याविषयीं नानासाहेबांना वाटणारी आत्मीयता हाच खरोखरी त्या दोघांच्या या व्यावहारिक संबंधाचा पाया होता. ही आत्मीयता इतकी उत्कट होती कीं, नानासाहेबांच्या ज्या डोळ्यांत एरवीं फक्त कुत्सित विचारांचें शेवाळच सांचलेलें दिसे, त्यांत भगवंतरावांच्या दर्शनाबरोबर कोमल भावनांचीं कमलें फुललेलीं दृष्टीस पडत असत. त्यांतून आज केशव त्यांच्याबरोबर असल्यामुळें तर नानासाहेबांच्या वात्सल्याला जोराची भरती आली.

नानासाहेबांच्या त्या प्रेमोत्कट स्वागतामुळें केशव इतका लाजला कीं, त्याच्या कानांच्या नाजूक पाळ्या अगदीं लाल होऊन गेल्या; व त्यांतच जेव्हां त्याच्या ही गोष्ट लक्षांत आली कीं, प्रो. राळे यांची हिरवट दृष्टि नानासाहेबांच्या त्या साऱ्या चेष्टितांवर रोंखलेली आहे, तेव्हां तर तो फारच शरमला. प्रोफेसरसाहेबांविषयीं त्याचें मत अगदीं वाईट होतें. वर्गांत शिकवितांना, मुद्दाम विषयांतर करून, प्रचलित राजकारणावर व्याख्यान झोडण्याची त्यांना

संवय होती. विशेषतः, ज्या दिवशीं ते सर दिनशा किंवा सर जीवनलाल यांच्या दर्शनाचा लाभ घेऊन येत, त्याच्या दुसऱ्या दिवशीं, त्या मुलाखतींत संपादिलेल्या ज्ञानाची जोड विद्यार्थ्यांना करून देण्यासाठींच कीं काय, त्यांचें नेमस्तांच्या राजकीय तत्त्वज्ञानावर वर्गांत हटकून प्रवचन होत असे; व त्या नेभळट प्रवचनाला चव आणण्याकरितां ते मधून मधून राष्ट्रीय आणि क्रांतिवादी पुढाऱ्यांना सडकून शिव्या देत असत. एकदां त्यांनीं आपल्या या साप्ताहिक वक्तृत्वांत अरविंद घोष यांचा उल्लेख 'हिंदी राजकारणांतील दुष्ट शक्ति ( A sinister influence in Indian politics )' म्हणून केला. तेव्हां चंद्रशेखरनें उठून त्यांना असे सांगितलें कीं, "मवाळ पक्ष हीच खरोखरी हिंदी राजकारणांतील एक दुष्ट शक्ति आहे. कारण, ज्या ज्या वेळीं राष्ट्रीय चळवळ जोरांत येते, त्या त्या वेळीं दडपशाहीची तरफदारी करून, तो पक्ष धडधडीत परकीय राज्यकर्त्यांना नैतिक पाठिंबा देतो." तेव्हां, प्रोफेसरसाहेब संतापानें त्याच्या अंगावर खेंकसून म्हणाले, "माझ्या व्याख्यानांत व्यत्यय करण्याचा तुला बिलकूल अधिकार नाहीं." त्यावर चंद्रशेखरनेंही तितक्याच जोरानें त्यांना सांगितलें, "तुम्हांलाही वर्गांत असलीं अप्रस्तुत व्याख्यानं झोडण्याचा अधिकार नाहीं." त्याच्या त्या उत्तरानें चिडून जाऊन प्रोफेसरसाहेबांनीं त्याला कॉलेजांतून काढून टाकण्यापर्यंत पाळी आणली होती, पण प्रिन्सिपॉलची त्याच्यावर मर्जी असल्यामुळेंच तो बचावला. हा सारा प्रकार केशवला माहीत असल्यामुळें, साहजिकच त्याचें मत प्रोफेसरसाहेबांविषयीं प्रतिकूल होतें; व त्यांची कुत्सित दृष्टि आपल्यावर खिळलेली आहे असें पहातांच, त्याला कसेंसेंच वाटून तो बैठकीवर न बसतां, खिडकीजवळ जाऊन बाहेर पहात उभा राहिला.

नानासाहेबांच्या त्या स्वागताकडे लक्ष न देतां, भगवंतराव त्यांना बसतां बसतां एवढेंच म्हणाले, "मला वाटलं, मलाच उशिर झाला आज यायला. पण बाकीची मंडळी कुठं आहेत ?—रावसाहेब अन् शास्त्रीबुवा कां नाहीं आले अजून ?"

"शास्त्रीबुवा ?—त्यांचा तर सध्यां हंगामच आहे. अन्—तुम्हांला माहित नाहीं वाटतं ?—गांधींच्या या सत्याग्रहाच्या प्रकरणापासून रावसाहेब जवळ

जवळ स्पेशल ड्युटीवर गेल्यासारखे आहेत. त्यांनीं स्वतः नाहींच सांगितलं मला;— पण परवां ते रा. ब. केळवकर भेटले होते, त्यांच्या तोंडून बोलतां बोलतां सहज निसटून गेलं ! रावबहादुर इतकं सुद्धां म्हणाले कीं, बंगाल्यांत कुठं गुप्त कटाचा सुगावा लागलेला आहे, तिथं रावसाहेबांना पाठविण्याचा सरकारचा विचार आहे ! असतील बहुधा तसल्याच कांहीं तरी भानगडींत गुंतलेले." नानासाहेब हंसत हंसत उद्गारले.

"म्हणजे ?—धन्य आहे रावसाहेबांची ! त्या जुन्या ऋणानुबंधाची माया अजुनही नाहीं सुटत त्यांना ? मग हें पोवाड्यांचं न् इतिहासभक्तीचं अवडंबर कशाला ? आजपर्यंत केलींत कर्मं तेवढीं पुष्कळ झालीं; आतां म्हातारपणीं तरी म्हणावं आयुष्य जरा निर्मळ कामांत जाऊं द्या," भगवंतराव किंचित् उद्वेगानें म्हणाले.

"अहो, एकाद दुसरा पोवाडा खरडून अन् तुमच्या पुण्याच्या त्या उपद्व्यापी मंडळांत तेलातुपाच्या हिशेबाचीं जुनीं चिठोरीं वाचून, जर त्यांना देशाभिमानी म्हणून मिरवायला सांपडतंय, अन् प्रसंगीं बळवंतरावांच्या सुद्धां कानाशीं लागतां येतंय, तर त्यांनीं तरी आपले जुने ढंग कां सोडावेत ? नाहीं तरी ते सांगत असतातच कीं, 'मी सी. आय. डीं. त होतों, म्हणूनच सावरकर फांसावर जायचे राहिले !' कांहीं म्हणा भगवंतराव, पण तुमचा हा राष्ट्रीय पक्ष म्हणजे असल्या साऱ्या बेजबाबदार अन् मतलबी माणसांचं मायपोट आहे !" प्रोफेसरसाहेब भगवंतरावांना डिंवचण्याच्या उद्देशानें म्हणाले.

"पण नाहींत कोणत्या पक्षांत मतलबी माणसं ? तुमचा मवाळ पक्ष तरी काय असा मोठा सोज्वळ लागून गेला आहे ? सारा जन्म देशासाठीं हाडांचीं काडं करणारे गोखलेही त्या पक्षांत गणले जातात, अन् सारी हयात सरकारची थुंकी झेलण्यांत घालविणारे सर माणेकजींसारखे होयबाही पण त्या पक्षांत मोडतात. राष्ट्रीय पक्षांत शिरायला निदान शिवाजी उत्सवांत भाषण करण्याचं तरी धैर्य दाखवावं लागतं. पण इथं तेवढं सुद्धां नको ! लिबरल क्लबाच्या पडदपोशींत बसून टिळकांना शिव्या दिल्या, म्हणजे कोणताही गब्बर मनुष्य मवाळांच्या गोटांत पुढारी म्हणून मिरवूं शकतो."

" माणकजींचा कां उगाच नालस्ती करतां ? त्यांच्यासारखा दानशूर तुमच्या जहालांत एक तरी सांपडेल काय ? एकाद्या मनुष्यानं सरकारी नोकरी केली, म्हणून कांहीं तो वाईट ठरत नाहीं. "

" मी तरी कुठं तसं म्हणतों ? सर माणेकजींनीं एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर असतांना काय दिवे लावले, ते तर सांगा ! अन् दानशौर्य तरी कसलं ? वडलांनीं दारूच्या मक्तेदारीवर, सट्टेबाजीवर आणि असल्याच इतर हजार लटपटी करून मिळविलेल्या लाखों रुपयांतून चार सहा हजार रुपये सेवासदनाला किंवा सर्वेंटांच्या मठाला दिले म्हणजे कांहीं मनुष्य दानशूर ठरत नाहीं. त्या साऱ्या संपत्तीचा उगम कशांत आहे, तो तर जरा पहाल कीं नाहीं ? मुंबई सरकारच्या कौन्सिलांत सर माणेकजी शिरल्यापासून त्यांनीं निरनिराळ्या खात्यांत किती पैसे दाबले, याचा कांहीं हिशेब ? गृहस्थानं जिथं जिथं म्हणून हात मारणं शक्य होतं, तिथं तिथं आपल्या सत्तेचा उपयोग करून घबाडं गिळंकृत केलीं;—अन् असला हा होयबा म्हणे लिबरल पार्टीचा आधारस्तंभ ! आधारस्तंभ तर खराच; पण इब्सेननं म्हटल्याप्रमाणं, आंतून सडून कुजून गेलेला ! रावसाहेब निदान तितके अधम तरी खास नाहींत. त्यांनीं सांगून सवरून सी. आय. डीं. त नोकरी केली—"

" खरोखरीच तितके नीच नाहींत !—फक्त त्यांनीं टिळकांच्या आणि परांजप्यांच्या नादीं लागून बहकलेल्या पोरांना, नाना प्रकारच्या युक्त्यांनीं पकडून, फांसावर लटकावलं एवढंच काय तें ! बाकी तुम्हांला काय त्याचं ? बळवंतरावांना कुठं त्याची लाज आहे, तर तुम्हांला असणार ? उलट तुमच्या विचारक्रांतीच्या उद्योगाला हीं फळं आलेलीं पाहून तुम्ही आनंदच मानला असेल ! शिवाय, बाजू अंगावर उलटलीच तर तुम्ही आपल्याला रानड्यांचे अनुयायी म्हणवायला पुन्हा मोकळेच ! "

" हें पहा, प्रोफेसरसाहेब, उगाच 'शेषं कोपेन पूरयेत्' करण्यांत काय अर्थ आहे ?" भगवंतराव अगदीं शांतपणानें म्हणाले. " तुम्हांला माहितच आहे,—मी रानड्यांचाही अनुयायी नाहीं अन् टिळकांचाही नाहीं. एकाचं राजकारण जसं मला पटत नाहीं, तसंच दुसऱ्याचं समाजकारणही मला पटत नाहीं. तुम्ही राव-

साहेबांवर तोंड टाकलं, म्हणून मी तरी हें सारं बोललों. नाहीं तर मला काय करायचं आहे तुमच्या माणेकजींशीं ? अन् तुम्ही म्हणतां तितके रावसाहेब वाईट आहेत असं जरी धरून चाललं, तरी त्यांच्याविषयीं माझ्यासमोर वाईट बोललेलं मला कसं खपेल ? किती झालं तरी ते माझे अन् नानासाहेबांचे जुने स्नेही आहेत. तुमच्या एकाद्या स्नेह्याविषयीं उद्यां मी जरी अगदीं सकारण वाईट बोललों, तरी तुम्ही तें मुकाट्यानं ऐकून घ्याल काय ? आपल्या माणसाचा अभिमान ही एक चीज जगांत आहेच कीं नाहीं ? एकाच बैठकींत बसणाऱ्या माणसांनीं एकमेकांच्या इष्टमित्रांविषयीं वाईट बोलूं नये, हा सामान्य शिष्टाचार आहे."

"बरोबर, बरोबर आहे अगदीं," नानासाहेब आपले दोन्ही हात 'शांतिरस्तु' च्या आविर्भावानें हलवीत उद्गारले. "उगाच काढला आपण हा वाद प्रोफेसरसाहेब;—रावसाहेबांचे दोष काय आम्हांला माहित नाहींत ? पण किती झालं तरी ते आमचे स्नेही ! शिवाय दोष नाहींत कुणामध्यें ?—"

इतक्यांत, ज्यांच्याविषयीं हें सारें बोलणें चाललें होतें, ते रावसाहेबच तिथें येऊन दाखल झाले.

रावसाहेब भुजंगराव देशमुख ही मुंबईतील एक नामांकित व्यक्ति होती. ते धिप्पाड व काळेसांवळे असून, त्यांचे डोळे बारीक पण भेदक होते. त्यांची सारी हयात पोलिस खात्यांत गेलेली होती; व क्रांतिकारकांच्या पोटांत शिरून त्यांचीं आंतडीं बाहेर काढणारा पाताळयंत्री अधिकारी म्हणून त्या खात्यांत त्यांचा लौकिक होता. त्यांची वाणी रसाळ व लेखणी वक्तृत्वपूर्ण असून, सर्वच प्रकारच्या नाटकी ढंगांत ते तरबेज होते. आपला सिंहगडावरील पोवाडा जेव्हां ते साभिनय म्हणून दाखवीत, तेव्हां श्रोत्यांच्या चित्तवृत्ति अगदीं हलून जात असत. मराठ्यांच्या इतिहासांतील कोणत्याही हृदयस्पर्शी प्रसंगाचें वर्णन करितांना त्यांच्या डोळ्यांत हटकून पाणी उभें राहत असे. सावरकरांच्या तोंडून त्यांचा सिंहगडचा पोवाडा ऐकून, आपल्याला पोवाडे लिहिण्याची स्फूर्ति झाली; व तिथूनच आपल्या इतिहासाच्या व्यासंगाला प्रारंभ झाला, असें ते नेहमीं मोठ्या अभिमानानें सांगत असत. नोकरींत असतांना सुद्धां ते आपल्याला देशाभिमानी म्हणवावयाला कधीं कचरले नाहींत. आणि, लोकप्रवाद असा होता कीं, या अभिमानाच्या प्रदर्शनाच्या जोरावरच त्यांनीं महाराष्ट्रांतील क्रांतिकारकांच्या

मंडळांत प्रवेश मिळवून, अनेक धाडसी तरुणांना काळें पाणी दाखविलें. सरकारचा त्यांच्या हुशारीवर इतका विश्वास होता कीं, त्यांना प्रथम रावसाहेब आणि नंतर रावबहादुर ही पदवी देऊन, त्यांच्या कर्तबगारीचा गौरव तर त्यांनीं केलाच; पण शिवाय, देशांत राजकीय चळवळ जोरांत आली किंवा क्रांतिकारकांच्या हालचालींचा सुगावा लागला, म्हणजे सरकार त्यांना मुद्दाम जादा कामगिरीवर नेमीत असे. नोकरींतून निवृत्त झाल्यानंतर ते विल्यापार्ल्यास 'शिवनिवास' नांवाची टुमदार बंगली बांधून तिथें राहिले होते; व राष्ट्रीय पक्षाच्या शिवाजी-उत्सवासारख्या राजकीयेतर चळवळींत आणि पुण्याच्या इतिहासमंडळाच्या हर एक उद्योगांत ते प्रामुख्यानें भाग घेत असत.

त्यांच्याबरोबर आणखी एक व्यक्ति होती. हे गृहस्थ गोरे, घारे, भुरे व डुबरे असून, भस्मचर्चित कपाळावरील शुभ्र पागोटें आणि शुभ्रतम अंगरखा त्यांच्या त्या गोमट्या ध्यानाला फारच खुलून दिसत होता. विलायती औषधांत, त्यांचें स्वरूप बदलण्यासाठीं, आयुर्वेदिक औषधें मिसळून व त्यांना संस्कृत नांवें देऊन, तीं हिमालयावरील स्वसंशोधित देशी औषधें म्हणून विकणारे 'भिषग्भास्कर' या नात्यानें ते साऱ्या मुंबईत प्रसिद्ध होते. आपण कलकत्ता येथील संस्कृत महाविद्यालयांत अध्ययन केलें; व तिथें असतांना बंगाली क्रांतिकारकांच्या गुप्त मंडळांशीं आपला घनिष्ठ संबंध होता, असें ते नेहमीं सांगत असत. त्यांच्या सांगण्यांत कधीं कधीं असेंही येत असे कीं, माणिकतोळा प्रकरण फुटल्यावर आपण मोठ्या शिताफीनें पोलिसांच्या हातांवर तुरी देऊन लाहोरला आलों; आणि, पंजाब युनिव्हर्सिटीची एम. एल. ओ. ची पदवी संपादन करून, सर्व कांहीं स्थिरस्थावर झाल्यानंतर, मुंबईस येऊन धन्वंतरीमंदिर स्थापन केलें. आपल्याला 'भिषग्भास्कर' ही पदवी त्रिवेंद्रम् येथें भरलेल्या वैद्यकसंमेलनांत मिळाली, असें त्यांच्या बोलण्यांत केव्हां केव्हां येत असे. पण, मुंबईच्या एका टवाळ वर्तमानपत्रानें त्यांच्या या सर्वच पदव्यांबद्दल एकदां शंका उपस्थित करून, त्रिवेंद्रम् येथें वैद्यकसंमेलनच मुळीं कधीं भरलें नव्हतें, असें जाहिर केलें. पण, शास्त्रीबुवांनीं या क्षुद्र टीकेकडे लक्ष दिलें नाहीं. त्यांच्या मुखांतून विष्णुसहस्रनामाचा घोष अविरत चालू असे. त्याचें कारण नानासाहेब असें सांगत असत कीं, कलकत्त्यास असतांना जिव्हालौल्यामुळें शास्त्रीबुवांना मत्स्याहाराची चटक लागल्याकारणानें

तज्जन्य पापाच्या क्षालनार्थ आपल्या जिव्हेवर ते विष्णुसहस्रनाम अखंड नाचवीत असतात. संस्कृतप्रमाणें इंग्रजी वाङ्मयाशींही आपला गाढ व्यासंग आहे, असें भासविण्याची लटक त्यांना मधून मधून येत असे; व पुष्कळदां हंसें होण्याची भीति पत्करूनही ते आपल्या इंग्रजीच्या चुटपुटत्या ज्ञानाचें प्रदर्शन करित असत.

'प्रबोधन' कचेरींतील हा शनिवारचा अड्डा विशेष गाजलेला होता. तिथें बहुधा रोजच कांहीं विशिष्ट व्यक्ति जमत असत. त्या सर्वांचें एकच एक सामान्य लक्षण सांगावयाचें झालें, तर तें असें सांगतां येईल कीं, ते सारेच या दोषपूर्ण जगावर कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें नाराज झालेले व म्हणून इतरांना शिव्या देण्याची प्रत्येक पर्वणी साधावयाला उत्सुक असलेले असे होते. कोणी जात्यभिमान दुखावल्याच्या कल्पनेनें पिसाळलेले, कोणी प्रसिद्धीच्या लालसेनें पछाडलेले, कोणी खासगी हेवेदावे उगवून घेण्यासाठीं आसुसलेले, कोणी आपल्या विकृत बुद्धीचें चोज पुरवून घ्यावयाला चटावलेले, तर कोणी स्वाभाविक पैशुन्यानें प्रवृत्त झालेले—अशा निरनिराळ्या मनोवृत्तीच्या व्यक्ति या मंडळांत होत्या. त्यांपैकीं प्रत्येकाची विशिष्ट प्रवृत्ति ओळखून, तिचा उपयोग आपल्या पत्रासाठीं कसा करून घ्यावा, या कसबांत नानासाहेब निष्णात होते. ते इतके कीं, आपल्या लगामीं असलेल्या या व्यक्तींना प्रसंगानुसार मोठ्या शिताफीनें राबवून घेऊन, संपादनाच्या खात्यावर एक पैही खर्च न करितां, त्यांनीं आपलीं दोन्ही नियतकालिकें चालविलेलीं होतीं. त्यांना असा योग्य अभिमान वाटत असे कीं, आपल्या संग्राहक धोरणाच्या दावणींत कडव्या देशभक्तापासून तों उलट्या काळजाच्या पोलिस अधिकाऱ्यापर्यंत सर्व प्रकारचे लोक गोंवले गेलेले आहेत.

शास्त्रीबुवा ही या अड्ड्याची उत्सवमूर्ति होती. त्यांच्या पाल्हाळिक भाषणांत, अप्रस्तुत कोट्यांत आणि आकर्ण हास्यांत अशी कांहीं मौज असे कीं, तिच्यामुळें त्यांच्या सहवासांत कोणाचाही एकाद दुसरा तास मोठ्या गंमतींत जात असे. त्यामुळें, दुसऱ्याला ऐकूं येईल अशा बेतानें विष्णुसहस्रनाम पुटपुटत लगबगीनें येणारी त्यांची ती मूर्ति पहातांच, मध्यंतरीं चाललेल्या वादामुळें विरसलेली नानासाहेबांची चित्तवृत्ति फिरून उल्लसित झाली.

---

प्रकरण ११ वें

# उभयान्वयी उपसंपादक



"यावें, यावें रावसाहेब, यावें शास्त्रीबुवा!" नानासाहेब त्यांच्या स्वागतार्थ आपलें अवजड शरीर किंचित् उचलल्यासारखें करित उद्गारले. 'कां,—आज वेळ कां लागला इतका शास्त्रीबुवा?"

"आमच्या या विलंबाला तसंच कांहीं बलवत्तर प्रयोजन घडलं," शास्त्रीबुवा आपल्या बसक्या पण रुंद नाकपुड्यांत तपकीर कोंबीत उद्गारले. "रावसाहेबांचा अन् आमचा असा कार्यक्रम ठरला होता कीं, आमच्या धन्वंतरीमंदिरांत दुपारीं बृहदीश्वराच्या देवालयांतील शिलालेखाची चर्चा करायची अन् मग इथं यायचं. पण, चर्चेला प्रारंभ होतो न होतो, तोंच आमचे कलकत्त्याचे अंतेवासी, माणिकतोळा प्रकरणांतले उपेंद्रनाथ,—आपल्याला श्रुत असतीलच बहुधा;—चुकतेच अंदमानाहून परत आले आहेत,–ते अकस्मात् उपस्थित झाले! मग काय?—साऱ्या जुन्या स्मृति पुनरुज्जीवित झाल्या; अन् त्या विश्रब्धालापांत काळ कसा व्यतीत झाला, तें कळलं सुद्धां नाहीं. काय रावसाहेब?–हः हः हः–"

रावसाहेबांकडे पाहून शास्त्रीबुवांनीं मोठ्यानें हास्य केलें. त्याबरोबर त्यांची जिवणी कानांपर्यंत दुभंगली जाऊन, त्यांच्या दंतावलीच्या दोन्ही रांगा उघड्या पडल्या.

"मग रावसाहेबांच्या ज्ञानांत मोठी महत्त्वाची भर पडली म्हणायची आज आपल्या साहचर्यामुळं," प्रोफेसरसाहेब रावसाहेबांना बोलण्याची संधि न देतां म्हणाले.

"हः हः हः—तसंच नव्हे केवळ," शास्त्रीबुवा हंसत हंसत उद्गारले. "पण थोडंसं तसं घडलं खरं! उपेंद्रनाथ म्हणजे अरविंदांचे अगदीं उजवे हात. त्यांनीं अशा एक एक रोमहर्षण कथा सांगितल्या कीं, रावसाहेब अगदीं थक्क होऊन गेले. आम्हांला कांहीं अपूर्व नव्हतं त्यांत. आम्ही म्हणजे अरविंदांच्या अगदीं अंतरंगांतले बघा!—'कोबिरॉज,' 'कोबिरॉज' म्हणून दिवसांतून दहा वेळां तरी त्यांनीं

आम्हांला बोलावून घ्यायचं अन् प्रत्येक कामांत सल्ला विचारायचा;—म्हणून तर हें माणिकतोळा प्रकरण इतकं रंगाला आलं! अहो, आमची सुद्धां त्या वेळीं अंदमानाला गच्छंती व्हायची.—पण किती झालं तरी महाराष्ट्रबुद्धि! वेळेवर असा गनिमी कावा लढवला म्हणतां कीं, अगदीं सही सलामत निसटलों. इतक्या शिताफीनं कीं, रावसाहेबांच्या खात्यांत कुठं कुठं म्हणून आमची नोंद सांपडायची नाहीं. काय रावसाहेब?"

शास्त्रीबुवांनीं रावसाहेबांच्या मांडीवर चापट मारून पुन्हा टोलेजंग हास्य केलं. या वेळीं त्यांच्या तोंडावर उठलेल्या हास्याच्या उत्तुंग लाटांनीं त्यांचे डोळे इतके आकुंचित झाले कीं, भुंवया आणि मिशा यांच्या दोन रेषाच फक्त त्या चिमुकल्या मांसल वर्तुलावर शिल्लक राहिल्या.

"आमचं खातं काय हो? तें कितीही हुशार असलं तरी त्याला तुमची ती अंतरंगांतली माहिती कुठून मिळणार?" रावसाहेब आपल्या खात्याचा कमीपणा कबूल करीत म्हणाले. "बाकी कांहीं म्हणा शास्त्रीबुवा, अरविंदांची बुद्धिमत्ता कांहीं और आहे. आपल्याला नव्हतं वाटलं कीं, हा ध्येयवादी इतका कारस्थानी आणि खोल असेल म्हणून. त्यांचं तें 'वंदे मातरम्', तें 'आर्य' मासिक, तें 'अहन् ॲन्ड अदर पोएम्स' सगळं सगळं वाचलं आहे पहा मी;—पण ही कल्पना नव्हती आपल्याला आली कधीं! उपेंद्रांनीं सांगितलेल्या एकेक गोष्टी ऐकून आपण तर अगदीं चीत झालों बुवा.—दुसरा मॅझिनीच बघा अगदीं! अहो, महाराष्ट्रांतल्या क्रांतिकारक मंडळांत जर असा मुत्सद्दी पुरुष असता, तर इंग्रजी राज्य चुटकीसरसं उखडलं असतं इथून;—पण दुर्दैव आपलं म्हणून तो त्या पोकळ काछ्याच्या, फुगीर गालाच्या, सैल जिभेच्या अन् ठिसूळ मनाच्या बंगाल्यांत जन्माला आला. त्याचं तें योगज्ञान आणि तीं गुप्त मंडळं चालविण्याची करामत पाहिली, म्हणजे असं वाटतं कीं, शिव-समर्थांची एकत्र मूस ओतून परमेश्वरानं हा महापुरुष निर्माण केला असावा. पण काय करावं? परिस्थिति अनुकूल नाहीं, म्हणून तें सारं वायां गेलं—"

रावसाहेबांनीं वाक्य पूर्ण करण्याऐवजीं एक प्रदीर्घ उसासा टाकला.

"हळहळूं नका, रावसाहेब इतके!—अरविंदांना साधलं नाहीं, तें तुम्ही

करून दाखवा कीं !" प्रोफेसरसाहेब हळूच भगवंतरावांकडे दृष्टिक्षेप करित मध्येंच उद्गारले. "या नाहीं, पुढच्या जन्मीं ! या जन्मीं तुम्हांला पोलीस खात्याचा अनुभव आलेला असल्यामुळं अरविंदांसारखे तुम्ही त्यांच्या जाळयांत कधींच सांपडणार नाहीं. त्या अनुभवाच्या जोरावर तुम्ही असा व्यूह रचा कीं, इंग्रजांचं राज्य अगदीं पत्त्यांच्या बंगल्यासारखं कोसळून पडलं पाहिजे.—काय शास्त्रीबुवा खरं कीं नाहीं ?"

यावर उत्तर देण्यासाठीं शास्त्रीबुवा तोंड उघडतात न उघडतात, तोंच भगवंतराव, स्वतःला असह्य झालेल्या त्या संभाषणाला कलाटणी देण्यासाठीं, भिषग्भास्करांकडे वळून म्हणाले, "काय शास्त्रीबुवा, आज बबनराव कां नाहीं आले अजून ? वास्तविक तुम्ही तिघे मिळूनच यायचे; पण आज तुम्हांलाही उशीर झाला अन् त्यांचाही अद्याप पत्ता नाहीं, हें कसं काय ?"

"तसं झालंय खरं," शास्त्रीबुवा म्हणाले. "आज दुपारीं तेही आले होते नित्याप्रमाणं धन्वंतरीमंदिरांत. पण आम्ही इकडं यायला निघण्याच्या सुमारास,—'सर दिनानाथांचं व्याख्यान आहे आज तुकाराम अन् वर्डस्वर्थ यांच्यावर;—तिकडून जरा फेरफटका करून येतों तुमच्या मागोमाग,' असं म्हणून ते जे सटकले ते सटकलेच ! पण काय हो प्रोफेसरसाहेब, आज तुमच्या कॉलेजांत सर दिनानाथांचं व्याख्यान अन् तुम्ही इथं कसे ?"

इतक्यांत जिन्यांतून आवाज आला—

"अहो ते इथंच असायचे अशा आणीबाणीच्या वेळीं ! असल्या भाऊगर्दींत घोडा घालायला ते कांहीं अडाणी नाहींत."

या शब्दांच्या मागोमागच ते उच्चारणारे उंचेले, काळसर, थोडेसे तिरळे, तरुण गृहस्थ दिवाणखान्यांत येऊन हजर झाले; व उभ्या उभ्याच प्रो. राळे यांच्याकडे पहात ते उद्गारले, "—पण प्रोफेसरसाहेब, हद्द झाली बुवा तुमच्या कॉलेजांतल्या पोरांची ! आज अगदीं पोलीस आणायची वेळ आणली होती तिथं त्यांनीं !"

त्याबरोबर सारीच मंडळी त्यांना एकदम ओरडून विचारती झाली, "म्हणजे ?-काय झालं तरी काय आज बबनराव, तिथं ?"

तीं सारीं संभाषणें इतका वेळ निर्विण्ण मनानें ऐकत असलेल्या केशवनेंही या वेळीं अत्यंत उत्सुकतेनें बबनरावांकडे पाहिलें. प्रो. राळे मात्र अगदीं स्तब्ध बसलेले होते.

"ऊंः, तसं कांहीं विशेष नाहीं हो;—नेहमींचंच आहे तें! यांचं कॉलेज म्हणजे अलीकडे शांतारामाची चाळच होऊन बसली आहे दुसरी!"

इतकें बोलून बबनराव शास्त्रीबुवांकडे वळले; व जणुं कांहीं त्या व्याख्यानाचा विषय कधीं निघालाच नव्हता, अशा आविर्भावानें त्यांच्या पाठीवर थाप मारून म्हणाले, "काय कविराज, काढतां का जरा तुमची ती मस्तिष्कतापनाशिनी, कस्तूरि-कामोदमिश्र, मद्र-मृत्तिका? अन् काय हो रावसाहेब, झालं का काय तुम्हांला हवं होतं तें त्या शिलालेखांतून निष्पन्न? भगवंतराव, रावसाहेबांचा एक नवीन शोध माहित आहे का आपल्याला? शिवाजीच्या आडनांवाची एक नवी व्युत्पत्ति बसविली आहे त्यांनीं अलीकडे!—होयसळ–पोयसळ–भोसल–भोसले!—काय रावसाहेब, बरोबर आहे ना?"

असें विचारून त्यांनीं शास्त्रीबुवांनीं पुढें केलेल्या डबींतील तपकिरीची एक भली मोठी चिमूट घेऊन, ती आपल्या नाकांत हंसत हंसत कोंबली.

पण, चुरचुरीत बातम्यांसाठीं हपापलेल्या नानासाहेबांना त्यांचें हें उडवाउडवीचें नाटक मुळींच आवडलें नाहीं. ते किंचित् वैतागानें त्यांना म्हणाले, "कोणताही विषय मुद्दाम उकरून काढून मग तो अर्धवट टाकून देण्याची तुमची ही खोड फार वाईट आहे, बबनराव! मग सांगतां का आम्हांला एकदां काय झालं यांच्या कॉलेजांत तें?"

"अहो, व्हायचंय काय? मी सांगतों तुम्हांला काय झालं असेल तें! आमच्या कॉलेजांत ती मराठी लिटररी सोसायटी निघाली आहे ना अलीकडे? तिचा सेक्रेटरी तो मांजरेकर;—त्यानं व त्याच्या उपटसुंभ साथीदारांनीं सभेंत केला असेल गोंधळ, दुसरं काय? तरी मी प्रिन्सिपॉलसाहेबांच्या कानीं कपाळीं सारखा ओरडतों आहें कीं, ही मराठी सोसायटीची ब्याद तुम्ही काढून टाका आपल्या कॉलेजांतून! पण त्यांना त्या मांजरेकराविषयीं फार पुळका आहे; अन् म्हणूनच हें सारं प्रकरण इतक्या थराला आलंय—"

" एकंदरींत कल्पना होती तर आपल्याला आगाऊच या साऱ्या गोंधळाची ! बाकी प्रोफेसरसाहेब, आपण अगदीं खरे धूर्त;—दुसरे मल्हारराव होळकरच ! त्यानं जसा पानिपताला तोंड लागण्यापूर्वीच रणांगणांतून पळ काढला, तसे आपण सभेला सुरवात होण्यापूर्वीच इकडे निघून आलां ! वास्तविक या वेळीं आपण सर दिनानाथांबरोबर मलबार हिलवर असायचे;—त्यांच्या मोटारीशिवाय आपलं फिरणं नाहीं व्हायचं कधीं ! अन् आजच नेमका आपल्याला नानासाहेबांना भेटायला मुहूर्त सांपडला;—याचं नांव योगायोग ! सर माणेकजींच्या सहवासांत राहून आपण मुत्सद्दीपणाची चांगलीच कमाई केली म्हणायची ! मग आतां आपणच सांगा ना सारी हकीगत ! हं, होऊं द्या संजय उवाच—," बबनराव खोंचून म्हणाले.

नंतर भगवंतरावांकडे वळून त्यांनीं विचारलें, " मग काय भगवंतरावजी, कांहीं अपेक्षा आहे का आपल्याला मजकडून या अंकासाठीं ? असेल, तर या व्याख्यानावरच देतों कॉलम दोन कॉलम घांसून ! "

बबनराव हे मुंबईतील एक विख्यात कलमबहाद्दर होते. त्यांचा विशेष हा होता कीं, कोणत्याही व्यक्तींतील, ग्रंथांतील, दृश्यांतील किंवा प्रसंगांतील फक्त दोष तेवढेच त्यांच्या दृष्टींत प्रामुख्यानें भरत असत. किंबहुना स्वतःशिवाय त्यांना जगांत आदरणीय असें मुळीं कांहीं नव्हतेंच. कोणत्याही प्रसिद्ध किंवा पूज्य व्यक्तीची टवाळी करावयाला त्यांची नेहमीं एका पायावर तयारी असे. या बाबतींत त्यांनीं शिष्टाचाराची देखील भीड कधीं मानली नाहीं. एकादा देशभक्त तुरुंगांतून सुटून आला, एकाद्या पुढाऱ्याला मानपत्र मिळत असलें किंवा एकाद्या कार्यकर्त्याचा स्मृतिदिन असला, तरी तसल्या प्रसंगींसुद्धां त्याच्यावर अभद्र टीकेनें भरलेला निंदात्मक लेख लिहावयाला त्यांना दिक्कत वाटत नसे. फार कशाला, मृत्युलेखांत सुद्धां दिवंगत व्यक्तीला कोंपरखळ्या मारावयाला ते चुकत नसत. ते मोठे संग्रही होते; व नामांकित व्यक्तींविषयींच्या साऱ्या कंड्या आणि कुचाळ्या त्यांच्या खिशांत सदैव भरलेल्या असत. किंबहुना त्या गोळा करणें हाच त्यांचा एकमात्र व्यवसाय होता म्हटलें तरी चालेल. आपल्या लेखांतून या गांवगप्पांचा मसाला भरून थोर व्यक्तींची बदनामी करावयाला त्यांना कधींही शंका वाटली नाहीं. त्यांचें हें सारें लेखन ' व्यतिपात ' या टोपण नांवानें

चालत असे. गृहस्थ जितका गप्पिष्ट आणि शिवराळ तितकाच खादाड होता; व नानासाहेबांच्या मनांतून कोणावर हल्ला चढवावयाचा असला, म्हणजे त्याच्या आवडीचीं चमचमीत खाद्यें त्याला यथेच्छ चारून, हें मारेकऱ्याचें काम त्याच्या-कडून ते मोठ्या खुबीनें करून घेत असत. बबनराव आपल्याला रानडे–गोखले यांचे अभिमानी म्हणवीत असत. पण, मुंबईतील एका राष्ट्रीय साप्ताहिकाचे ते उपसंपादक होते; व इतरांना शिव्या देण्याची आपली हौस त्यांना तेथें फेडून घेण्याची शक्यता नसल्यामुळें, ते 'प्रागतिकां'तही नेहमीं लिहीत असत. त्यांच्या या दुटप्पीपणाबद्दल प्रोफेसरसाहेब त्यांना नेहमीं उभयान्वयी म्हणत असत; व त्यांच्या बेजबाबदार लेखनकामाठीबद्दल गवगवा करून प्रोफेसरसाहेबांनीं त्यांना मवाळ पक्षाच्या अंतरंगांत शिरणें अशक्य करून सोडलें होतें.

एकदां असा चमत्कारिक प्रसंग घडून आला कीं, तेव्हांपासून त्या दोघांत कायमचें वितुष्ट उत्पन्न झालें. बबनराव जरी स्वतःला नेमस्त पक्षाचे अभिमानी म्हणवून घेत असत, तरी त्यांच्यासारख्या सामान्य स्थितींतील माणसाला त्या पक्षांत प्रतिष्ठा मिळणें शक्य नव्हतें. त्यामुळें मुंबईतील नेमस्तांच्या महत्त्वाच्या खाजगी सभा जेव्हां होत, तेव्हां आपल्या ओळखीच्या एकाद्या लब्धप्रतिष्ठिताच्या आश्रयानें त्यांना तेथें स्वतःचा प्रवेश करून घ्यावा लागत असे; व अशा वेळीं पुष्कळदां त्यांचा अपमान होण्याचेही प्रसंग येत असत. पण, बबनरावांनीं असल्या प्रसंगांची कधीं दिक्कत केली नाहीं. ते नेहमीं म्हणत असत कीं, वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडलेल्या माणसानें बातम्या मिळविण्याच्या बाबतींत, मनाची काय किंवा जनाची काय, लाज म्हणून बाळगतां कामा नये. या दंडकानुसारच ते स्वतः वागत असत. बेझंटबाईच्या अटकेनंतर पुढील धोरणाचा विचार करण्यासाठीं नेमस्त पक्षाच्या शेलक्या पुढाऱ्यांची एक अगदीं खासगी सभा सर जीवनलाल यांच्या महालक्ष्मीवरील बंगल्यांत भरली होती. त्या सभेला नानासाहेबांच्या बरोबर मोठी खटपट करून बबनरावही हजर राहिले. सभेमध्यें कडाक्याचा वाद होऊन एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढण्यापर्यंत मजल गेली. अशा तऱ्हेचा वाद म्हणजे बबनरावांसारख्या कुत्साप्रिय माणसाला तें एक घबाडच. वस्तुतः ती सभा अत्यंत खाजगी स्वरूपाची होती. इतकी कीं, तिच्यांत झालेल्या वादळाचा अगदीं सौम्य प्रतिध्वनि सुद्धां मुंबईच्या नेमस्त-

पक्षीय किंवा निमगोऱ्या वर्तमानपत्रांत उठला नाहीं. पण, बबनराव ज्या जहाल पत्राचे उपसंपादक होते, त्यांत मात्र या सभेंतील साऱ्या विचित्र प्रकारांचें रंगवून केलेलें विकृत वर्णन प्रसिद्ध झालें. प्रो. राळे यांनीं तो अंक तांबड्या पेन्सिलीनें खुणा करून मुद्दाम सर जीवनलालांकडे पाठवून दिला; व त्याबरोबरच तें सारें वर्णन कोणी लिहिलें असावें, याबद्दलही आपला अंदाज त्यांना कळविला. तो लेख वाचून सर जीवनलालांना अतिशय चीड आली; त्यांनीं ताबडतोब नानासाहेब व बबनराव यांना बोलावून घेतलें; आणि, तुमच्या सारख्या दोन डगरींवर हात ठेवणाऱ्या बेजबाबदार लेखकांमुळें वर्तमानपत्रांचें नांव बदू होतें, असे उद्गार काढून त्यांनी बबनरावांना जवळ जवळ अर्धचंद्र दिला. त्यांचा तो संताप पाहून नानासाहेब इतके घाबरले कीं, अर्जुनाची सुद्धां श्रीकृष्णाचें विराट् स्वरूप पाहून इतकी गाळण उडाली नसेल. त्या दिवसापासून बबनरावांनीं प्रो. राळे यांच्याविषयीं मनांत दंश धरिला होता.

बबनरावांच्या त्या मर्मभेदक भाषणानें प्रोफेसरसाहेब अगदीं संतप्त झाले; त्यांचा जाड अधरोष्ठ जोरानें हलूं लागला; व एकदम एकेरीवर येऊन ते उद्गारले, " बबनराव, तुम्ही पायरी ओळखून बोलत जा जरा आपली ! मी कांहीं उभयान्वयी आणि बेजबाबदार मनुष्य नाहीं तुमच्यासारखा ! भगवंतरावांच्या न् नानासाहेबांच्या बैठकींत तुम्ही बसतां, म्हणून कांहीं तुम्ही असं समजूं नका कीं, वाटेल त्याच्यावर तोंड टाकण्याची सनद तुम्हांला मिळाली आहे—"

पण नानासाहेबांनीं त्यांना पुढें बोलूं दिलें नाहीं. ते दोघांनाही उद्देशून म्हणाले, " हें काय आरंभलंय तुम्ही आज ? आपण काय इथं एकमेकांच्या उखाळ्या पाखाळ्या काढायला का जमत असतों ? बबनराव, तुम्ही तरी अगदीं खंवचट बुवा ! राहूं द्या आतां तुमचं हें भांडण अन् सांगा बरं सभेंत काय झालं तें एकदां;—उगाच आणखी अंत नका पाहूं आमचा ! काय शास्त्रीबुवा, आपला बबनराव हुशार खरा, पण एकंदरींत मोठा द्वाड गृहस्थ आहे नाहीं ?"

इतकें बोलून, जणुं कांहीं त्या भांडणावर विनोदाचें आवरण घालावें, म्हणून नानासाहेब बळेंच मोठ्यानें हंसले.

" तें काय विचारावं, नानासाहेब ? बबनरावाचा द्वाडपणा हेंच तर त्याचं वैशिष्ट्य आहे ! ' स तस्य स्वो भावः ' हेंच खरं.—परोत्कर्षासहिष्णुता हा जसा

क्षत्रियांचा तसा द्वाडपणा हा वर्तमानपत्रकारांचा अलंकार आहे बघा.—अन् माहिती तरी किती! त्या माहितीमुळंच तर हा द्वाडपणा खुलून दिसतो इतका. त्यांचा खिसा सदा अगदीं गरमागरम गप्पांनीं भरलेला असायचा. हिंदुस्थानांतली कोणतीही प्रसिद्ध व्यक्ति घ्या. तिचं कांहीं ना कांहीं तरी बिंग आपलं बबनरावांच्या खिशांत हें सांपडायचंच! बळवंतराव टिळकांनीं मामलेदारीसाठीं अर्ज केला होता, हें कधीं कोणाच्या स्वप्नीं तरी आलं असेल का?—पण बबनरावांनीं तें म्हणजे अगदीं मुद्यापत्त्यानिशीं सिद्ध करून दिलं! मला तर असं वाटतं कीं, बेंजामिन डिस्रायलीनं जशा थोरामोठ्यांच्या गोष्टी लिहिल्या आहेत, तसा आधुनिक महदाख्यायिकांचा संग्रह बबनरावांनीं करावा! मोठा वाचनीय, मोठा रसाळ ग्रंथ होईल! खरोखरी, नानासाहेब आपण जसे आमच्या या मुंबई शहरांतले नॉर्थक्लिफ आहां, भगवंतरावजी जसे आपल्या या क्लबाचे जॉन्सन आहेत, प्रेमाबाई जशा आपल्या महाराष्ट्रांतल्या मादाम द स्ताअल् आहेत, तसे बबरानव म्हणजे आपल्या 'प्रागतिका'चे नेव्हिन्सन आहेत बघा!"

शास्त्रीबुवा आपल्या या कल्पनेवर खूष होऊन शेवटीं जोरानें हंसले. इतक्या जोरानें कीं, हंसण्यामुळें मिटण्याच्या बेताला आलेल्या त्यांच्या डोळ्यांतून पाणी गालांवर ठिबकून अधरोष्ठही पाझरण्याच्या बेतांत आला.

नानासाहेबांच्या त्या इषाऱ्याप्रमाणें बबनरावांनीं तोंड आवरलें खरें; पण अखेरचा म्हणून एक झणझणीत चिमटा त्यांनीं प्रोफेसरसाहेबांना घेतलाच. ते म्हणाले, "बरं बुवा, राह्यलं आमचं. आम्हांला काय माहीत प्रोफेसरसाहेबांची राजकारणी प्रकृति इतकी नाजूक झाली असेल म्हणून! बरं पण नानासाहेब, आमचं इंजिन धडाक्यानं चालूं लागावं अशी जर आपली इच्छा असेल, तर आधीं कांहीं नैवेद्याची व्यवस्था करा बुवा! माझा जीव कसा अगदीं गळून गेला आहे. आज या कविराजांनीं अगदींच फसवलं बघा! एवढे त्यांचे ते बंगाली स्नेही उपेन्द्र आले होते; मला वाटलं कीं, आज होतो आपल्याला कांहीं तरी महल्लाभ;—पाणशेंगांचा रस्सा किंवा निदान कुक्कुटांडार्कयुक्त घृतपरिपूरितापूप! पण शास्त्रीबुवा कसले छट! त्यांनीं करांगळी एवढीं दोन दोन सोनकेळीं अन् कॉफीचा एक एक पेला यांच्यावर भागवलं सारं—"

" अरे पण बबनराव, कांहीं स्थळकाळ तर पहाशील कीं नाहीं ? शनिप्रदोष आहे ना बाबा आज !—अन् तूं म्हणतोस तसले पदार्थ जर घरीं आणले, तर म्हातारी खायला उठेल ना मला ! मी नेहमीं माझ्या रोग्यांना सांगत असतों कीं, मत्स्याहार हा मोठा बुद्धिवर्धक असतो म्हणून;—पण म्हातारीपुढं आमचं सारं वैद्यशास्त्र लटपटतं ! हे नानासाहेब आहेत म्हणूनच कलकत्त्याला घालविलेल्या दिवसांची स्मृति कांहीं शेष राहिली आहे;—नाहीं तर 'ते हि नो दिवसा गताः' असंच म्हणण्याचा प्रसंग आला असता." शास्त्रीबुवा शेवटीं किंचित् गंभीर होऊन उद्गारले.

हें संभाषण चालू असतांनाच, नानासाहेबांनीं आपल्या कोंकणी आवाजांत स्वयंपाक्याला हांक मारून व विशिष्ट खाद्यनिदर्शक असे हातवारे करून सांगितलें, " अरे, गोविंदा, कांहीं तरी आण बाबा, यांच्यासाठीं आधीं ! हें बघ, पहिल्यांदा तें हें आण अन् मग कॉफी घेऊन ये—"

इतकें बोलून ते शास्त्रीबुवांना म्हणाले, " मग, तुमचा शनिप्रदोष आतां इथं सुटणार म्हणतां तर ? चांगली शक्कल काढली तुम्ही ही बिचाऱ्या बबनरावाला उपाशीं मारण्याची—"

" हः हः हः—अहो बबनरावांचं समाधान आमच्या त्या मिळमिळीत फराळानं थोडंच व्हायचं आहे ? बाकी झालीच म्हणायची आतां पारण्याची वेळ;— 'प्रदोषो रजनीमुखम् !' संध्याकाळीं साडेपांच वाजले म्हणजे मग कांहीं हरकत नाहीं अन्नसेवनाला—"

इतक्यांत गोविंदा निरनिराळ्या बशांनीं भरलेला पितळेचा मोठा थोरला ट्रे घेऊन आला; व त्यानें तो नानासाहेबांच्या पुढें ठेवला.

त्याबरोबर शास्त्रीबुवांचा चेहरा अतिशयच खुलला; व डोक्यावरील पागोटें काढीत ते उद्गारले, " काय रे बबनराव, किती गोड आहे नानासाहेबांचा स्वभाव ! या भौतिक युगांत गृहस्थधर्माचं इतकं नैष्ठिक परिपालन करणारीं माणसं फार विरळा !—अगदीं खरेखुरे आहिताग्नि !—सदोदित घरांत तळण पोळण चाललेलं असायचं ! खरोखरी, नानासाहेब, आपण जर मुंबईत नसतां, तर मला आमचं धन्वंतरीमंदिर कलकत्त्याला जाऊन उघडावं लागलं असतं. काय

बबनराव, खरं का नाहीं ?" असें बोलून त्यांनीं बबनरावांच्या पाठीवर थाप मारून संतोषानें आकर्ण हास्य केलें.

"हं, मग होऊं द्यात आतां दोन्ही कामं एकदमच सुरू," नानासाहेब हंसत हंसत म्हणाले.

"अहो, दुसरं काम सुचणार कसं त्यांना आतां ?" शास्त्रीबुवा एका बशींतील खाद्य तोंडांत टाकीत उद्गारले. "नानासाहेब, हीं बोंडें काय नामी झालीं आहेत आजचीं ! अशीं टचटचीत बोंडें फक्त आपल्या मादामकडेच मिळतात, काय प्रोफेसरसाहेब ?" शास्त्रीबुवांनीं डोळे मिचकावीत विचारलें.

"हं बबनराव, मग सांगा बरं एकदां सारी हकिकत;—म्हणजे ठरवतां येईल काय लिहायचं त्याच्यावर तें." भगवंतरावांनीं बबनरावांकडे पाहून म्हटलें. त्यांनीं तिथें ठेवलेल्या एकाही पदार्थाला अद्याप स्पर्श केलेला नव्हता; व नानासाहेबही तेवढ्यापुरतें त्यांचें अस्तित्व विसरल्यासारखे दाखवून वागत होते.

थोड्या वेळानें कॉफी व सुक्या मेव्यानें भरलेल्या बशा आल्या. त्याबरोबर नानासाहेबांनीं अगत्यपूर्वक भगवंतराव व केशव यांना कॉफीचा एक एक पेला देऊन, त्यांच्यापुढें त्यांतल्या दोन दोन बशा ठेवल्या. भगवंतरावांनीं कॉफीचा एक घोंट घेतांच नानासाहेबांनीं आपली मान प्रश्नार्थक बुद्धीनें हलविली. तेव्हां भगवंतरावांनीं, 'छान झाली आहे,' असें म्हणून स्मित हास्य केलें; व पुन्हा एकदां बबनरावांकडे वळून ते म्हणाले, "हं, आटपा लवकर बबनराव; उशिर नको आतां उगाच—"

"खरंच बबनराव, करा बुवा एकदां लवकर सुरवात," रावसाहेब उद्गारले. "असल्या खमंग खाद्यानंतर तुमच्या खमंग गप्पा अवश्य हव्यात."

---

## प्रकरण १२ वें

# ॲंग्लो-मराठ्याची जातकुळी



इतकें मंगलाचरण झाल्यावर वस्तुतः बबनरावांनीं ती हकिकत सांगण्यास सुरवात करावयाला हवी होती. पण, रावसाहेबांचे ते उद्गार ऐकून, बशींतील

खाद्याचा एक भला मोठा तुकडा तोंडांत टाकीत, त्यांनीं एकदां मनःपूर्वक हास्य केलें; व नानासाहेबांकडे पहात ते रवंथ करीत म्हणाले, "अहो, तें तर लागलेंच आहे आमच्या मागं !—तुम्ही थोडेच सोडणार मला माझ्या तोंडून ती सारी हकिकत वदवल्याशिवाय ! घोड्याला शर्यतीच्या मैदानावर सोडण्यापूर्वी जशी दारू पाजावी, तशीं हीं उत्तेजक खाद्यं नानासाहेबांनीं मुद्दामच माझ्यापुढं ठेवलीं आहेत.—पण या भरलेल्या बशा पुढं असेपर्यंत तरी बुवा आपल्याला कांहीं बोलणं सुचणं शक्य नाहीं !—काय शास्त्रीबुवा ?—"

"हः हः हः !—बरोबर बोललास बबनराव;—तुझ्यासारख्या ज्ञातास्वादाला या वेळीं बोलणं सुचण कठीणच एकंदरींत.—पण या बशा रिकाम्या व्हायला रे कितीसा वेळ ?—त्यांतून आज तर सारेच पदार्थ कंदर्प-मीन-मिश्र आहेत !—असले हे स्निग्ध पदार्थ पाहिल्यावर आपली तर बुवा अगदीं रसना सार्थवती बभूव ! आतां नानासाहेबांनीं तुला झालेले परिश्रम लक्षांत घेऊन पुन्हा आग्रह केला, तर मात्र मोठी पंचाइत आहे खरी—"

"वा, वा शास्त्रीबुवा, एवढा द्राविडी प्राणायाम कशाला ?" नानासाहेब हंसत हंसत म्हणाले. "फार काळजी दिसते तुम्हांला बबनरावांची ! अरे गोविंदा, आण बावा पुन्हा सारं.—आतां उगाच कां शास्त्रीबुवा बशीवर हात आडवा धरतां ? जर कदाचित् थोडं जास्त झालंच, तर आहेतच तुमचीं तीं चूर्ण न् भस्मं !"

"अहो, चूर्ण न् भस्मं घेऊन काय करतां ?—तीं सारीं लोकांसाठीं आहेत," शास्त्रीबुवा उसासा टाकीत उद्गारले. "तुम्हांला जो काय आग्रह करायचा असेल तो सारा बबनरावाला करा;—विधात्यानं भोक्ता निर्माण केलाय बघा हा त्या सर्व खाद्यांना !"

"कां ? तुमच्या भोक्तृत्वाला आजच कशानं ग्रहण लागलं, शास्त्रीबुवा ?" तो सारा प्रकार पाहून मनांतल्या मनांत अगदीं चिडून गेलेले प्रोफेसरसाहेब मध्येंच बोलले. "शरीर पहावं तर कसं अगदीं तुंद आहे !—तुमच्याकडे बघितल्यावर परमेश्वरानं तुम्हांला फक्त आडवं वाढायचं वरदान देऊन जन्माला घातल्याचा भास होतो—"

"कसलं आलंय तुंद शरीर, प्रोफेसरसाहेब ! अहो, पोकळ वासा आहे निवळ; कोणत्या घटकेला कोसळून पडेल याचा पत्ता नाहीं लागणार तुम्हांला ! अलीकडे

माझ्या प्रकृतीचं असं झालं आहे नानासाहेब, कीं मी औषधं देऊन लोकांच्या शरीरांतून हांकलून दिलेले सारे रोग माझ्या शरीरांत सूड घेण्याच्या बुद्धीनं ठाण देऊन बसलेले आहेत. त्यामुळं एकादा घास जरी पोटांत अधिक गेला, तरी अगदीं प्राणाशीं गांठ येते. त्यांतून असल्या पदार्थांचा अत्याहार तर फारच वाईट.— अहो, हे चमचमीत पदार्थ म्हणजे मनुष्यजातीचे केवळ शत्रु आहेत शत्रु !" बोलतां बोलतां शास्त्रीबुवांनीं आवेशानें आपले दोन्ही हात वर केले.

त्या संधीचा फायदा घेऊन नानासाहेबांनीं झटकन स्वतःच त्यांची बशी भरली; व ते हंसून म्हणाले, "अहो, शत्रु आहेत म्हणूनच तर त्यांचा असा फडशा पाडायचा. बरं पण बबनराव, आतां मात्र अगदीं उशीर नाहीं करायचा हां;— एंजिन झपाट्यानं सुरू होऊं द्या—"

"यांतून एकदां मोकळं होऊं द्या मला, नानासाहेब !" बबनराव आपली तिरळी दृष्टि साभिप्राय फिरवीत म्हणाले; व त्यांनीं आपलें चित्त बशांवर एकाग्र केलें.

नानासाहेबांना असलेली चांभारचौकश्यांची बेसुमार आवड बबनरावांना माहीत होती; व त्या आवडीचें कोड दक्षतेनें पुरवूनच, भगवंतरावांची मर्जी त्यांच्यावर फारशी नसतांही, त्यांनीं 'प्रागतिकां'तील आपलें आसन कायम टिकविलें होतें. आपल्या पत्रांतील बातम्यांच्या पानाचा नानासाहेबांना फार अभिमान होता. कारण तेवढयाच फक्त एका पानावर ते स्वतः जातीनं मेहनत घेत असत. अग्रलेखाबरोबर शेवटल्या दिवशीं छापल्या जाणाऱ्या या पानाचें साहित्य ते झाडून सारीं बारीक सारीक वर्तमानपत्रें चाळून मोठ्या कसोशीनें गोळा करीत; व अशा रीतीनें त्यांनीं श्रमपूर्वक लिहिलेल्या या बातम्यांवर अखेरचा सफाईचा हात फिरविण्याचें काम बबनरावांकडे असे. ते बहुधा प्रत्येक बातमीला कांहीं तरी प्रश्नार्थक किंवा उद्गारचिन्हांकित विषारी वाक्याची जोड देऊन ती शक्य तितकी चटकदार करीत असत. बातम्यांचीं अग्रें अणकुचीदार करून त्यांना व्याजोक्तीच्या विषाचा लेप देण्याच्या त्यांच्या या कौशल्यामुळेंच नानासाहेबांचा त्यांच्यावर इतका लोभ जडला होता. अर्जुनाच्या अक्षय्य भात्याप्रमाणें बातम्या पुरविण्याच्या किंवा पैदा करण्याच्या बाबतींत बबन-

रावांचा खिसा अथांग होता; व त्यांतील इरसाल चिजा संपादन करण्यासाठीं नानासाहेबांची एरवीं घट्ट म्हणून गाजलेली मूठही त्यांच्या त्या खिशांत मात्र केव्हां केव्हां सैल होत असे. 'प्रागतिका'चा खप आपल्या या विविध-वृत्त-विरचन-वैदग्ध्यावरच अवलंबून आहे, अशी त्यांची समजूत होती; व आपल्या अगदीं अंतरंगांतल्या स्नेहीमंडळीजवळ ते नेहमीं म्हणत असत कीं, ' भगवंतरावांच्या लेखांमुळं 'प्रागतिका'चा दर्जा इतका वाढला आहे, हें खरं; पण गिरगांवांतले कारकून अगर परळमधले कामगार आमच्या पत्रासाठीं जो एक आणा मोठ्या खुषीनं खर्च करतात, तो केवळ त्यांतल्या झणझणीत बातम्या वाचण्या-करितां !"

बशा रिकाम्या होतांच बबनरावांनीं शास्त्रीबुवांच्या डबींतून एक भली थोरली तपकिरीची चिमूट घेऊन ती आपल्या नाकांत कोंबली; व एक जोराची शिंक काढून नंतर बोलावयाला प्रारंभ केला. त्यांनीं या वेळीं आसनमांडी ठोकली होती. आणि बोलतांना ते मधून मधून शास्त्रीबुवांच्या पाठीवर किंवा मांडीवर थाप मारीत असत. गवयाला जशी तबल्यावरील ठेकेदार थाप, तसें बबनरावांना तें शास्त्रीबुवांचें पृष्ठस्पंदन स्फूर्तिदायक होत असे. शिंक आल्यावरोबर दोन बोटें नाकपुड्यांवर ठेवून, त्यांनीं आपलें घ्राणेंद्रिय एकदां जोरानें हलविलें; व नंतर ते म्हणाले, " मी सहाच्या सुमाराला यांच्या कॉलेजच्या हॉलमध्यें गेलों.—त्याच वेळीं मुलीं तिथं चिराबाजार भरला होता !—कोणताही प्रोफेसर आला कीं टाळ्या आणि हुश्श हुश्श ! प्रिन्सिपॉलसाहेब जेव्हां सर दिनानाथांना घेऊन आले, तेव्हां टाळ्यांचा व स्टँपिंगचा इतका आवाज झाला कीं, हॉल कोसळतो कीं काय असं मला वाटूं लागलं. सर दिनानाथांची मात्र अशी कल्पना झाली कीं, हें सारं आपलं स्वागतच चाललंय; व अगदीं स्मितमुखानं ते खुर्चीवर येऊन बसले. प्रिन्सिपॉलसाहेबांनीं प्रस्तावना केल्यावर सरसाहेब बोलायला उठले. पण काय ? त्यांच्या तोंडून पहिलं वाक्य बाहेर पडतं न पडतं, तोंच एक उंच, गोरा विद्यार्थी उभा राहून म्हणाला, ' हें व्याख्यान तुकारामावर आहे. म्हणून तें मराठींतूनच झालं पाहिजे." '

इतक्यांत रावसाहेबांनीं मध्येंच विचारलें, " काय हो, नांव काय त्या विद्यार्थ्याचं ? मघाशीं प्रोफेसरसाहेबांनीं सांगितला तो मांजरेकर तर नव्हे ना ?'

तेव्हां बबनराव हंसत हंसत म्हणाले, " सांगतों, सांगतों.—नांवच कशाला ? त्याची सारी जातकुळीच सांगतों तुम्हांला. पण जरा हें तर पुरं होऊं द्या आधीं. सर दिनानाथांना वाटलं कीं, हा प्रश्न आपल्याला थट्टेवर नेतां येईल; व म्हणून ते हंसत हंसत म्हणाले, 'आजचं व्याख्यान तुकारामाप्रमाणं वर्डस्वर्थवरही आहे. तेव्हां तुमचा आग्रहच असेल तर अर्धं व्याख्यान मराठींत अन् अर्धं इंग्रजींत देतों मी !' त्याबरोबर त्या विद्यार्थ्यानं सांगितलं, 'हरकत नाहीं—सुरवात मराठींतून होऊं द्या.' त्याच्या तोंडून ते शब्द बाहेर पडतांच 'मराठी' 'मराठी' असा गलका चारी बाजूंनीं सुरू झाला. तेव्हां मात्र सरसाहेब चकारले; व आपला अगदीं ठेवणींतला भसाडा आवाज काढून त्यांनीं इंग्रजींत बोलायला प्रारंभ केला.—त्यांना वाटलं कीं, आपल्या घनगर्जनेंत तो सारा गलका बुडून जाईल.—पण त्यांच्या प्रत्येक शब्दागणिक गलका वाढतच चालला. तेव्हां मॅक्फर्सनसाहेब अगदीं लाल होऊन उभे राहिले; व आपल्या आवाजांत शक्य तितकी कठोरता आणून त्यांनीं त्या विद्यार्थ्याला विचारलं, 'चंद्रशेखर, याचा अर्थ काय ? तुला आज इथं तमाशा करून दाखवायचा आहे काय ? आजच्या आपल्या सन्मान्य पाहुण्यांचा अशा रीतीनं उपमर्द करायला तुला कांहीं वाटत नाहीं ?' त्यावर त्या विद्यार्थ्यानं न डगमगतां उत्तर दिलं, 'आपल्या पाहुण्यांचा अपमान करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. त्यांच्या विद्वत्तेविषयीं मला आपल्या इतकाच आदर आहे.—पण आजचं व्याख्यान तुकारामावर आहे व म्हणून तें मराठींतच झालं पाहिजे, असा आमचा आग्रह आहे. तो रास्त आहे कीं नाहीं,—आपणच सांगा ! आपल्या आवडत्या बर्न्स कवीच्या कवितांचं विवेचन जर एकादा इंग्रज व्याख्याता उद्यां जर्मन भाषेतून करूं लागला, तर आपल्याला तें रुचेल काय ?' या उत्तरामुळं प्रिन्सिपॉलसाहेब क्षणभर घोंटाळले—"

प्रो. राळे या वेळीं मध्येंच उद्गारले, " इथंच तर चुकतं सारं मॅक्फर्सनसाहेबांचं ! असल्या दबेलपणामुळंच पोरं शेफारतात ! "

तेव्हां रावसाहेब त्यांना म्हणाले, " अहो, मॅक्फर्सन तरी काय करील ? त्या विद्यार्थ्याचं म्हणणं काय चूक होतं ? तुकारामावर एका महाराष्ट्रीयानं इंग्रजींतून व्याख्यान देणं, हें तुम्हांला तरी योग्य वाटतं काय ?"

नानासाहेब ती हकिकत ऐकावयाला इतके आतुर झाले होते कीं, तींत उत्पन्न झालेला हा व्यत्यय त्यांना मुळींच सहन झाला नाहीं. ते जरा रागानेंच त्या दोघांना म्हणाले, "अहो, पण जरा ऐकून तर घ्याल कीं नाहीं पुरतं आधीं? मग आहेच तुमचा त्याच्यावरला काथ्याकूट ! हं, चालूं द्या बबनराव—"

बबनरावांनीं दरम्यान तपकिरीचा एक बार टांसून पुन्हा एकदां शिंक काढली; व नंतर ते म्हणाले, "सरसाहेब तर या वेळीं संतापानं लटलटां कांपत होते. ते मध्येंच खेकसून म्हणाले, 'माझी मातृभाषा मराठी नाहीं,—कोंकणी आहे. तुमचा हट्टच असेल तर तिच्यांतून व्याख्यान देतों.' त्यावर त्या विद्यार्थ्यानं त्यांना [illegible]नं उत्तर दिलं, 'हरकत नाहीं. आम्हांला जरी कांहीं कळलं नाहीं, तरी आपल्या मातृभाषेचा मान आम्ही जरूर राखूं !' आतां मात्र मॅक्फर्सनसाहेब फार रागावले. त्यांनीं टेबलावर जोरानं हात आपटला; व ते त्या विद्यार्थ्याला म्हणाले, 'चंद्रशेखर, मूर्खपणा करूं नको. आजचं व्याख्यान इंग्रजींतून जाहीर झालेलं आहे व तें इंग्रजींतच झालं पाहिजे.' यावर चंद्रशेखरनं त्यांना निर्भयतेनं उत्तर दिलं, 'मी मूर्खपणा करीत नाहीं. आमचा आग्रह एवढाच आहे कीं, हें व्याख्यान तुकारामावर असल्यामुळं त्याच्या मातृभाषेचा मान ठेवण्यासाठीं सरसाहेबांनीं चार वाक्यं तरी मराठींतून बोलावीं.—त्यांना मराठी बोलतां येतं;—मी त्यांची मराठी उपासना ऐकलेली आहे !' या त्याच्या उत्तरामुळं मॅक्फर्सनसाहेब अतिशय चिडले व ओरडून म्हणाले, 'मांजरेकर, मला शिकवूं नकोस. हें कॉलेज माझं आहे व इथं कुणाचीही शिरजोरी मी चालूं देणार नाहीं !—सरसाहेब, आपण व्याख्यान सुरू करा !' पण, सरसाहेबांच्या तोंडून इंग्रजी शब्द बाहेर पडतांच टाळ्या कडकडल्या; तावदानं फुटलीं व 'मराठी' 'मराठी' असा प्रचंड गलका एकदम सुरू झाला. प्रिन्सिपॉलसाहेबांनीं आपल्याकडून गडबड थांबविण्याचा शक्य तितका प्रयत्न केला; मुलांना चुचकारून अन् दबकावून पाहिलं; व चंद्रशेखरला काढून टाकण्याचीही धमकी दिली. पण व्यर्थ. शेवटीं त्यांना सभा बरखास्त करावी लागली; व सरसाहेबांना घेऊन ते मागच्या दारानें निसटले—"

तें सारें ऐकल्यावर नानासाहेब आपल्या वासलेल्या तोंडावर हात ठेवून उद्गारले, "काय तरी व्रात्यपणा हा पोरांचा ! ही बळवंतरावांची शिकवण नव्हेतेय बरं;—म्हणे हे आमचे गुरूच नव्हेत !—"

यावर प्रोफेसरसाहेब म्हणाले, “अहो एवढ्यानं कुठं संपलंय ? तुम्हांला माहीत नाहींत या मांजरेकराचे एक एक प्रताप ! मला तर असं वाटतं कीं, आपल्या या असल्या वाह्यातपणामुळं हा पोरगा एक दिवस काळं पाणी पाहणार बघा—! ” त्यांच्या घाऱ्या डोळ्यांतून या वेळीं संतापाच्या ठिणग्या पडत होत्या.

त्यांचे ते उद्गार ऐकून आणि विशेषतः डोळ्यांतील खुनशीपणाचा दर्प पाहून, ती सारी हकिकत उत्कंठेनें ऐकत असलेल्या केशवच्या अंगावर शहारे आले.

शास्त्रीबुवांना मात्र ती हकिकत ऐकून मोठा संतोष झाला. ते बबनरावांच्या पाठीवर थाप मारून म्हणाले, “ काय रे बबनराव, सर दिनानाथांनीं जर खरोरीच आपल्या मातृभाषेंत भाषण केलं असतं, तर मोठी बहार उडाली असती, नाहीं रे ! लेकाला म्हणावं, एवढा जर तुला मातृभाषेचा अभिमान आहे, तर चालव ना एकदां उपासना कोंकणींतून !––सदा न् कदा तें इंग्रजी कशाला ? परमेश्वर कांहीं इंग्लंडांत नाहीं जन्माला आलेला, त्याला सुटाबुटांत अन् इंग्रजींत आळवायला ! समजेल म्हणावं तुझं मोडकं तोडकं मराठी त्याला ! छान अद्दल घडली आज या दिनानाथाला !”

भगवंतराव इतका वेळ विचारमग्न होते. ते कांहीं तरी आठवल्यासारखें करित म्हणाले, “ पण काय हो, हा चंद्रशेखर कोण ? हें नांव केव्हां तरी कानांवरून गेलेलं दिसतं ! काय रे बाबू, तुझा तो नवा मित्र तर नव्हे ना हा ?— तुम्ही काय माहिती काढली, त्याची बबनराव ? तुमच्या खिशांत असेलच त्याची सारी कुळकथा ! ” इतकें बोलून ते बबनरावांकडे पहात थोडेसे हंसले.

“ हो तर;—आजच्या या नाटकांतल्या मुख्य नायकाची माहिती आपल्याला न मिळून कसं चालेल ? व्याख्यान आटोपल्यावर तोच उद्योग केला मी;–– त्यामुळंच तर इतका उशीर झाला ! फ्रेंच पुलाजवळ ती टुमदार निळी बंगली आहे ना ?—तिच्या मालकिणीचा मुलगा आहे म्हणतात हा ! ” बबनरावांनीं शेवटीं अर्थपूर्ण नजरेनें डोळे मिचकावीत नानासाहेबांकडे पाहिलें.

“ म्हणजे,––सांगतां तरी काय तुम्ही हें ? ” नानासाहेब आश्चर्यानें आपले दोन्ही हात पुढें करून उद्गारले. “ भगवंतरावजी, आपल्या गांवची ती नायकीण

सकवार आहे ना ?--तिचा मुलगा म्हणतात हा !—आतां आली त्याची सारी कुळकथा लक्षांत—"

त्यांचे ते उद्गार ऐकून भगवंतरावांनीं प्रश्नार्थक बुद्धीनें कपाळाला आंठ्या घातल्या. आणि रावसाहेब म्हणाले, " अरे, पण आम्हांला ऐकवा ना नानासाहेब ती कुळकथा एकदां.—बबनरावांपेक्षां आपलीच माहिती अधिक दिसते आहे या प्रकरणांत !"

" अहो, किती झालं तरी गांवकरीण आहे ती त्यांची ! मधून मधून समाचाराला सुद्धां जात असतील नानासाहेब तिच्या. काय बबनराव, तुम्ही खाल्ली आहे कीं नाहीं नानासाहेबांच्या बरोबर तिच्या हातची कधीं पानपट्टी ?" शास्त्रीबुवा बबनरावांच्या पाठीवर थाप मारून फिदफिदी हंसले.

" मोठा चमत्कारिक आहे इतिहास त्या पोराचा. आमची ती सकवार गांवाहून आली, तेव्हां सुंदर दिसत असे फार; अजूनसुद्धां कशी केतकीच्या पानासारखी दिसते !—तिला जस्टिस वल्लभदासांनीं आश्रय दिला. एकदां त्यांनीं आपल्याबरोबर चीफ जस्टिस मॅक्वर्थ यांना नेलं तिच्या गाण्याला. ते हिंदी नृत्यगायनाचे मोठे भोक्ते.—सकवारचं नृत्यकौशल्य पाहून ते खूष झाले अगदीं;—अन् त्यांच्याच कृपाप्रसादानं हा मुलगा झाला पुढं तिला ! त्याचे डोळे, कपाळ अन् केंस पहा तुम्ही;—दुसरा मॅक्वर्थसाहेबच वाटेल तुम्हांला !"

" अरे का हो, पण ते मॅक्वर्थसाहेब वेश्याव्यवसायप्रतिबंधक कमिटीचे अध्यक्ष होते ना ? अन् मग हें कसं काय ?" ती हकीकत ऐकून चमकलेल्या प्रोफेसरसाहेबांनीं मध्येंच विचारलें. आतां त्यांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. न्या. मॅक्वर्थ व प्रि. मॅक्फर्सन यांचा फार स्नेह होता, या गोष्टीची त्यांना आठवण झाली; व त्यामुळेंच तर प्रिन्सिपॉलसाहेबांचा चंद्रशेखरवर इतका लोभ नसेल ना, असा विचार त्यांच्या मनांतून डोकावून गेला.

" अहो, तुमचे सर माणेकजी नाहींत का मद्यपानप्रतिबंधक कमिटीचे अध्यक्ष ?—तसंच हें ! त्यांत नवल काय वाटलं तुम्हांला एवढं ?" बबनरावांनीं संधि साधून टोला हाणला.

" अन् असले म्हणून बिघडलं कुठं ?" नानासाहेब उद्गारले. " आधीं सकवार ही कांहीं वेश्या नव्हे. चांगली घरंदाज नायकीण आहे. आणखी दुसरं असं कीं,

मॅक्वर्थसाहेबांशीं संबंध आल्यावर बैठकी करायचंसुद्धां सोडलं तिनं. क्वचित वल्लभदासांच्या मार्फतीनं कुणी भीड घातली, तर ती जात असे एकादे वेळीं. पण अलीकडे तेंही नाहीं. मॅक्वर्थसाहेबांनीं इंग्लंडला जातांना तिला पन्नास हजार नगद दिले म्हणतात. त्यांच्या फोटोचं लॉकेट मंगळसूत्रासारखं गळ्यांत बाळगलं आहे तिनं आपल्या !—तशी ती फार चांगली आहे हो—

"हो तर !—वसंतसेनाच दुसरी !" शास्त्रीबुवा डोळे मिचकावीत बोलले. "नानासाहेब, फार लोभ दिसतो बुवा तुमचा आपल्या गांवकरणीवर. आम्हांला तरी ऐकवा एकदां तिचं गाणं. काय रावसाहेब, तुम्ही चलाल कीं नाहीं ?"

"हो, हो,—न चलायला काय झालं ? तिलाच काय पण त्या चंद्रशेखरलासुद्धां पाहून ठेवला पाहिजे एकदां ! अशीं पराक्रमी माणसं एकदां तरी डोळ्यांखालून घातली पाहिजेत; त्यांतून हा तर ॲग्लो–मराठा ! जगांतल्या दोन श्रेष्ठ जातींचे गुण त्याच्यांत एकवटलेले," रावसाहेब हंसत हंसत उद्गारले.

"हें पहा बबनराव, त्याच्या त्या कुळकथेशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. दिनानाथांना अडवण्यांत मात्र त्याचा मुद्दा अगदीं बरोबर होता." भगवंतराव बबनरावांना सूचना देण्याच्या हेतूनं म्हणाले. "त्याच्या वर्तनाचा तुम्ही निषेध करा;—पण दिनानाथांनाही दोष द्यायला चुकूं नका. अन् या माहितीचा संपर्क-सुद्धां नको त्या लेखाला. नानासाहेब, प्रूफ पाठवा उद्यां त्याचं माझ्याकडे. मग काय चलायचं ना आतां रावसाहेब ?" बोलतां बोलतां भगवंतराव उभे राहिले.

बाकीची मंडळीही लगेच उठली. शास्त्रीबुवा मात्र अद्याप बसलेलेच होते. त्यांनीं नानासाहेबांना हळूच विचारलें, "मादामकडे नाहीं चलायचं का आज ?"

नानासाहेबांनीं भगवंतरावांकडे पाहिलें. पण ते कांहीं बोलणार तोंच प्रोफे-सरसाहेब उद्गारले "इतक्या उशीरां ? 'मादाम'कडे जायची वेळ होऊन गेली शास्त्रीबुवा !" इतकें बोलून ते फ्रेंच भाषेत अर्धवट स्वतःशींच पुटपुटले. "या वेळीं कुठलं तें फुलपांखरूं मोकळं सांपडायला ? (Comment trouver cette fille-de-joie inoccupe' maintenant ?)"

बिचारे शास्त्रीबुवाही निराश होऊन उठले.

---

## प्रकरण १३ वें

# चंद्रशेखर



" चंद्रा, चंद्रा, अरे चंद्रशेखर—"

केशवनें रस्त्यावरून हांक मारली. रात्रींचे दहा वाजून गेलेले असल्यामुळें रस्ता या वेळीं अगदीं शांत होता; व त्या बंगलींतून येणाऱ्या गायनाच्या मंजुळ आलापांनीं त्या शांततेला एक प्रकारची माधुरी आली होती.

केशवच्या तिसऱ्या हांकेबरोबर त्या निळ्या बंगलीच्या माडीवरील खिडकींत एक तरुण मुलगा येऊन उभा राहिला. त्याबरोबर, रस्त्यावरील विद्युद्दीपाचा झग-झगीत प्रकाश त्याच्या तोंडावर पडून, स्मितामुळें झालेली त्याच्या चिमुकल्या, आरक्त ओठांची हालचाल आणि गालाला पडलेल्या नाजूक खळ्या केशवला स्पष्ट दिसल्या. त्याचा गौरवर्ण लालसर नव्हता किंवा पिंवळसरही नव्हता; तर पहांटच्या फिक्या पडलेल्या चंद्राच्या कांतीप्रमाणें फटफटीत पण सतेज असें त्याचें गोरेपण होतें. त्याला अद्याप मिसरूड चांगली फुटलेली नव्हती. तिची ती अस्पष्ट, असित रेषा त्याच्या गोऱ्यापान, नितळ चेहऱ्यावर फारच मोहक दिसत होती. त्याच्या भव्य कपाळावर न विंचरलेल्या जाड, दाट, पिंगट केसांचें नैस-र्गिक शिरोभूषण शोभत होतें. त्याचे डोळे गोकर्णीच्या फुलासारखे निळसर आणि टपोरे असून, त्यांत आत्मप्रत्ययाचें इतकें उद्दाम तेज होतें कीं, गगनाचा भेद करणाऱ्या उत्तुंग शैलाग्रांचा नीलिमा पाहून जसा धाक वाटावा, तशा तऱ्हेचा वचक त्याची दृष्टभेट होतांच मनांत उत्पन्न होत असे. त्या गंभीर डोळ्यांत या वेळीं असे कांहीं अनिर्वचनीय भाव उद्भूत झालेले होते कीं, त्यांतून निःशब्द अशा गाढ स्नेहाच्या संजीवक सुधेचें सिंचनच जणुं रस्त्यावर उभ्या असलेल्या केशवच्या संतप्त मनावर झालें.

आणि खरोखरीच त्या दोघांचें प्रेम शब्दातीत होतें. वस्तुतः त्यांच्या वयांत तीन चार वर्षांचें अंतर होतें; व चंद्रशेखर हा या वेळीं बी. ए. च्या वर्गांत असल्या-मुळें त्याही दृष्टीनें केशवला तो वरचढ होता. पण, सहा महिन्यांपूर्वी केशवची गांठ पडल्यापासून चंद्रशेखरच्या मनांत त्याच्याविषयीं इतकें प्रेम एकदम उत्पन्न

झालें कीं, त्या प्रेमांत वयाची, विद्येची आणि इतरही सर्व प्रकारची विषमता पार विरून गेली. तें प्रेम इतकें उत्कट होतें कीं, त्यानें उद्दीपित झालेल्या चंद्रशेखरच्या अंतर्भेदी बुद्धीला केशवची कोणतीही भावना अगोचर किंवा अगम्य राहिलेली नव्हती. उत्कट प्रेम हें जितकें आंधळें तितकेंच अंतर्ज्ञानी असतें. त्यामुळें, केशवनें कोणतीही इच्छा व्यक्त करण्यापूर्वीच चंद्रशेखरनें ती पूर्ण करावी, विचार बोलून दाखविण्यापूर्वीच तो ओळखावा आणि दुःख सांगण्यापूर्वीच तें दूर करावें, असाच प्रकार नेहमीं घडत असे. खरें पाहिलें तर, केशव हा घरचा संपन्न असल्यामुळें, त्याला उणीव अशी खरोखरी कोणत्याच गोष्टीची नव्हती. पण, खऱ्या प्रेमाचा एक विशेष असा असतो कीं, तें उपभोगापेक्षां त्यागांतच अधिक आनंद मानतें. त्यामुळें, आपल्याच मनानें केशवच्या अनेक गरजा कल्पून, चंद्रशेखर त्याला नेहमीं इतक्या देणग्या देत असे कीं, केशवची अभ्यासाची खोली म्हणजे त्यानें दिलेल्या वस्तूंचें एक संग्रहालयच बनलेलें होतें. शिवाय, प्रेम हें जसें गरजा भागवितें, तसेंच तें त्या वाढवितेंही. चंद्रशेखरचा संबंध येण्यापूर्वी केशवचें जीवन एकविध होतें. पण, चंद्रशेखरनें त्याच्या जीवनांत इतके नवीन भाव उत्पन्न केले कीं, त्याच्या मानसिक गरजा प्रत्यहीं वाढत जाऊन, चंद्रशेखरचा सहवास हें त्याच्या जीवनाचें एक आवश्यक अंग होऊन बसलें.

चंद्रशेखरच्या या असीम प्रेमाची आणि खुद्द त्याला स्वतःलाही त्याच्याविषयीं वाटणाऱ्या प्रबळ आकर्षणाची ओळख केशवला पुष्कळ दिवस पटलेली नव्हती. आई आणि ललिता यांच्या मायेंत गुरफटलेल्या आपल्या मनाला चंद्रशेखरविषयीं इतकी आत्मीयता कां वाटावी, आणि त्याच्या सहवासाचा इतका लळा कां लागावा, हें त्याला एक कोडें होतें.

तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं
भावस्थिराणि जननांतरसौहृदानि

हा शाकुंतलांतील श्लोक पार्वतीनें त्याला शिकविला होता; व त्यांतील मध्यवर्ती कल्पना विशद करण्यासाठीं रामकृष्ण परमहंस आणि विवेकानंद यांच्या पहिल्या भेटीची गोष्ट सांगितली होती. त्या श्लोकाच्या अनुषंगानें या नवीन स्नेहाची उपपत्ति लावण्याचा केशवनें पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं. प्रेमाच्या भावना जितक्या सूक्ष्म आणि सांद्र, तितकें त्याचें

स्वरूप उत्कट आणि अगम्य. चंद्रशेखरच्या सन्निध असतांना आणि नंतरही त्याच्या मनांत इतक्या अननुभूत भावनांचे कल्लोळ उठत कीं, मानवी संबंधांचे धागेदोरे उकलावयाला अद्याप समर्थ न झालेली त्याची बुद्धि त्याविषयीं विचार करितांना अगदीं गोंधळून जात असे. आईच्या आणि ललितेच्या सान्निध्यांत येणारा प्रेमाचा अनुभव निराळा व चंद्रशेखरच्या सान्निध्यांत येणारा अनुभव निराळा, एवढीच एक अस्फुट जाणीव त्याला झालेली होती. प्रेम हें एकविध नसतें;—शारीरिक, भावनिक, बौद्धिक आणि आत्मिक असे त्याला विविध पैलू असतात, ही गोष्ट त्याला अद्याप कळावयाची होती. चंद्रशेखरविषयीं त्याला वाटणारें आकर्षण एकविध नव्हतें. त्याची अशी एकही गोष्ट नव्हती कीं, जी केशवला आवडत नसे. त्याचें भाषण समजो वा न समजो, तें ऐकतांना आपल्या बुद्धीला विचारांचे नवे कोंब फुटतात आणि भावनांना नवीन संवेदनांचा बहर येतो, असा अनुभव त्याला प्रत्यहीं येत होता. चंद्रशेखरजवळ प्रत्येक गोष्ट मोकळ्या मनानें सांगण्याइतका त्याचा धीर अद्याप चेपलेला नव्हता. पण, मन कोणत्याही कारणानें व्यथित किंवा क्षुब्ध झालें असतां, प्रथम त्याच्याकडे धांव घ्यावी, असें मात्र त्याला वाटत असे; व चंद्रशेखरनें कांहींही न बोलतां त्याचा नुसता हात जरी प्रेमानें दाबला, तरी त्याच्या मनाचा तो क्षोभ आणि ती व्यथा नाहींशी होत असे.

"काय रे बाबू ?—रस्त्यावरून कां हांका मारतोस ? वर ये ना ?" चंद्रशेखरनें विचारलें. त्याच्या त्या प्रश्नांत आश्चर्य, आनंद आणि प्रेम यांच्या छटा मिसळलेल्या होत्या.

"नको रे,—तूंच ये खालीं; आपण फिरायला जाऊं," केशवनें अगदीं तुटकपणानें म्हटलें.

"अरे, पण थोडा वेळ तर वर ये; असं काय करतोस ? आई भजन करत्येय; —तें थोडं ऐकशील की नाहीं ? मग जाऊं बाहेर."

"नको रे, माफ कर बुवा आजचा दिवस !—तूंच लवकर खालीं ये ना, चंद्रा ?"

केशवच्या त्या तुटक शब्दांत इतकी आर्तता भरलेली होती कीं, चंद्रशेखरनें लगेच त्याला उत्तर दिलें, "हा बघ, आलोंच मी खालीं."

खालीं आल्यावर त्यानें केशवकडे एक वेळ न्याहाळून पाहिलें. त्याबरोबर त्याचा चेहरा किंचित् गंभीर झाला; व केशवच्या खांद्यावर आपले हात ठेवून त्यानें विचारलें, "काय आलंय रे आज तुझ्या मनांत?—बरं, पण कुठं चलायचं?"

"महालक्ष्मीवर,—आपल्या नेहमींच्याच ठिकाणीं. पण चंद्रा, तुला राग तर नाहीं ना आला माझा?" केशवनें त्याचा हात आपल्या हातांत घेऊन विचारलें.

"तुझा राग?—अन् तो कशाबद्दल? आजपर्यंत कधींतरी मी तुझ्यावर रागावलोंय का बाबू? आणि रात्रीचे आपण आज पहिल्यांदाच फिरायला जातों आहों, असं थोडंच आहे?"

"तसं नव्हे रे;—मी तुला भजनांतून उठायला लावलं म्हणून वाटलं मला तसं;—पण तुझ्या आईला तर नाहीं ना राग येणार?"

"छे रे,—ती शंकासुद्धां नको. मी देखील रागावेन एकादे वेळीं तुझ्यावर! पण आईला राग कसा तो मुळीं येतच नाहीं;—तिला फक्त प्रेम करायचं माहीत आहे," चंद्रशेखरनें साभिमान म्हटलें; व लगेच तो केशवच्या गळ्यांत हात घालून पुढें बोलला, "अन् तिला माहीत नाहीं का बाबू, तूं मला किती आवडतोस तें? तिला पक्कं ठाऊक आहे,—तुझ्यावर रागावणं म्हणजे माझ्यावरच रागावणं आहे;—ती कशी रागावेल तुझ्यावर?"

इतकें बोलून ते दोघे चालावयाला लागले. आकाश आज किती तरी दिवसांनीं अगदीं निरभ्र झालेलें होतें; व वाऱ्याच्या गार झुळका एकसारख्या येत होत्या. मलबार टेकडीच्या पायथ्याशीं ते आल्यावर रस्ता अगदींच निर्मनुष्य झाला. वाऱ्यानें होणारी झाडांच्या पानांची सळसळ, रस्त्यानें जाणाऱ्या मोटारींची घरघर किंवा क्वचित् एकाद्या बंगल्यांतून येणारा विलायती वाद्याचा सूर काय कानांवर पडेल तेवढाच. तथापि चांदणें स्वच्छ पडलेलें असल्यामुळें ही निर्मनुष्यता भयाण वाटत नव्हती. वर निळें, निष्कलंक आकाश जसें चंद्राच्या प्रभेनें उजळलेलें होतें, तसा खालीं पावसानें धुवून निघालेला स्वच्छ, काळाभोर रस्ता विद्युद्दीपांच्या तेजानें चमकत होता. तांबड्या पिंवळ्या फुलांचे सपर्ण घोंस रस्त्यावर ठिकठिकाणीं पडलेले होते; व फुलांचा अगदीं मंद असा परिमळ हवेंत दरवळला होता. क्वचित्

बंगल्यांच्या भोंवतीं असलेल्या बगीचांतील चिमकुले विजेचे दिवे तरुलतांतून काजव्यांसारखे लुकलुकतांना दिसत होते. जणुं कांहीं, सृष्टीच्या त्या साऱ्या नैसर्गिक आणि नागर आविर्भावांतून अचिरागत शारदश्रीचा रम्यगंभीर रूपोल्लास शालीनतेनें व्यक्त होत होता. वारा, सुवास, शांतता आणि चंद्रप्रकाश यांनीं युक्त अशी ती रात्र केशवला इतकी प्रसन्न वाटली कीं, त्याचा मनस्ताप आपोआपच कमी होत गेला. तो स्वतः रस्त्यानें एक शब्दही बोलला नाहीं किंवा चंद्रशेखरनेंही त्याला कांहीं विचारलें नाहीं. पण, सहानुकंपेच्या शब्दातीत संवेदनेनें त्यांचीं हृदयें भरून आलेलीं होतीं; व आपल्या मनाची ती सोत्कंठ स्थिति व्यक्त करण्यासाठींच कीं काय, केशव चालतांना मधून मधून चंद्रशेखरचा हात घट्ट धरून भावपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पहात असे.

जकातखान्याजवळ ते येतांच चंद्रशेखर बसण्याच्या हेतूनें एका बांकाजवळ गेला. पण केशवनें लगेच त्याला म्हटलें, " इथं नको;—आपण आंतच एकाद्या खडकावर जाऊन बसूं या, चंद्रा—"

त्याप्रमाणें ते दोघेही समुद्रांत उतरून एका खडकावर जाऊन बसले.

त्या खडकावर बसतांच, रस्त्यानें चालत असतां ज्या मधुर नीरवतेनें त्यांना मुग्ध केलें होतें, तिच्यापेक्षां किती तरी विशाल अशा शांततेचा साक्षात्कार त्यांच्या मनाला झाला. पण ती शांतता निःशब्द मात्र नव्हती. समुद्राच्या लाटांचा उद्घोष तिच्या गभीरतेंतून सारखा घुमत होता. परंतु, सृष्टींतील कांहीं अकृत्रिम निनाद असे आहेत कीं, त्यांत मनाला शांत करण्याचें विलक्षण सामर्थ्य असतें. समोर पसरलेला तो विस्तीर्ण जलराशि, त्याच्या लाटांवर झळकणारें तें शुभ्र चांदणें आणि त्या लाटांतून अविरत उठणारे मंद्र निनाद,—सृष्टींतील सारी उदात्तता त्या सुरम्य दृश्यांत एकवटलेली होती. समुद्राच्या सुनील लाटांवर चमचम करित नाचणारें तें चांदणें काळपुरुषाच्या भव्य मुखावरील स्मिताच्या मंद उर्मीसारखें दिसत होतें. त्या चकचकीत, निळसर, फेसाळ जलराशीवर आकाशाचा प्रचंड घुमट अलगत टेकला होता. क्षितिजावरील तारका चांदण्यामुळें निष्प्रभ होऊन रांगोळीच्या ठिपक्यांसारख्या दिसत होत्या. उलट क्षितिजाशीं समांतर असलेले दिवे दुरून ताऱ्यांसारखे भासत होते. चंद्र या वेळीं आकाशाच्या मध्यावरून किंचित् ढळलेला होता. पावसाळ्याच्या अखेरच्या दिवसांत आभा-

ळाला येणाऱ्या गहिऱ्या अस्मानी रंगाच्या पार्श्वपटावर त्याचें अपुरें बिंब फारच मनोहर दिसत होतें; व त्याच्या समोरच कृत्तिका, रोहिणी व मृग हे तीन नक्षत्रपुंज चमकत असल्यामुळें, दोनीही बाजूंच्या क्षितिजांना अवर्णनीय शोभा आली होती.

समुद्र आणि सृष्टि यांची ती शोभा पहात ते दोघेही कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसले होते. केशव तर इतका तल्लीन होऊन गेला होता कीं, चंद्रशेखरशीं कांहीं बोलण्यासाठीं आपण आलेलों आहों, याचें भान त्याला उरलें नाहीं. पण चंद्रशेखरच्या मनांत मात्र सारखे त्याच्याविषयींचे विचार घोळत होते; व सृष्टीच्या व्यक्त अशा त्या सौंदर्यापेक्षां केशवच्या अव्यक्त अशा हृदयाशीं समरस व्हावयाला तो अधिक उत्सुक झालेला होता. अखेर त्यानें केशवला विचारलें "बाबू, बोलत कां नाहींस तूं आज ? एवढ्या रात्रीं मला कशाला आणलंस इथं ? सांग ना ? "

"तसं कांहीं नाहीं.—चांदणं पडलं होतं;—फिरायला जावंसं वाटलं तुझ्याबरोबर म्हणून आलों," केशवनें क्षितिजावर खिळलेली आपली दृष्टि ढळूं न देतां तुटकपणानें उत्तर दिलें.

"असं कां बरं म्हणतोस, बाबू ? तुला कांहीं तरी मला सांगावंसं वाटलं म्हणूनच तूं मला घेऊन इथं आलास;—खरं कीं नाहीं ?" इतकें बोलून चंद्रशेखरनें त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले व त्याला म्हटलें, "हें बघ, तिकडे नको पाहूं; आधी माझ्याकडे पहा बरं, बाबू ! "

त्याबरोबर क्षितिजावर आबद्ध झालेली आपली दृष्टि तिथून काढून घेऊन त्यानें चंद्रशेखरकडे डोळे भरून पाहिलें. त्यांची दृष्टभेट होतांच त्याच्या चेहऱ्यावर विषादाची सूक्ष्म छाया पसरली; व त्याचे ओंठ किंचित् थरथरले. पण तो स्तब्धच होता. फक्त चंद्रशेखरच्या हातांतून आपले हात सोडवून घेऊन त्यानें हळूच त्याचीं बोटें दाबलीं.

कांहीं वेळ ते दोघेही अगदीं स्तब्ध होते. नंतर चंद्रशेखरनें त्याच्या केंसांवरून हात फिरवित त्याला विचारलें, "खरं सांग बाबू,—तूं मला काय सांगणार होतास ? अन् तुला इतकं वाईट कसलं वाटतंय ? आज कांहीं रोजच्या सारखा प्रसन्न नाहीं दिसत तूं !—काय रे, तुझं न् ललितेचं भांडण तर नाहीं झालं ?"

"भांडण ?—तें तर रोजच चाललंय," केशवनें अत्यंत उद्वेगानें उत्तर दिलें. 'मी तें पत्र तिला घातल्यापासून आमचा एकही दिवस आनंदाचा गेलेला नाहीं. मधें दोन दिवस तर तिनं माझ्याशीं बोलणंच टाकलं होतं ! शेवटीं जेव्हां कोणतीही गोष्ट तिच्यापासून लपवून ठेवणार नाहीं असं वचन मी तिला दिलं, तेव्हां आमचा समेट झाला. तिनं माझं अगदीं डोकं उठवलंय सारखं तूं त्या चंद्रशेखरच्या नादीं लागूं नको म्हणून—"

"अस्सं;—एकंदरींत माझ्या नादीं न लागण्याची भाषा एव्हांपासूनच सुरू झाली म्हणायची तुमच्या घरांत," चंद्रशेखरनें किंचित् हंसून म्हटलें. " पण काय रे, तुझ्या काकांना जर पत्ता लागला—मी कोण न् काय आहें याचा, तर ते काय म्हणतील तुला ? "

"त्यांनाही आजच पत्ता लागला;—फक्त तुझा न् माझा कांहीं संबंध आहे, हें मात्र कळलं नाहीं. पण तशी शंका आली असावी अन् तें कळायला वेळही पण लागणार नाहीं. एकदां गळयापर्यंत पाणी आल्यावर तें नाकातोंडांत शिरायला वेळ कसला ? "

"माझी माहिती कशी कळली त्यांना ? अन् ती कुणीं दिली ?"

" अरे, ते बबनराव आहेत ना, आपला लेखनकंडू शमवण्यासाठीं आमच्या 'प्रागतिका ' ला चिकटलेले 'ते के न जानीमहे ' या कोटींतले कलमकसाई ! ते आज तुझ्या कॉलेजांतल्या सभेला हजर होते— "

" हो, खरंच तो 'लोकमता'चा उपसंपादक ना ? भेटला खरा तो मला तिथं. तर दिनानाथांनीं हॉलमधून प्रयाण केल्याबरोबर तो मजजवळ आला, अन् मला त्यानं छेडायला सुरवात केली. प्रथम त्यानं मला माझं पूर्ण नांव विचारलं. मी त्याला काय उत्तर दिलं असेन सांग बरं ? "

" काय उत्तर देणार ?—पूर्ण नांव सांगितलं असशील," केशवनें किंचित् चमकून म्हटलें.

"होय, सांगितलं खरं पूर्ण नांव;—'चंद्रशेखर मांजरेकर' म्हणून. पण किती झालं तरी तो वर्तमानपत्राचा संपादक;—त्यांत पुन्हा उप आणि बातम्या जमवण्याचा न् पिकवण्याचा धंदा करणारा ! त्याची कुजट जिज्ञासा तेवढ्यावर

थोडीच तृप्त व्हायचीय ? त्यानं मला विचारलं,—'हें आपलं पूर्ण नांव नव्हे. आपल्या वडिलांचं नांव ?'—मी त्याला सर्वांच्या समक्षच सांगितलं, 'मला मुळीं वडिलच नाहींत' म्हणून—"

'काय सांगतोस तूं चंद्रा हें ? तुला बोलवलं तरी कसं असं ?' केशवनें स्तिमित होऊन विचारलें.

"अरे, त्यांत काय अवघड आहे ? आपण कितीही लपवण्याची धडपड केली, तरी या गोष्टी थोड्याच लपून रहायच्या आहेत ?—वर्गांतल्या शेंकडा नव्याणव विद्यार्थ्यांना मी न सांगतां माझी जातकुळी माहीत झालेली आहे. मी कद्धीं कद्धीं विसरणार नाहीं.—शाळेंत पाऊल ठेवल्या क्षणापासून हा त्रास माझ्यामागं लागला आहे. पहिल्या पहिल्यांदा मी आईच्या शिकवण्यावरून सांगत असे—'माझे वडील वारले,' म्हणून. पण तें किती दिवस पचणार ? तुला कधीं नाहीं कल्पना यायची त्या अपमानाची, त्या मनस्तापाची, त्या लाजिरवाण्या आत्मवंचनेची, बाबू ! पोरांना कुठून ना कुठून तरी पत्ता लागतो अन् मग तीं बुद्ध्या विचारित सुटतात एकसारखीं;—किती फसवणार आपण त्यांना दर वेळेला ? म्हणून मी वैतागून शेवटीं नुसतं 'चंद्रशेखर मांजरेकर' लावायला सुरवात केली.—आई किती रागावली, तिला किती वाईट वाटलं !—तिचं आपलं एक म्हणणं कीं, 'तूं एकदां विलायतेहून बॅरिस्टर होऊन आलास म्हणजे लोक हें सारं विसरून जातील.—मग तूं आपण होऊन कशाला ही खूण शिल्लक ठेवतोस ?' मी तिला परोपरीनं सांगितलं, 'आपल्या आडनांवांत जर आपला नऊ महिने भार वहाणारी जन्मदात्री आई नसते, तर जन्माला नुसता निमित्त होणारा बापच तेवढा एकटा कशाला हवा !' आडनांवांत सुद्धां हा पंक्तिप्रपंच कां म्हणून ?—त्यांतून मला तर मुळीं बापच नाहीं. पुराणांतल्या अयोनिसंभव म्हणून वर्णिलेल्या आणि कुठं तरी जन्मलेल्या ऋषींना सुद्धां त्यांच्या जनकांनीं जवळ केलं, त्यांना गणगोतावर हक्क सांगतां आला, वाडवडिलांच्या विद्येची वारसदारी मिळवतां आली.—आणि आम्हांला मात्र म्हणे बाप नाहीं ! अप्सरा म्हणजे सांगून सवरून स्वर्वेश्या;—देव, दानव, मानव या सर्वांशीं भेदाभेद न करतां त्यांनीं सरोस व्यवहार केला;—पण त्यांचे मुलगे महर्षि झाले, मुली महाराण्या झाल्या. त्यांना समाजबंधनं नडलीं नाहींत;—अन् आम्हीं मात्र समाजबाह्य, पतित, अधर्म्य;–आम्हांला ना जात ना कूळ ! मी आईला पुष्कळ सांगितलं,

तुझं नांव मी लावतों' म्हणून;—'माझे आईबाप, माझं गणगोत, माझं आप्तसर्वस्व गळं कांहीं तूंच आहेस! आपल्या जातींत मुलाची एवढी काळजी कोण घेतो! —त्याला बाजारभाव नाहीं. मुलगी नसली तर ओटींत घेतील, विकत घेतील, अन् तेच्यावर पाण्यासारखा पैसा खर्च करतील! पण तूं मला आईप्रमाणं वाढवलंस अन् वडलांप्रमाणं शिक्षण दिलंस.—बापाशिवाय माझं कांहींही अडलं नाहीं अन् कोणतंही कमी पडलं नाहीं.' पण आईला हें पटलं नाहीं. तिची आपली भोळी समजूत कीं, बापाच्या नांवाशिवाय मुलगा जगांत नांदणार कसा! बाबू, तुला माहीत आहे का तो उपनिषदांतला ऋषि;—आपल्या बापाचं नांव ठाऊक नाहीं, म्हणून गुरूंना स्पष्ट सांगणारा! मीही आतां तसंच करायचं ठरवलं आहे! खरो-खरी बाबू, आमच्या जातींतल्या मुलांच्या मागून या प्रश्नाचा ससेमिरा केव्हां सुटेल तेव्हां खरा—"

बोलतां बोलतां चंद्रशेखरचे डोळे विस्फारित होऊन, त्यांत संतापाचे स्फुलिंग चमकूं लागले. तो बोलावयाचा एकदम थांबला; व केशवचे हात पुन्हा आपल्या हातांत घेऊन ते त्यानें आपल्या डोळ्यांवर ठेवले. जणुं कांहीं, आपल्या हृदयाचा दाह केशवच्या स्नेहार्द्रशीतल स्पर्शानें कमी होईल, अशी आशा त्याला वाटली.

---

प्रकरण १४ वें

# नव्या पक्षाच्या स्थापनेची प्रतिज्ञा



ते दोघेही कांहीं वेळ त्या स्थितींत स्तब्ध होते. मात्र चंद्रशेखर केशवचे हात आपल्या डोळ्यांवर व कपाळावर सारखे दाबीत होता; व चंद्रशेखरच्या त्या उष्ण स्पर्शाबरोबर त्याच्या मस्तकांत भ्रमत असलेल्या बुद्धिगम्य संतापाची झळ केशवला तीव्रतेनें जाणवत होती. त्याचे हात किती वेळ तरी चंद्रशेखरनें आपल्या कपाळा-वर ठेवले. पण त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं. दुःख हें जितकें अंतर्गूढ, तितकी स्पर्शाची आवश्यकता अधिक. कारण, स्पर्श हा मनाचें केवळ सांत्वनच करितो, असें नव्हे; तर दुःखाच्या धगीनें म्लान झालेल्या जीवकुसुमाला पुन्हा विकसितही करितो. नाहीं तरी, शब्द हे दुःख प्रगट करावयाला नेहमींच अपुरे

पडत असतात; व म्हणून शब्दांनीं व्यक्त करितां येण्यासारखें दुःख संपतांच जन्मापासून अहर्निश चाललेली आपल्या मनाची तळमळ स्पर्शानें व्यक्त करण्याचा प्रयत्न चंद्रशेखर करित होता.

त्याचा तो संताप केशवला अगदीं न्याय्य वाटला. पण त्याचें सांत्वन कसें करावें, हें मात्र त्याला सुचेना. चंद्रशेखर नेहमीं म्हणत असे कीं, विकारवशता ही बुद्धीच्या दुर्बलतेची द्योतक असते. आणि, बुद्धिमान् मनुष्यानें संताप किंवा दुःख यांच्या प्रदर्शनांत आपल्या मानसिक शक्तींचा अपव्यय न करितां, ज्या अन्यायामुळें त्याच्या मनाचा क्षोभ होतो, त्याचें निर्मूलन करण्याच्या उद्योगाला निग्रहानें लागावें. अर्थात् संतापाचा तो आवेग कमी झाल्यावर, आपण विकारांच्या आधीन झाल्याबद्दल त्याला विषाद वाटेल, असें केशवच्या मनांत आलें.

म्हणून, चंद्रशेखरच्या डोळ्यांवरील आपले हात हळूच काढून घेऊन तो त्याला म्हणाला, "चंद्रा, विनाकारण संताप करून घेतोस तूं आपल्या जिवाचा! या गोष्टी काय आपल्या हातच्या आहेत का? जन्म हा केवळ एक दैवयोग आहे; व म्हणून समाजाच्या घटनेंत, विशेषतः व्यक्तिमात्राचा दर्जा ठरवितांना, ती एक अगदीं क्षुद्र बाब गणली गेली पाहिजे. पण आम्हां हिंदूंचं सारंच उरफाटं! जन्म हा हिंदु समाजघटनेचा पाया होऊन बसला असून, उच्चनीचत्वाच्या साऱ्या कल्पना त्याच्या भोंवतीं केंद्रित झालेल्या आहेत. ही समाजघटना बदलण्याचा प्रयत्न आधीं केला पाहिजे.—उगाच संतापण्यांत काय अर्थ? पण काय रे, तुझ्या त्या उत्तराचा मुलांवर काय परिणाम झाला? अन् बबनराव काय म्हणाले तुला?—"

"मुलं अगदीं गप्प होतीं;—अन् त्यांना कांहींही वाटलं असलं, तरी माझ्या समोर काय कुणाची बोलण्याची प्राज्ञा आहे? आमचा दत्ता माझ्या मागं उभा होता.—तुला माहितच आहे तो किती तापट आहे तें;—तो त्या संपादकाच्या अंगावर धांवून जाऊन, त्याला इंग्रजींत म्हणाला, 'असले उपमर्दकारक प्रश्न विचारायला तुम्हांला शरम नाहीं वाटत?' बिचारा संपादक अगदीं गार झाला त्याच्या त्या भडिमारानं.—त्यानंतर त्यानं मला तरी कांहीं विचारलं नाहीं! पण बाबू, तुमचा तो बबनराव अगदीं पाजी वाटला मला—"

"अरे, आहेच तो मुळीं तसा!—तो जर पाजी नसता, तर जहालांच्या पत्रांत उपसंपादकाचं काम करून, पुन्हां मवाळांच्या पत्राचे रकाने भरण्याचं कसब त्याला कधींच साधलं नसतं. तुला माहीत नाहीं,—हा बबनराव म्हणजे शुद्ध मारेकरी आहे. कोणावर केव्हां चोरटा हल्ला करील याचा नेम नाहीं. आमच्या दादांच्या हाताखालीं तो आतां चार वर्षं काम करतो आहे ना? पण, परवां त्या टवाळ पत्रांत दादांवर जो निनांवी शिवराळ लेख आला होता, तो त्यानंच लिहिला होता म्हणतात. जगांतल्या साऱ्या व्यक्तींचीं आणि संस्थांचीं वैगुण्यं हुडकण्याचा आणि तीं चिवडण्याचा त्याचा धंदा! त्याच्या डोळयांच्या बाहुल्या जशा उलट्या आहेत, तसंच त्याचं काळीजही पण उलटं आहे. स्वतःच्या मतलबाशिवाय दुसरं कांहीं जगांत त्याला आदरणीय असेल, असं वाटत नाहीं. नाहीं म्हणायला, न्यायमूर्ति रानड्यांविषयीं मात्र तो बरं बोलतो;—पण त्यांतसुद्धां कांहींतरी मतलब असला पाहिजे त्याचा. त्यानंच सांगितली तुमच्या कॉलेजांतली सारी हकीकत आज अड्ड्यावर—"

"असं.—एकंदरींत 'प्रागतिक' कचेरींत जाऊन पोंचलं म्हणायचं माझं नांव. आतां पोलिसखातं कांहीं लांब नाहीं तिथून फारसं! मग येणार तर माझ्यावर 'प्रागतिका'च्या ताज्या अंकांत ताशेरा;—या मवाळांचीं वर्तमानपत्रं सरकारचं निम्मं काम आपल्या टीकेनं करित असतात! आणि माझी कुळकथा कोणी सांगितली भगवंतरावजींना?—"

"नानासाहेबांनीं.—त्या म्हाताऱ्याला अगदीं इत्थंभूत माहिती आहे तुमची—"

"असायचीच! असलेच धंदे जन्मभर करीत आलेला आहे तो! असा लघळ आहे तो थेरडा;—आईनं त्याला कितीदां तरी भेट न देतां तसाच परत लावला असेल! पण तो कांहीं आठवड्यांतून एकदां तरी आमच्या घराचा उंबरठा झिजवायला चुकत नाहीं. अन् अगदीं आजी-पणजीपासून गोष्टी काढीत असतो आमच्या घरच्या! आईनं गाणं सोडलंय हें काय माहीत नाहीं का त्याला?—पण आला म्हणजे 'एक तरी चीज म्हण' म्हणून बसतो तिच्या खणपटीला! खरोखरी बाबू, सांगून सवरून बदमाष पुरवले;—पण असले हे संभावित सोदे फार वाईट—"

" अन् किती अभद्र बोलत होते रे, ते सारे तुझ्याविषयीं चर्चा करतांना ! अन् हे म्हणे आमच्या समाजांतले विचारी आणि सुशिक्षित लोक !—यांना सुसंस्कृत कां म्हणायचं मला कळत नाहीं—"

"अरे, हे कसले आले आहेत सुसंस्कृत ? मला तर अलीकडे असं वाटायला लागलं आहे कीं, शिक्षण आणि संस्कृति यांचा कांहीं सुद्धां संबंध नाहीं. संस्कृति हा केवळ एक मनाचा धर्म आहे;—ज्याचं मन थोर, तो सुसंस्कृत,—मग तो शिक्षित असो वा नसो. एकाद्या मनुष्यानें भाराभर पदव्या घेतल्या किंवा गाडाभर ग्रंथ लिहिले म्हणून तो सुसंस्कृत असतो, असं थोडंच ? त्याची संस्कृति फक्त त्याच्या पदव्यांत अन् पुस्तकांत काय दिसेल ती; संभाषण पहावं तर सारं अश्लील कोट्यांनीं बुजबुजलेलं असायचं अन् वर्तनाविषयीं तर विचारूच नको ! आपल्या सुशिक्षितांना बायकांविषयीं बोलूं लागलं म्हणजे तर जसा कांहीं ऊत येतो अगदीं ! त्यांच्या अड्ड्यांतून जो संभावित शिमगा चालतो त्याच्यापुढं होळीवरील कवित्व सुद्धां फिकं पडेल सारं ! केवळ एक भोग्य वस्तु म्हणून स्त्रियांविषयीं विचार करण्याची आपल्या समाजाची संवय जोंपर्यंत सुटत नाहीं, तोंपर्यंत हें असंच चालायचं ! मला केव्हां केव्हां असं वाटतं कीं, मनुष्य जितका सुशिक्षित तितका तो उलट्या काळजाचा असतो. अशिक्षिताला आपल्या अपकृत्यांवर पांघरूण घालायला आधीं सुचत नाहीं अन् सुचलं तरी साधत नाहीं. सुशिक्षिताचं तसं नाहीं.—तो आपली सारी बुद्धि आपल्या दुश्चरितावर संभावितीची झिलई देण्यांत खर्च करित असतो. आमचे प्रो. राळेच पहा ना !—आमच्या जातींतल्या साऱ्या घरांचे उंबरठे त्या स्वारीनं झिजवलेले आहेत; अन् अलिकडे पुन्हा त्या सर माणेकजीला बरोबर घेऊन फिरत असतो आणखी ! इतकं सारं करून पुन्हा वेश्याव्यवसायावर झोड उठवायला अन् सुधारक म्हणून मिरवायला तयार;—समाजांत त्यांच्या उपासनेला कोण गर्दी ! मला पुष्कळदां असं वाटतं कीं, या सुसंस्कृत बदमाषांच्या तोंडावरला संभावितीचा बुरखा फाडून टाकून, त्यांना त्यांच्या खऱ्या हिडिस स्वरूपांत जगापुढं उभं करावं. तुझ्या काकांच्या त्या अड्ड्यांत एक तरी मनुष्य प्रामाणिक आणि सभ्य आहे का ? राग नको मानूं बाबू तूं;—पण भगवंतरावजी जर तूं नेहमीं सांगतोस तितके तत्त्वनिष्ठ असते, तर त्यांनीं त्या अड्ड्यांत पाऊल नसतं ठेवलं कधीं —"

" नाहीं रे,—तूं उगाच गैरसमज करून घेतलाहेस दादांविषयीं;—ते खरोखरीच तत्त्वनिष्ठ, दिलदार अन् प्रामाणिक आहेत. आजचंच उदाहरण घे ना;—तुझ्याविषयीं कांहीं तरी वेडंवांकडं लिहावं अशी त्या बबनरावाची अन् प्रोफेसराची फार इच्छा होती. पण, दादांनीं साफ सांगितलं कीं, वैयक्तिक कांहीं लिहूं नका. इतकंच नव्हे, तर तुझा मुद्दा अगदीं बरोबर होता, असंच ते म्हणाले—"

" तें सारं खरं. पण ते जर इतके प्रामाणिक आहेत, तर त्यांना त्या लोकांत मिसळायला कसं आवडतं, हेंच मुळीं मला समजत नाहीं. मनुष्याची पारख नेहमीं तो ज्या माणसांत उठतो बसतो त्यांच्यावरून करायची असते. त्या दृष्टीनं पाहिलं तर भगवंतरावजींविषयीं काय म्हणावं लागेल ?–प्रो. राळ्यांच्या इतके ते वाईट नसतील, हें कबूल. पण त्या जातिवंत दुर्जनांच्या टोळक्यांत बसून त्यांच्या मनाची युक्तायुक्ततेविषयींची चाड मेली आहे न् त्यांची तत्त्वनिष्ठा डागळली आहे, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. नाहीं तर ते 'प्रागतिका'चे संपादक कधींच झाले नसते ! ते स्वतःला सोशॅलिस्ट म्हणवतात,—निदान तूं तरी नेहमीं तसं सांगत असतोस. पण त्या साप्ताहिकांतले त्यांचे अग्रलेख म्हणजे मवाळांचं आपमतलबी राजकारण अन् समाजसत्तावाद यांची निस्सत्व, विसंगत भेसळ असते. खरोखरी, त्यांच्यासारख्या बुद्धिमान् आणि बहुश्रुत माणसानं या वेळीं धैर्यानं पुढं येऊन लोकांना असं सांगितलं पाहिजे कीं, महाराष्ट्रांतले हल्लींचे पक्ष हे तत्त्वावर उभारलेले नसून, केवळ व्यक्तिमाहात्म्यावर अधिष्ठित झालेले आहेत. आज सारं राजकारण मुशींत घातलेलं आहे.—कालचे जहाल आज मवाळ होऊन बसले असून, देशांत नवा पक्ष निर्माण होण्याचीं स्पष्ट चिन्हं दिसत आहेत. समाजसत्तावादाचा प्रसार करायला इतकी चांगली वेळ दुसरी कोणती सांपडेल ? पण, तुझे दादा पहावे, तर एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातली इंग्लंडमधली ओवेनिझम् प्रतिपादित बसले आहेत. समाजसत्तेविषयींच्या तत्त्वज्ञांच्या कल्पना आतां इतक्या पुढं गेलेल्या आहेत कीं, मार्क्सला सुद्धां प्रमाण मानण्याची आज पुष्कळांची तयारी नाहीं ! अन् तुझे दादा मात्र टॉलस्टॉय, रस्किन, मॉरिस, ओवेन इत्यादि अर्धवटांच्या वाङ्मयांतच अद्याप घोटाळताहेत;–त्यांना तत्त्वनिष्ठ कसं म्हणावं ? "

" नाहीं रे,—ते तत्त्वनिष्ठ आहेत अन् प्रामाणिकही आहेत. पण त्यांना असं वाटतं कीं, समाजांत आधीं विचारक्रांति घडून आली पाहिजे; अन् अनायासं आपल्या विचारांचा प्रसार करतां येतो, म्हणून त्यांनीं 'प्रागतिका'चं संपादकत्व पत्करलं—"

" काय विचित्र कल्पना आहे ही त्यांची, बाबू ! मवाळांच्या नेभळट राजकीय मतांच्या शृंखलांनीं जखडलेला समाजसत्तावाद कधीं तरी विचारक्रांति घडवून आणूं शकेल काय ? सांगून सवरून साम्राज्यवादी ते ! ब्रिटिशांचा अंमल हें ईश्वराचं अतर्क्य वरदान आहे, हें लोकांना पढवण्यांत रानडे—गोखल्यांची हयात गेली. पारतंत्र्याला ईश्वराचं वरदान मानणारा अन् त्या तत्त्वावर आपल्या राजकारणाची प्राणप्रतिष्ठा करणारा असला परप्रत्ययनेय राजकीय पक्ष हिंदुस्थानाशिवाय पृथ्वीच्या पाठीवर दुसऱ्या कोणत्याही देशांत सांपडणार नाहीं. रानड्यांसारख्या विचारवंतांच्या अग्रणीला असला स्वकीयांचा तेजोवध करणारा दैववाद आठवावा, यापेक्षां पारतंत्र्यामुळं झालेल्या आमच्या बुद्धिनाशाचा आणखी कोणता पुरावा पाहिजे ? हिंदुस्थानाचीं राज्यसूत्रं ईश्वरानंच त्याच्या कल्याणासाठीं आमच्या हातीं दिलीं आहेत, अशी भाषा मेकॉलेपासून तों मोर्लेपर्यंत साऱ्या ब्रिटिश मुत्सद्यांनीं वापरली आहे;—तिचं मला नवल वाटत नाहीं. हिंदुस्थानाचं राज्य मिळविण्यासाठीं जे अनन्वित अत्याचार ब्रिटिशांनीं केले, आणि तें कायम ठेवण्यासाठीं जे अत्याचार ते आज प्रत्यहीं करीत आहेत, त्यांचं समर्थन करण्यासाठीं–जगाला त्यांची न्याय्यता भासविण्यासाठीं–अशी कांहीं तरी नैतिक उपपत्ति बसविणं त्यांना प्राप्तच होतं. तेव्हां, त्यांनीं ईश्वरी योगायोगाची भाषा बोलायला प्रथमपासूनच सुरवात केली, याचं मला आश्चर्य वाटत नाहीं. पण आमच्यांतल्या श्रेष्ठ मानल्या गेलेल्या मुत्सद्यांनीं सुद्धां त्यांच्या त्या उपपत्तीची री ओढण्यांत धन्यता मानावी, हा केवढा चमत्कार ! ब्रिटिशांच्या साम्राज्यनीतीला सर्वांत दुष्ट असं विषफळ जर कोणतं आलं असेल, तर तें म्हणजे पारतंत्र्याविषयीं प्रामाण्यबुद्धि बाळगणारा हा मवाळ पक्ष हें होय. गेलीं पन्नास वर्षं या पक्षानं राजकारण आपल्या मुठींत ठेवून या प्रामाण्यबुद्धीचा प्रसार लोकांत केला आणि ब्रिटिशांच्या अधिराज्याला नैतिक अधिष्ठान मिळवून दिलं. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, पारतंत्र्याची जी चीड प्रत्येक जिवंत राष्ट्राच्या रक्तांत उपजतच

उसळत असते, ती आमच्या नसांतून पार मरून गेली आहे. म्हणून प्रथम या पक्षाचा उच्छेद केला पाहिजे. पारतंत्र्याला प्रमाण मानणारा पक्ष कोणत्याही स्वाभिमानी राष्ट्रांत असूंच शकत नाहीं.—"

"अरे, पण बिचाऱ्या नेमस्त पक्षावर एवढं तुफान करण्यापूर्वी, त्याच्या कामगिरीची चांगली बाजू तूं थोडी तरी लक्षांत घेशील कीं नाहीं? आज जी थोडी बहुत राजकीय जागृति देशांत दिसत आहे, ती तरी त्यांच्याच चिकाटीच्या प्रयत्नांमुळं ना? अन् त्यांनीं जर लोकांचा छळ सोसला नसता, तर सामाजिक सुधारणेच्या ज्या तत्त्वांचा तूं एवढा अभिमान वाहतोस, त्यांचा प्रसार कधीं तरी झाला असता काय? खरोखरी, समाजसुधारणेविषयीं जी आस्था आज महाराष्ट्रांत उत्पन्न झालेली दिसत आहे, तिचं सर्व श्रेय नेमस्तांनाच दिलं पाहिजे. राजकीय पुढारी म्हणून तूं त्यांना कितीही हेटाळलंस, तरी सुधारक म्हणून त्यांची योग्यता तुला मान्य केलीच पाहिजे—"

"सुधारक?—महाराष्ट्रांत खरा सुधारक फक्त एकच झाला,—तो म्हणजे आगरकर! हे कसले आले आहेत सुधारक? एकीकडे सामाजिक स्वातंत्र्याच्या वल्गना करायच्या आणि दुसरीकडे जास्तींत जास्त पगाराची नोकरी पटकावण्यासाठीं सरकार-दरबारीं खेटे घालायचे!—असल्या वाचिवीरांना सुधारक कोण म्हणेल? हे बंगलेबाज, मोटरचारी सुधारक म्हणजे निव्वळ विलायती मतांचीं आणि विलायती मालाचीं स्वत्वशून्य गिऱ्हाईकं आहेत! समाजसुधारणेची खरी कळकळ जर यांना असती, तर मिशनरी वृत्तीनं आपल्या मतांचा त्यांनीं प्रसार केला असता; अन् स्वतःच्या चारित्र्याच्या जोरावर समतेचीं तत्त्वं लोकप्रिय करून दाखविलीं असतीं. खरे सुधारक आर्यसमाजाचे प्रवर्तक!—श्रद्धानंदांच्या-लजपतरायांच्या तोडीचा एक तरी त्यागी सुधारक या मवाळांत सांपडेल काय? कर्वे, शिंदे, देवधर यांना मी सुधारक म्हणतों. त्यांनीं सारी हयात कष्टांत अन् दारिद्र्यांत घालविली; लोकांचे प्रवाद अन् अपवाद आनंदानें सोसले; आणि अखेर आपल्या मतांची व्यवहार्यता समाजाला पटवून दिली. ते खरे सुधारक.—लठ्ठ पगार आणि लठ्ठ पेन्शनं हे ज्यांच्या जीविताचे आद्यंत; पेडररोडवर किंवा संगमावर राहून लोकांना मंत्रद्रष्ट्याच्या दिमाखानं

उपदेश करणं ही ज्यांच्या कर्तृत्वाची परिसीमा; आणि जगांतील सर्व दुर्बल राष्ट्रांचा रक्तशोष करणारी ब्रिटिश सत्ता हें ज्यांचं परब्रह्म;—त्यांना सुधारक म्हणणं म्हणजे समतेच्या, स्वातंत्र्याच्या अन् बंधुतेच्या तत्त्वांची विटंबना करणंच होय! अन् यांना उदारमतवादी तरी कां म्हणायचं? रानडे-भांडारकरांनीं सामाजिक सुधारणेची जी व्याप्ति एकदां ठरवली, तिच्या पलीकडे एक पाऊलभरही जायला हे सुधारक तयार नाहींत. अज्ञेयवाद म्हटला कीं यांचं पित्त खवळतं; अनिर्बंध प्रेम म्हटलं कीं यांच्या कपाळाला आंठ्या पडतात; यांना जातिभेद नको असेल; पण वर्गभेदाचे इतके कडवे पुरस्कर्ते दुसरे सांपडणार नाहींत! यांचे पगार, यांच्या पदव्या, यांचे बंगले, यांच्या मोटारी, यांचं गिर्यारोहण, मुलांना आय. सी. एस्. करून आणण्याची आणि मुलींनां आय. सी. एस्. गांठून देण्याची यांची धडपड—या साऱ्या गोष्टी काय दर्शवितात?—राज्यकर्त्यांच्या बरोबरीची अशी आपली एक निराळी जातच जणुं या सुधारकब्रुवांनीं उत्पन्न केली आहे! समाजाविषयीं असा यांना काय जिव्हाळा वाटतो, तर त्यांना त्याचे सुधारक म्हणावयाचे? समाजाशीं जे समरस होतात, त्याच्या दैन्याचे जे वांटेकरी होतात, त्याच्या जे खस्ता खातात, ते खरे सुधारक—"

"बरं, ते एक नसतील सुधारक.—पण टिळकांविषयीं तरी तुम्हांला एवढा आपलेपणा कां वाटावा, चंद्रा? ज्या सुधारणेच्या तत्त्वावर तुमची एवढी श्रद्धा आणि ज्या सामाजिक क्रांतीशिवाय हिंदुस्थान दास्यमुक्त होणं शक्य नाहीं असं तुम्हांला वाटतं, तिला विरोध करण्यांत तर टिळकांचं शक्तिसर्वस्व आजपर्यंत खर्च झालं! सुधारणेच्या चळवळीची जर पद्धतशीर बदनामी त्यांनीं केली नसती, तर त्या चळवळीविषयीं जे दुष्ट पूर्वग्रह महाराष्ट्रांत आज बोकाळलेले आहेत, ते कधींच उत्पन्न झाले नसते. ते पूर्वग्रह तुम्हांला यापुढं पावलोपावलीं नडतील. आणि टिळकांचीं राजकीय मतं तरी काय मोठीं पायाशुद्ध आहेत? सुधारक निदान जातिभेदाच्या तरी विरुद्ध आहेत. पण टिळकांना जातिभेदही हवा अन् वर्गभेदही हवा! संस्थानिकापासून कुळकर्ण्यापर्यंत साऱ्यांचे मिराशी हक्क कायम ठेवावे,—नालायखांच्या सुद्धां जहागिरी काढून घेण्यांत येऊं नयेत, असं 'केसरीं'तून प्रतिपादण्यांत टिळकांची हयात गेली. मजुरांविषयीं त्यांना कळवळा

वाटतो; पण तो फक्त भूतदयेच्या दृष्टीनं. त्यांना वर्गभेद नको आहे;—समाजांतील सर्व प्रकारची वतनदारी, विशिष्ट हक्कांचीं केंद्रं नष्ट व्हावींत, असं तुमच्याप्रमाणंच त्यांचंही मत आहे, अशी कल्पना तूं तेवढ्यावरून करून घेऊं नकोस. त्यांना जर शेतकऱ्यांविषयीं खरी कळकळ असती, तर कायम धाऱ्याच्या पद्धतीचा पुरस्कार त्यांनीं कधींही केला नसता. टिळकांच्या राजकीय जहालपणावर मोहित होऊन, तुम्ही त्यांचं खरं स्वरूप विसरूं नका ! टिळक म्हणजे कांहीं लजपतराय नव्हेत किंवा अरविंदही नव्हेत. रानडे ज्या परिस्थितींत वाढले, ज्या पूर्वग्रहांची पकड जन्मभर त्यांच्या मनावर होती, ती परिस्थिति अन् ते पूर्वग्रह यांनीं टिळकांनाही पछाडलेलं आहे;—रानडे आणि टिळक यांच्यांत फारसा फरक नाहीं ! उलट रानडे एक वेळ पुरवते;—प्रतिपक्षाचा सुद्धां गुण घेण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत होती. टिळकांचं तसं नाहीं. ते पराकाष्ठेचे हट्टी;—त्यांचा मताभिनिवेश डोळस नाहीं. तुमच्या नव्या सामाजिक मतांना यत्किंचितही दया दाखवायला ते तयार होणार नाहींत;—अन् तरीसुद्धां तुम्हांला त्यांच्याविषयीं आपलेपणा वाटावा ?—"

"कां वाटूं नये ?—साहजिक वाटतो. टिळकांचं आणि आमचं जमणं शक्य नाहीं,—किंबहुना सामाजिक बाबतींत ते आमचे शत्रु आहेत, हें खरं. पण त्यांना आमचीं सामाजिक मतं कितीही अनिष्ट वाटलीं, तरी मवाळांप्रमाणं सरकारच्या हातांत आमची मान द्यायला ते कधींही तयार होणार नाहींत. राष्ट्रीय पक्षाला खब्यासारखा बाजूला काढून सरकारच्या हातीं त्याची मुंडी देण्याचा जो अधमपणा मवाळांनीं सुरतेला केला, तसलं नीच कृत्य टिळकांच्या हातून कधींही होणार नाहीं. ब्रिटिश राज्यसत्तेविरुद्ध जो जो मनुष्य झगडायला उभा राहिला, त्या त्या मनुष्याला,—मग तो व्यक्तिशः त्यांना कितीही अप्रिय असो, त्याचीं राजकीयेतर मतं त्यांना कितीही अनिष्ट वाटोत,—पाठिंबा द्यायला टिळक कधींही चुकले नाहींत. सरकारच्या क्रोधाला बळी पडण्याचा प्रसंग ज्या दिवशीं आमच्यावर येईल, त्या दिवशीं टिळक आमच्या पाठीशीं उभे रहातील;—म्हणून त्यांच्याविषयीं आम्हांला आपलेपणा वाटतो. आयर्लंडांतील फिनियन क्रांतिकारकांना पार्नेल ज्या कारणांमुळं आपलासा वाटे, त्याच कारणांमुळं टिळक आम्हांला आपलेसे वाटतात. मवाळांचं तसं नाहीं. ते परकीय राज्यकर्त्यांचे पक्षपाती,—त्यांचे पाठीराखे

आहेत. त्यांच्या सत्तेवर आजपर्यंत ज्या ज्या माणसानं हात उचलला, त्याला त्याला आपला शत्रु लेखून, प्रतिकूल टीकेचा मारा त्याच्यावर सतत करून त्यांनीं अखेर त्याला सरकारच्या स्वाधीन केलं. उपऱ्या ब्रिटिशांच्याही तोंडून निघणार नाहींत, असे दुःशब्द या मवाळांनीं क्रांतिकारकांविषयीं काढलेले आहेत ! शिवरामपंतां-विरुद्ध फेरोजशहांच्या बगलेंतल्या मुंबईच्या कॉंग्रेस कमिटीनं केलेला दगलबाज-पणाचा ठराव तूं विसरूं नकोस ! 'सर्व जगांत हे स्वतः खून आणि लूटमार करित आहेत. पण आयर्लंडांत कुठं एकादा खून पडला कीं, हे चवताळून किंचाळा-यला लागतात. कारण हा खून त्यांच्या पथ्यावर पडत नाहीं ना?'—या पार्नेलनं इंग्रजांविषयीं काढलेल्या उद्गारांचं मर्म आमच्या मवाळांना कधींही कळणं शक्य नाहीं.—इतकी त्यांची बुद्धि साम्राज्यवादाची कीड लागून कुजून गेलेली आहे. खरोखरी, इंग्लंडांतला एकादा कट्टर साम्राज्यवादी पुरवेल, पण हिंदुस्थानांतला इरसाल मवाळ पुरवणार नाहीं—"

चंद्रशेखर या वेळीं आवेशानें अगदीं बेभान होऊन बोलत होता. केशवची स्निग्ध दृष्टि चंद्रप्रकाशांत अधिकच उज्ज्वल दिसणाऱ्या त्याच्या आरक्त मुखावर स्थिर झालेली होती. त्याची ती संतप्त मुद्रा, ते विस्फारित नेत्र, बोलतांना रागानें थरथरणारे ते ओंठ पाहून केशवला साश्चर्य कौतुक वाटलें. जवळ येत चाललेल्या समुद्राच्या लाटांचा ध्वनि भोंवतालच्या निःशब्दतेंतून या वेळीं घुमून उठत होता. पण, चंद्रशेखरचा आवाज आतां बोलतां बोलतां इतका चढला होता कीं, त्याच्या तोंडून निघणाऱ्या सावेश शब्दांशिवाय केशवला दुसरें कांहींही ऐकूं येत नव्हतें. त्या आविष्ट स्थितींत त्याला फार वेळ राहूं देणें अनिष्ट वाटल्या-मुळेंच कीं काय, त्याचा हात आपल्या हातांत घेत केशव त्याला किंचित् हंसून म्हणाला, "तूं उगाच इतकं तापून कां बोलतोस, चंद्रा? मला काय या साऱ्या गोष्टी कळत कां नाहींत?"

"कळतं सारं,—पण वळत मात्र नाहीं." त्याच्या त्या स्मितयुक्त मार्मिक प्रश्नानें चंद्रशेखरचा राग एकदम विरघळून तो हंसत हंसत उद्गारला. "आईच्या न् दादांच्या विचारांची छाप तुझ्या मनावर इतकी घट्ट बसलेली आहे कीं, त्यांतून तें मुक्त होईल तेव्हां खरं! पण त्याबद्दल मी तुला दोष देत नाहीं.

तुझ्या आजोबांपासून तुमच्या घरांत रानड्यांचं प्रस्थ चालत आलेलं;—त्याची भीड तुला तरी एकदम कशी तोडवणार ? ”

“ पण चंद्रा, रानडे जसे आपल्या नव्या पक्षाचे गुरु होणं शक्य नाहीं, तसेच टिळकही होणं शक्य नाहीं. मला गांधींबद्दल सुद्धां शंका वाटते—”

“ शंका ?—माझी तर खात्रीच आहे पक्की ते आपले गुरु होऊं शकत नाहींत याबद्दल ! गोखले आणि टॉलस्टॉय यांच्या परस्परविरोधी मतांची भेसळ करून तीं मतं आपलीं म्हणून सांगत फिरणारा विक्षिप्त मनुष्य कधीं तरी आपला गुरु होणं शक्य आहे काय ? गांधी भूतदयावादी आहेत. अन्यायावर आणि विषमतेवर भूतदयेची झिलई चढलेली दिसली कीं, त्यांच्या भूतदयेनं द्रवणाऱ्या मनाचं समाधान होतं. मजुरांना हवाशीर चाळी बांधून दिल्यावर, मग टाटा टोलेजंग बंगल्यांत राहिले अन् लक्षावधि रुपयांचा नफा त्यानं दाबला, तरी गांधींना कांहीं वाटणार नाहीं. ते त्याच्या कारखान्याला खुशाल आशीर्वाद देतील, असल्या मनोवृत्तीचा मनुष्य आपला गुरु कसा होणार ! खरोखरी बाबू, हल्लींच्या पुढाऱ्यांपैकीं कोणीच आपल्याला गुरुस्थानीं होण्याच्या लायकीचे नाहींत; किंबहुना त्यांनीं स्थापन केलेले पंथ आणि पक्ष नष्ट करण्याचंच कार्य आपल्याला आधीं करावं लागेल. वास्तविक हिंदुस्थानासारख्या परतंत्र राष्ट्रांत दोनच पक्ष असायला पाहिजेत;—एक परकीय राज्यकर्त्यांचा आणि दुसरा स्वातंत्र्याकांक्षी जनतेचा. पण, अंशतः राज्यकर्त्यांच्या भेदनीतीमुळं आणि त्याहीपेक्षां अंशतः आपल्या स्वार्थबुद्धीमुळं इतके तट आपल्यांत सध्यां पडलेले आहेत कीं, स्वातंत्र्य तर राहोच, पण नुसती स्वायत्तता सुद्धां आपल्या हयातींत मिळेल कीं नाहीं याविषयीं शंका उत्पन्न होऊन, या अभागी देशाच्या भवितव्याविषयीं मन अगदीं निराश होऊन जातं. केशवसुतांच्या त्या ओळी बाबू, तुला आठवतात का ?—

तेव्हां आम्ही म्हटलें—“ ही ऱ्हासाची
रजनी केव्हां जाइल विरुनि साची ?—

स्वतंत्रतेची पहांट ती येईल,
उत्कर्षाचा दिन केव्हां सुचवील ?—”

" या डोळ्यांनीं पहांट ती बघण्याचें
असेल का हो नशिबीं दुर्दैव्यांचे ?
किंवा तीतें आणायाचे कांहीं
यत्न आमुच्या होतिल काय करांहीं ?"

प्रयत्न करणं एवढंच काय तें सध्यां आपल्या हातीं आहे. अन् त्यांत सर्वस्व जरी गमवावं लागलं, तरी गमावून जो नवा पक्ष निर्माण झाला पाहिजे, असं आपल्याला वाटतं, त्याची भूमिका आपण तयार केली पाहिजे. तुला नाहीं का असं वाटत, बाबू ?"

"वाटतं,—पण उपयोग काय ? तुझा आत्मविश्वास, तुझं कर्तृत्व माझ्या ठिकाणीं नाहीं. चंद्रा, तुझं भाषण ऐकतांना मला हुरूप येतो; तुझ्या सहवासांत राहून तूं म्हणतोस त्या मार्गानं देशसेवा करावी अशी प्रबळ इच्छा होते.—पण तो मार्ग किती विलक्षण आहे हें मनांत आलं—"

"बाबू, तूं तरी निदान ही भाषा वापरूं नयेस," चंद्रशेखरनें त्याचे हात आपल्या हातांत घट्ट धरून म्हटलें. "मला जर आज कुणाचा आधार वाटत असेल, तर तो तुझ्या सहानुभवाचा. दोन व्यक्तींचं एकमेकांवरलं असीम प्रेम ही दुनियेंतली एक और चीज आहे.—स्फूर्ति देण्याचं जें सामर्थ्य त्या प्रेमांत असतं, तें जगांतल्या दुसऱ्या कोणत्याही वस्तूंत नसतं. अन् तूं जर असली निराशेची भाषा बोलूं लागलास तर मी काय करावं ? बाबू, आपण दोघे जर एकविचारानं वागलों, तूं नुसतं माझ्या मागं उभं राहून जरी मला प्रोत्साहन दिलंस, तरी पुरे आहे. जगाचे आघात सोसण्याचं सामर्थ्य मला निसर्गानं भरपूर दिलं आहे;—त्या आघातांची मला दिक्कत वाटत नाहीं. पण, ते आघात सोशीत असतांना जिथं निश्चिंत मनानं आणि विश्वस्त बुद्धीनं डोकं टेकतां येईल, जिथं आनंदाचे आणि दुःखाचेही अश्रु मनसोक्त गाळतां येतील, असा निवारा मला हवा. तो तुझ्या प्रेमाशिवाय मला दुसरीकडे कोठें मिळेल ? तुझ्या अडचणी मला कळतात; तुझ्या भोंवतालचे मतांचे आणि मायेचे पाश मला दिसतात.—पण आज ना उद्यां तूं ते तोडूं शकशील, असा मला धीर वाटतो; त्या धीराला डळमळीत करणारी असली भाषा तूं वापरूं नकोस. तुझ्याकडून मला एकच वचन पाहिजे,—तूं एव-

ढंच कबूल कर—कीं, कसाही प्रसंग आला तरी मी तुला सोडणार नाहीं. मावळण्यासाठीं क्षितिजावर उतरलेला हा चंद्रमा आणि त्याला स्पर्श करण्यासाठीं नाचत असलेला हा सागर;—आपल्या अंगावर उडत असलेले हे त्याच्या लाटांचे तुषार त्यांच्या प्रेमोद्रेकाची साक्ष देत आहेत.—दोन व्यक्तींच्या प्रेमाचं हें मूर्तिमंत प्रतीक आपल्यापुढं आहे;—आपला स्नेह असा असावा,–निरुपाधिक आणि निस्सीम असावा, एवढंच वचन तुझ्यापासून मला पाहिजे—"

"वचनाची काय गरज आहे?" केशव म्हणाला. त्याचा आवाज या वेळीं विलक्षण मृदु पण गंभीर झाला होता. "चंद्रा, मी तुला कधींही कोणत्याही प्रसंगांत सोडणार नाहीं. तुला जर मी सोडला, तर माझं जीवन निस्सार होऊन जाईल. तुला सोडणं म्हणजे माझ्यामध्यें जें चैतन्य आज उत्पन्न झालं आहे, त्या चैतन्यालाच मी सोडणं आहे.—"

बोलतां बोलतां त्यानें चंद्रशेखरचे हात आपल्या हातांत घेऊन ते आपल्या कपाळावर घट्ट दाबले. नंतर क्षणभरानें तो उद्गारला "आपण उठूं या आतां. वारा पहा किती गार सुटला आहे—"

इतकें बोलून ते दोघेही उठले. चंद्र या वेळीं क्षितिजाच्या अगदीं कडेवर आला होता; व त्याच्या पीत प्रभेचा झोत समुद्राच्या उसळत्या लाटांवर पडून पाणी अतिशयच झळकत होतें. वारा अगदीं गार सुटला होता; व मध्यरात्र उलटून गेलेली असल्यामुळें विलक्षण शांतता सर्वत्र पसरलेली होती.

ते समुद्रांतून बाहेर येऊन चालावयाला लागल्यावर, चंद्रशेखर एकदम आठवल्यासारखें [illegible] केशवला म्हणाला, "आज बोलण्याच्या नादांत तुला एक महत्त्वाची गोष्ट अजीबात सांगायची राहून गेली, बाबू! रात्रीं कॉलेजांतून परत आल्याबरोबर प्रिन्सिपॉलसाहेबांचं निकडीचं बोलावणं आलं होतं मला—"

"कशासाठीं रे?" केशवनें उत्सुकतेनें विचारलें. "अगदीं सगळी सगळी हकीकत सांग मला—"

तो चालतां चालतां एकदम थबकला.

"थांबूं नकोस. मी सगळं कांहीं सांगतों तुला—" चंद्रशेखरनें हंसत हंसत म्हटलें. "मी घरीं जाऊन जेवायला बसतों न बसतों, तों त्यांचा चपराशी

आला. दत्तानं आईला कॉलेजांत घडलेला सारा प्रकार सांगितलेला होता. त्यामुळं आधींच ती फार घाबरून गेली होती. तिनं मला पुरतं जेवूं सुद्धां दिलं नाहीं. ' आधीं साहेबांना भेटून ये, ' म्हणून आग्रह धरला तिनं; अन् म्हणाली, ' मी सुद्धां येत्यें बरोबर ! तुला त्यांची क्षमा मागायची नसली तर मीच पसरीन पदर त्यांच्यापुढं !' मी तिची कशीबशी समजूत घातली न् तडक बंगल्यावर गेलों. चपराशानं मला आंत नेलं. साहेब कांहीं तरी लिहीत होते. मी दार उघडून आंत गेलों. त्यांना कोण आलं तें समजलं,—पण त्यांनीं वर बघितलं नाहीं. घुश्शां-तच होती स्वारी अगदीं !—"

बोलतां बोलतां चंद्रशेखरनें साभिमान स्मित केलें.

" मग तूं काय म्हणालास त्यांना ? "

" मी पांच मिनिटं वाट पाहिली. नंतर आपण होऊनच विचारलं, ' मला कशासाठीं बोलावलं ' म्हणून. तेव्हां, वर न पहातांच किंचित् कठोर आवाजांत साहेब उद्गारले, ' तुला कल्पना नाहीं ? ' मी त्यांचा रोंख ओळखला. पण मुद्दामच म्हटलं ' नाहीं !' त्याबरोबर आपले लहानसे डोळे वटारून माझ्याकडे पहात ते रागानें म्हणाले, " चंद्रशेखर, माझ्या सहनशीलतेचा अंत पाहूं नकोस ! तूं जें वर्तन आज संध्याकाळीं केलंस तें तुला योग्य वाटतं का ? "–मीही त्यांच्या दृष्टीला दृष्टि भिडवून उत्तर दिलं, ' होय, मला योग्य वाटतं; व मी जें केलं तें विचारपूर्वकच केलं .' त्याबरोबर साहेब थोडे नरमून म्हणाले, " तुझ्या दृष्टीनं तुझं करणं ठीक असेल कदाचित् ;—तुझ्या देशाभिमानाविषयीं मला सुद्धां आदर वाटतो ! पण देशाभिमान ही एक शक्ति आहे. ती कांहीं वाटेल तेव्हां अन् वाटेल तिथं वापरून उधळून टाकायची नसते !—शिवाय शाळेची शिस्त आणि गुरुजनांविषयींचा आदर म्हणून कांहीं जगांत आहेच कीं नाहीं ?' मी त्यांना सांगितलं, ' होय.—पण त्या शिस्तीला अन् त्या आदरालाही मर्यादा आहेत. त्यांच्यापेक्षां उच्चतर अशा भावनांची आणि तत्त्वांची पायमल्ली होण्याचा प्रसंग जेव्हां त्यांच्यामुळं येतो, तेव्हां ती शिस्त आणि तो आदर यांची अमर्यादा करण्याशिवाय गत्यंतर उरत नाहीं !—माझ्या परिस्थितींत आपण असतां, तर आपण काय केलं असतं ? साहेब, हा प्रश्न तत्त्वाचा होता, नुसता

भावनेचा नव्हे.' माझ्या या उत्तरानं ते थोडा वेळ घुटमळल्यासारखे झाले. नंतर एक दीर्घ उसासा टाकून म्हणाले, 'तुझ्या म्हणण्यांत तथ्य आहे चंद्रशेखर, मीही कबूल करतों. पण इथं एका शिक्षणसंस्थेचा चालक म्हणून मी बसलेलों आहें;—तिच्या शिस्तीची अंमलबजावणी ही मला केलीच पाहिजे. देशाभिमानाच्या ईर्ष्येनं भलताच प्रसंग तू मजवर आणूं नकोस.' इतकं बोलून ते एकदम उभे राहिले; माझ्या डोक्यावर त्यांनीं हात ठेवला; व कांपऱ्या आवाजांत ते उद्गारले, 'चंद्रशेखर, तुझ्याविषयीं मला किती प्रेम वाटतं अन् कां वाटतं यीची तुला कल्पना नाहीं. माझं इथलं आयुष्य आतां संपत आलं आहे;—त्याला या अखेरच्या दिवसांत कटुता आणण्याचा प्रसंग तूं येऊं देऊं नकोस ! मी तुझा आणि तुझ्या मातृभूमीचा निस्सीम हितचिंतक आहें. हे केंस तिच्याच सेवेंत पांढरे झालेले आहेत;—त्यांच्याकडे लक्ष दे अन् आपल्या भावनांना पुन्हा अनावर होऊं देऊं नको ! मला खात्री आहे;—आपण लवकरच पुन्हा इंग्लंडांत—त्या स्वातंत्र्यभूमींत, गुरुशिष्य म्हणून नव्हे, तर स्नेही म्हणून भेटूं ! तुला मी फार फार चहातों,—तूं मला स्वतःच्या मुलासारखा आहेस. तुझ्या जीवनावर, तुझ्या आकांक्षांवर घाव घालण्याची पाळी तूं मजवर आणूं नकोस.'–इतकं बोलून त्यांनीं माझा हात घट्ट दाबला व मला रजा दिली."

"पण त्यांचा तो सल्ला पटला का तुला ?" केशवनें एक प्रकारच्या आशायुक्त आवाजांत विचारलें.

"नाहीं !–कसा पटेल ?" चंद्रशेखरनें किंचित् आवेशानें उत्तर दिलें." मॅक्फर्सनसाहेब कट्टे साम्राज्यवादी अन् त्यांत पुन्हा मिशनरी आहेत, हें विसरून चालणार नाहीं. शिवाय, हिंदुस्थानाच्या हितचिंतनाची भाषा कोणता इंग्रज बोलत नाहीं ? त्यांच्या त्या मायावी भाषेला भुलून आपलं कसं चालेल, बाबू ?"

केशव यावर कांहीं बोलला नाहीं; फक्त त्यानें एक उसासा मात्र टाकला.

## प्रकरण १५ वें

# मुंबईतील मादाम द स्ताअल



"तुम्ही गेलां होतांत का कालच्या सभेला, शास्त्रीबुवा ?—काय तरी बाई विलक्षण धाडस त्या विद्यार्थ्याचं !—त्याची ती शांत, निर्भय मूर्ति माझ्या डोळ्यांपुढून हलत नाहीं कालपासून—"

"हः हः हः—आम्हांला कुठलीं आलीं आहेत सभा न् संमेलनं प्रेमाबाई ?" शास्त्रीबुवा दंतपंक्तीचें प्रदर्शन करित उद्गारले. "आम्ही वैद्य डॉक्टर म्हणजे अगदीं 'खिद्यसे लोकहेतोः'! आमचं सारं आयुष्य, आयुष्याचा प्रत्येक क्षण न् क्षण सार्वजनिक—लोककार्यी लागलेला. तुमचंसुद्धां जीवन तसं सार्वजनिकच आहे.–पण तुमची निदान रात्र तरी तुम्हांला हक्काची न् निभ्रांत असते. आम्हांला म्हणजे दिवस न् रात्र दोन्ही सारखींच;–रात्रीं दोन वाजतां जरी एकादा मनुष्य बोलवायला आला तरी उठावं लागतं.—अशा स्थितींत कुठं जातां सभेला ?—"

"काय शास्त्रीबुवा, अवडंबर माजवलंय तुम्ही हें आपल्या लोककार्याचं ! कुणी ऐकलं तर म्हणेल कीं, जसा कांहीं धर्मार्थच दवाखाना चालविला आहे ! पण इकडे पहावं तर घर झालं, छापखाना झाला, हिमौषधिभांडार झालं, पुन्हां रुग्णालय काढण्याच्या गोष्टी बोलतांच आहां.—तुमचं तें एवढं थोरलं धन्वंतरीमंदिर काय पैशाशिवायच झालं वाटतं, शास्त्रीबुवा ? त्यांतून तो बापडा हिमालय तुमच्या भांडारांत येऊन बसल्या दिवसापासून तर कांचनगंगेला नुसता पूर आलाय—"

"काय सांगावं तुम्हांला, प्रेमाबाई ?—जावं त्याच्या वंशा तेव्हां कळे ! अहो, तुम्ही जर शाळाखात्यांत शिरून निरामयनिरीक्षिका होण्याऐवजीं परिचर्येचा व्यवसाय केला असतात, तर तुम्हांला आली असती कल्पना आमच्या कष्टांची;—चोवीस तास खपावं तेव्हां कुठं चार टिकल्या दृष्टीस पडतात.—तुमच्यासारखं थोडंच आहे ? तीन चार तास गाडींतून हिंडावं, मुलींचीं तोंडं पहावीं अन् रिपोर्ट खरडून रावबहादुरांकडे पाठवावा कीं झाल्या मोकळ्या ! खरोखरी, तुमचं जीवन म्हणजे वसंतदूतिकेसारखं रमणीय आणि स्पृहणीय आहे, प्रेमाबाई !—पण काय

रे बबनराव, तूं गेला होतास ना कालच्या सभेला ? मग ऐकूं द्या ना आम्हांला एकदां तिथं काय झालं तें—"

" मीच कां ?—रावसाहेब सुद्धां होते कालच्या सभेला शास्त्रीबुवा—"

" भगवंतरावजींचा न् नानासाहेबांचा फारच आग्रह पडला, म्हणून गेलों होतों सहज ! पण तो गोंधळ सुरू झाल्यावर मग कांहीं थांबलों नाहीं आम्ही तिथं—"

" अरे, पण गोंधळ काय झाला तो तर ऐकवाल कीं नाहीं ?"

" प्रमिलाबाईच सांगतील तुम्हांला सारी हकीकत, शास्त्रीबुवा.–मी बुवा आज अगदीं थकून गेलों आहें फार—"

" मी समजलें तुमच्या थकण्याचं रहस्य, " प्रमिला हंसत हंसत उद्गारली. " कालिदासाच्या 'महानसं गच्छावः' म्हणणाऱ्या विदूषकावर ताण आहे तुमची ! पण सगळी मंडळी आल्याशिवाय कांहीं आज तुमचा थकवा दूर करतां येणार नाहीं मला. कालच्या प्रसंगाचं वर्णन केल्यामुळं तुमच्या तोंडाला जो शीण येईल, तो मग दामदुपटीनं घालविण्याची करतें मी तरतूद. हं, मग करा ना आतां सुरवात—"

" छे छे;—नाहीं तरी तुम्ही सूतोवाच केलं आहे, तर तुम्हीच आतां तें पुरं करा. बायका म्हणजे कोणत्याही पदार्थाला तिखटमीठ लावून खमंग करण्यांत पटाईत.—तेव्हां तुमच्याच तोंडचं तें खुसखुशीत वर्णन ऐकूं द्या आम्हांला;—काय शास्त्रीबुवा ?—"

" हः हः हः—बबनराव, तें काय विचारावं ? आपल्या प्रेमाबाई म्हणजे निसर्ग-पंडिता आहेत अगदीं.—उगाच नाहीं मुंबईचे सारे विद्वन्मणि त्यांनीं आपल्या स्नेह-सूत्रांत गोंवलेले ! आपले राळेसाहेब त्यांना जे 'मादाम द स्ताअल' म्हणतात तें कांहीं उगाच नव्हे ! वैदुष्य आणि वैदग्ध्य यांचं म्हणजे या अगदीं विलासस्थान आहेत;–यांना पाहिलं म्हणजे मला खरोखरी 'मालतीमाधवां'तलं तें कामंदकीचं वर्णन आठवतं—"

" पुरे पुरे शास्त्रीबुवा;—तुम्हांला कीं नाहीं लोकांच्या अंगीं नसते गुण चिकट-वण्याची संवयच आहे नाहीं तरी !—त्या राळयांना काय होतं 'मादाम द स्ताअल' म्हणून माझी थट्टा करायला—"

"हा केवळ आपला विनय आहे, प्रेमाबाई !—आपल्या ठिकाणीं तसेच गुण असल्याशिवाय कां ही विद्वद्भृंगतति आपल्या भोंवती रुजी घालत्येय ?—"

"माझ्या गुणांचं पुराण पुरे झालं.—आतां जरा कालच्या सभेची हकिकत ऐका आधीं !—मग काय सुरवात करतां ना बबनराव ?"

"नको, नको,—तुम्हीच सांगा प्रमिलाबाई; मी नीटसं कांहीं पाह्यलं नाहीं काल.—मागच्या बाजूला उभा राहून त्या प्रो. बावळयांशीं बोलत होतों;—तुम्हीच सांगा !—म्हणजे घरीं बसून जगाच्या उठाठेवी करणाऱ्या शास्त्रीबुवांच्या चवचाल जिज्ञासेला चांगलं खमंग खाद्य मिळेल—"

"अहो, आम्हां बायकांचा खमंगपणा फक्त चुलीपुरता ! शिवाय पराचा कावळा करणाऱ्या तुम्हां वर्तमानपत्रांच्या संपादकांची सर आम्हांला कुठून येणार ? त्यांतून तुम्ही म्हणजे तर अगदीं काकदृष्टि ! आम्हां बायकांची नजर कितीही बारीक म्हटली तरी ती सुंदर वस्तूवरच फक्त पडायची;—पण लोकांचीं असतील नसतील तीं व्यंगं पहाण्यांत न् फुगवून सांगण्यांत तुम्ही पटाइत ! मग सांगा ना बबनराव तुम्हीच;—उगाच आर्जवं नका करून घेऊं गडे !"

"अगदीं बरोबर बोललीस प्रेमा तूं," रावसाहेब तिच्या त्या मार्मिक भाषणानें खुलून उद्गारले. "बबनरावांच्या सांगण्यांत नेहमींच कांहीं और खुमारी असते ! शिवाय कालचा प्रसंगही मोठा विलक्षण;—तो वर्णन करायला बबनरावच पाहिजेत.—हं, मग करा आरंभ—"

"सांगतों बुवा,—काय करणार ? प्रेमाबाईचा न् रावसाहेबांचा इतका आग्रहच आहे, तर सांगितलंच पाहिजे आतां;—काय शास्त्रीबुवा ?" बबनराव शास्त्रीबुवांनीं पुढें केलेल्या डबींतील चिमूट आपल्या नाकांत कोंबीत रेंकत रेंकत म्हणाले.

"यांत काय शंका आहे का ?" शास्त्रीबुवा बबनरावांच्या पाठीवर थाप मारीत उद्गारले. "अरे, सुंदर स्त्रियांचा आग्रह म्हणजे तो अनुग्रहच होय ! कौपर कवीची ती गोष्ट तुला माहित आहे ना ? त्याला एकदा एका अनवद्यांगीनं आपण बसलेल्या कोचावरच कविता ल्याहायला सांगितली; अन् तोही बेटा असा रसिक कीं, त्यानं हजारों ओळींचं काव्य लिहिलं त्या कोचावर ! पुरुष हा भ्रमरासारखा मधुव्रत असला पाहिजे, बबनराव ! भगवंतरावजींसारखं अलीकपांडित्य नाहीं

कामाचं."—बोलतां बोलतां त्यांनीं आपले डोळे शक्य तितके ताणून प्रमिलेच्या तन्वंगाकडे अतृप्त वासनेनें पाहिलें.

- " शास्त्रीबुवा, फार वाहवलांत तुम्ही आज ! आपण कुणाविषयीं काय बोलतों याचा कांहीं सुमार ?–तुमची अशी कल्पना आहे का, कीं बायका पाहिल्या म्हणजे जीभ आपली हवी तशी सैल सोडावी ? हं, बबनराव, करा पाहूं सुरवात सांगायला ! तुमचं तोंड उघडल्याशिवाय कांहीं शास्त्रीबुवांचं तोंड मिटायचं नाहीं—"

रावसाहेबांच्या त्या सरोष उद्गारांनीं शास्त्रीबुवा थिजल्यासारखे होऊन, त्या सुसज्जित दिवाणखान्यांत इतका वेळ खेळत असलेल्या विनोदी वातावरणांत गांभीर्याचा गारठा उत्पन्न झाला. तशा तऱ्हेचे उद्गार काढण्याचा रावसाहेबांना, केवळ वयानें किंवा दर्जानें नव्हे, तर प्रमिलेशीं असलेल्या त्यांच्या ऋणानुबंधानेंही पूर्ण अधिकार होता. प्रमिला ही पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमधील एका शिक्षकाची मुलगी. हा गृहस्थ आगरकरांचा चहाता व म्हणून कर्ता सुधारक असल्याकारणानें, पहिली बायको वारल्यावर, पंडिता रमाबाईच्या शारदासदनांतील एका तरुण विधवेशीं त्यानें पुनर्विवाह केला. पण, प्रमिलेच्या जन्मानंतर थोड्याच दिवसांनीं तो प्लेगला बळी पडून, बिचाऱ्या त्या तरुणीवर पुन्हा वैधव्याची आपत्ति कोसळली. परंतु, ती पंडिताबाईच्या तालमींत तयार झालेली असल्यामुळें, या संकटानें खचून न जातां तिनें स्वतःच्या पायांवर उभें राहाण्याचें ठरविलें. पण एक तर ती पुनर्भू; व त्यांतच पुन्हा पंडिताबाईची शिष्या. त्यामुळें पुण्याच्या शाळाखात्यांत तिला थारा मिळेना; व तेथील प्रातःस्मरणीय सुधारकाग्रणींनीं, आपल्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें, तिला सल्ला देण्यापलीकडे कांहींच मदत केली नाहीं. आपल्याला त्यांच्या मुलाबाळांच्या तरी शिकवण्या मिळाव्या, म्हणूनही तिनें पुष्कळ खटपट केली. पण, सुधारक पुढाऱ्यांना तिचा आपल्या घराशीं संबंध येणें इष्ट न वाटल्या-मुळें, त्यांनीं तेवढीही मेहरबानी तिच्यावर केली नाहीं. अखेर पंडिताबाईचें पत्र घेऊन ती मुंबईला आली; व त्यांच्या शिफारसीनें तेथील एका मिशनरी शाळेंत तिचा प्रवेश झाला.

अशा आईच्या तालमींत प्रमिला तयार झालेली होती. पंडिताबाईच्या सहवा-सांत राहिल्यामुळें प्रमिलेच्या आईचा हिंदु धर्म आणि हिंदु समाज यांच्याविषयींचा

आदर आधींच ढांसळला होता. त्यांत या कटु अनुभवांची भर पडली. ती मिशनच्या इमारतींत राहत असे; व तेथील अनाथ ख्रिस्ती मुलीप्रमाणें आपल्या प्रमिलेलाही तिनें युरोपियन पद्धतीनेंच वाढविलें. प्रमिलेला एम्. ए. पर्यंत शिकविण्याचा तिचा विचार होता. पण, दुर्दैवानें तिला क्षयानें ग्रासल्यामुळें, आपल्या डोळ्यांदेखत मुलीची सर्व व्यवस्था झालेली असावी, म्हणून तिनें त्याच शाळेंतील एका होतकरू शिक्षकाशीं प्रमिलेचें लग्न करून दिलें. पण लग्नानंतर दोन वर्षांच्या आंतच नवरा मुदतीच्या तापाला बळी पडून मातृहीन प्रमिला निराधार झाली. परंतु, आईच्या शिक्षणखात्यांतील पुण्याईमुळें लवकरच तिला एका शाळेंत नोकरी लागून, तें तिच्या भावी उत्कर्षाचें निमित्त झालें. रा. ब. भुजंगराव देशमुख यांचे कनिष्ठ बंधु रा. ब. भवानराव देशमुख हे या वेळीं शाळाखात्यांत एक बडे अधिकारी होते. ते एकदां शाळेची तपासणी करण्यासाठीं आले असतां, तारुण्याच्या अगदीं भरांत असलेली ही वैधव्यग्रस्त शिक्षिका त्यांच्या दृष्टीस पडली. गतधवा शिक्षिकांविषयींची रावबहादुरांची साभिलाष सहानुभूति मुंबईस प्रसिद्ध होती. त्यांनीं प्रमिलेच्या कामावर चांगला शेरा मारून, तिला ट्रेनिंगला पाठविण्याची जोराची शिफारस केली; व आपल्या मुलाखतीसाठीं तिला घरीं बोलाविलें.

प्रमिला सुंदर नव्हती. पण, तिचा बांधा गोल आणि गोंडस असून, संस्कृत कवींनीं प्रमदांचे जे निम्नोन्नत अवयव जसे असावेत म्हणून रसिकतेनें वर्णन केलें आहे, ते सारे तिचे यथास्थित तसे होते. त्यांतच पुन्हा तारुण्य आणि वपुःश्रीच्या विकासाला पोषक होणारी सर्व प्रकारची स्वतंत्रता. शिवाय, युरोपियन स्त्रियांच्या सहवासांत कौमार्य गेल्यामुळें, तिच्या वर्तनांत एक प्रकारची आकर्षक धिटाईही उत्पन्न झालेली होती. या सर्व कारणांमुळें सकृद्दर्शनीं ती फारच मोहक वाटत असे; व त्या मध्यमेवर रावबहादुरांची जी कृपादृष्टि एकदां पडली, ती कायमचीच. त्यांचें कुटुंब त्या वेळीं नुकतेंच निवर्तलेलें असून, त्याच्यावर एक शोकरसपूर्ण निवापांजलीही त्यांनीं प्रसिद्ध केला होता. त्या काव्याची एक सोनेरी बांधणीची प्रत त्यांनीं प्रमिलेला सप्रेम भेट म्हणून नजर केली; व शिवाय तिच्याकडून पंडितरायांचा भामिनीविलासही वाचून घेतला. पत्नीच्या वियोगामुळें व्यथित झालेल्या रावबहादुरांच्या विदग्ध मनाला तिचा तो सहवास म्हणजे एक विरंगुळाच होऊन, त्याला हळू हळू सांद्रता येत गेली. त्यांच्या कृपेनें लवकरच प्रमि-

लेला मुंबईच्या शाळाखात्यांत आरोग्यनिरीक्षकेची जागा मिळून तिचें आयुष्य लौकिक दृष्टीनें सुखासीन झालें. पण ती मोठी महत्त्वाकांक्षी होती. हातांत चांगला पैसा खेळूं लागून आयुष्याला स्थैर्य आलें, एवढ्यानें तिचें समाधान झालें नाहीं. तिची भावना अशी होती कीं, जग ही निव्वळ एक भोगभूमि आहे; व ते भोग जितके विविध आणि उच्च, तितकें जीवन व्यापक आणि आनंदमय. म्हणून, तिनें आपल्याला मिळालेल्या या संधीचा दक्षतेनें उपयोग करून, निरनिराळ्या विषयांचा आणि विद्यांचा परिचय करून घेतला. संसाराला गोडी आणणाऱ्या सर्व शास्त्रांत आणि कलांत ती मनस्विनी हळुहळू पारंगत झाली. लवकरच रावबहादुरांच्या सहाय्यानें तिनें वाङ्मयवाटिकेंतही प्रवेश करून घेतला; व 'प्रबोधनां'तून तिच्या कथा–कविता झळकूं लागून तिचें यश सर्व महाराष्ट्रभर दरवळलें. एवढ्यावरच ती थांबली नाहीं. तिनें एक नाटकही लिहिलें. त्याच्या पहिल्या प्रयोगाला सांगलीपासून नागपूरपर्यंतचे महाराष्ट्रांतील सारे नाट्याचार्य आणि नाट्यप्रेमी रसिक हजर होते. या नाटकामुळें मराठी वाङ्मयांत तिला मोठीच प्रतिष्ठा प्राप्त होऊन, महाराष्ट्रांतील अनेक विद्वानांचें ती विश्रंभस्थान होऊन बसली. कोणी तिला प्रेमोपायनें दिलीं, कोणी तिच्यावर कविता लिहिल्या, कोणी तिच्याशीं पाणिग्रहणाची उत्सुकता दर्शविली, तर क्वचित् एखाद्या धृष्ट साहित्यपुंगवानें तिला अनिर्बंध प्रणयाच्याही लताकुंजापर्यंत सानुनय खेळवीत नेलें.

पण, प्रमिला खेळकर असली, तरी भोळसर नव्हती. शिकाऱ्याला हुलकावण्या दाखवीत दमविणाऱ्या हरणासारखी त्या हरिणाक्षीची वृत्ति होती. तिनें अनेकांना खेळविलें; पण कोणताही खेळ आपल्या अंगलट येऊं दिला नाहीं. उसाच्या शेतांतून स्वतःच्या अंगाला पानोळी न लागूं देतां मनसोक्त चरण्याचें कसब त्या पृथुजघनेला उत्तम साधलेलें होतें. तारुण्याचें महत्त्व आणि मोल ती जाणून होती; व त्याला ढळ पोंचेल किंवा झळ लागेल असा कोणताही प्रसंग तिनें सहसा येऊं दिला नाहीं. रावबहादुरांना फार वाटे कीं, अकालीं वठून गेलेली ही वेल पुन्हा फुललेली पहावी. पण, चांदण्या रात्रीं मोटारींतून फिरावयाला जातांना किंवा सिनेमागृहांतील तिमिरावृत रहःस्थलीमध्यें, तिचा मांसल हात आपल्या केंसाळ हातांत घेऊन, तिला लाडिकपणानें 'प्रेमा, प्रेमा' असें म्हणत, त्यांनीं हळूच पुनर्विवाहाचा प्रश्न काढला कीं, तिनें उसासे टाकावेत, जुन्या आठवणींनीं आपला उन्नत ऊर भरून आल्या-

सारखें करावें; व गुलाबाच्या पाकळीवरील दंवबिंदूला लाजविणारा एकादा टपोरा अश्रूही गालांवर ठिबकूं द्यावा. रावबहादुर इतके दर्दी; पण त्यांना सुद्धां त्या मेधाविनीच्या मनाची गांठ उकलतां आली नाहीं. रावसाहेबांकडूनही त्यांनीं तिला पुष्कळ सांगून पाहिलें. पण, तिचें आपलें एक उत्तर, "माझ्या मनाला पुनर्विवाह पटत नाहीं." रावबहादुरांनीं एकदां असूयेनें तिच्यावर स्वातंत्र्याभिलाषेचाही आरोप केला होता. त्यावर तिनें हंसून त्यांना असें मार्मिक उत्तर दिलें कीं, "तुम्ही सुधारक असल्यामुळें तुम्हांला तरी माझी ही अभिलाषा इष्टच वाटली पाहिजे." रावबहादुरांची धर्मचारिणी होण्याचें जरी तिनें नाकारिलें, तरी स्नेहसंमिश्र कृतज्ञतेमुळें त्यांची सहचरी मात्र ती अखंड राहिली; व त्यांना निराशेमुळें मधून मधून येणारे उद्वेगाचे झटके स्मराचे केवळ सचिवच अशा आपल्या स्मितपूर्ण चतुरालापांनीं ती नाहींसे करित असे.

रावसाहेबांचाही प्रमिलेवर अतिशयच लोभ होता; पण तो निराळ्या प्रकारचा. त्यांच्या धंद्यांत त्यांनीं अनेकदां तिचा संमोहनास्त्रासारखा उपयोग केला होता; व एकादा कारागीर जशा प्रकारच्या मायेनें आपल्या नाजूक हत्याराला जपतो, तशी तिची काळजी ते घेत असत. या त्यांच्या ऋणानुबंधाची माहिती असल्यामुळें, रावसाहेबांचा तो राग पहातांच शास्त्रीबुवांनीं आपल्या जिभेला लगाम घातला.

---

## प्रकरण १६ वें

# सहज कशी खेळविते ललना

——:०:——

शास्त्रीबुवांवर अशा रीतीनें खट्टू होण्याचा प्रसंग आलेला पाहून, बबनरावांना वाईट वाटलें; व ते दोघांनाही खूष करण्याच्या उद्देशानें म्हणाले, "जाऊं द्या ना रावसाहेब !—आपल्याला माहीतच आहे शास्त्रीबुवांचा स्वभाव. त्यांचा आपल्या रसनेवर मुळीं कोणत्याच बाबतींत ताबा नाहीं. पण जिभेचा सैलपणा हा मनाच्या स्वच्छपणाचा निदर्शक असतो, हें आपण विसरूं नका. बरं पण शास्त्रीबुवा, जरा तुमची ती मद्रमृन्मंजूषिका काढा बरं बाहेर.—आणखी एकदां बार ठांसल्याशिवाय कांहीं नीट जमेलसें दिसत नाहीं !—"

असें म्हणून बबनरावांनीं हंसत हंसत रावसाहेबांकडे पाहून शास्त्रीबुवांच्या मांडीवर चापट मारली.

तेवढ्यानें शास्त्रीबुवा पुन्हा खुलले; व डबी बबनरावांच्या पुढें धरून त्यांना म्हणाले, " अरे बबनराव, तुझ्या खाण्याला न् बोलण्याला जसा सुमार नाहीं, तसाच ओढण्यालाही पण नाहीं.—आपल्या ओकांसारख्या बालबोध लेखकानं जर उद्यां तुझं चरित्र लिहिलं, तर तो नेपोलियनशीं तुलना करील तुझी तपकीर ओढण्याच्या बाबतींत—"

"अहो, कोणत्या ना कोणत्या तरी गुणांत बरोबरी असावी आपली थोरामोठ्यांशीं.—आम्ही बाकीच्या बाबतींत नसलों, तरी निदान तपकीर ओढण्यापुरते तर नेपोलियन आहों कीं नाहीं ?—तेवढंच सही ! " बबनराव चिमूट नाकांत भरित उद्गारले. "पण आतां एकदां कालच्या गोंधळाची हकिकत सांगून मोकळा होतों. कांहीं म्हणा रावसाहेब, तो मांजरेकर जितका धाडसी, तितकाच धोरणीही दिसतो मला. त्याला ही पक्की खात्री कीं, बेझंटबाईचं व्याख्यान एकदां सुरू झाल्यावर मग कांहीं कोणी आपल्याला बोलूं देणार नाहीं; अन् बाईंना विरोध केलेला लोकांना कदाचित् खपायचाही नाहीं. म्हणून त्यानं बाईंना बोलण्याची संधि न देतांच सभा उधळून लावली. व्यासपीठावर एवढी बडी बडी मंडळी बसलेली;—सर दिनशा, सर शापुरजी, सर दिनानाथ, सर वसंतराव, सर गोवर्धनदास, सर वल्लभदास, सर माणेकजी, रावबहादुर, अप्पासाहेब, नानासाहेब;—मुंबईतल्या अगदीं शेलक्या धेंडांचं कडं टेबलाभोंवतीं पडलेलं !—पण त्यानं कुणाचा मुलाजा म्हणून ठेवला नाहीं. सर माणेकजींचं नांव अध्यक्षपदासाठीं सुचवण्याकरतां प्रो. राळे तोंड उघडतात न उघडतात, तोंच हा व्यासपीठावर उडी मारून उभा राहिला; अन् त्यानं या सूचनेला माझा विरोध आहे म्हणून एकदम बोलायला सुरवात केली—"

" अन् सर माणेकजींच्या कारकीर्दीवर त्यानं केलेली टीका तरी किती रास्त होती ! म्हणूनच लोकांनीं तरी त्याचं भाषण मुकाट्यानं ऐकून घेतलं. तो जेव्हां व्यासपीठावर उभा राहिला, तेव्हां कुणालाही बाई वाटलं नाहीं इतकं सुंदर इंग्रजी बोलेल म्हणून ! पण काय हो बबनराव, प्रो. राळे कां त्याच्यावर एवढे चिडून धांवले ?—"

"नुसते धांवले नाहींत,—त्यांनीं खुर्ची उचलली होती त्याच्या डोक्यांत घालायला. पण अप्पासाहेबांनीं त्यांचा हात धरला म्हणून राह्यलं ! बाकी त्या चंद्रशेखरचं धैर्य मात्र विलक्षण ! त्यानं ती खुर्ची अल्लद् वरच्या वर धरून ठेवली; अन् हंसत हंसत म्हणाला, 'असल्या एका खुर्चीनं काय व्हायचंय प्रोफेसरसाहेब ! मी कांहीं माझं भाषण पुरं केल्याशिवाय हलत नाहीं आतां इथून !' त्याच्या त्या धाडसानं आमचा हा जयद्रथ चीत झाला अगदीं. राळ्यांचा फार दांत आहे त्या मुलावर, प्रेमाबाई. प्रो. बावळ्यांनीं आज सांगितली सारी हकिकत मला. वर्गांत ते उगाच आपल्या राजकारणाचं प्रदर्शन करूं लागले, म्हणजे हा चंद्रशेखर त्यांची सडकून हजेरी घेतो. त्यामुळं अगदी बिथरून गेली आहे स्वारी त्याच्यावर—"

"पण काय हो बबनराव, मवाळ पक्षांत एवढं महत्त्व कधींपासून आलं या राळ्याला ? अन् हा मवाळ तरी कधीं झाला ? मला तर आठवतं कीं, आठ नऊ सालीं याच्या जहालपणामुळं याला कॉलेजांतून काढून टाकण्यापर्यंत पाळी आली होती. तुम्हांला तर माहीतच आहे सारं;—गुंड विद्यार्थ्यांचा म्होरक्या होता ना हो हा तुमच्या कॉलेजांतल्या ?—अन् आतां पहावं तर माणेकजींचा उजवा हात होऊन बसला आहे अगदीं—"

"तें पुसूं नका रावसाहेब !—त्यानं आजपर्यंत अशा किती कोलांट्या उड्या मारल्या आहेत ! अहो, हा मोठ्या माराकुटीनं दुसऱ्या वर्गांतून एम. ए. झाला. याला मोठी हांव कीं, आपल्याला प्रोफेसर नेमावं;—पण सध्यां तर पहिल्या वर्गांतून एम्. ए. झालेल्यांना सुद्धां बाजारभाव नाहीं.—मग याला कोण विचारतो ? शिवाय आमच्या मॅक्फर्सननं याचे सारे थेर पाहिलेले. पण हा मोठा हिकमती ! कॉलेजांत असतांना तो स्वतःला अज्ञेयवादी व अराजक म्हणवीत असे. पण, जेव्हां का त्यानं पाहिलं कीं, हे दोन अ-कार आपल्याला जगांत पावलो-पावलीं अडवणार, तेव्हां दिली त्यानं रजा त्यांना अन् सरळ समाजांत शिरून देवनिष्ठ न् राजनिष्ठ बनला. आपल्या इंग्रजी वक्तृत्वानं त्यानं सर दिना-नाथांवर छाप पाडली; आणि सहा महिन्यांच्या आंत त्यांचा अगदीं कल्याण झाला बघा ! सरसाहेब हायकोर्टांतलं आपलं काम आटोपून फिरायला जायला निघाले कीं, हा आपला त्यांच्याबरोबर असायचाच. त्यांच्या उपासनांचं पुस्तक निघाल्याबरोबर यानं टाइम्समध्यें दोन रकाने खरडून, तें चोपडं उपनिषदांच्या

पंक्तीला बसविलं. अन् व्रदरहुडपुढं सामाजिक चळवळीवर मुद्दाम एक व्याख्यान झोडून त्यांना रानड्यांपेक्षांही व्यापक दृष्टीचे ठरविले ! तुम्हांला माहीतच आहे कीं, सर दिनानाथ म्हणजे अगदीं भोळा सांब;—साऱ्या मुलखाचा स्तुतिप्रिय ! याच्या नशिबानं त्याच सुमाराला ते व्हाइस चॅन्सलर झाले. अन् त्यांनीं आपलं वजन मॅक्फर्सनपाशीं खर्च करून याला प्रोफेसर नेमवलं !—पण त्याची तृप्ति एवढ्यावरच झाली नाहीं.—सरसाहेबांच्या कृपेनं त्यानं सीनेटमध्यें आपला प्रवेश करून घेतला; अन् वरपासून खालपर्यंत आपल्याला जागोजाग परीक्षक नेमून घेतलं. शिवाय उताऱ्यांचीं, नोटांचीं, अर्थशास्त्राचीं असलीं कसलीं तरी पुस्तकं नेहमीं काढून तींही अभ्यासक्रमांत लावून घेत असतो. निरनिराळ्या मार्गांनीं युनिव्हर्सिटींतून फावड्यानं पैसा ओढतोय पहा तो एकसारखा !—खरोखरी रावसाहेब, लांड्यालबाड्या केल्याशिवाय जगांत कोणी पुढं येऊं शकत नाहीं, अशी माझी खात्री होऊन चुकली आहे आतां अगदीं !—ज्यांना लोक बडे समजतात त्यांच्या भरभराटीचं मूळ नेहमीं कसल्या ना कसल्या तरी घाणींत सांपडतं—"

"अरे चालायचंच बबनराव ! जगाची रहाटीच सारी तशी आहे; त्याला आपण काय करणार ?" शास्त्रीबुवा सांत्वनाच्या बुद्धीनें आपली डबी त्यांच्यापुढें करित म्हणाले. "हजारों गरिबांना अर्धपोटीं राबवल्याशिवाय कधीं कोणी भांडवलवाला झाला आहे काय? हजारों शेतकऱ्यांना घरादाराला नागवल्याशिवाय कधीं कोणी सावकार झाला आहे काय? मनुष्य जो गब्बर होतो, तो चारचौघांना गरीब केल्याशिवाय होत नाहीं, हें तूं आपलं गृहीत धरून चाल ! समुद्राच्या एका बाजूला जेव्हां भरतीचं उधाण लोटलेलं असतं, तेव्हां त्याची दुसरी बाजू उघडी पडलेली ही असायचीच !—हें जगच मुळीं सारं असं आहे अन् यांतच आपल्याला नांदायचंय—"

"हें काय समजत का नाहीं बबनरावांना, शास्त्रीबुवा ? तुमच्यापेक्षां त्यांचे पावसाळे जरी कमी गेले असले तरी जगांतला चिखल त्यांनीं जास्त तुडवला आहे," रावसाहेब जरा त्रासिकपणानें उद्गारले. "पण बबनराव, अलीकडे तर हा राळे त्या माणेकजीच्या मोटारींत दिसतो सदा सर्वदा अन् पुन्हा लिबरल क्लबचा सेक्रेटरीही पण झाला आहे. सध्यां त्याचं न् दिनानाथांचं सूत नाहीं दिसत फारसं—"

"अहो नसायचंच !—आतां कांहीं दिनानाथ व्हाइस चॅन्सलर नाहींत. सध्यां तो माणेकजी एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांतून निवाल्यापासून निवडणुकीच्या मागं लागलाय. त्यानं असं ठरवून टाकलंय कीं, या नव्या सुधारणांत आपल्याला दिवाणगिरी ही मिळालीच पाहिजे. म्हणून या राळयाला धरलाय हाताशीं त्यानं;—त्याला इंग्रजी फर्डे लिहिणारा न् बोलणारा मनुष्य पाहिजे होता; अन् याला घबाड हवं होतं चरायला असलंच एकादं.—त्यामुळं ही युति झालीय—"

"शास्त्रीबुवा, आपले बबनराव म्हणजे एक चालता बोलता चरित्रकोशच आहेत नव्हे का?" प्रमिला मोठ्या कौतुकानें म्हणाली. "त्यांच्या खिशांत म्हणजे कुणाविषयीं अन् कसली माहिती सांपडेल याचा कांहीं नेम नाहीं.—इंग्रजीमध्यें तीं 'हूज हू' म्हणून पुस्तकं असतात ना, त्यांची आठवण होते बबनरावांना बोलतांना ऐकलं म्हणजे.—काय माहिती अन् ती रंगवून तरी किती शिताफीनं सांगतात—"

"वा वा वा,—तें कांहीं विचारूं नका, प्रेमाबाई ! अहो हा बबनराव जर इंग्लंडसारख्या स्वतंत्र राष्ट्रांत जन्मला असता, तर चिरोल नाहीं तर नेव्हिन्सन होऊन बसला असता एव्हां ना !—त्या राळयासारख्या सामान्य माणसानं हांजी हांजी करून मोठेपणाला चढावं अन् आमच्या बबनरावासारख्या कल्पक माणसावर चार वर्तमानपत्रांना मजकूर पुरवून गुजारा करण्याची पाळी यावी;—तस्मात् हा अवस्थे तूलयसि ! म्हणून तर मी सारखा ओरडतोंय हिंदुस्थानाला स्वराज्य मिळालं पाहिजे म्हणून ! खरोखरी प्रेमाबाई, प्रो. राळे—"

शास्त्रीबुवा पुढें आणखी कांहीं बोलणार, तोंच प्रो. राळे हे आपले बूट करकरां वाजवित दिवाणखान्यांत येऊन थडकले. त्यांची ती आज युरोपियन पद्धतीनें विशेष सजलेली मूर्ति दृष्टीस पडतांच शास्त्रीबुवा व्यक्तदंत हास्य करित उद्गारले, "शतायुषी भव, शतायुषी भव ! आपल्याच गुणांचं वर्णन चाललं होतं आतां इथं ! हे बबनराव सांगत होते कीं, प्रोफेसरसाहेब म्हणजे मुंबईच्या सिंहाचा छावा आहेत अगदीं.—काल जर ते नसते तर मोठा दुर्धर प्रसंग होता आम्हां सर्वांवर—"

"हो हो तर !—टाइम्सनं स्पष्टच म्हटलंय मुळीं आजच्या तसं,—'पुढच्या धांगडधिंग्यापासून (further ugly developments) प्रो. राळयांनीं लोकांचा

बचाव केला,' म्हणून !" रावसाहेब तोच स्तुतीचा धागा हातीं घेऊन बोलले. "राळेसाहेब जर धैर्यानं पुढं सरसावले नसते, तर त्या मांजरेकरानं सहज ती सभा उधळून स्वतःची दुसरी सभा भरवली असती तिथं! खरोखरीच अगदीं सिंहाचा छावा—"

"कां रावसाहेब थट्टा करतां उगाच आमची ?" प्रो. राळे खूष होऊन उद्गारले. "अहो, बबनरावांनीं व्याजोक्तीनं म्हटलं असेल, अन् तुम्हीं तें खरं धरून चाललांत झालं ! त्यांच्या तोंडून आमची तारीफ म्हणजे कपिलाषष्ठीचाच योग तो ! शिवाय कुठं मुंबईचा सिंह न् कुठं आम्हीं ?—"

"अहो, मला जसं तुम्हीं मादाम द स्ताअल बनवलं आहे ना तसेच तुम्ही मुंबईचे सिंह," प्रमिला त्यांच्याकडे पहात हंसत हंसत उद्गारली. "एकदां हरबऱ्याच्या झाडावरच एकाद्याला चढवायचं ठरवलं म्हणजे उपमादृष्टांतांना हो काय तोटा ?"

रदनावलीची शुभ्रता, अधरोष्ठाची आरक्तता आणि गोऱ्यापान हनुवटीवरील तिळाचा नीलिमा यांची शोभा खुलविणारें तिचें तें हास्य प्रो. राळे यांना फारच लोभनीय वाटलें. त्यांची दृष्टि तिच्या चेहऱ्यावर स्थिर होते न होते, तोंच तिनें आपले कपाळावर आलेले केंस मागें सारले. त्याबरोबर, विद्युद्दीपांच्या प्रकाशांत तळपत असलेल्या तिच्या केशकलापावर हातांतील हीरकवलयांची प्रभा पडून, प्रोफेसरसाहेबांना तो इतका मनोहर वाटला कीं, परिश्रमपूर्वक रचलेल्या त्या फुगीर अलकोर्मींचें चुंबन घेण्याची त्यांना उत्कट लालसा झाली; व ते ज्या एका उद्देशानें आज तिथें आले होते, तो एकदम उद्दीपित झाला.

म्हणून, तिच्या त्या उपालंभगर्भ उद्गारांकडे दुर्लक्ष करून, तिच्याकडे उत्कंठेनें पाहात ते म्हणाले, "काय प्रेमाबाई, फिरायला चलतां का आज जुहूवर ? चांदणं कसं सुंदर पडलंय.—वेळ तरी जाईल जरा मजेनं ! मी मुद्दाम मोटार घेऊनच आलोंय आज;—तिथ माझे एक पारशी स्नेही आहेत, त्यांच्याकडे जाऊन फराळ करूं अन् नंतर समुद्रावर जाऊं !—मग निघायचं ना ?

"वा वा,–काय नामी कल्पना आहे प्रोफेसरसाहेबांची," शास्त्रीबुवा लघळपणानें हंसत उद्गारले. "काव्यालापांत रमलेल्या यांच्यासारख्या रसिकालाच अशा वेळीं

चंद्रिकाधौत अन् तालीवनमर्मर अशा समुद्रकिनाऱ्यावर विहार करण्याची कल्पना सुचायची. काय प्रेमाबाई, आम्हांला चलतां का घेऊन तुमच्याबरोबर? म्हणजे आम्ही सुद्धां मजा लुटूं म्हटलं थोडासा तुमच्या कौमुदीमहोत्सवाचा! हो, पण कांहीं अडचण होत नसेल तर हो! नाहीं तर प्रोफेसरसाहेबांचं कांहीं तरी तसंच नाजूक राजकारण असायचं तुमच्यापाशीं अन् आमच्या आगमनानं त्याचा बेरंग व्हायचा उगाच!"

"तुम्हांला अवश्य नेलं असतं, शास्त्रीबुवा;—तुमच्यासारखा नर्मसचिव बरोबर असला म्हणजे कौमुदीमहोत्सवाच्या आनंदाला भरतीच येईल केव्हांही!" प्रमिलेनें उत्तेजक असें व्याजस्मित करित म्हटलें. "मी आनंदानं आल्यें असत्यें प्रोफेसरसाहेब! अलिकडे किती तरी दिवसांत आम्ही जुहूला गेलेलों नाहीं. सालअखेर असल्यामुळं रावबहादुरांना आतांशा काम जरा जास्त असतं;—तेव्हां ही संधि कांहीं मी गमावली नसती! पण अजून इथला मुख्य कार्यक्रम व्हायचाय; भगवंतरावजी न् नानासाहेब आलेले नाहींत;—मग मी कशी बरं निघणार आपल्याबरोबर?" बोलतां बोलतां तिच्या भुंवया वक्र होऊन तिच्या अकलंक ललाटावर विमर्शाच्या ईषद्रेषा उमटल्या.

"अन् काय ग प्रेमा, आज तूं भगवंतरावजींच्या बाबूच्या मार्फत त्या मांजरेकराशीं ओळख करून घ्यायचं ठरवणार आहेस ना? मग ती मंडळी आल्याशिवाय तूं जाणार तरी कशी इथून? तें तर मोठं महत्त्वाचं काम आहे—"

"हो, बरी आठवण दिलीत रावसाहेब! विसरूनच गेलें होतें मी आजचं हें काम," प्रमिलेनं रावसाहेबांकडे पहात गंभीर मुद्रेनें म्हटलें. नंतर प्रो. राळे यांच्याकडे वळून आपल्या बांगड्यांशीं खेळत ती लडिवाळपणानें म्हणाली, "खरंच गडे, प्रोफेसरसाहेब, तो मांजरेकर विद्यार्थी आहे म्हणे आपला; मग तुम्हीच कां नाहीं त्याला एकदां आणीत इथं? असा हुषार अन् कर्तबगार तरुण आपल्या क्लबांत असावा असं तुम्हांला नाहीं का वाटत? तुमचे न् त्याचे कांहीं मतभेद असले तरी काय हरकत आहे? भिन्न मतांचीं माणसं एकत्र आलीं, म्हणजे बैठकीला जास्त रंग भरतो अन् विचारविनिमयही पुष्कळ होतो. मला तर बाई असा अभिमान आहे कीं, निरनिराळ्या मतांचीं न् विचारांचीं मुंबईतील रसिक माणसं माझ्या या

दिवाणखान्यांत समान भूमिकेवर येऊन काव्यशास्त्रविनोदाच्या विशुद्ध आनंदाचा उपभोग घेतात. काय बबनराव खरं कीं नाहीं ? ”

“ वा, वा—तुमचा हा दिवाणखाना म्हणजे फ्रान्समधलं सलूनच समजतों आम्ही प्रेमाबाई ! अन् म्हणूनच प्रोफेसरसाहेबांनी तुम्हांला दिलेली मॅदम द स्ताअलची उपमा अगदीं यथार्थ वाटते आम्हांला ! खरोखरच प्रोफेसरसाहेब आपण जरूर त्या आपल्या शिष्याला एकदां घेऊन या इथं—” बबनराव मिस्किलपणानें म्हणाले.

हा अतिप्रसंग प्रो. राळे यांना अगदीं दुःसह झाला. ते किंचित् चिडून म्हणाले, “ त्या चंद्रशेखरनं तुमच्यावर खूपच मोहनी टाकलेली दिसत्येय, प्रेमाबाई ! पण तुमचं हें दौत्य कांहीं माझ्या हातून होणं शक्य नाहीं,—दिलगीर आहें ! बबनराव किंवा शास्त्रीबुवा यांच्यासारखीं उभयान्वयी माणसंच असलीं काम करायला योग्य !”

इतकें बोलून ते फ्रेंचमध्यें स्वतःशींच पण आवेशानें पुटपुटले “काय वस्ताद फटाकडी आहे ! मला हुलकावण्या दाखवायला पहात्येय. हरकत नाहीं;–केव्हां ना केव्हां तरी सांपडेलच माझ्या जाळ्यांत ! (Qùest rusé, cétte coquette ! Elle veut me jouer faux ! Cest égal ! Je suis sûr de l'attraper un de ces jours ! ! )”

“ हः हः हः, फराशिसांच्या भाषेंत नका देऊं बुवा शिव्या आम्हांला, प्रोफेसरसाहेब, ” शास्त्रीबुवा हंसत हंसत म्हणाले. “ अहो, आम्हीं उभयान्वयी माणसं आहों म्हणून तर जगांत समन्वय होऊं शकतोय सर्व विरोधांचा ! बरं पण बबनराव, आज नानासाहेब अन् भगवंतराव यांचा कसा अजून पत्ता नाहीं ?”

“ खरंच शास्त्रीबुवा, कंटाळा आला बुवा यांची वाट पाहून ! या बड्या माणसांच्या बड्या कामांमुळं आम्हां छोट्या माणसाचं मात्र मरण ! काय प्रेमाबाई, आणखी किती वेळ ताटकळत ठेवणार आपण आम्हांला ? छे छे, आपण तर बुवा गळून गेलों अगदीं—”

“ बरं बरं, समजलें हो मी तुमच्या गळण्याचा अर्थ ! इतकं आर्जवून नको कांहीं सांगायला, बबनराव,” प्रमिलेनें उठतां उठतां त्यांच्याकडे स्मितपूर्ण कटाक्ष

फेंकीत म्हटलें. "चला रावसाहेब, चलायचंच साऱ्यांनीं आंत.—तयारीच आहे सारी अगदीं; उगाच बापड्या बबनरावांचे हाल नकोत व्हायला आणखी—"

तिच्या मागोमाग ते सारे आंत जावयाला निघाले. जातां जातां शास्त्रीबुवा बबनरावांच्या पाठीवर हळूच थाप मारून डोळे मिचकावीत गुणगुणले, " सहज कशी खेळविते ललना !"

---

प्रकरण १७ वें

# लोकांची फसवणूक करणारी चळवळ



"मला टिळकांच्या त्या तारेचं राहून राहून नवल वाटतं, चंद्रा ! बादशहांना तसली तार करून त्यांनीं आपल्याला सहकार्याच्या वचनानं आगाऊ बांधून घेतलं, असाच नाहीं का अर्थ होत या कृत्याचा ?"

"होतो खराच. पण सध्यांच्या स्थितींत टिळकांपासून दुसऱ्या कोणत्या धोरणाची अपेक्षा करणं शक्य आहे ? त्यांनीं ती तशा प्रकारची तार केली नसती तरच आश्चर्य. अच्युतरावांचं त्या तारेबद्दलचं तें हाय हाय करणं मला तरी अगदीं अप्रयोजकपणाचं वाटतं, बाबू ! त्यांच्या डोळ्यांपुढं अजूनही ते ४–५ सालांतले, सरकारवर बहिष्कार घाला असा आदेश लोकांना देणारे, टिळक आहेत. पण ते टिळक आज राहिलेले नाहींत. महायुद्धांत सरकारला मदत करण्याचा जाहिरनामा त्यांनीं ज्या दिवशीं काढला, त्याच दिवशीं त्यांच्या राजकारणाचं हें पुढलं भवितव्य ठरून गेलं.—"

" पण यांत त्यांनीं वाईट काय केलं?" केशवनें किंचित् आवेशानें विचारलें. "वारा उलट वाहूं लागल्यानंतर जो शीड उतरणार नाहीं, तो नावाडी कसला ?—परिस्थितीप्रमाणं पवित्रा बदलणं हें मुत्सद्याचं कर्तव्यच आहे. तुला आठवतं चंद्रा, आपल्या मुंबईच्या पुढाऱ्यांचं युद्धाच्या आरंभीं काय मत होतं तें ? ते तर असं म्हणत होते कीं, असल्या या संकटाच्या काळांत आपल्या चळवळीचा उपद्रव सरकारला होऊं नये, म्हणून तूर्त राष्ट्रीय सभाच मुळीं कांहीं दिवस बंद ठेवूं या ! टिळकांनीं जर राजनिष्ठेचा जाहीरनामा काढून आपली नजरकैदेंतून सुटका करून घेतली नसती, तर आज जें राजकीय चळवळीला इतकं तेज चढ-

केलं दिसत आहे तें खचित घडलं नसतं. परिस्थितीपुढं मान वांकविण्याचं चातुर्य त्यांनीं तेव्हां दाखविलं, म्हणूनच त्यांना पुढं परिस्थितीला वळण देण्याचं सामर्थ्य आलं—"

"कोण म्हणतो परिस्थितीला टिळकांनीं वळण दिलं म्हणून?" चंद्रशेखरनें चालतां चालतां एकदम थांबल्यासारखें करून रागानें विचारलें. "समुद्राला भरती येऊन त्याच्या पाण्यानं किनाऱ्यावरील वाळूंत रुतून बसलेल्या होड्या जर हलूं लागल्या, तर त्याचं श्रेय कांहीं कोणी नावाड्याला देत नाहीं. परिस्थितीला वळण काळानं लावलं, टिळकांनीं नव्हे. अमेरिकेनं युद्धांत उडी घेतल्यावर स्वयं-निर्णयाच्या तत्त्वाचा उदय होऊन सर्व जगाचं राजकारण हादरून गेलं. त्यामुळं सर्वच जित राष्ट्रांच्या आकांक्षांना जोर चढला. त्याचाच एक परिणाम म्हणजे आपली स्वराज्याची चळवळ. तिचं सर्व श्रेय टिळकांना देणं म्हणजे उन्हाळयांत हिमालयाला पाझर सुटून गंगेला आलेल्या पुराचं श्रेय वळीवाच्या पावसाला देण्यासारखं आहे. महायुद्धाच्या आरंभीं जर टिळकांनीं जाहीर केलं असतं कीं, हें युद्ध आपमतलबीपणाचं,—साम्राज्यवादी राष्ट्रांच्या स्पर्धेतून उद्भवलेलं आहे, आणि यांत तुम्ही सरकारला मुळींच मदत करूं नका म्हणून, तर त्यांनीं परिस्थितीला कलाटणी देण्याचा प्रयत्न केला, असं म्हणतां आलं असतं. पण त्यांनीं उलट राज-निष्ठेचा जाहीरनामा काढला! त्यांत प्रामाणिकपणा तर नव्हताच, पण मुत्सद्दीपणा-ही नव्हता. खुद्द इंग्लंडांत तिथल्या मजूर पक्षाच्या मॅकडोनल्डसारख्या पुढाऱ्यांनीं युद्धाचा उघड उघड धिक्कार केला, त्यांत सामील होऊं नका म्हणून लोकांना सांगितलं; आणि आमचे पुढारी मात्र इकडे राजनिष्ठेच्या प्रदर्शनांत अन् लष्कर-भरतीच्या उद्योगांत अहमहमिकेनें गुंतलेले! ज्या आयर्लंडचा दाखला टिळकांच्या डोळयांपुढं नेहमीं असतो, त्याचं तरी उदाहरण त्यांनीं या वेळीं घ्यायचं होतं. महायुद्धाची नौबत झडतांच तेथल्या पुढाऱ्यांनीं सरळ लोकांना असा इषारा दिला कीं, तुम्हांला जर स्वतंत्र व्हायचं असेल, तर ही उत्कृष्ट संधि आहे—"

"पण यांत टिळकांचा काय दोष? आयर्लंडच्या निम्म्यानं तरी आपली तयारी आहे का आज? जिथं लोक स्वराज्य हा नुसता शब्द उच्चारायला भीत होते, तिथं क्रांतीच्या वल्गना करणं मूर्खपणाचं झालं नसतं काय?"

" मूर्खपणा कसला आलाय त्यांत? असला अविचार हा केव्हां ना केव्हां तरी करायलाच पाहिजे. मॅझिनीनं हा अविचार केला, म्हणून इटली स्वतंत्र झाला; लेनिननं हा अविचार केला, म्हणून रशियांत लोकशाही स्थापन झाली; ग्रिफिथनं हा अविचार केला, म्हणून आयर्लंड आज स्वायत्ततेच्या मार्गावर आहे. तुला काय असं वाटतं बाबू, कीं लोकांनीं स्वतःची तयारी झाल्याचं आश्वासन दिल्यावर, या महापुरुषांनीं आपल्या राज्यक्रांतीच्या उद्योगाला आरंभ केला म्हणून? लोकांची तयारी करण्यासाठीं त्यांनीं आपल्या रक्ताचं प्रथम पाणी केलं, तेव्हांच लोक पुढें स्वतःच्या रक्ताचे सडे शिंपायला तयार झाले. लोक काय सुखासुखी कधीं तयार होत असतात कां क्रांतीला? कोणत्याही सुधारणेच्या बाबतींत लोकांच्या तयारीची वाट पहायचं ठरवलं, म्हणजे जगाच्या अंतापर्यंत हात जोडून स्वस्थ बसावं लागेल. इंग्लंड कोणत्या बुद्धीनं युद्धांत पडलंय हें टिळकांना दिसत होतं. मग, आयरिश पुढाऱ्यांप्रमाणं लोकांपुढं वस्तुस्थिति मांडून, त्यांना योग्य मार्ग दाखविण्याचं धैर्य त्यांनीं कां केलं नाहीं? पण, आपल्या रक्तांत पारतंत्र्याची चीड नाहीं, हेंच खरं. नाहीं तर, ब्रिटिश सरकारनं ज्यांना शत्रु लेखून परोपरीनं छळलं, त्या टिळकांनीं आपला सनदशीरपणा शाबीत करून घेण्यासाठीं त्याच्या कोर्टाचे उंबरठे खास झिजविले नसते. राष्ट्राच्या काय किंवा व्यक्तीच्या काय, भूतकालाचा ठसा त्याच्या भवितव्यावर उमटल्याविना रहात नाहीं म्हणतात तो असा!—शिवाजी महाराजांनीं मोंगल बादशाहीच्या माथ्यावर पाय देऊन स्वतःला राज्याभिषेक करून घेतला; आणि त्यांच्या नातवाच्या पेशव्यांनीं बादशहाचे मुतालिक म्हणून मिरवण्यांत धन्यता मानली! त्यांचं रक्त आमच्या नसांतून खेळतं आहे! भाऊसाहेबांनीं जेव्हां दिल्लीच्या तक्ताचं छत फोडलं, तेव्हां अपशकुनाच्या भीतीनं त्यांच्या बरोबरच्या मराठे सरदारांनीं हाय खाल्ली!—त्यांचे वंशज आम्ही! ब्रिटिश सरकार संकटांत पडलेलं पाहून आम्हांला राजनिष्ठेचा उमाळा आल्याविना कसा राहील?—"

" टिळकांच्या डावपेंचांचा जाणून बुजून विपर्यास करतोयस तूं, चंद्रा! युद्धांत सरकाराला मदत करूं नका, असा उपदेश जर टिळकांनीं लोकांना केला असता, तर त्याच क्षणीं त्यांची मंडालेला पुन्हा रवानगी झाली असती. आयर्लंडला जें पचलं तें हिंदुस्थानाला पचायला अजून वेळ आहे. टिळकांच्या त्या

राजनिष्ठेच्या जाहीरनाम्यांतूनच पुढं स्वराज्याची चळवळ निघाली, हें तूं विसरूं नकोस—"

"तुला वाटल्यास तूं कर त्यांच्या त्या स्वराज्याच्या चळवळीचं कौतुक! पण मला करणं शक्य नाहीं. या चळवळीनं आमची जितकी फसवणूक केली, तितकी दुसऱ्या कोणत्याही चळवळीनं केली नसेल. ६–७ सालीं निर्भेळ स्वातंत्र्यापर्यंत आमच्या आकांक्षांची भरारी जाऊन पोंचली होती; ती या चळवळीमुळं पलट खाऊन पुन्हा वसाहतीच्या स्वराज्याच्या शबल साध्याभोंवतीं घुटमळूं लागली. आणि हिंदुस्थानांत राज्यक्रांति घडवून आणण्याच्या जर्मनीच्या प्रयत्नांना कायमचा पायबंद बसला—"

"काय विचित्र तर्कट आहे तुझं हें, चंद्रा! आपल्या पुढाऱ्यांचं कोणतंच कृत्य तुला अलीकडे चांगलं दिसेनासं झालंय. सरकारच्या कृत्यांची मीमांसा करायला तुझी ही विदारक दृष्टि ठीक आहे. पण, ग्रहण पहाण्यासाठीं ज्या काजळलेल्या भिंगाचा उपयोग आपण करतों, त्या भिंगांतून आकाशांतल्या सुंदर तेजोगोलांकडे पहाणं योग्य होणार नाहीं. साम्यवादाच्या प्रभावानं लाभलेली दिसतेय ही नवीन दृष्टि तुला—"

"साम्यवादाचा न् या दृष्टीचा कांहींही संबंध नाहीं. आपले पुढारी झाले म्हणून काय झालं? सरकारच्या प्रत्येक कृत्याची जशी आपण मीमांसा करतों, तशी पुढाऱ्यांच्याही कृत्यांची केली पाहिजे. आपल्या पुढाऱ्यांना स्वयंभू अस्तित्व नाहीं, बाबू! सर फेरोजशहा नेहमीं मोठ्या अभिमानानं म्हणत कीं, आम्ही ब्रिटिश संस्कृतीचे प्रसव आहों. आणि तें कांहीं खोटं नव्हे. हिंदुस्थानावर आजपर्यंत अनेक परकीय जेत्यांनीं राज्य केलं. पण या इंग्रजांच्या इतकं आम्हांला कोणीही आत्मसात् करून टाकलं नव्हतं. इतरांनीं आमच्यावर अत्याचार पुष्कळ केले असतील. पण आम्हांला मनानं मात्र त्यांना कधींच गुलाम करतां आलं नाहीं. परंतु, इंग्रजांनीं आमचं जीवन इतकं अंतर्बाह्य आक्रमून टाकलं आहे कीं, आम्हांला स्वतंत्र असं अस्तित्व आतां मुळीं उरलेलंच नाहीं. आमच्या साऱ्या चळवळी ब्रिटिश राजकारणाचीं प्रतिबिंबं आहेत अन् आमचे सारे पुढारी ब्रिटिश संस्कृतीचे प्रसव आहेत! अगदीं जहालांतला जहाल पुढारी घेतला, तरी त्या ज्वालामुखीच्यासुद्धां अंतरंगाच्या चोरकप्प्यांत ब्रिटिश सत्तेविषयींची आत्मीयता,

—निदान आदराचा तरी झिरपा आढळतो. तारुण्यांत निर्भेळ स्वातंत्र्याच्या गर्जना करणारा बिपिनबाबूंसारखा क्रांतिवादी म्हातारपणीं साम्राज्यवादावर भाष्य लिहायला उद्युक्त होतो, तो याच कारणामुळं; आणि, विलायतेला शिष्टमंडळ नेणारांची कुचेष्टा करणारा टिळकांसारखा बहिष्काराचा प्रवर्तक आपल्या अखेरच्या दिवसांत स्वतः शिष्टमंडळ घेऊन जातो, तोही याच कारणामुळं! अशा चंचल पुढाऱ्यांच्या धोरणाची जर आम्ही निष्ठुर चिकित्सा केली नाहीं, तर सध्यांच्या या आत्मवंचक चळवळींतून आमचं डोकं वर निघणं कठीण आहे—"

"एकंदरींत तुझं असं म्हणणं चंद्रा, कीं इथून तिथून आपले सारे पुढारी ब्रिटिश सरकारचे पर्यायानें हस्तक आहेत. तुझ्या आवडत्या टिळकांवर तरी तूं अशा तऱ्हेचा आरोप करशील असं मला वाटलं नव्हतं! ज्या पुरुषानं आपलं सारं आयुष्य सरकारशीं झगडण्यांत घालवलं, त्याच्यावर असा आरोप करणं म्हणजे आपल्या प्रखर तेजानं सूर्याशीं स्पर्धा करणाऱ्या धूमकेतूला ग्रहमालेंत गोंवण्यासारखं आहे. पण पुरे हा वाद आतां. आपण कुठं आलों हें तुझ्या लक्षांत आहे ना?—उशिरच झाला आज थोडासा फिरून परत यायला आपल्याला! दादासुद्धां आले असतील कदाचित् घरीं—"

केशव बंगलीच्या आवारांत शिरतां शिरतां म्हणाला.

"बहुधा नसावेत; कारण पेटीचा सूर ऐकूं येतोय," चंद्रशेखरनें उत्तर दिलें; व लगेच तो चमकल्यासारखा होऊन केशवला म्हणाला, "कोण गातंय रे बाबू आज तुमच्याकडे?—किती मधुर आहे आवाज तरी!"

"अरे, आमच्या ताईची नवी मैत्रीण—सुमति प्रधान—आपल्या गुप्ते मास्तरांची भाची;—तुला माहित नाहीं?"

"अरे हो, ऐकलंय खरं तिचं नांव मास्तरांच्या तोंडून पुष्कळदां.—किती गोड आहे रे आवाज हा! आमच्या घरीं पुष्कळ उत्तम गाणारणींचं गाणं ऐकलंय मी;—पण बाबू, या आवाजांतली आर्तता कांहीं और आहे—"

ते दोघे हळूच जिना चढून वर आले. सुमति गाण्यांत इतकी तल्लीन झालेली होती कीं, खोलींत कोणी आलें आहे, हें समजण्याइतकें भानच मुळीं तिला उरलेलें नव्हतें. तिच्या शेजारच्या खुर्चीला ओटंगून ललिता उभी होती. तिचें चित्त

अर्धवट त्या भक्तिरसपूर्ण गाण्यांत आणि अर्धवट आतां पुष्कळच वर आलेल्या प्रतिपदेच्या चंद्राचें हंसरें, पिंवळसर बिंब पहाण्यांत गुंतलेलें होतें. बागेंतील झाडें वाऱ्यानें हलत होतीं; व त्यांच्या हलत्या फांद्यांतून तें चंद्रबिंब फारच सुरेख दिसत होतें. आभाळांत ठिकठिकाणीं पसरलेल्या काळ्याकरड्या ढगांच्या पुंजक्यावर चंद्राची प्रभा पसरून, तिनें धवळलेल्या त्या ढगांची शोभा भग्नदंत माणसाच्या विकट हास्यासारखी दिसत होती. ललितेची दृष्टि त्या दृश्यावर बद्ध झाली होती; व कान सुमतीचें गाणें ऐकण्यांत गुंग झाले होते. दाराकडे पाठ करून बसलेल्या त्या दोघी मैत्रिणींना पाहून चंद्रशेखर मोहित झाला. स्त्रीसौंदर्याचे अनेक उन्मादक प्रकार त्यानें आजपर्यंत पाहिले होते. पण, त्या किशोरींच्या मुग्ध चारुतेंत जी सहजता भरली होती, ती त्याला अत्यंत मोहक वाटली. मेजावरील दिव्याचा प्रकाश त्या दोघींच्या अंगावर पडला होता. त्या प्रकाशांत ललितेचा भव्य तिपेडी अंबाडा, त्यावर शोभणारें गुलाबाचें सपर्ण फूल, अंगांतील तलम पोलक्याचा अस्मानी रंग आणि अनावृत असलेल्या मानेचा व हातांचा गौरवर्ण यांची कांति द्विगुणित झाली होती. आणि, पांढऱ्या पदरावर सोडून दिलेली सुमतीची ती सैल, सुदीर्घ वेणी चांदण्यांत चमेलीच्या शुभ्र फुलांवर सुवासानें उन्मत्त होऊन पसरलेल्या नागिणीसारखी दिसत होती. ते दोघे दारांत येऊन उभे राहतांच सुमति घोळघोळून म्हणत असलेले पुढील चरण त्यांच्या कानावर पडले—

**आलें तुझ्या रे दारिं नृपा,**
**घालीं भिकेला कारिं रे कृपा !**

ते चरण म्हणून सुमतीनें आपला पेटीवर द्रुतगतीनें फिरणारा हात थांबविला.

तिचें गाणें थांबतांच, इतका वेळ त्यांत गुंतलेलें ललितेचें लक्ष सहज दाराकडे जाऊन, ती एकदम चमकून उठली. त्याबरोबर सुमतीच्याही लक्षांत त्यांचें आगमन येऊन, तीही लगेच उठून उभी राहिली.

"कां ? आम्ही आल्याबरोबर गाणं थांबलंसं तुमचं ? [illegible]संकोच नको कांहीं वाटायला आमचा," केशवनें त्यांची ती हालचाल पाहून म्हटलें.

"संकोच कसला आलाय त्यांत ? तुम्ही यायला न् पद संपायला एकच गांठ पडली.—शिवाय इथं आतां एकापेक्षां एक गहन विषय निघतील. तेव्हां आमचं संगीत आम्ही आटपतं घेतलेलंच बरं," ललितेनें उत्तर दिलें.

"पण संगीतांत गहनता नसते असं सांगितलं कुणी तुम्हांला ? मनुष्याच्या हृदयामधले अगदीं गूढांतले गूढ भाव जर कुणीं लीलेनं जागृत करीत असेल, तर तें संगीत;—तुम्हांला आमच्यासमोर म्हणायचंच नसेल तर गोष्ट निराळी," केशवनें किंचित् हंसून म्हटलें; नतर तो चंद्रशेखरकडे वळून म्हणाला, "बैस ना रे चंद्रा, तुझी ओळख करून देतों यांच्याशीं;—ही आमची ताई, तुला माहीतच आहे—"

"—आणि ही माझी मैत्रिण सुमति—तुम्हांला ठाऊक असेल कदाचित्; तुमच्या गुप्ते मास्तरांची भाची अन् शिष्या," ललितेनें त्या दोघांना उद्देशून म्हटलें.

इतका वेळ स्तब्ध असलेल्या चंद्रशेखरनें अभिवादनाच्या बुद्धीनें एकवार स्मितपूर्वक त्या दोघींकडे पाहिलं. तो कांहीं बोलणार, तोंच केशव लगबगीनें उद्गारला, "हो, याची ओळख करून द्यायची राह्यलीच.—हा माझा मित्र चंद्रशेखर मांजरेकर—"

"परवां ज्यांनीं बेझंटबाईच्या व्याख्यानाची सभा उधळून लावली ते—" ललितेनें सुमतिकडे पहात वाक्य पुरें केलें.

"ओळख करून देण्याची ही पद्धत नव्हे, ताई !" केशव एकदम रागानें उद्गारला.

तो कदाचित् आणखी कांहीं पुढें बोलला असता. पण त्याला आपला राग व्यक्त करण्याची संधि न देण्याच्या हेतूनें चंद्रशेखरनें हंसत हंसत म्हटलें, "कां रे ? काय चुकलं या पद्धतींत ? हल्लीं ज्या एका गोष्टीमुळं माझं नांव ज्याच्या त्याच्या तोंडीं झालं आहे, तीच गोष्ट नेमकी त्यांनीं बोलून दाखविली;—त्यांत बिघडलं कुठं ? थोडक्यांत चांगली ओळख करून द्यायची, म्हणजे अशाच अगदीं ठळक गोष्टीवर बोट ठेव[illegible]तं; एरव्हीं माणसाचं वैशिष्ट्य चटकन् कळावं कसं ?" इतकें बोलून त्यानें ललितेकडे वळून तिला विचारलें, "तुम्हांला कसा काय वाटला त्या दिवशींचा प्रकार ?—"

"दुसरं काय वाटायचंय ? आधीं सभा मोडणं हेंच मुळीं गैरशिस्त;—त्यांत एका स्त्रीचं व्याख्यान; अन् ती स्त्रीही अशी कीं, जिचं सर्व आयुष्य मानव-

जातीच्या सेवेंत गेलेलं आहे.—अशा स्त्रीचं व्याख्यान बंद पाडलेलं कुणाला आवडेल ? ” ललितेनें अगदीं निर्भयतेनें त्याच्याकडे पहात उत्तर दिलें.

“ एकंदरींत एका बाईच्या व्याख्यानांत व्यत्यय आला म्हणून तुम्हांला विशेष वाईट वाटलेलं दिसतंय !–समजा, हेंच जर एकाद्या पुरुषाचं व्याख्यान असतं, अन् त्यांत जर मी गडबड केली असती, तर कांहीं तुम्हांला इतकं वाईट वाटलं नसतं;–खरं ना ?—”

“ होय;—स्त्रीजातिविषयीं जो विशेष आदर सर्व सुधारलेल्या समाजांत दाखविला जातो, तो आपल्या तरुणांच्या ठिकाणीं नसावा, याचं कोणाला वाईट वाटणार नाहीं ? ”

“ स्त्रीजातिविषयीं विशेष आदर ? अन् तो कां म्हणून ? स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे हक्क हवेत, असं तुम्हीं म्हणतां ना ? मग ज्यांना समान हक्क हवेत, त्यांना वागणूकही यापुढें समानच मिळणार ! ” चंद्रशेखर आवेशानें उद्गारला. पण त्याच्या डोळ्यांत जरी आवेशाची दीप्ति झळकत होती, तरी तोंडावरील स्मिताच्या खळ्या मात्र कायमच होत्या; आणि, क्षितिजाच्या एका बाजूला चंद्राची मधुर द्युति पसरली असतां दुसऱ्या बाजूला वीज लखलखत रहावी, तसें तें त्याचें स्मितसुंदर, आविष्ट मुखमंडल या वेळीं दिसत होतें. आपल्या या उद्गारांचा त्या दोघींवर काय परिणाम होतो, हें पहाण्यासाठीं क्षणभर थांबून त्यानें पुन्हा बोलावयाला प्रारंभ केला. “त्यांतून सार्वजनिक चळवळींत पडलेली बेझंट-बाईसारखी स्त्री !—जी प्रतिपक्षावर कोरडे उडवतांना त्याची कधींही गय करीत नाहीं आणि जिचं सर्व आयुष्य वादांची धुळवड खेळण्यांत गेलं आहे.—मला वाटतं, अशा बाईला जर तिच्या व्याख्यानांत एकाद्यानं विरोध केला, तर तें कांहीं फारसं असभ्यपणाचं होणार नाहीं. आतां ही गोष्ट खरी कीं, स्त्रीदाक्षिण्याच्या ज्या मोहक कल्पना गेलीं पंचवीस वर्षं आपल्या कानाव[illegible] पडत आल्या आहेत, त्यांच्या असल्या प्रकारानं ठिकऱ्या उडतात !—पण माझी अशी समजूत आहे कीं, स्त्रीच्या अबलत्वाच्या ज्या काव्यमय भावनांवर हें दाक्षिण्याचं कर्मकांड उभारलेलं आहे, त्या भावना आजच्या स्वाभिमानी स्त्रीला तरी खास रुचणार नाहींत. स्त्रीदाक्षिण्य म्हणजे पुरुषांनीं स्त्रीजातीवर लादलेल्या दास्याला.

दौर्बल्याला कवींनीं दिलेलं रम्य स्वरूप ! त्या दाक्षिण्याची ढाल अलीकडल्या सुशिक्षित मुली पुढं करतील असं मला स्वप्नांत सुद्धां वाटलं नव्हतं—"

त्याच्या त्या अनपेक्षित कोटिक्रमानें ललितेच्या मनाचा क्षणभर गोंधळ उडाला. पण लगेच ती हंसत हंसत म्हणाली, " स्त्रीदाक्षिण्यावर तुमचा बराच राग दिसतो एकूण !—पण मला कांहीं त्यांत साराच पुरुषांचा आपमतलबीपणा भरला आहे, असं वाटत नाहीं. आमची ही सुमा सफ्रेजेट आहे;—तिला कदाचित् पटेल हें तुमचं भाष्य ! पण, प्रत्येक जुन्या प्रचलित रूढींतून विकृत अर्थ काढण्याची जी पद्धत अलीकडे पडत चालली आहे, ती मला मुळींच पसंत नाहीं. तुम्ही स्त्रीदाक्षिण्य हें स्त्रियांच्या गुलामगिरीला कवींनीं दिलेलं गोंडस नांव आहे असं म्हणतां;—पण मी तें पुरुषांच्या हृदयांत स्त्रीजातीविषयीं वसणाऱ्या कोमल भावनांचं प्रतीक समजतें. समतेचा अर्थ असा खास नव्हे कीं, तिच्या होमकुंडांत परस्परांविषयीं वाटणाऱ्या साऱ्या कोमल, उच्च भावनांची आहुति दिली पाहिजे ! समता म्हणजे कांहीं वारंवार कापल्यामुळं हिरवळीला येणारी सपाटी नव्हे; तर पाण्यावर उठणाऱ्या लहानथोर ऊर्मींचं एकमेकांशीं आत्मीयतेनं समरस होणं होय. उच्चनीचता ही समाजांत केव्हांही रहाणारच;—ती निसर्गनिर्मित आहे. पण ती व्यवहारांत बोंचूं न देणं म्हणजे समता. पण, घटकाभर तुमची समतेची कल्पना खरी धरून चाललं, तरी जिचं सर्व आयुष्य हिंदुस्थानाच्या सेवेंत खर्च झालं आहे, त्या वृद्ध विदुषीचा उपमर्द करणं कोणत्याच दृष्टीनं क्षम्य ठरणार नाहीं—"

"इथंच आपला थोडासा मतभेद आहे. बेझंटबाई विद्वान् आहेत, यांत शंका नाहीं.—पण इथं राहून त्यांनीं जें कार्य केलं, तें हिंदुस्थानाच्या उन्नतीसाठीं कीं ब्रिटिश साम्राज्याच्या कल्याणाकरितां हा मात्र एक प्रश्नच आहे—"

"तुमचं म्हणणं असं आहे का चंद्रशेखर, कीं बेझंटबाईनीं जी होमरूलची चळवळ केली, ती इंग्लंडच्या कल्याणासाठीं ?—"

"होय—मी असंच म्हणतों. आतां माझा न् बाबूचा याबद्दलच रस्त्यानं वाद चालला होता.—मी उगाच कांहीं तरी म्हणत नाहीं. पांच वर्षांपूर्वीची परिस्थिति तुम्ही लक्षांत घेतलीत, तर तुम्हांलाही माझं म्हणणं खात्रीनं पटेल. महायुद्धाच्या आरंभीं शेंकडा नव्याण्णव लोकांना वाटत होतं कीं, या लढाईत इंग्लंडला जर्मनी

धूळ चारणार;—नव्हे त्यांची तशी इच्छा होती. लोकांची ही भावना जर्मनी जाणून होता. तिचा फायदा घेऊन, इंग्लंड युद्धाच्या पेंचांत अडकलं असतां, हिंदुस्थानांत क्रांति घडवून आणावी, या हेतूनें जर्मनीनं हिंदी क्रांतिकारकांना हाताशीं धरलं, इथं शस्त्रास्त्रं पाठविलीं आणि बंडाचा व्यूह रचला. कदाचित् त्याचा हा डाव साधलाही असता. सतत येणाऱ्या जर्मनीच्या विजयाच्या बातम्यांमुळं ब्रिटिशांच्या सामर्थ्यावरला बहुजनसमाजाचा विश्वास ढांसळला होता. करांच्या फांसण्या लागल्यामुळं रयत बेदिल झाली होती. आणि हिंदुस्थानांतील सैन्य सगळं रणक्षेत्रावर पांगलं होतं. क्रांतीच्या प्रयत्नाला इतका अनुकूल मुहूर्त खचित सांपडला नसता. तरीसुद्धां जर्मनीचा डाव हुकला!—तो हुकायला जीं कारण झालीं, इंग्लंडविरुद्ध उलटलेलं लोकमत पुन्हा ज्या कारणांमुळं थाऱ्यावर आलं, त्यांत बेझंटबाईची होमरूलची चळवळ मुख्य मानली पाहिजे. साम्राज्यनिष्ठा आणि सैन्यभरती हा त्या चळवळीचा पाया होता. ब्रिटिश सत्तेविरुद्ध बिथरलेलं सारं हिंदुस्थान त्या चळवळीनं पुन्हा साम्राज्यवादी बनवून टाकलं! सुधारणांचे हप्ते मिळविण्यासाठीं झटण्याची जी ईर्ष्या या चळवळीनं समाजांत उत्पन्न केली, तिच्यांत ब्रिटिश सत्तेविषयींचा सारा आकस बुडून गेला. अशा रीतीनं पारतंत्र्याचे बौद्धिक पाश ज्या चळवळीनं दृढतर केले, ती चळवळ हिंदुस्थानाच्या कल्याणासाठीं बाईनीं केली असं कसं म्हणावं? मला तर केव्हां केव्हां असं वाटतं कीं, सत्तावनच्या बंडाची पुनरावृत्ति होऊं नये, म्हणून ह्यूमसाहेबांनीं जशी डफरिनच्या सल्ल्यानं राष्ट्रीय सभा स्थापन केली, तसा जर्मनीचा क्रांतीचा प्रयत्न निष्फळ व्हावा म्हणून बाईनीं हार्डिंगच्या सल्ल्यानं स्वराज्यसंघ काढला असावा! तुम्हांला माहीत नाहीं ताई,—बेझंटबाई ब्रिटिश साम्राज्याला राष्ट्रसंघाचा उत्कृष्ट नमुना मानतात. अन् त्यांच्या या राष्ट्रसंघांत सारं जग समाविष्ट होण्याचा योग जर उद्यां आला, तर हिंदुस्थानांत ब्रह्मविद्येचं अवडंबर माजवून बसलेल्या या साम्राज्यवादिनीला मोक्ष मिळाल्याचा आनंद खास होईल. ब्रिटिश साम्राज्याच्या आधारस्तंभांत कॅनिंग आणि ह्यूम यांच्या जोडीला बाईंना बसवावं इतकी त्यांची ही कामगिरी महनीय आहे! खरोखरी त्यांच्या या स्वराज्याच्या चळवळीनं लोकांची किती वंचना झाली आहे, हें मनांत आलं म्हणजे माझ्या जिवाचा अगदीं संताप होतो."

बोलतां बोलतां त्यानें आपल्या धवलोत्तुंग कपाळावर आलेले केंस आवेशाच्या भरांत झटकन मागें सारले. त्या वेळीं, हाफशर्ट घातल्यामुळें उघडें असलेलें त्याचें तें गोरेंपान, सुदृढ, रुंद मनगट दिव्याच्या प्रकाशांत त्या दोघींच्या दृष्टीस पडून, त्यांना तें मोठें आकर्षक वाटलें; व त्याच्या तेजस्वी मुखावर त्यांची दृष्टि क्षणमात्र स्थिर झाली.

---

प्रकरण १८ वें

# रुधिराची संतत धार



पण, त्याच्या त्या भाषणाची मोहनी ललितेच्या मनावर फार वेळ टिकली नाहीं. तिच्या लगेच लक्षांत आलें कीं, तो आपल्याकडे शोधक दृष्टीनें पहात आहे. त्याबरोबर तिचा सारा स्वाभिमान जागृत होऊन, तिला स्वतःच्या विवशतेचा राग आला. तिनें केशव आणि सुमति यांच्याकडे पाहिलें. तेव्हां त्यांच्या चेहऱ्यावर तिला कौतुकमिश्र आदराच्या छटा उमटलेल्या आढळल्या; व चंद्रशेखरचा तिला जास्तच राग आला. वस्तुतः, त्याच्या त्या युक्तिवादांत तथ्य आहे, असें तिला मनांतून फार वाटत होतें. पण ही तिची भावना तिच्या आजपर्यंतच्या सर्व पूर्वग्रहांच्या विरुद्ध होती. बेझंटबाईविषयीं तिच्या मनांत निरतिशय पूज्यभाव वसत होता. तिचे काका यशवंतराव हे थिऑसफिस्ट होते; व ब्रह्मविद्येच्या गूढ तत्त्वांविषयीं विचार करावयाला जरी त्यांना मुळींच वेळ नव्हता, तरी त्यांच्या प्रसारार्थ पैसे खर्च करावयाला मात्र ते नेहमीं तयार असत. त्यामुळें मुंबईतील प्रमुख थिऑसफिस्टांत त्यांची गणना होत असे. त्यांची श्रीमंती आणि श्रद्धा यांमुळें बेझंटबाईचा त्यांच्यावर बराच लोभ होता; व आपल्या मुंबईच्या मुक्कामांत त्यांची बंगली स्वतःच्या पदरजांनीं पुनीत करावयाला बाई बहुधा चुकत नसत. पार्वतीलाही त्यांच्याविषयीं फार आदर वाटत असे. स्वतःच्या अंतःकरणप्रवृत्तीला प्रमाण मानून वागणारी स्वतंत्र बुद्धीची कर्तबगार स्त्री म्हणून तिला बाईविषयीं जवळ जवळ एक प्रकारची पूज्यबुद्धि होती. वेदांताचा नाद तर तिला उपजतच होता. आणि, त्यावरील जुने संस्कृत प्राकृत ग्रंथ जसे ती गोडीनें वाचीत असे,

तशींच विवेकानंद, रामतीर्थ, भांडारकर, रानडे, बेझंट प्रभृति अर्वाचीन धार्मिकांचीं त्यावरील नवीं भाष्येंही तिला प्रिय होतीं. ब्रह्मविद्यामंदिरांत काय किंवा राममोहनाश्रमांत काय, होणाऱ्या धर्मचर्चेला ती मुलांसह बहुधा हजर राहात असे. घरांतल्या वडील माणसांच्या ठिकाणीं असलेलें हें विशिष्ट धर्मप्रेम ललिता आणि केशव यांच्या वृत्तींत उत्कटतेनें प्रतिबिंबित झालें होतें; व घराण्याच्या गुरुप्रणालींत समाविष्ट झालेल्या बेझंटबाईंवर तर त्यांची विशेषच भक्ति होती.

या कारणांमुळें चंद्रशेखरनें केलेली बेझंटबाईंच्या राजकारणाची ती विचिकित्सा ललितेला दुःसह वाटली. तिचे काका हे बाईंच्या स्वराज्यसंघाचे मुंबईंतील एक आद्य सभासद होते; व तिच्या दादांना बाईंच्या धार्मिक उद्योगाविषयीं जरी आदर नव्हता, तरी यशवंतरावांच्या आग्रहामुळें आणि अंशतः स्वराज्याच्या चळवळीवरील स्वतःच्या निष्ठेमुळें तेही संघाचे पुढें सदस्य झाले होते. बाईंचीं स्वराज्यावरील वक्तृत्वपूर्ण व्याख्यानें ललितेनें तल्लीन होऊन ऐकलीं होतीं; व त्यांना अटक झाल्यानंतर कांहीं दिवस ती त्यांच्या छायाचित्राचें पदकही पदरावर लावीत असे. अर्थात् ज्या राजकारणावर तिची इतकी उत्कट श्रद्धा होती, त्यावर अशा तऱ्हेची विदारक टीका झालेली तिला कशी सहन व्हावी ? चंद्रशेखरच्या त्या टीकेला केशवनें कांहींच उत्तर देऊं नये, याचें तर तिला फारच वैषम्य वाटलें; व त्याला दुसऱ्या मुद्यावर निरुत्तर करितां आलें तर पहावें, म्हणून आपला राग एकदम व्यक्त न करितां, तिनें चंद्रशेखरला विचारलें—

"तुम्ही म्हणे क्रांतीचे पुरस्कर्ते आहां ! तेव्हां बाईंचं सनदशीर राजकारण तुम्हांला नसायचंच पसंत. पण त्यांचं धर्मकार्य तरी तुम्हांला मान्य आहे कीं नाहीं ? कां त्यांतही तुम्हांला असाच कांहीं मतलब दिसतो ?"

"हो,—न दिसायला काय झालं ?" चंद्रशेखरनें किंचित् हंसून म्हटलें. "डोळसपणानं पाहिलं तर कुणालाही दिसावा इतका तो मतलब उघड आहे. थिऑसफिस्टांची आद्य गुरुदेवता मॅडम ब्लॅव्हॅट्स्की ही पहिल्या नंबरची जहांबाज बाई होती. तिनं जेव्हां पाहिलं कीं, युरोपांत कुठंही आपल्या गारुडाची डाळ शिजत नाहीं, तेव्हां त्या महामायेनं हिंदुस्थानांत येऊन आपल्या गूढविद्येचं इंद्रजाल धर्मभोळ्या हिंदूंपुढं उभं केलं ! बेझंटबाई या तिच्यापेक्षां संभावित असल्या, तरी एकंदरींत त्याच संप्रदायांतल्या.—शिवाय इंग्लंडांतल्या साऱ्या

चळवळींचं पाणी त्यांनीं चाखलेलं. इथं आल्यावर हिंदुधर्मातल्या हर एक गोष्टीचीं स्तुतिस्तोत्रं गाऊन त्यांनीं जुन्या वळणाच्या बड्या बड्या मंडळींत आपला जम बसवला. आणि ब्रह्मविद्येच्या नांवाखालीं साम्राज्यवादाच्या प्रसाराला सुरवात केली—"

"धर्माचा न् साम्राज्याचा काय संबंध?" ललितेनें रागानें एकदम मध्येंच विचारलें.

"काय संबंध?—संबंध अगदीं स्पष्ट आहे. तुम्ही वसईला चला माझ्याबरोबर एक दिवस; म्हणजे धर्माच्या न् साम्राज्याच्या संबंधांचीं जिवंत स्मारकं मी तुम्हांला हवीं तितकीं दाखवितों. ख्रिस्ती राष्ट्रांनीं धर्मप्रसार हें साम्राज्यविस्ताराचंच एक साधन करून ठेवलं आहे. एका हातांत बंदूक आणि एका हातांत बायबल घेऊन पोर्तुगीजांनीं आपल्या या साष्टी बेटांत घातलेला हैदोस काय तुम्ही इतक्या लवकर विसरलां? इंग्रजांचे मार्ग तितके अघोर नसतील; पण हेतु तोच. आम्ही ज्यांत शिक्षण घेतों, तीं गोऱ्या मिशनऱ्यांचीं कॉलेजें, त्यांच्या शाळा, त्यांचे मठ, त्यांचीं अनाथालयें, त्यांचे दवाखाने अहोरात्र आमच्या मनावर बिंबवीत असतात कीं, तुमच्या धर्मापेक्षां, तुमच्या संस्कृतीपेक्षां, तुमच्या राष्ट्रापेक्षां ख्रिस्ती धर्म, ख्रिस्ती संस्कृति आणि ख्रिस्ती राष्ट्रें हीं किती तरी अधिक उदार, भूतदयावादी आणि श्रेष्ठ आहेत. मिशनऱ्यांच्या या निरनिराळ्या संस्था आमचा तेजोवध, आमच्या संस्कृतीचा संहार अणुंअणूंनीं क्षणोक्षणीं करित आहेत. जिथं जिथं हे मिशनरी गेले, तिथं तिथं त्यांनीं धर्मप्रसाराच्या नांवाखालीं जेत्यांशीं समरस होण्यांत सार्थक मानणारा एक जितांचा वर्ग,—धर्मानं, शीलानं, संस्कृतीनं सर्वथैव भिन्न असं एक उपराष्ट्र निर्माण करून, पाश्चात्यांच्या राजकीय आक्रमणाचा मार्ग सुकर करून ठेवला. बेझंटबाईंचे मार्ग तर या मिशनऱ्यांपेक्षांही मायावी. हिंदुधर्माविषयीं त्यांना खरोखरीच प्रेम वाटत असेल; नाहीं असं नाहीं. पण, धर्म आणि राजकारण यांची त्यांनीं अशी कांहीं सांगड घातली आहे कीं, खोलवर विचार केल्यावर तें प्रेम सहेतुक असावं, अशी जबर शंका येते. हिंदुस्थान जगाचा उद्धार करणार हें त्यांच्या प्रत्येक व्याख्यानाचं पालुपद असतं; अन् तें ऐकलं म्हणजे आमच्या लोकांच्या अंगावर थरारून रोमांच उभे राहतात. पण जगाचा उद्धार करण्याची ही पात्रता हिंदुस्थानाला कशानं येणार?—तर इंग्लं-

डशीं सहकार्य केल्यानं! ज्या हिंदुस्थानाचा इंग्लंडशीं संबंध आल्यामुळं पूर्वेकडल्या अर्ध्या अधिक राष्ट्रांना पारतंत्र्याचं ग्रहण लागलं, तें हिंदुस्थान इंग्लंडच्या सहकारितेनें जगाचा उद्धार करणार, या बाईच्या भाकितावर आम्ही भावड्या हिंदूनींच फक्त भाळावं. बाईची साम्राज्यनिष्ठा इतकी जाज्वल्य आहे कीं, तिच्या धुंदींत त्यांनीं टिळकांना न् गांधींना सुद्धां प्रसंगीं राजद्रोही म्हणून निंदायला कमी केलं नाहीं—"

"काय बोलतोयस तूं हें, चंद्रा? तुझ्या या पद्धतीप्रमाणं लोकांवर जर बेफामपणानं हेतूंचे आरोप करीत सुटलं, तर जगांतलं कोणतंही कृत्य निर्मळ दिसणार नाहीं अन् कोणतीही व्यक्ति निःस्वार्थ वाटणार नाहीं," केशवनें त्याच्या भाषणाला आळा घालण्याच्या उद्देशानें म्हटलें. ललितेच्या संतापाचा क्षणोक्षणीं चढत असलेला पारा त्याला दिसत होता.

"नाहीं वाटणार कदाचित्!—बिघडलं कुठें?" चंद्रशेखर बेपर्वाईनें उद्गारला.

"खरं आहे तुमचं म्हणणं, चंद्रशेखर! नाहीं तर तुम्ही तरी कशाला कम्युनिस्ट झालां असतात?" ललिता एकदम म्हणाली. "ज्यांना कोणत्याच प्रकारची परंपरा नाहीं अन् ज्यांच्या जीवनांत अभिमान वहाण्यासारखंही कांहीं नाहीं, त्यांना उन्नत अन् पवित्र भावनांवर नांगर फिरविणारा साम्यवाद आवडावा, हें अगदीं स्वाभाविक आहे. कोणताही मनुष्य झाला, तरी तो आपल्या सोईला पडेल, तेंच तत्वज्ञान नेहमीं उचलीत असतो—"

तिच्या त्या मर्मभेदक उद्गारांतली खोंच चंद्रशेखरच्या अगदीं काळजाला झोंबली. आणि त्याचा चेहरा एकदम लालबुंद झाला. पण क्षणभरच. त्यानें आपला मनःक्षोभ लगेच निग्रहानें आवरला; व तो हंसून म्हणाला, "बरोबर बोललांत तुम्ही ताई! ज्याला जात ना गोत अशा माझ्यासारख्या माणसानं कम्युनिस्ट व्हावं हें साहजिकच आहे. मला कोणत्याच प्रकारची परंपरा नाहीं हं खरं.—पण माझ्या जीवनांत अभिमान वहाण्यासारखं कांहीं नाहीं, असं जें तुम्ही म्हणालांत, तें मात्र तुमचं अजीबात चुकलं. माझ्या आईविषयीं मला इतका अभिमान आहे कीं, तिच्यापुढं सारी दुनिया मला तुच्छ वाटते. हिंदु समाजांतील स्त्रियांचें दास्य, दैन्य आणि दिव्यता यांची एकसंध मूस ओतूनच जणुं निसर्गानं

तिला निर्माण केली आहे; व तिच्याकडे पाहिलं म्हणजे स्त्रीजातीच्या उद्धाराला आपलं आयुष्य वहावं, असा मोह मला नेहमीं पडतो. इतका निरपेक्ष आदर, इतका निस्सीम अभिमान मला जन्मभूमीशिवाय दुसऱ्या कुणाचविषयीं वाटत नाहीं. तसं पाहिलं तर जन्मभूमीचं मी कांहींच लागत नाहीं. अस्पृश्याला सुद्धां जात असते अन् गुन्हेगाराला सुद्धां कुळ असतं.—पण मला जात नाहीं, कुळ नाहीं;—समाजांत कोणत्याच प्रकारचं स्थान नाहीं. इतरांना ज्या कारणांस्तव जन्मभूमीविषयीं जिव्हाळा वाटतो, त्यापैकीं कोणतंच कारण माझ्या बाबतींत अस्तित्वांत नाहीं. पण तरीसुद्धां मला तिच्या सेवेंत झिजावं, तिच्या उद्धारासाठीं आत्मदान करावं, असं नेहमीं वाटतं. कां ?—तर तिनं मला माझी आई दिली आहे म्हणून ! तुम्हांला कल्पना येणार नाहीं कधीं मला तिच्याविषयीं किती प्रेम, किती अभिमान वाटतो याची !—"

तो कदाचित् तसाच आणखी पुढें बोलत राहिला असता. हृदयाच्या अगदीं गाभ्याला जखम व्हावी आणि तिथून रक्ताचा लोट वहात राहावा, तसें त्याचें तें भाषण होतें; व तो जरी ललितेला उद्देशून बोलत होता, तरी त्याचे ते उद्गार खरोखरी आत्मगतच होते. त्याच्या त्या तशा रीतीनें बोलत रहाण्यांत तिला उत्तर देण्यापेक्षां सुद्धां स्वतःचें सांत्वन करून घेण्याची बुद्धीच अधिक प्रभावी होती. हृदय हें सर्व मृदु भावनांचें विश्रंभस्थान; व त्याच्यावर ज्या वेळीं अधिक्षेपाचें पोलादी पाऊल पडतें, तेव्हां त्यांतील साऱ्या भावना दुखावल्या जाऊन तडफडत उठतात. तसेंच या वेळीं चंद्रशेखरचें झालें होतें. ललितेच्या त्या दुःशब्दांना त्यानें हंसत उत्तर देण्याचा प्रयत्न केला खरा, पण त्याच्या त्या हंसण्यांत दाबून टाकलेल्या आक्रंदनाची दाहक आर्तता भरलेली होती.

त्याच्या मनाची ही क्षुब्ध स्थिति लक्षांत घेऊन केशवनें मुद्दामच त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें, "तुझ्या घरीं जायचंय ना चंद्रा, आपल्याला ? आपण निरोप सांगायला म्हणून आलों अन् इथंच रमलों. आई वाट नसेल का पहात तुझी ?" नंतर त्यानें ललितेकडे वळून म्हटलें, "ताई, आज मला जेवायचं नाहीं, हें सांगण्यासाठीं आम्ही इथं आलों. पण तुमच्या वादांत राहून गेलं सारं;—जातों आतां आम्ही—"

ललिता कांहींच बोलली नाहीं. ती अगदीं सुन्न होऊन गेली होती. तिच्या उत्तराची वाट न पहातां, ते दोघे खोलींतून बाहेर पडले.

त्याबरोबर इतका वेळ मुग्ध असलेली सुमति तिला म्हणाली, "मी सुद्धां जातें ताई, यांच्याबरोबर.—आई वाट पहात असेल घरीं—"

"कां ग ?—आज नाहीं गेलीस तूं तर चालणार नाहीं का, सुमा ?—मी निरोप पाठवतें गड्यावरोबर तुझ्या घरीं; पण तूं जाऊं नको गडे !—माझं मन कीं नाहीं कसं अगदीं विलक्षण अस्थिर झालंय—"

"कांहीं झालं तरी ताई, मला गेलं हें पाहिजेच;—आई अगदीं वाटेकडे डोळे लावून बसली असेल;—मी गेल्याशिवाय ती अन्नाला शिवणार नाहीं. मी जेऊन लगेच परत येतें; तूं गड्याला पाठव मागोमाग—"

इतकें बोलून त्या खोलींतून बाहेर पडल्या; व ललितेनें बागेंतून बाहेर पडण्याच्या बेतांत असलेल्या केशवला हांक मारून, सुमतीला बरोबर नेण्याविषयीं सांगितलें.

सुमतिसह ते दोघे रस्त्यावर येतांच समुद्रावरील वाऱ्याच्या गार झुळका एकदम त्यांच्या अंगावर आल्या. रात्र बरीच झालेली असल्याकारणानें आतां किंचित् जाणवूं लागलेल्या थंडींत त्या झुळकांमुळें चांगलाच गारठा उत्पन्न झाला होता. तो थंड वारा अंगाला झोंबतांच सुमतीनें शहारे आल्यासारखें करून आपला लांबलचक पदर अंगाभोंवतीं घट्ट गुंडाळून घेतला. त्या वेळची तिची ती सलज्ज हालचाल, पदरांतून स्पष्ट दिसणारा तिचा रेखीव बांधा आणि एका हातानें अंगाभोंवतीं लपेटलेला पदर धरून दुसऱ्या हातानें तोंडावर येणारे कुरळ मागें सारतांना होणारी तिची धांदल केशवला अतिशय मोहक वाटली. चंद्र अद्याप आकाशाच्या मध्यावर आला नव्हता; व आकाशही निरभ्र नव्हतें. चंद्राच्या भोंवतालच्या साऱ्या तारा फिक्या पडल्या होत्या. फक्त रोहिणीचा योगतारा आणि मृगाचे चरण तेवढे लुकलुकत होते; व मृगलांछन इतका जवळ असतांही व्याध आपल्या तेजाचा दिमाख निर्भयतेनें मिरवीत होता. रस्त्यांतील रहदारी या वेळीं इतकी कमी झालेली होती कीं, सँढर्स्ट पूल ओलांडतांच रॉयल ऑपेरांतील वादनाचे सूर त्यांच्या कानावर स्पष्ट पडले. त्यांच्यापैकीं कोणीच या वेळीं बोलण्याच्या

मनःस्थितींत नव्हतें. पण अगदींच कांहीं न बोलल्यास तें गैर दिसेल या भावनेनें आणि त्याहीपेक्षां नवीन झालेली ओळख वाढविण्याच्या उत्सुकतेनें केशवनें सुमतीला विचारलें, "मास्तरांची न् तुमची रोज भेट होते का ?"

"हो, आम्हांला तसं दुसरं कोणीच नाहीं;—त्यामुळं मामांनाच आमची सारी विचारपूस करावी लागते. शिवाय ते मला रोज तासभर शिकवतातही."

"काय शिकवतात ते तुम्हांला ?" चंद्रशेखरनें एकदम झोंपेंतून दचकून उठून बोलावें त्याप्रमाणें विचारलें.

त्याच्या आवाजांत जिज्ञासा आणि आवेश यांचें असें कांहीं चमत्कारिक मिश्रण झालें होतें कीं, सुमतीनें एकदम डोळे विस्फारून त्याच्याकडे पाहिलें; व ती म्हणाली, "शाळेपैकीं नाहीं कांहीं शिकवीत; त्यांनीं दिवस वांटलेले आहेत व आळीपाळीनें ते तीन विषय घेतात. दोन दिवस गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध यांतलं कांहीं तरी सांगतात. दोन दिवस सामाजिक प्रश्नावरलं कांहीं तरी वाचून दाखवतात; अन् दोन दिवस आठवड्यांतल्या महत्त्वाच्या घडामोडींवर बोलतात. रविवारीं तेवढी मला सुटी असते.—म्हणूनच मी इतका वेळ बसूं शकलें आज यांच्याकडे—"

बोलतां बोलतां तिच्या ओठांच्या मिटलेल्या पाकळ्या किंचित् उमलून दंतावलीची धवल द्युति त्यांतून तरलतेनें प्रकट झाली. तिचे ते विस्फारित नेत्र आणि स्मितशुभ्र मुखमंडल केशवला अत्यंत मनोहर वाटलें; व चंद्राच्या मंद प्रकाशांत आपल्या बरोबर येत असलेल्या त्या किशोरीची श्यामल मूर्ति पाहून, स्वप्नभूच्या अस्पष्टरम्य अशा आलोकांतूनच आपण जणुं संचार करित आहों, असा भास त्याच्या विलोल मनाला झाला.

त्यांचें हें बोलणें संपतें न संपतें, तोंच तिचें बिऱ्हाड जवळ आलें. तेव्हां त्या दोघांना स्मितपूर्वक नमस्कार करून ती चाळीच्या आवारांत शिरली. ती दिसेनाशी होतांच ते पुन्हा फ्रेंच पुलाच्या बाजूला जाण्यासाठीं परत फिरले.

कांहीं वेळ ते दोघेही स्तब्ध होते. पण केशवला ती स्तब्धता असह्य होऊन चंद्रशेखरचा हात आपल्या हातांत घेत त्यानें विचारलें, "चंद्रा, उगाच नेला मी तुला आज आमच्या घरीं! ताई अगदीं तोंडाला येईल तें बोलत होती; नाहीं

तरी तिचा स्वभाव थोडासा तेज न् कठोरच आहे!—चंद्रा, तिचं बोलणं तूं मनावर घेऊं नकोस—"

"मनावर घेण्यासारखं काय आहे त्यांत, बाबू? अरे, अशा तऱ्हेचीं बोलणीं जन्मापासूनच माझ्या कानांवर सारखीं पडत आहेत! अन् पुन्हा ती बोलली त्यांत खोटं तरी काय होतं? त्यांतल्या त्यांत मला आज एका गोष्टीबद्दल मात्र समाधान वाटतंय;—तुझ्या ताईची न् सुमतीची ओळख झाली. ललिता कठोर आहे असं तूं म्हणतोस; पण मला ती कठोर वाटत नाहीं;—तिच्या स्वभावांत विलक्षण उत्कटता आहे. अन् उत्कटतेचा धर्मच असा असतो कीं, तिची ज्या विषयावर निष्ठा असते, त्याला ढका लागण्याचा प्रसंग आला असतां, ती अत्यंत कठोर होते. अशा मनोवृत्तीचीं माणसं आपल्या आवडत्या गोष्टीसाठीं जीवसुद्धां टाकतील वेळप्रसंगीं! ललिता जितकी उत्कट, तितकीच सुमति गंभीर आहे. आमचा दोघांचा वाद चालला असतां ती एक शब्दही बोलली नाहीं. पण, मला तरी तिच्या मुद्रेवरून असं वाटलं कीं, माझं म्हणणं तिला पसंत पडलं असावं. खरोखरी बाबू, या दोघी मुली जर आपल्या बेतांत सामील होतील, तर केवढी बहार होईल!"

"छे, तें शक्य नाहीं, चंद्रा;—निदान लतेच्या बाबतींत तरी नाहीं. ती मतांच्या बाबतींत अगदीं हट्टी आहे.—तुझ्यावर तिचा जो राग आहे तो यामुळंच. तिची अशी समजूत आहे कीं, मी तुझ्यामुळं बिघडलों;—तुझ्यामुळं मी कविता लिहायचं टाकून देऊन राजकीय चळवळीच्या मागं लागलों.—तो राग तिनं मघांशीं उगवून घेतला!—तिच्या माझ्यावरल्या प्रेमाची मला फार भीति वाटते! तें प्रेम मलाही ताप देतं न् तिलाही ताप देतं. ती आपल्याला कधींच मिळणं शक्य नाहीं. सुमतीचं मात्र कांहीं सांगवत नाहीं. किती झालं तरी आपल्या गुप्ते मास्तरांची शिष्या आहे ती! पण काय रे चंद्रा, तूं मला तीं वीरेंद्र चक्रवर्तीचीं पत्रं आज दाखवणार आहेस ना?"

"होय,–त्याविषयींच विचार करीत होतों मी रस्त्यानं;–त्या पत्रांच्या बाबतींत मी शपथेनं बांधलेला आहें. तूं कांहीं अद्याप आमच्या अंतरंग मंडळाचा सदस्य झालेला नाहींस. त्या दृष्टीनं तीं पत्रं तुला दाखवणं म्हणजे एका परीनं शपथ मोडणंच

आहे.—तुझ्याविषयीं मी वीरेंद्रांना लिहिणार होतों.—पण अलिकडे मला एक चमत्कारिक शंका यायला लागली आहे.–म्हणून मी त्यांनाही तुझ्याबद्दल कांहीं लिहिलं नाहीं न् तेजसिंगांनाही पण कांहीं लिहिलं नाहीं—”

“कसली शंका रे? तुला माझ्या प्रामाणिकपणाबद्दल तर नाहीं ना संशय वाटत?”

“छे रे, तुझा त्यांत कांहींच संबंध नाहीं. माझी शंका अगदीं निराळीच आहे. आमचा सारा पत्रव्यवहार अलीकडे फोडला जात असावा, असं मला वाटतं. वीरेंद्रांनाही तशीच शंका आहे; व स्वित्झर्लंडच्या टपालखात्याकडे तशी तक्रारही त्यांनीं केली आहे. सुदैव एवढंच कीं, आमच्या सांकेतिक लिपीचा पत्ता पोलिसांना चटकन लागणं शक्य नाहीं.—पण असं किती दिवस चालणार? आमच्या एकंदर चार पांच लिप्या आहेत; व पोलिसांना चकवण्यासाठीं वीरेंद्र अलीकडे प्रत्येक पत्रांत वेगळी लिपि वापरतात अन् शक्य तितकं संदिग्धही लिहितात.—तरी पण फुटण्याची भीति आहेच!—वीरेंद्रांच्या महायुद्धांतल्या उद्योगापासून ब्रिटिश पोलिसांची त्यांच्यावर सक्त नजर आहे.—हिंदी क्रांतिकारकांशीं समक्ष वाटाघाट करण्यासाठीं गेल्या वर्षी अफगाण मुल्लाच्या वेषानं ते पेशावरला आले होते.—त्याच वेळीं ते पकडले जायचे. पण पोलीस आपल्या मागावर आहेत असा सुगावा लागतांच त्यांनीं वेष पालटून रातोरात सरहद्द गांठली.—ते स्वित्झर्लंडांत आहेत, तोंपर्यंत त्यांना पकडणं शक्य नाहीं. पण, त्यांच्या चळवळीचीं तरी पाळंमुळं खणून काढावीं, म्हणून हल्लीं पोलिसांचे जिवापाड प्रयत्न चालले आहेत. आमच्यापैकीं कोणावर केव्हां कसला प्रसंग येईल, याचा नेम नाहीं.—म्हणून तुला मंडळांत घेऊन या खाईंत ढकलावं कीं नाहीं, याबद्दल माझं मन साशंक झालंय अलीकडे—”

“असं कां म्हणतोस, चंद्रा? तूं जर त्या खाईंत पडायला स्वतः तयार आहेस, तर मग मला कां तूं नको म्हणतोस?—जें काय व्हायचं असेल तें दोघांचंही होऊं दे!—मी आयत्या वेळीं कच खाईन असं तर नाहीं वाटत तुला?”

" नाहीं;—पण तुझ्या घरच्या मंडळीच्या तुझ्यावरल्या आशा पाहिल्या न् तुझं वय लक्षांत घेतलं म्हणजे माझं मन चांचरतं; आणि अभिमन्यूला चक्रव्यूह फोडायला धाडण्यांत धर्मानं जी चूक केली, तसा प्रकार आपल्या हातून होऊं नये असं मला वाटतं—"

" काय विचित्र बोलणं हें तुझं, चंद्रा ! तुझ्या न् माझ्या वयांत असं काय मोठं अंतर आहे, तर तूं आपल्याकडे धर्मराजाचा वडीलपणा घेऊन मला अभिमन्यु बनवावंस ? शिवाय, घरच्या माणसांच्या आशाच पहायच्या, तर तुझ्या आईच्या आशा काय तुझ्याविषयीं कमी आहेत ?—तिला बिचारीला असं होऊन गेलंय कीं, केव्हां एकदां माझा चंद्रा बॅरिस्टर होऊन येईल ?—"

" पण माझ्या आईला कांहीं मी एकटाच नाहीं. कर्ण गेला तरी कुंतीला जसा अर्जुन होता, तसा मी गेलों तरी तिला दत्ता आहे. तुझं तसं नाहीं. तुझ्या दादांचा, ललितेचा, साऱ्यांचा आधार, साऱ्यांचा जीवभाव काय तो तूं ! शिवाय दुसरं असं कीं, तूं जो आमच्या मंडळांत येणार तो माझ्यावरल्या प्रेमामुळं येणार;—आमच्या तत्त्वांवर तुझा पूर्ण विश्वास बसला आहे असं मला वाटत नाहीं—"

" पण तुझा तरी स्वतःचा निखालस विश्वास आहे का ? तुला खरोखरीच असं वाटतं का कीं, असल्या अतिरेकाच्या मार्गानं आपलं कार्य साधेल म्हणून ?"

" नाहीं; मलासुद्धां त्याच्या परिणामांबद्दल केव्हां केव्हां शंकाच वाटते;—खरं सांगतों तुला मी.—पण आज परिस्थिति तितकी अनुकूल नसल्यामुळं हे मार्ग विफल ठरले म्हणून काय झालं ?—माझा असा विश्वास आहे कीं, आमच्या अपयशांत पुढच्या क्रांतिकारकांच्या यशाचं बीज आहे; आमच्या प्रेतावर पाय देऊन आगामी क्रांतिकारक स्वातंत्र्याचं शिखर गांठतील. आयर्लंडमध्यें गेल्या शंभर वर्षांत क्रांतिकारकाच्या किती पिढ्यांची आहुति पडलेली आहे, हें तूं लक्षांत घे. त्या मानानं महाराष्ट्रांत अद्याप कांहींच घडलेलं नाहीं ! फडक्यांपासून तों पिंगळ्यांपर्यंत कांहीं फार पिढ्या होत नाहींत. केशवसुतांनीं म्हटल्याप्रमाणं, गतशतकांच्या घोर पातकांचं क्षालन करायला खरोखरीच आमच्या रुधिराची संतत धार पडली पाहिजे.—'डायरेक्ट ॲक्शन'चं आमचं स्वप्न जर कधीं काळीं खरं व्हायचं असेल, तर त्याला अवश्य असलेली त्यागाची न् साहसाची वृत्ति

समाजांत उत्पन्न होण्यासाठीं आम्हांला स्वतःच्या जिवावर उदार झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं.—लोकांच्या डोळयांपुढं आतांपर्यंत गुप्त कटांचीं उदाहरणं आहेत. आम्ही साम्यवादी म्हणतों तसल्या सामुदायिक उठावाची कल्पना बहुजनसमाजाला अद्याप परिचित झालेली नाहीं. ती परिचित व्हायची म्हणजे बुद्धिजीवी वर्गाला आम्ही आत्मसात् करून प्रचाराच्या कामाला लावलं पाहिजे; श्रमजीवी लोकांत वर्गकलहाची भावना तीव्रतेनं उत्पन्न केली पाहिजे आणि आमच्या मतांचा प्रसार खेडोपाडीं झाला पाहिजे—"

"तुमच्या कार्यक्रमाचा फक्त एवढाच भाग मला पटतोः—साम्यवादाच्या प्रसारासाठीं अभ्यासमंडळ काढणं अन् श्रमजीवी वर्गाची संघटना करणं. —पण ती संघटना दृढतर होण्याची वाट न पहातांच 'डायरेक्ट ॲक्शन'चा अवलंब करणं किंवा तिचा अवलंब करण्यासारखा प्रसंग मुद्दाम ओढवून आणणं, हें मात्र मला मुळींच पसंत नाहीं. योग्य वेळीं वर्गयुद्ध आपोआप घडून येईल. तें मुद्दाम आव्हान देऊन घडवून आणण्याची आवश्यकता नाहीं.–रान अतिशय तापलं, म्हणजे नुसती फांदीवर फांदी घासल्यानं सुद्धां ठिगणी पडून वणवा भडकतो.–शिवाय जें स्थित्यंतर घडून यावं अशी आपली आकांक्षा आहे, तें घडून येण्यासाठीं वर्गयुद्ध खरोखरी झालंच पाहिजे, असंही मला वाटत नाहीं. आमचे दादा नेहमीं म्हणतात कीं, समाजसत्तेचं एक एक तत्त्व जग आज इतक्या झपाट्यानं न कळत अंमलांत आणीत आहे कीं, रक्ताचा एक थेंबही न पडतां कालांतरान सर्व राष्ट्रं समाजसत्तावादी होतील. त्यांच्या या म्हणण्यांत पुष्कळच तथ्य आहे, असं मला वाटतं. याचा अर्थ असा नव्हे कीं, मी क्रांतीला कचरतों. तुझ्याबरोबर मी कोणत्याही खाईंत आनंदानं उडी घेईन! पण तुझ्या या कल्पना मात्र मला अद्याप पटत नाहींत—"

"तूं थोडा व्यापक दृष्टीनं विचार कर, म्हणजे माझं म्हणणं तुला खास पटेल. कालांतरानं सर्व जग समाजसत्तावादी होईल, हें मलाही कबूल आहे. पण, जी सुधारणा घडून आल्यानं मानवजातीच्या दुःखांचा भार हलका होईल, अशी ग्वाही आपली मनोदेवता आपल्याला पदोपदीं देत असते, ती घडवून आणण्याचं काम काळावर सोंपवून स्वस्थ बसण्यांत पौरुष नाहीं आणि प्रामाणिकपणाही नाहीं.–हा एक प्रकारचा सुसंस्कृत दैववाद आहे एवढंच! मानवजातीची जी प्रगति आज-

पर्यंत झाली, ती कांहीं अशा रीतीनं काळाच्या तंत्रानं चालून झालेली नाहीं. काळ धडधडीत प्रतिकूल असलेला दिसत असतांना सुद्धां, आपल्याला इष्ट वाटत असलेली सुधारणा ताबडतोब घडवून आणण्यासाठीं, ज्यांनीं सर्वस्वावर उदार होऊन भगीरथ प्रयत्न केले, त्या महानुभावांच्या कर्तृत्वामुळंच आजपर्यंत जगाची प्रगति झालेली आहे. पवित्र यज्ञीय अग्नि हा अरणि मुद्दाम एकमेकांवर घांसूनच उत्पन्न करावा लागत असतो! त्या अग्नींतील एक समिधा होण्याचं भाग्य जरी मला लाभलं, तरी मी आयुष्याचं सार्थक झालं असं समजेन!—माझा स्वतःचा विकासवादावर मुळींच विश्वास नाहीं. विकासवादाचा अवलंब करणं—आपल्याला हवी असलेली सुधारणा काळ आपोआप घडवून आणील म्हणून वाट पहात रहाणं, म्हणजे मनुष्यानं निसर्गाच्या हातांतील बाहुलं होऊन बसणं आहे. असला हा विकासवाद म्हणजे दैववादाची सुधारलेली आवृत्तीच होय! मनुष्याच्या कर्तृत्वाचं वैशिष्ट्य कालचक्राला कलाटणी देण्यांत आहे; काळाचे गुलाम होऊन बसण्यांत नाहीं—"

तो आणखी कांहीं बोलणार, तोंच घर जवळ आल्यामुळें, त्यांचें संभाषण तेवढ्यावरच थांबलें.

---

प्रकरण १९ वें

# ताबा मागणारें प्रेम



सुमति गेल्यावर ललिता कसे बसे चार घांस खाऊन सज्जांत येऊन उभी राहिली. इतका वेळ दूर असलेल्या ढगांनीं चंद्राचें पूर्णकल्प बिंब आतां चोहोंबाजूंनीं घेरलें होतें; व धांवत्या ढगांचे विरल खंड आणि वाऱ्यानें हलणाऱ्या झाडांच्या कांपऱ्या सांवल्या यांतून निसटून भुईवर पडलेल्या त्याच्या खिन्न चांदण्याची शोभा आंसवांनीं मलिन झालेल्या मुखावरील स्मिताच्या छटांसारखी दिसत होती. तें उदास दृश्य पहातांच आपल्याला हंसत हंसत उत्तर देणाऱ्या मानी चंद्रशेखरची दुःखसंतप्त मुद्रा ललितेच्या डोळयांसमोर उभी राहिली. आपल्या हातून त्याचा उपमर्द झाल्याबद्दल तर तिला आतां वाईट वाटत होतेंच. पण,

त्याहीपेक्षां त्या अपमानामुळें केशवच्या हृदयाला किती वेदना झाल्या असतील, या कल्पनेनें तिचें मन अधिक व्यथित झालें. त्याचा चंद्रशेखरकडे असलेला ओढा जरी तिला आवडत नसे, तरी अशा रीतीनें त्याचें मन दुखवावयाला आपण कारण व्हावें, अशी मात्र तिला मुळींच इच्छा नव्हती. पण, रागाच्या भरांत अवचित तिच्याकडून चंद्रशेखरचा अपमान झाला. आणि तोही त्याचा युक्तिवाद बुद्धीला पटत असतांना,—त्याच्या तेजस्वी उद्‌गारांनीं मन मोहित होत असतांना. चंद्रशेखरनें अभिमानानें दिलेलें, पण अत्यंत आर्ततापूर्ण असें, तें उत्तर अजूनही तिच्या कानांत घुमत होतें; व न कळत पाय पडून चुरगळलेलें फूल हातांत घेऊन सहृदय मनुष्यानें जसें त्याच्या पाकळयांकडे खेदानें बघावें, त्याप्रमाणें मघाशीं घडलेल्या त्या प्रकाराविषयीं विचार करितांना तिला आतां एकसारखा अनुताप होत होता. इतकेंच नव्हे, तर चंद्रशेखरचा आपण अशा रीतीनें उपमर्द केल्यामुळें केशवच्या प्रेमाला मुकण्याचा प्रसंग तर आपल्यावर येणार नाहीं ना, अशीही एक शंका क्षणैक तिच्या मनाला शिवून गेली; व त्या शंकेनें चाळवलेल्या तिच्या हळव्या मनापुढून त्यांच्या आयुष्यांतील अनेक प्रसंग झरझर येऊन गेले.

केशवचें आपल्यावरील प्रेम किती उत्कट आहे, हें ज्या प्रसंगामुळें तिला प्रथम कळून आलें, तो प्रसंग तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. त्या वेळीं केशव फार तर दहा वर्षांचा असेल. तोंपर्यंत त्या दोघां भावंडांचें बाळपण दिवसा घरीं किंवा सायंकाळीं चौपाटीवर एकमेकांशीं खेळण्यांत, एकमेकांच्या सहवासांत स्वर्गसुख मानण्यांत गेलेलें होतें; व पुढें मागें आपल्याला एकमेकांशिवाय आयुष्य कंठावें लागेल, अशी कल्पनाही त्यांच्या मनाला कधीं शिवली नव्हती. दुपारीं पार्वतीच्या दोहों बाजूंना बसून खिदळत जेवतांना किंवा रात्रीं तिच्या मांडीवर डोकीं ठेवून उत्कंठेनें वीरांच्या कथा ऐकतांना, त्यांचे घांस आणि अश्रु कितीदां तरी मिसळले होते; व किती वेळां तरी तशा त्या अर्धालिंगित स्थितींत तिच्या दिलरुब्याच्या आलापांनीं गुंगून जाऊन, निद्रेच्या नीरव प्रदेशांत त्यांनीं न कळत प्रवेश केला होता. त्यामुळें त्या दिवशीं इंग्रजी शाळेंत घालण्यासाठीं म्हणून जेव्हां भगवंतरावांनीं त्या भावंडांना वेगवेगळया ठिकाणीं नेलें, त्या वेळीं त्यांच्या मनाची अतिशय तळमळ झाली. ललितेला जगाच्या व्यवहाराची थोडी तरी जाणीव होती. पण लहानग्या केशवला मात्र तिची ती ताटातूट अगदीं दुःसह झाली. मुलांमुलीं-

साठीं वेगळ्या शाळा कां असाव्यात, याचा उमज त्याच्या निरागस बालबुद्धीला कांहीं केल्या पडेना. घरीं आल्यावर त्यानें पार्वतीला पुष्कळ छेडलें. तेव्हां, तिनें त्याची अशी समजूत घातली कीं, आज जरी तुम्हांला वेगळ्या शाळेंत जावें लागत असलें, तरी हें शाळेंतलें शिक्षण संपल्यावर पुन्हा तुम्ही शिकण्यासाठीं एकत्र याल. पण या आशावादानें त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं; आणि, त्या रात्रीं आपले चिमुकले हात ललितेच्या गळ्यांत घालून, निराळ्या शाळेंत न जाण्याबद्दल त्यानें तिच्याकडून शपथ घेवविली.

त्यानंतर लवकरच यशवंतराव आजारी पडल्यामुळें त्यांना लोणावळ्यास राहावयाला जावें लागलें. तिथें असतांना पुष्कळदां वहिनीबाईसाहेब त्यांच्याकडे बसावयाला येत असत. त्यांचा ललितेवर अतिशय लोभ होता. तिच्याविषयीं बोलतांना त्या एकदां गंमतीनें पार्वतीला म्हणाल्या,"तुमची ही लता कीं नाहीं तुम्ही देऊन टाका मला. मी तिचं सारं शिक्षण माझ्या देखरेखीखालीं करवून आमच्या सदनाचा कारभार पुढं तिच्या हवालीं करीन." आणि त्या दिवशीं जातांना त्या ललितेला आपल्याबरोबर घेऊनही गेल्या. केशवनें तिची संध्याकाळपर्यंत वाट पाहिली. पण, जसजसा काळोख पडत चालला, तसतसा त्याच्या मनाचा धीर सुटत चालला; व त्याला असें वाटलें कीं, लता आपल्याला कायमची अंतरली. वहिनीबाई तिला बोलल्याप्रमाणें खरोखरीच घेऊन गेल्या. तिला अशा रीतीनें घेऊन जाण्याचा त्यांना काय हक्क आहे, अशी कल्पना त्याच्या मनांत आली. आणि वहिनीबाईंचा व आपल्या आईचा त्याला अतिशय राग आला. त्या रागाच्या भरांत तो उठला; व अंधारांतून एकटाच चालत त्यांच्या बंगल्यापाशीं आला. पण त्याला आंत जाण्याचा धीर होईना. म्हणून तो बाहेरच रस्त्यावर उभा राहिला. इतक्यांत हातांत कंदील घेतलेली मोलकरीण व तिच्या मागोमाग ललिता बंगल्यांतून बाहेर पडतांना त्याला दिसली. त्याबरोबर त्यानें धांवत पुढें येऊन तिचे दोन्ही हात घट्ट धरले. ललितेनें त्याला पुष्कळ विचारलें, "एवढ्या अंधारांतून तूं एकटाच मला न्यायला कां आलास?" पण तो कांहीं बोलला नाहीं. तीं भावंडें थोडीं पुढें जातात न जातात, तोंच गड्याला घेऊन केशवचा शोध करण्यासाठीं बाहेर पडलेली पार्वती त्यांना भेटली. त्या रात्रीं त्याला कितीदां तरी स्वप्नांत दिसलें कीं, वहिनीबाईसाहेब ललितेला आपल्या-

बरोबर कुठें तरी दूर दूर घेऊन जात आहेत. आणि, अखेर पहांटे तिला जागें करून जेव्हां त्यानें तिच्याकडून आपल्याला कधींही सोडून न जाण्याचें वचन घेतलें, तेव्हांच त्याला सुखानें झोंप लागली.

आणखी एक प्रसंग तिला आठवला. तो घडल्याला अद्याप पुरतें वर्षही लोटलें नव्हतें. तिच्या आईला अतिशय वाटे कीं, ललितेचें लग्न आतां लांबणीवर टाकूं नये. आणि तशी तिची कुरबुर घरांत नेहमीं चाललेली असे. ललितेला हा प्रकार अगदीं पसंत नव्हता. पार्वतीचीं विवाहविषयक मतें सतत तिच्या कानांवर पडत आल्यामुळें, बाळपणापासून लग्नाच्या कल्पनांत रमणाऱ्या इतर सामान्य मुलींपेक्षां तिचे जीविताविषयींचे विचार अगदीं निराळ्या प्रकारचे बनले होते. त्यामुळें लग्नाचें बोलणें आईच्या तोंडून निघालें कीं, ललितेच्या कपाळाला आंठ्या चढत असत. त्या दिवशीं रात्रीं तिला फिरून यावयाला थोडा उशीर झाला. तेव्हां, जेवतांना तिची आई तिला रागानें म्हणाली, "माझं ऐकायचं नसलं तुला तर तूं नको ऐकूं, ताई. पण आज ना उद्यां तुला लग्न होऊन दुसऱ्याच्या घरीं जायचंय.—बाबूप्रमाणं तुझा जन्म कांहीं या घरांत जायचा नाहीं, हें मात्र तूं विसरूं नकोस." आईचे हे उद्गार ललितेला फार झोंबले. वाढलेलें अन्न कसेंबसें खाऊन ती आपल्या अभ्यासाच्या खोलींत आली; व दिवा न लावतां तशीच कोचावर येऊन पडली. केशव रात्रीं सिनेमाहून परत येऊन खोलींत पाऊल ठेवतो न ठेवतो, तोंच त्या अंधारांत ललितेचे हुंदके त्याच्या कानांवर पडले. त्याबरोबर तिच्याजवळ जाऊन त्यानें तिचे हात आपल्या हातांत घेतले व तिला सारी हकीकत विचारली. ललितेनें आपल्या आईचे ते उद्गार त्याला स्फुंदत स्फुंदत सांगतांच, तो किंचित् आवेशानें म्हणाला, "तुझ्या इच्छेविरुद्ध तुझं लग्न कसं होईल? तसाच प्रसंग आला तर मी सांगेन दादांना.—दादा आपलं खास ऐकतील.—वर्डस्वर्थ कवीची बहीण नाहीं जन्मभर त्याच्याजवळ राहिली? मग आपल्याला दोघांना एकत्र कां रहातां येऊं नये? लता, आपला जन्म एकमेकांसाठीं आहे; दुसऱ्यासाठीं नाहीं!"

त्याचे ते शब्द तिला आठवतांच तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. ते शब्द त्यानें उच्चारल्याला अद्याप एक वर्षही उलटलें नसेल;—तोंच त्याच्या प्रेमाला दुरावण्याचा प्रसंग आपल्यावर आला;—याबद्दल जबाबदार कोण? आपण कीं

चंद्रशेखर ?—तिचें तिलाच उत्तर सुचेना. विचार ही अशी वस्तु आहे कीं, तिच्या पोटीं अनेक विकल्प आणि व्यथा जन्माला येतात; व त्यामुळें विचारानें मनाचा दाह शांत होण्याऐवजीं पुष्कळदां तो उलट वाढतो मात्र. मघांशीं घडलेल्या त्या प्रकाराच्या अनुषंगानें केशववरील आपल्या प्रेमाविषयीं ललिता जों जों विचार करूं लागली, तों तों तिचा मनस्ताप वाढतच गेला. केशव हें तिच्या सर्व प्रेम-भावनांचें केंद्र होतें. किंबहुना, त्याच्या जीवनाच्या पूर्ततेंतच आपल्या जीवनाची परिणति आहे, अशी तिची भावना होती. त्याच्याविषयीं पार्वतीच्या ज्या अपेक्षा आणि आकांक्षा होत्या, त्याच तिनें आपल्याही मानल्या होत्या; व त्यांच्या पूर्त-तेच्या कामांत त्याला मदत करणें, हें ती आपलें कर्तव्य समजत असे. त्या कर्तव्याला आपण जागलों काय ?—असा प्रश्न तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. चंद्रशेखरची ओळख झाल्यानंतर केशवच्या वृत्तींत आणि विचारांत जो फरक पडत गेला, तो जाणून घेण्याचा प्रयत्न आपण कधीं तरी केला काय? मग चंद्रशेखरवर रागावण्याचा आपल्याला काय अधिकार ? केशवशीं समरस होण्याचा थोडा जरी प्रयत्न आपण केला असता, तरी त्याच्यांत आणि आपल्यांत उत्पन्न झालेलें हें विचारांचें वैषम्य या थराला पोंचलें नसतें, असें तिला वाटलें. चंद्र-शेखर हा बोलून चालून परका तरुण; त्यांतून हीन जातींतला. केशवनें त्याच्याशीं इतके दिवस आपली ओळख करून दिली नाहीं, हा त्याचा अपराध नव्हे. पण, आपण मात्र त्या दोघांच्या स्नेहाचें स्वरूप समजून न घेतां चंद्र-शेखरचा राग केला;—त्या धाडसी दिलदार तरुणाची पहिल्याच भेटीला नाहक अवहेलना केली आणि अशा रीतीनें केशवचें मन दुखविलें, ही आपली केवढी तरी चूक झाली, अशी कल्पना तिच्या मनांत आली. ती कल्पना मनांत आली मात्र, लगेच तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटला.

इतक्यांत आपल्या खांद्यावर कोणीतरी हात ठेवल्याचा भास तिला झाला. त्याबरोबर डोळे पुसून तिनें मागें वळून पाहिलें. आंसवांनीं भिजलेल्या पापण्यांतून झळकणारी तिच्या त्या करुणपूर्ण डोळ्यांची दीप्ति चंद्राच्या त्या निष्प्रभ प्रकाशांत पावसानें भिजलेल्या पानांतून चमकणाऱ्या काजव्याच्या लकाकीसारखी या वेळीं दिसत होती. ती कांहीं बोलणार, तोंच सुमतीनें तिचा हात धरून तिला म्हटलें, “ताई, अशा गारठ्यांत तूं बाहेर कां उभी ? बाधणार नाहीं का ही थंडी तुला ? चल, आंत बसूं आपण—”

" बाधली म्हणून काय झालं ? आतां माझ्या आयुष्यांत असं काय उरलंय कीं, ज्याच्यासाठीं मला जगावंसं वाटावं ? "

" असं भलतंच काय बोलतेस तूं ताई ? मी अन् बाबुराव आम्ही दोघं जोंपर्यंत आहों, तोंपर्यंत तरी तूं असं बोलूं नयेस—"

" सुमा, मी भलतंच बोलत नाहीं; मला जें धडधडीत दिसतं तेंच मी बोलतें. बाबू तर मला अंतरलाच, अन् तूं सुद्धां मला लवकरच अंतरशील—"

" तुझ्या मनांत येतात तरी कशा या कल्पना, ताई ? पण हें बघ, आपण आंत जाऊं आधीं;-इथं थंडींत नको.—आंत अंथरुणावर पडून बोलूं— "

सुमतीनें तिला आंत नेली; व आपल्या मांडीवर तिचें मस्तक घेऊन, पुन्हा तिच्याशीं बोलावयाला प्रारंभ केला.

" बाबुराव आपल्याला अंतरले असं तुला कां वाटतं ? खरोखरी तूं हें दुःख आपल्या कल्पनेनं निर्माण केलं आहेस. ते तुला अंतरले असं तूं म्हणतेस; पण तूं कधीं तरी त्यांचे विचार समजावून घ्यायचा प्रयत्न केला आहेस का ? ज्या माणसांवर आपलं प्रेम असतं किंवा ज्यांनीं आपल्यावर प्रेम करावं असं आपल्याला वाटतं, त्यांच्या जीवनाशीं हर एक बाबतींत समरस होणं हें आपलं कर्तव्य नाहीं का ? ताई, पुरुषांच्या प्रेमाला बौद्धिक सहकार्याची अपेक्षा असते. आमची आई मामांची अगदीं पाठची बहीण. पण तिच्यापेक्षां माझ्यावरच त्यांचा जीव अधिक आहे. ते स्पष्टच सांगतात, तुला माझे विचार समजण्याची पात्रता आहे, म्हणून तूं मला इतकी आवडतेस. आपण बायका भावनेनं प्रेम करतों; आपलं जीवनच मुळीं भावनामय. तसं पुरुषांचं नाहीं.—पुरुष बुद्धीनं प्रेम करितात. त्यांची बुद्धि जिथं रिझेल तिथं त्यांचं मन रमतं.—तुझ्या बाबुरावांवरील प्रेमाचा तूं या दृष्टीनं कधीं तरी विचार केला आहेस का ? मी गेले चार महिने पहातें आहें;—त्यांच्या बौद्धिक जीवनाशीं तुझा काडीचाही संबंध नाहीं;—जर कांहीं असेल तर विरोधच आहे.—अन् आज तर साऱ्याच गोष्टींचा कळस झाला ! चंद्रशेखरांना तूं उगाच इतकं टाकून बोललीस, असं नाहीं का तुला आतां वाटत ?"

"उगाच नाहीं बोललें, सुमा; त्यांचं तें सारं इतरांविषयींचं तुच्छतेचं बोलणं मला असह्य झालं म्हणूनच मी बोललें. आपल्याला जीं माणसं प्रिय किंवा पूज्य

असतात, त्यांच्याविषयीं हेटाळून बोललेलं कुणाला आवडेल ? पण बोललें नसतें तर बरं झालं असतं, असं मात्र मला आतां वाटतं. मला कल्पना नव्हती कीं, माझं तें सारं विषासारखं कडू बोलणं ते मुकाट्यानं सहन करतील. सुमा, बाबू म्हणतो तें कांहीं खोटं नव्हे;—खरोखरीच चंद्रशेखरांच्या प्रत्येक गोष्टींत विलक्षण मोहनी भरलेली आहे—"

"एकंदरींत चंद्रशेखरांनीं तुला सुद्धां अखेर मोहित केलं म्हणायचं—"

"होय, मोहित केलं;—माझा पराजय मी कबूल करतें," ललितेनें एकदम उठून आवेशानें म्हटलें. "पण याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांचीं तीं सारीं विक्षिप्त आणि भयंकर मतं मला पटतात. मला त्यांनीं मोहित केलं तें आपल्या गुणांनीं,—मतांनीं नव्हे—"

"गुणांनीं मोहित झालेल्या मनुष्यावर मतांची छाप पडायला फारसा वेळ लागत नाहीं, ताई!" सुमतीनें किंचित् हंसून म्हटलें. "शिवाय त्यांच्या मतांत गैर काय आहे ? तूं जर आपल्या आजपर्यंतच्या साऱ्या आवडत्या कल्पना बाजूला सारून त्यांच्या मतांचा विचार केलास, तर तीं तुला वाटतात तितकीं विक्षिप्त खास वाटणार नाहींत. जगांतल्या साऱ्याच नवीन गोष्टी प्रथमदर्शनीं आपल्याला चमत्कारिक वाटत असतात; व काळोखांत झाडांच्या फांद्यांचे हेलकावे पाहून लहान मुलाला भुतांचा भास व्हावा, त्याप्रमाणें रूढ कल्पनांच्या रहाटींत रुळलेल्या आपल्या मनाला त्यांची केव्हां केव्हां नाहक भीति वाटते. पण ताई, तुझ्यासारख्या बुद्धिमान् मुलीनं तरी चंद्रशेखरांच्या मतांच्या नवीनपणाला इतकं बुजून जाणं शोभत नाहीं. माझी खात्री आहे कीं, तूं जर त्यांचीं मतं समजावून घेण्याचा प्रयत्न केलास, तर तुम्हां भावंडांत जें नसतं दुजेपण आज उत्पन्न झालं आहे, तें नाहींसं होऊन जाईल—"

"नाहीं सुमा, हा निव्वळ मतांचा प्रश्न नाहीं. बाबूवरलं माझं प्रेम किती उत्कट, किती निस्सीम आहे, हें तूं ओळखीत नाहींस.—म्हणून तुला असं वाटतं. आमच्या दोघांच्या प्रेमांत तिसरं कोणीही वांटेकरी झालेलं मला सहन होणार नाहीं. समजायला लागल्यापासून आमचा जन्म एकमेकांसाठीं आहे, अशा भावनेनं आजपर्यंत आम्ही वागत आलों; अन् त्याच भावनेनं आमचं पुढचं आयुष्य गेलं

पाहिजे.—तरच मी सुखी होईन. बाबूनं दुसऱ्यावर प्रेम करावं ही कल्पनाच मला मुळीं सहन होत नाहीं—"

"कां होऊं नये ? एका माणसाला अनेक व्यक्तींवर सारखंच उत्कट प्रेम करणं अशक्य आहे, असं वाटतं का तुला ताई ? बाबुरावांचा न् चंद्रशेखरांचा स्नेह तुला आवडत नाहीं;—पण तूं स्वतः नाहीं का माझ्यावर प्रेम करीत ?"

"होय, तुझ्यावर मी प्रेम करतें, पण तें अगदीं निराळ्या प्रकारचं. मला त्या दोन प्रेमांतला फरक समजतो, पण सांगतां येत नाहीं.—बाबूनं माझं सारं जीवन व्यापलं आहे. तितकं तुला कधींच व्यापणं शक्य नाहीं. एका वेळीं अनेकांवर प्रेम करणं शक्य आहे; पण आपलं हृदय,—आपलं जीवनसर्वस्व मात्र आपण एकालाच देऊं शकतों. नदी आपल्या तीरावरच्या तरुलतांना जीवनदान करते हें खरं; पण तिच्या जीवनसर्वस्वाचा लाभ मात्र फक्त एकट्या सागरालाच घडतो. आयुष्यांत आपला अनेक माणसांशीं संबंध येतो, अनेक माणसांविषयीं आपल्याला प्रेम वाटतं.—आई, बाप, बहीण, भाऊ हीं सारींच आपल्याला प्रिय असतात; व त्यांच्यापैकीं कोणाशींही आपली ताटातूट झाली, तरी आपल्या जिवाची तळमळ होते. मनुष्याचं मन हें असं विलक्षण आहे कीं, तें एकाच वेळीं अनेकांवर प्रेम करूं शकतं. पण, आकाशांत जरी अनेक तारकांना स्थान मिळत असलं, तरी तें जर कोणाच्या तेजानं सर्वस्वीं व्यापून जात असेल, तर तें फक्त चंद्राच्या. तसंच मनाचंही आहे. सुमा, तूं मला इतकी आवडतेस कीं, तुझ्या भेटीची एकादी वेळ जर टळली, तर माझे प्राण कासावीस होऊं लागतात;—तुला केव्हां एकदां भेटेन असं मला होऊन जातं. पण तुझ्याविषयींचं हें प्रेम निराळं आणि बाबूविषयींचं प्रेम निराळं.—त्यांच्यांतला हा निराळेपणा मला स्वतःला जाणवतो, पण सांगतां मात्र येत नाहीं. बायरनचं एक वाक्य बाबू नेहमीं सांगत असतो, "प्रेम ही पुरुषाच्या जीवनांतल्या अनेक गोष्टींपैकीं फक्त एक गोष्ट असते पण स्त्रीचं मात्र तें जीवनसर्वस्व असतं." हें वाक्य मला फार फार पटतं सुमा ! पुरुषाचं प्रेम महत्त्वाकांक्षेनं विचलित होईल किंवा मोहानं कलुषित होईल त्याला प्रसंगानुसार हवे तितके फांटे फुटूं शकतात. पण स्त्रीचं प्रेम !—तें प्रेमविषयाशिवाय दुसऱ्या कशाला मुळीं ओळखीतच नाहीं, दुसऱ्या कशासाठीं मुळीं जगतच नाहीं. स्त्रीचं जीवन नंदादीपासारखं आहे. ज्या प्रेमामुळं तिच्या जीवनाला

उज्ज्वलता प्राप्त होते, त्या प्रेमांतच त्याची आहुति पडत असते. सुमा, बाबूवरचं माझं प्रेम जर माझ्या जीवितांतून काढून टाकलं, तर पाणी आटून गेलेल्या झऱ्या-सारखी माझी अवस्था होईल. त्या प्रेमामुळं मला जग रम्य वाटतं, त्या प्रेमामुळं माझ्या भावनांना बहर येतो अन् त्या प्रेमामुळं माझ्या विचारांना स्फूर्ति मिळते. तूं स्वतः ज्या दिवशीं असं प्रेम करशील, त्याच दिवशीं सुमा, तुला माझ्या या बोलण्याचा अर्थ कळेल—"

"कुणाला ठाऊक !—आपल्या प्रेमाच्या कल्पनाच कदाचित् भिन्न असतील. तुझ्या प्रेमाचं असं आहे ताई, कीं तूं स्वतः सर्वस्व देशील हें खरं; पण त्याबरो-बरच आपल्या प्रेमविषयानंही आपल्याला सर्वस्व दिलं पाहिजे, अशी अपेक्षा तूं करशील. त्यामुळंच तुला प्रेमांत वांटेकरी खपूं शकत नाहीं. माझा प्रेमाविषयींचा अनुभव;—मला तुझ्या इतका अनुभव नाहीं ताई;—माझी प्रेमाची कल्पना निराळी आहे. नदी स्वतः सर्वस्व देते, पण सर्वस्वाची अपेक्षा मात्र उलट करीत नाहीं. प्रेमविषयाच्या सुखांत स्वतःचं सुख पहाण्याची ज्याची तयारी असेल, तें खरं प्रेम.—प्रेमविषयाचा पदोपदीं ताबा मागणारं प्रेम;—कदाचित् तूं म्हणतेस तसं तें अधिक उत्कट, अधिक एकनिष्ठ असेल;—पण ताई, तुझ्या या असल्या प्रेमापासून सुखा-पेक्षां दुःखच एकदरींत फार—"

"बरोबर आहे तुझं म्हणणं, सुमा.—पण तूं समजतेस तसं हें माझं प्रेम स्वार्थी मात्र नाहीं. प्रेमविषयाचा ताबा मागण्याचा हेतु त्याच्यावर सत्ता गाजवि-ण्याचा नसतो; तर त्याच्याशीं जिवाभावानं समरस होण्याचा असतो. ज्या प्रेमांत तिसरं मनुष्य बरोबरीचं वांटेकरी होऊं शकतं, त्या प्रेमांत जीवांची समरसता कुठली ? आणि हृदयांचं ऐक्य तरी कुठलं ? दोन व्यक्ति तेव्हांच समरस होतात, तेव्हांच त्यांच्या जीवनाचे ओघ एक होतात कीं, जेव्हां त्यांना एकमेकांइतकं अन्य कांहीं प्रिय वाटत नाहीं आणि एकमेकांशिवाय सर्व जग सुनं वाटतं. "त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयं, त्वं कौमुदी नयनयोरमृतं त्वमंगे" या उद्गा-रांची सार्थकता फक्त अशा प्रकारच्या प्रेमांतच पटते; आणि त्याच प्रेमामुळं या दुःखमय मानवी जीवनाला इतकी दिव्यता, इतकी माधुरी प्राप्त झाली आहे. "प्रीता निमाली तर ?"—विनायकांचा तो प्रश्न !—त्या प्रश्नामुळं जर हृदयाचा कुठं

थरकांप होत असेल, तर तो फक्त याच प्रेमाच्या बाबतींत. हें प्रेम—अशा प्रेमाला मुकल्यावर मग जगांत काय राहिलं अन् जीवनांत तरी काय राहिलं ? —कितीही आंसवं ढाळलीं तरी न विझणारं फक्त त्याच्या विदारक स्मृतींचं हृदयांत सदैव धडधडणारं अग्निकुंड ! सुमा, तूं म्हणतेस तें कांहीं खोटं नव्हे. अशा प्रकारच्या प्रेमांत त्याग जास्त, तळमळ जास्त, भावनांची तीव्रताही जास्त. मला तर केव्हां केव्हां असं वाटतं कीं, बाबूवरचं हें माझं वेडं प्रेम अखेर एक दिवस माझा बळी घेणार—"

"असं अभद्र कां बोलतेस तूं, ताई? तुमच्या बाबुरावांत जसे दुसऱ्याला मोहनी घालणारे गुण आहेत, तसेच ते चंद्रशेखरांतही आहेत. आतांच तूं म्हणालीस ना चंद्रशेखरांनीं मला मोहित केलं म्हणून ? मग तुला त्या दोघांवरही सारखंच प्रेम कां करतां येऊं नये ? "

सुमतीनें तो प्रश्न ललितेला विचारला खरा. पण ती लगेच चपापली. तिचा तिलाच तो प्रश्न चमत्कारिक वाटला. आणि, तो विषय टाळण्याच्या हेतूनें तिनें ललितेच्या गळ्यांत हात घालून लडिवाळपणानें म्हटलें, "ताई, आतां निजूं या गडे आपण.—आज फार त्रास करून घेतलाहेस तूं आपल्या जिवाला;—झोपेनंच तुला वाटलं तर थोडं बरं वाटेल—

इतकें बोलून तिनें ललितेचें मस्तक बळेंच उशीवर ठेवलें; व अगदीं हलक्या हातानें तें चेपावयाला सुरवात केली. पण, तिच्या त्या शेवटच्या वाक्यानें ललितेच्या मनांत विचारांचें इतकें काहूर उत्पन्न केलें कीं, सुमतीला झोंप लागल्यानंतर सुद्धां पुष्कळ वेळ तिच्या जिवाची तळमळ चालू होती.

---

## प्रकरण विसावें

# निर्दोषस्पर्शाना हि विधवा

———o———

"वा वा, बबनराव, अरे असलीं हीं पेयं म्हणजे रसायनंच आहेत मूर्तिमंत या कुसुमाकराचीं ! कविकुलगुरूनं तर सीधुपान हें अत्यंत युक्त म्हणून सांगितलं आहे या ऋतूंत !–पण तो विक्रमभोजादिकांचा वैभवशाली काळ गेला अन् त्याच्या

बरोबर ते रम्य प्रदोषही गेले.—आतां प्रदोष म्हणजे एक आपला उपवासाचा दिवस होऊन बसलाय या भरतखंडांत," शास्त्रीबुवा तोंडाला लावलेलें कांचपात्र खालीं ठेवीत उद्गारले. "खरोखरी आपल्या प्रेमाबाई म्हणजे वसंतमंजरीच आहेत केवळ !–या दिवाणखान्यांत बसलं;–विजेच्या पंख्यांचा हा वारा, खिडक्यां-तून ठेवलेल्या या पुष्पगुच्छांचा हा सुवास, हीं स्निग्ध सात्त्विक खाद्यं, तृष्णेचं शमन करणारीं हीं हिममिश्र पेयं;—यांचा आस्वाद घेतांना असं वाटतं कीं महाबळेश्वर तुच्छ आहे या दिवाणखान्यापुढं !–सुंदर स्त्रिया कोणताही ऋतु आपल्या साहचर्यानं रमणीय करून सोडतात, असं जें वर्णन कालिदासानं केलं आहे, त्याचा उत्तम प्रत्यय येतो इथं;—खरं कीं नाहीं प्रोफेसरसाहेब ?–बाकी तुमच्यासारख्या बड्या मंडळीला काय कौतुक इथल्या या वसंतविहाराचं ?–सर माणेकजींच्या बंगल्यावरील मैफलींत आपल्याला अगदीं खाशांच्या हातून सीधु-पानाचे सुद्धां योग येत असतील पुष्कळदां !–मोठे भाग्यशाली आहां बुवा तुम्ही ! —प्रेमाबाईकडचे हे प्रदोष पदरांत पाडून, पुन्हा आपले सर माणेकजींकडच्या मधु-रात्रीहि साधायला तयारच !—"

बोलतां बोलतां आपल्या रसस्नात मिशा उपरण्यानं पुसून शास्त्रीबुवांनीं धूम्रवलयांत दृष्टि निमग्न करून कोचावर रेललेल्या राळयांकडे पहात मोठ्यानें हास्य केलें.

"इथं येण्यापूर्वीं शांभवी घेतलेली दिसतेय आज तुम्ही, शास्त्रीबुवा !—अहो, हीं सरबतं कितीही चांगलीं असलीं, तरी तुमचं तें खास वसंतऋतूसाठीं काढलेलं नवं रसायन;—परवांच त्याची जाहिरात वाचली मी 'प्रागतिकांत';—काय नांव त्याचं पहा,—पर्फटी फर्फटी—"

"अहो, प्रमदानंदपर्पटी !—थोडं संस्कृत शिका आपण राळेसाहेब; म्हणजे गोंदल नाहीं उडणार अशी आपली—"

"संस्कृत शिकण्यासाठीं वेगळा खटाटोप हो कशाला करायला हवा, बबन-राव ?—मोरोपंताची ती एक कुठलीशी आर्या आहे ना !—तसं आपल्या शास्त्री-बुवांचं भाषण म्हणजे संस्कृत-प्राकृत-मिश्रित कंथाच असते ती एक.—हे आम्हीं सांगतात कीं, कालिदासाच्या घरच्या दासीसुद्धां समस्यापूर्ति करण्यांत पटा-

ईत होत्या म्हणून. तसाच यांचं धन्वंतरीमंदिर झाडणारा गडी सुद्धां जाडे जाडे संस्कृत शब्द वापरीत असेल आपल्या बोलण्यांत! माझी तर अशी खात्री होऊन गेली आहे कीं, शास्त्रीबुवांच्या सहवासामुळं मी लवकरच चांगला संस्कृत पंडित होईन.—पण तें राहूं या तूर्त.—काय हो शास्त्रीबुवा, तुमच्या त्या पर्पटीपेक्षां सुद्धां हें सरबत अधिक तापहारक ओहे का?—"

"काय विचित्र प्रश्न विचारलात हा, प्रोफेसरसाहेब!—आपण मोठे काव्य-मर्मज्ञ आहां; त्यांतून फ्रेंच वाङ्मयाचे भोक्ते. अरविंदबाबू नेहमीं सांगायचे कीं, संस्कृतच्या खालोखाल जर जातिवंत शृंगार कुठं असेल तर तो फ्रेंच वाङ्मयांत.—आणि आपण तर केवळ मुरब्बी आहां त्याचे अगदीं! आमच्यासारख्या खल घोटण्यांत न् पुड्या बांधण्यांत दिवस घालविणाऱ्या माणसानं आपल्याला काय शिकवावं?— आमची प्रमदानंदपर्पटी कितीही तापहारक असली, तरी प्रत्यक्ष प्रमदेनं दिलेल्या पेयापुढं तिची काय मातब्बरी?—"

"कशाला शास्त्रीबुवा, उगाच एवढं फोड करून सांगतां? त्यांना काय हें कळत नाहीं असं थोडंच आहे? प्रोफेसरसाहेब म्हणजे तर अगदीं दर्दी आहेत या विषयाचे—"

"कोणत्या विषयाचे दर्दी? आम्हांला सांगितलंत तर आम्ही तो शिकून तरी घेऊं त्यांच्यापासून, बबनराव!—"

हातांत ट्रे घेऊन दिवाणखान्यांत येत असलेल्या प्रमिलेनें हंसत हंसत विचारलें. वायुलतेच्या सौम्य रंगासारखी निळी झांक असलेलें पारशी पद्धतीचें तलम पातळ ती नेसली होती; व उरोजांपर्यंतचा भाग उघडा राहील अशा तऱ्हेचा गुलाबी ब्लाऊज तिनें अंगांत घातला होता. क्षितिजावर पसरलेला संध्येचा रक्तिमा निळसर अभ्रांच्या विरल पटलांतून जसा खुलावा, तसा त्या ब्लाऊजचा गहिरा रंग पातळाच्या झिरझिरीत पदराखालून शोभत होता. उकाड्याच्या त्रासाला कंटाळून तिनें आज नेहमींप्रमाणें आंबाडा बांधला नव्हता; तर आपले काळेभोर, कुरळे केस गोऱ्यापान अकलंक कपाळाभोंवतीं, त्यांची मेहेरप होईल अशा रीतीनें, सिलोल्यूटच्या सुबक फुलपांखरांनीं कानांजवळ व्यवस्थित बसवून देऊन, त्यांचा एकेरी पेड पारव्या रंगाची फीत गुंडाळून खालीं सोडून दिला

होता. ब्लाऊजला पिननें अडकवून पदर खांद्यावरून मागें सोडलेला असल्यामुळें उघडा पडलेला तिचा ईषदरुण, पीनोन्नत उरोभाग विद्युद्दीपाच्या प्रकाशांत मोहक दिसत होता; व गळयांत घातलेल्या टपोऱ्या मोत्यांच्या एकावलीनें तिच्या कंबुकंठाची कांति दुणावली होती. तिची जिवणी किंचित् रुंद असल्यामुळें हास्याच्या ऊर्मीनीं तिच्या फुगीर गालांना या वेळीं मनोहर चुण्या पडल्या होत्या.

"—या दिवाणखान्यांत निघणाऱ्या साऱ्या विषयांचे," बबनरावांनीं तिच्या प्रश्नाला उत्तर दिलें. पण तें देतांना त्यांचें लक्ष तिच्यापेक्षां तिच्या आगमनानें उडालेल्या प्रोफेसरसाहेबांच्या धांदलीकडेच विशेष होतें.

प्रमिलेनें ट्रे दिवाणखान्याच्या मधोमध असलेल्या वाटोळया विस्तीर्ण मेजावर ठेवला; व ती खुर्चीवर बसली. तिनें दिवाणखान्यांत पाऊल ठेवल्यापासून प्रोफेसरसाहेबांची दृष्टि तिच्या मूर्तिवर खिळलेली होती. तिला सिगारेटचा धूर सहन होत नसे. म्हणून, हातांतील नुकतीच पेटविलेली सिगारेट रक्षापात्रांत फेंकून देऊन, ते तिच्या शेजारच्या खुर्चीवर येऊन बसले. आणि बाजूच्या कोचावर लेटलेल्या शास्त्रीबुवांकडे पाहून हंसत हंसत म्हणाले, "पुढं या ना शास्त्रीबुवा; आतां दूर राहून कसं चालेल?"

"ह ह ह—उगाच नाहीं बबनरावांनीं आपल्याला दर्दी म्हटलं," शास्त्रीबुवा उठण्यासाठीं शरीर सांवरीत असतां उद्गारले. "पण काय हो प्रेमाबाई, तुम्ही यांच्याजवळ फ्रेंच शिकत होतात, त्याचं काय झालं?—"

"व्हायचंय काय शास्त्रीबुवा?—पहिलीं दोन प्रायमरं शिकवलीं मोठ्या उल्हासानं; अन् नंतर म्हणायला लागले कीं, तुम्हांला जर फ्रेंच कविता वाचायच्या असतील, तर माझ्याबरोबर महालक्ष्मीवर किंवा जुहूला रोज संध्याकाळीं फिरायला चला!—त्यामुळं तेवढ्यावरच थबकलं आमचं सारं शिक्षण—"

"काय शास्त्रीबुवा, मी यांना वाईट काय सुचवलं यांत?—तुम्हीच सांगा बरं!—अहो, काव्यपरिशीलनाला स्थळही पण काव्यमयच हवं;—घरीं बसून कविता वाचण्याची कल्पना आपल्याला नाहीं बुवा पसंत!—म्हणून मी यांना सुचवलं कीं, कधीं जुहूच्या वाळवंटांत, कधीं महालक्ष्मीच्या कातळावर, तर कधीं

मलबार हिलवरील बागेंत असं रमत गमत फ्रेंच वाचीत जाऊं रोज थोडं थोडं; पण तें यांना पटेना;—त्याला आम्हीं काय करणार बुवा—?"

"वा वा, काय नामी कल्पना होती आपली! उगाच नाहीं आपण इंग्रजी काव्याच्या अध्यापनांत इतकीं वर्षं घालविलीं.—आपल्यासारखा रसिक गुरु, फ्रेंच कवितेसारखा ललित विषय, जुहूच्या वाळवंटासारखं रम्य स्थळ आणि यांच्यासारखी चतुर शिष्या!—वा वा, काय बहार उडाली असती!—खरोखरी समुदितः सर्वो गुणानां गणः!—अहो, अशा ठिकाणीं कविता समजावून तरी कशाला सांगायला हवी?—परस्परांच्या दृष्टींत दृष्टि गुंतवून ती ओठांतल्या ओठांत गुणगुणत गेलं, म्हणजे अर्थ आपोआप उकलत जातो; अन् त्याचे सूक्ष्म ध्वनि एकमेकांच्या अंतःकरणांत स्वयमेव निनदित होऊन अंगावर रोमांचाच्या लहरीवर लहरी उठत राहतात!—स्वसंवेद्य शिक्षण तें!—गुरु आणि शिष्या यांचा एकलय व्हायचा त्या काव्यसमाधींत!—वा वा, त्या समाधीच्या नुसत्या कल्पनेनंसुद्धां गात्रं पुलकित होतात!" शास्त्रीबुवा अर्धोन्मीलित नेत्रांनीं प्रमिलेकडे पहात डुलत डुलत उद्गारले. "प्रेमाबाई, प्रोफेसरसाहेबांच्या या सूचनेंत वावगं काय होतं हो? अलीकडे ती नवीन बालोद्यान शिक्षणपद्धति निघाली आहे ना?—त्यांतलाच हाही एक शिक्षणाचा प्रकार! वाटल्यास प्रमदोद्यानपद्धति असं एकादं नव पारिभाषिक नांव द्या तुम्ही त्याला!—आम्हांला बरोबर नेण्याची तुमची जर कधीं लहर लागली, तर मी सुद्धां गीतगोविंद समजावून सांगेन तुम्हांला मधून मधून!—"

"ऐकलंत शास्त्रीबुवा काय म्हणतात तें?—कोणत्या रसिक मनुष्याला माझी ही कल्पना पटणार नाहीं?—मग चलतां कां आज जुहूला?—चांदणंही कसं छानदार पडलंय.—तिथं म्युस्सेचीं अशीं मधुर प्रेमगीतं तुम्हांला मी समजावून सांगतों!—मग बोलावूं ना मोटार फोन करून?" बोलतां बोलतां त्यांनीं अधीरतेनें तिचा टेबलावर असलेला हात झटकन आपल्या हातांत घेऊन तो घट्ट दाबला.

त्या अकल्पित प्रकारानें प्रमिला स्तिमित झाली. पण क्षणभरच. तिनें लगेच आपला हात त्यांच्या हातांतून सोडवून घेऊन अत्यंत रोषयुक्त मुद्रेनें त्यांच्या-

कडे पाहिलें. पण, तिच्या त्या आविर्भावांत रागापेक्षां लालित्याचाच भाग इतका अधिक होता कीं, प्रोफेसरसाहेब त्यामुळें वरमण्याऐवजीं उलट जास्तच मोहित झाले. क्षणैक कोणीच कांहीं बोललें नाहीं. पण, ती स्तब्धता तशीच टिकूं देणें अनिष्ट आहे असें वाटल्यामुळेंच कीं काय, प्रमिलेनें स्वतःच बोलावयाला सुरवात केली. ट्रेमधील एक बशी बबनरावांपुढें ठेवून ती त्यांना म्हणाली, "कसल्या एवढ्या विचारांत गर्क झालां आहां तुम्हीं आज, बबनराव? आतांपर्यंत चाललेल्या या संभाषणांत तुम्हांला कांहींच कां गम्य नव्हतं? मघांशीं ज्या दर्दीपणाविषयीं तुम्हीं बोलत होतां तो जर हाच असेल, तर मनुष्यापासून पशूपर्यंत सर्व प्राणिमात्राला तो सामान्य आहे, असंच नव्हे कां!"

तें वाक्य उच्चारतांना तिच्या तोंडावर रोषगर्भ व्याजस्मिताची रेषा उमटली.

तिच्या त्या वाक्याचा रोंख बबनरावांनीं ओळखला. पण तो विषय टाळण्याच्या हेतूनें ते म्हणाले, "तसं नव्हे हो!–तुम्हीं आंत असतांना आमचं कालिदासाविषयीं बोलणं चाललं होतं, त्यावरून म्हटलं मी तें.—पण प्रेमाबाई, तुम्हीं आपल्यासाठीं नाहीं आणलेलं दिसत कांहीं;—तुमच्याशिवाय कशी सुरवात करायची आम्हीं!—"

"खरंच, विसरूनच गेलें आज मी अगदीं स्वतःला," प्रमिलेनें किंचित् हंसल्यासारखें करून म्हटलें. आपल्याला आंत जावयाला बबनरावांनीं निमित्त दिल्याबद्दल तिला फार बरें वाटलें. "तुम्ही सुरवात करा;—मी आतां येतें आणखी एक बशी घेऊन;—केव्हांपासून निवून चालले आहेत पदार्थ—" इतकें बोलून ती लगेच उठली.

ती आंत जातांच प्रोफेसरसाहेब उठले; व खिडकीशीं उभे राहून बाहेर पहात विमनस्कतेनें शीळ घालूं लागले. त्याबरोबर शास्त्रीबुवा बबनरावांच्या पाठीवर थाप मारून डोळे मिचकावीत हळूच उद्गारले, "'निर्दोषस्पर्शना हि विधवा' असं व्यवहारसूत्र दिसतंय या राळ्याचं!—आज तर अगदींच ताळ सोडला लेकानं!—कसं मर्मभेदक बोलत होती बघितलंस ना;—छे छे, बिजली आहे अगदीं!—हें चहाच्या पेल्यांतलं वादळ लवकर शांत होवो म्हणजे झालं—"

" त्याची नको काळजी तुम्हांला.—हा आचरट असला, तरी ती महाधूर्त आहे !—तिनं अशीं कैक लोचटं अंगाशीं आलेलीं झटकून टाकलीं आहेत मोठ्या शिताफीनं !—रावसाहेबांच्या तालमींत तयार झालेली आहे ती—"

बबनराव आणखी कांहीं पुढें बोलणार, तोंच प्रमिला एक बशी घेऊन आली. तिची मुद्रा आतां पूर्ववत् प्रसन्न झाली होती. त्यांना स्वस्थ बसलेले पाहून ती आश्चर्याच्या आविर्भावानें उद्गारली, " हें काय ?—तुम्ही सुरवात नाहीं केली अजून ? अन् प्रोफेसरसाहेब बाजूला कां उभे ?—इतके दिवस या बैठकींत बसून सुद्धां तुम्ही माझ्या बाबतींत इतका शिष्टाचार पाळाल असं वाटलं नव्हतं बाई मला !—"

तें शेवटचें वाक्य उच्चारतांना तिनें अतिशय लाडिकपणानें स्मित केलें.

" वा वा, असं कसं म्हणतां आपण ? " शास्त्रीबुवा तिच्या त्या स्मितानें खुलून जाऊन उद्गारले. " पुरुषांच्या बाबतींत शिष्टाचार एक वेळ न पाळला तरी चालेल. पण स्त्रियांच्या बाबतींत ?—अब्रम्हण्यम् !—शिष्टाचार हें तर स्त्रीदाक्षिण्याचं महत्त्वाचं अंग होऊन बसलंय या काळांत !—आमच्या लहानपणीं फोटोच्या वेळीं बायको नवऱ्याच्या मागं लाजून नम्रतेनं उभी राहत असे. आतां बघावं तर ती बेलाशक पदर मागं टाकून खुर्चीवर झोकांत रेललेली असते; अन् हा तिच्या मागं उभा किंवा तिच्या पायांशीं बसलेला असतो !—काळ बदलला, तसे आचारही बदलले. एलिझाबेथ राणीच्या बुटांना चिखल लागू नये म्हणून आपल्या अंगावरल्या महावस्त्राची पायघडी करणारा रॅले हा आज आदर्श होऊन बसलाय आमचा ! अहो, इतकं कशाला, आपल्या सर दिनानाथांचंच उदाहरण पहा ना ! सरसाहेब स्वतः आधीं मोटारींतून उतरून नंतर लेडी रुक्मिणीबाईंना हाताचा आधार देऊन उतरायला मदत करतात ! त्यांतून आपल्यासारख्या स्त्रियांच्या बाबतींत शिष्टाचार पाळायला कुणाला उल्हास वाटणार नाहीं, प्रेमाबाई !—ज्यांच्या साहचर्यानं कोणतंही सुख हें अधिक सुखकर होतं, त्यांच्या बाबतींत शिष्टाचाराचं पालन हा एक उपभोगाचाच प्रकार होऊन बसतो ! "

बोलतां बोलतां शास्त्रीबुवांनीं बशींतील पदार्थाचा एक भला मोठा तुकडा गपकन तोंडांत टाकला.

शास्त्रीबुवा अशा रीतीनें पुन्हा मूळपदावर येत चाललेले पाहून बबनराव विषय बदलण्याच्या उद्देशानें म्हणाले, “ काय शास्त्रीबुवा, आज भगवंतरावजी, नानासाहेब अन् रावसाहेब यांच्याशिवायच प्रदोष सुटायचा का आपला ?— ”

“ अरे कां हो, ही मंडळी कां नाहीं आली अजून ?—विस्मृतीच होऊन गेली मला अगदीं !” शास्त्रीबुवा अवचित आठवण होऊन दचकल्यासारखे करित उद्गारले. त्या धांदलींत त्यांच्या तोंडांतला अर्धा घांस खालीं पडून त्यांचें उपरणें चित्रित झालें. तें कुणाच्या लक्षांत न येईल अशा रीतीनें झटकीत त्यांनीं मिनतवारीनें म्हटलें, “ अरे बबनराव, इथं येऊन एकदां बसल्यावर—कांहीं विचारूं नको !—बाह्य जगांतील समस्त उपाधींचा विसर पडून जातो अगदीं या स्थलाच्या रमणीयतेमुळं !—खरोखरी, अत्र रम्यत्वमेवमपराध्यति,—न अस्माकं दोषः ! छे छे, पण प्रेमाबाई आपल्या तरी लक्षांत राहायला हवं होतं;—हा प्रमाद सर्वस्वीं आपला आहे ! ”—बोलतां बोलतां त्यांनीं एकदम आपला हात आंखडता घेतला.

“ वा वा—छान कांगावा चालवलाय तुम्ही, शास्त्रीबुवा ! म्हणे तुमचा प्रमाद ! तुम्हांला आपल्या स्नेहीमंडळीशिवाय खाणंपिणं सुचलं हा माझा अपराध का ?—पण हळहळायला नको कांहीं इतकं हो ! ” प्रमिलेनें लडिवाळपणानें त्यांच्याकडे पहात म्हटलें. “ बबनरावांना तरी चार घांस पोटांत गेल्यावरच आठवण झाली ना ? शास्त्रीबुवा यांत तुमचाही दोष नाहीं अन् माझाही दोष नाहीं.—संध्याकाळींच आली होती चिठी मला नानासाहेबांची. त्यांत त्यांनीं लिहिलं होतं कीं, भगवंतरावजींना अन् मला सर जीवनलालांनीं बोलावलं असल्यामुळं आमच्या येण्याचा कांहीं नेम नाहीं.—म्हणून म्हटलं उगाच कां अंत पहा तुमचा ?—”

“ सर जीवनलालांनीं बोलावलं ? अन् तें कशाला बुवा ? ” बबनरावांनीं साश्चर्य मुद्रेनें विचारलें. “ सकाळींच मी ‘ प्रागतिक ’ कचेरींत गेलों होतों. पण नानासाहेब कांहीं बोलले नाहींत मजजवळ—”

“ मी सांगतों तुम्हांला सर जीवनलालांनीं त्यांना कशाला बोलावलं असेल तें.—काल मी त्यांच्या चेंबरमध्यें गेलों होतों, तेव्हांच ते म्हणत होते मजजवळ, या दोघांना एकदां भेटीला बोलावलं पाहिजे, म्हणून, ” प्रो. राळे एकदम

आवेशानें उद्गारले. " गांधीची ती साऱ्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेली असहकारितेची योजना पाहिलीत ना तुम्ही ?—ती आतां तो कॉंग्रेसवर लादणार बघा.—कारण तुर्कस्थानाशीं होऊं घातलेल्या तहाच्या अटी जाहीर झाल्या-मुळं खिलापतीचा कायमचा बोजवारा उडाला आहे अगदीं !—आजपर्यंत त्या अलीबंधूंनीं अन् त्यांच्या नादीं लागून या गांधीनं ब्रिटिश सरकारला वेड्यावांकड्या धमक्या दिल्या.—पण तो लॉयड जॉर्ज कसला छट् !—दुसरा मॅकियाव्हेलीच तो !—ज्यानं आयर्लंडांतल्या बहाद्दर चळवळ्यांना भरडून काढण्याचा सपाटा लावलाय, तो काय या उपासतापास करणाऱ्या अन् चरखा फिरवणाऱ्या जरत्कारूच्या शापांना दाद देणार होय ?—त्यानं यांच्या जिभेला प्रथम मधाचं बोट लावलं अन् अखेर दोस्त राष्ट्रांकडे बोट दाखवून खांका वर केल्या !—आतां गांधीला आपल्या धमक्या खऱ्या करून दाख-विल्याविना गत्यंतर नाहीं.—अहो, हरिश्चंद्राचा अवतार आहे ना तो या कलियुगांतला ! "

प्रोफेसरसाहेब बोलतां बोलतां वामांगवेपनपूर्वक कुत्सितपणानें हांसले.

" पण या साऱ्या गोष्टींचा संबंध काय जीवनलालांच्या आमंत्रणाशीं ?—कां आज वर्गांतलं व्याख्यान इथं झोडायची लहर लागली आहे आपली ? "

" अहो, संबंध नाहीं कसा ?—सूर्यप्रकाशासारखा स्पष्ट आहे अगदीं !—व्यर्थ इतकीं वर्षं घालवलीं तुम्ही वर्तमानपत्रांच्या कचेरींत, बबनराव ! इतका साधा कार्यकारणभाव कळत नाहीं.—अन् तरी हे शास्त्रीबुवा नेव्हिन्सन म्हण-तात तुम्हांला !—अहो, वर्तमानपत्रांतला मनुष्य म्हणजे वायुमापक यंत्रा-सारखा हवा.—आकाश निरभ्र दिसत असलं तरी त्याला आगामी वादळाचा सुगावा अचूक लागला पाहिजे !—माझ्या तासाला जर तुम्ही मधून मधून हजर राहिलां—"

" हें पहा प्रोफेसरसाहेब, शास्त्रीबुवा आपले प्रेमानं म्हणतात मला नेव्हिन्सन !—अहो, मी जर खरोखरीच तसा असतों, तर वर्तमानपत्रांच्या कचेऱ्यांचे उबरठे कशाला झिजवावे लागले असते मला ?—माझी गोष्ट सोडून द्या. घटकाभर तुम्हीच नेव्हिन्सन आहांत असं समजून चाला या

आपण ! पण आमच्या डोक्यांत एकदां उजेड तर पडूं द्या आधीं या कार्य-कारणभावाचा—" बबनरावांनीं अगदीं संथपणानें उत्तर दिलें.

"कार्यकारणभाव उघड आहे अगदीं.—सर जीवनलालांना अशी भीति पडली आहे कीं, फेरोजशहांच्या पैशाच्या जोरावर निघालेला आमचा हा 'प्रागतिक' सध्यांच्या या लाटेंत आपली पक्ष-परंपरा विसरून उद्यां पटदिशीं गांधींचं ढोलकं बडवायला लागायचा !—नानासाहेबांच्या व्यवहारचातुर्याबद्दल खात्री आहे तशी त्यांना. पण ते भगवंतराव आहेत ना एक विक्षिप्त ! त्यांच्या डोक्यांत एकदां का तें गांधीच्या तत्त्वज्ञानाचं खूळ शिरलं तर कांहीं बघायला नको !— 'प्रागतिक' म्हणजे दुसरं 'नवजीवन' होऊन बसेल—"

"मग बिघडलं काय त्यांत ?" शास्त्रीबुवांनीं जरा रागानेंच विचारलें. प्रोफेसरसाहेबांनीं चालविलेली ती गांधींची निंदा त्यांना सहन झाली नाहीं. "तुम्हांला असं वाटतं का कीं, 'प्रागतिका'नं सदोदित सरकारचं, सर माणेकजींचं अन् सर जीवनलालांचं ढोलकं वाजवीत राहावं म्हणून ? तुम्ही करतांच आहां कीं तें काम टाइम्सचे स्तंभ अन् त्याबरोबरच स्वतःचेही खिसे भरून !—तुमचं ठीकच आहे. सर माणेकजींकडून अवदानं सुटताहेत अन् टाइम्सकडूनही रौप्यमुद्रा झडताहेत !—पण बिचाऱ्या 'प्रागतिका'ला लोकाश्रयावर जगायचंय;—त्याचा कांहीं विचार कराल कीं नाहीं ?—शिवाय तुमच्या मवाळ पक्षाला तरी कुठं गांधींचं म्हणणं अमान्य आहे ?—तुर्कस्थानाच्या तहांत मुसलमानांची वंचना झाल्याबद्दल तुम्ही नाहीं निषेध केला सरकारचा ? अन् ज्या कमिटीवर खुद्द तुमच्या जीवनलालांनीं काम केलं, त्या कमिटीच्या हिंदी सभासदांनीं तरी पंजाबांतील हत्याकांडाच्या बाबतींत गांधींसारखंच मत दिलेलं नाहीं काय ? तुमचं म्हणणं येऊन जाऊन एवढंच कीं नाहीं कीं, तुमच्याप्रमाणं कॉंग्रेसनं नुसते निषेधाचे ठराव करून, पुन्हा आपलं निर्लज्जपणानं सरकारच्या पुढं लांगूलचालन करायला सज्ज व्हावं ? आणि 'प्रागतिका'ला कधीं काळीं तुमच्याकडून मिळालेल्या देणगीच्या जोरावर तुम्ही आपल्या या कोडग्या धोरणाचं तुणतुणं वाजवायला लावणार त्याला ?—धन्य आहे तुमची प्रोफेसरसाहेब !—इतके दिवस 'प्रागतिका'नं पुष्कळ पांग फेडले तुमचे.—आतां तरी करूं द्या त्याला

त्या महात्म्याच्या धोरणाचा पुरस्कार !—किती झालं तरी तुमच्या गोखल्यांचाच शिष्य आहे ना हो तो ?—"

"कसला आला आहे गोखल्यांचा शिष्य ?—तुम्हांला तो एवढा महात्मा वाटत असेल, तर त्याच्या पादुका करून ठेवा ना आपल्या देव्हाऱ्यांत;—पण राजकारणांत कशाला देव्हारे माजवतां त्याचे ?—" प्रोफेसरसाहेब हेटाळणीच्या सुरांत उद्गारले. "वाटल्यास तुमच्या रोग्यांना त्याच्या प्रतिमेचे ताईतही गळ्यांत बांधायला सांगा !—मला वाटलं नव्हतं शास्त्रीबुवा, कीं रोग्यांची नाडी तपासायच सोडून तुम्ही हिंदुस्थानाच्या राजकारणाचं निदान करायच्या फंदांत पडाल म्हणून !—पण आहे;—भगवंतरावांनीं आपला वरदहस्त तुमच्या डोक्यावर ठेवला म्हणायचा एकूण—"

"अहो, कुणाच्या डोक्यावर सर दिनानाथांचा वरदहस्त असतो, तर कुणाच्या डोक्यावर भगवंतरावजींचा असतो; त्यांत वावगं काय झालं ?—भगवंतरावांजवळ जरी तुमच्या त्या दिनानाथांच्या किंवा माणेकजींच्या इतकी माया नसली, तरी बुद्धीच्या बाबतींत ते त्यांच्यापेक्षां कांकणभर सरसच ठरतील. शिवाय गांधींच्या म्हणण्याचा खरेपणा पटायला भगवंतरावांचा वरदहस्त तरी कशाला हवा ?—तुमच्या त्या रुक्ष राजकारणांत कधीं मन न घालणाऱ्या माझ्यासारख्या अप्रबुद्ध स्त्रीला सुद्धां तें समजूं न् उमजूं शकतं.—मला तरी बाई असं वाटतं कीं, गांधी या वेळीं अगदीं योग्य मार्ग दाखवताहेत देशाला—"

"भले भले ! आतां तर अगदी चीत झालों बुवा आपण !—इतक्या सुंदर मुखांतून गांधींच्या धोरणाची वकिली ऐकल्यावर कुणाला आपला पराभव झाल्याचं कबूल करण्याचा मोह पडणार नाहीं ?" प्रोफेसरसाहेब तिच्या त्या भाषणावर खूष होऊन उद्गारले. "पण आमचंही म्हणणं थोडंसं ऐकून घ्याल कीं नाहीं ?—गांधीची असहकारितेची कल्पना उमदी असेल. पण ती व्यवहार्य आहे का ? आयर्लंड आमच्यापेक्षां कितीतरी पटीनं अधिक संघटित; पुन्हा तिथले लोक सशस्त्र; आणि बंडखोरीची भावना तर त्यांच्या रक्तांत अगदीं भिनलेली.—पण सिनफेनांची आज कशी त्रेधा उडाली आहे पहातां ना ? अशा स्थितींत आपण ब्रिटिश सरकारशीं असहकारिता करण्याच्या गोष्टी बोलणं,

म्हणजे जिथं हत्तीच्या धडका काम देऊं शकत नाहींत, अशा तटावर माणसांनीं आपलं डोकं फोडून घेण्यासारखं आहे.—असल्या त्राग्यानं का कुठं राजकारणं होत असतात ?—शिवाय गांधीच्या धोरणाला काडीइतका तरी धर आहे का ? ज्यांनीं ज्यांनीं आजपर्यंत त्याच्या चळवळींत भाग घेतला, त्यांना त्यांना तोंडघशीं पाडलंय त्यानं आयत्या वेळीं मोर्चा फिरवून ! दक्षिण आफ्रिकेंत मार खाण्याची पाळी आली होती त्याच्यावर या अवसानघातकीपणामुळं !—अन् गोखले जर आफ्रिकेला गेले नसते, तर सारं गाडं उलटत होतं बघा त्याच्या अंगावर ! अहो, इतकं कशाला ? अमृतसरला यानं काय केलं ? तिथं यानंच हट्ट धरला होता ना कॉंग्रेसनं बिनशर्त सहकार्याचा ठराव करावा म्हणून ? सहा महिने नाहीं झाले अजून पुरते त्या गोष्टीला अन् आतां म्हणतो असहकारिता करा ! बरं, ती तरी कशासाठीं करायची ? तर सगळ्या अन्यायांचं आणि अत्याचारांचं माहेरघर म्हणून इतिहासांत गाजलेल्या खिलापतीच्या संरक्षणासाठीं !—जगांतल्या साऱ्या सुबुद्ध लोकांचा धर्म, धर्मगुरु आणि धर्मपीठ यांच्यावरला विश्वास उडत चाललाय; अन् हे उल्लू निघाले आहेत खिलापतीसारख्या जुलमी धर्मपीठाचं रक्षण करण्यासाठीं लोकांचा बळी द्यायला ! खरोखरी, असल्या या छांदिष्ट, लहरी अन् अवसानघातकी माणसापेक्षां बळवंतराव फार बरे बुवा !—"

"एकंदरींत बळवंतरावांना बरे म्हणण्याचा प्रसंग आला अखेर तुमच्यावर, प्रोफेसरसाहेब !" एकाएकीं दिवाणखान्याच्या दाराच्या बाजूनें आवाज आला.

त्याबरोबर सर्वांचें लक्ष तिकडे वेधलें.

---

प्रकरण एकविसावें

## वीरेंद्राचा जाहिरनामा



"—एवढ्यानंच संपलं नाहीं;—महात्माजींनाही बरे म्हणण्याचा प्रसंग लवकरच येणार आहे तुमच्यावर," भगवंतरावांनीं अर्धवट उच्चारलेलें वाक्य आंत येतां येतां पुरें केलें.

त्यांना पाहिल्याबरोबर प्रमिला एकदम उठून उभी राहिली; व इतरांनींही आदरसूचक अशा हालचाली बसल्या जागीं केल्या. त्यांच्या मागोमाग केशव आणि नानासाहेब आंत आले. केशव खिडकीजवळ जाऊन उभा राहिला; व भगवंतराव आणि नानासाहेब आपल्या नेहमींच्या खुर्च्यांवर बसले.

भगवंतरावांनीं ते शब्द अशा कांहीं पद्धतीनें उच्चारले होते कीं, आतांपर्यंत तेथील वातावरणांत खेळत असलेला उपरोध नाहींसा होऊन, त्याची जागा गांभीर्यानें घेतली. त्यांच्या वाक्यांतील सूचनेचा बोध न झाल्यामुळें प्रोफेसर-साहेबांनीं त्यांना विचारलें, "म्हणजे ?—मी समजलों नाहीं आपण काय म्हणतां तें ?"

"आजचा 'ईव्हनिंग न्यूज' वाचलेला दिसत नाहीं तुम्ही ?"

"कां ?—कांहीं विशेष आहे त्यांत ?"

"विशेष ?" नानासाहेब मध्येंच हातवारे करित उद्गारले. "तुम्ही वाचलंत तर थक्क होऊन जाल—"

"पण कसली एवढी रोमहर्षण वार्ता आहे, तें तर श्रवणपथावर येऊं द्या एकदां आमच्या," शास्त्रीबुवा अधीरतेनें उद्गारले.

"वीरेंद्र चक्रवर्तीचा जाहिरनामा प्रसिद्ध झाला आहे आजच्या 'ईव्हनिंग न्यूज़'मध्यें," भगवंतराव म्हणाले. "त्यांत गांधींच्या योजनेचा निषेध आणि समाजसत्तावादी क्रांतिकारकांच्या कार्यक्रमाचा पुरस्कार केलेला आहे. शेतकरी आणि कामकरी यांची प्रभावी संघटना निर्माण झाल्याशिवाय कोणत्याही प्रकारची सामुदायिक उठावणी शक्य नाहीं, असें वीरेंद्र म्हणतो. खिलापतींच्या प्रश्नावर जोर देण्याचं गांधींचं धोरण अत्यंत घातुक असून, त्यामुळं धर्माचा राजकारणांत शिरकाव होईल; व आज जरी मुसलमान तुम्हांला मिळाले, तरी त्यांच्यांत या चळवळीमुळं उत्पन्न झालेलं धर्मवेड अखेर तुम्हांला भोंवेल, असा इषारा त्यानं दिला आहे. साम्यवाद हाच हिंदुस्थानाला तरणोपाय आहे; त्याचा अवलंब केल्यानेंच सारे बिकट प्रश्न ताबडतोब सुटतील; व म्हणून त्याच्या पायावर राष्ट्रीय सभेची पुनर्घटना केली पाहिजे, असा वीरेंद्राचा हिंदी जनतेला आदेश आहे."

" पण यांत विशेष काय आहे ?—असल्या तात्त्विक जाहिरनाम्याचा राजकारणावर प्रत्यक्ष परिणाम काय होणार ? "

" नाहीं,—ही नुसती तात्त्विक घोषणा नाहीं, बबनराव. आपल्या जाहिरनाम्याच्या शेवटीं वीरेंद्रानं कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना असा स्पष्ट इशारा दिला आहे कीं, साम्यवादाची शपथ घेतलेले अनेक तरुण आज हिंदुस्थानांतील औद्योगिक शहरांत त्याच्या प्रचाराचं कार्य करीत असून, त्यांच्या चळवळीला जर राष्ट्रीय सभेनं पाठिंबा दिला नाहीं, तर तिचीं सूत्रं आमच्या ताब्यांत घेण्यासाठीं आम्ही निकराचे प्रयत्न करूं—"

इतकें बोलून भगवंतराव किंचित् थांबले. त्यांच्या डोळयांत या वेळीं आवेशाची दीप्ति झळाळत होती; व जणुं कांहीं भावी घडामोडींचा चित्रफलक समोर दिसत आहे, अशा भावनेनें त्यांनीं पुन्हा बोलावयाला प्रारंभ केला.

" ही घोषणा सुद्धां एका अर्थानं तात्त्विक आहे, व ती करणारा कदाचित् या देशांत कधींच पाऊल ठेऊं शकणार नाहीं, हेंही खरं. पण म्हणून कांहीं तिची उपेक्षा करून चालणार नाहीं.—निदान ज्या शहरांत लक्षावधि कामगार आणि कारकून मोठ्या कष्टानं जीवितयात्रा कंठीत आहेत, त्या या मुंबईसारख्या औद्योगिक शहरांत तरी या घोषणेंतील कल्पनांचीं बीजं रुजायला फारसा वेळ लागणार नाहीं.—हें शहर म्हणजे जणुं कांहीं दलित बहुजनसमाजाचं धडधडणारं अंतःकरणच आहे.—भांडवलशाहीच्या पोलादी टांचेखालीं दडपल्या गेलेल्या तीव्र आकांक्षा, दास्यविमोचनासाठीं तळमळणारे तरुणांचे साहसी आत्मे आणि दारुण सामाजिक विषमतेमुळं दुखावलेलीं मानी हृदयं;—साम्यवादाला इतकं अनुकूल कार्यक्षेत्र अन्यत्र कुठं आढळेल ?—क्रांतिकारक कल्पनांचं बीज हें वाऱ्याबरोबर फैलावत जातं; आणि सुईच्या अग्राएवढी जरी अनुकूल भूमि त्याला लाभली, तरी तटाच्या भेगेंतील चिमूटभर मातींत उगवून पुढं त्याचा विध्वंस करणाऱ्या अणुमात्र वटबीजाप्रमाणं, तेवढी जागा त्याला फोंफावायला पुरी होते. वीरेंद्राच्या घोषणेचा प्रभाव आज जाणवला नाहीं, तरी दोन तीन वर्षांनीं—कदाचित् वर्षाच्या आंतच जाणवेल. सर जीवनलालांशीं आम्ही बोलत होतों, त्याच वेळीं ' न्यूज 'चा अंक आला.—त्यांतला तो जाहिरनामा पाहतांच सरसाहेब उद्गारले, " हें आणखी एक नवं

संकट दिसतंय.—सध्यां मुंबईतील कामगारांची चळवळ आमच्या मुठींत आहे. —आमच्या पैशाच्या जोरावर सर्व्हंट्स ऑफ इंडियांतलीं माणसं आज ती चळवळ चालवताहेत.—पण हें मार्क्सचं तत्त्वज्ञान जर मजूरवर्गांत फैलावलं तर !—पण मला खात्री आहे, सरकार तें फैलावूं देणार नाहीं.—आमच्या-पेक्षांही सरकारलाच त्याच्यापासून भय जास्त आहे."—सरसाहेबांची भिस्त नेहमींप्रमाणं सरकारवर ! वीरेंद्राचा तो जाहिरनामा वाचल्यावर मुंबईतील पुढल्या साऱ्या वादळाचं—संपाचं आणि गोळीबारांचं भीषण चित्र डोळ्यापुढं उभं राहत—"

भगवंतराव पुन्हा थांबले. क्षणेक त्या दिवाणखान्यांत पूर्ण स्तब्धता होती. केशव खिडकींतून पलीकडल्या सिनेमागृहाजवळ तिकिटें घेण्यासाठीं चाललेली लोकांची दंगल पहात होता. पण त्याचे कान मात्र भगवंतरावांचें भाषण ऐकण्यांत गुंग झालेले होते. खुर्चीवर हात ठेवून उभ्या असलेल्या प्रमिलेची दृष्टि त्यांच्या आविष्ट मुद्रेवर खिळलेली होती. आणि प्रो. राळे अर्धवट तें भाषण ऐकण्यांत व अर्धवट त्यावरून सुचणाऱ्या विचारांत गढून गेलेले होते.

भगवंतरावांच्या भाषणामुळें उत्पन्न झालेली ती निःशब्द गंभीरता दुःसह झाल्यामुळेंच की काय, शास्त्रीबुवा प्रो. राळे यांच्याकडे पाहून म्हणाले, " आप-ल्याला या वार्तेनं खरोखरींच स्तिमित केलेलं दिसतंय, प्रोफेसरसाहेब ?—"

" तसं कांहीं विशेष नाहीं.—पण हें सारं ऐकल्यावर आमच्या कॉलेजांतला तो विद्यार्थी—चंद्रशेखर—त्याची आठवण झाली मला !—"

त्यांचे ते उद्गार ऐकतांच केशवनें एकदम चमकून मागें पाहिलें. त्याचा चेहरा या वेळीं अगदीं विवर्ण झाला होता; व त्याच्या डोळ्यांत सदैव नांदणारा प्रसाद नाहींसा होऊन, ते भयसंमिश्र विस्मयानें विस्फारित झाले होते. त्यानें मागें वळून बघतांच त्याला असें दिसून आलें कीं, प्रमिला आप-ल्याकडे टक लावून पहात आहे. त्याबरोबर तो अतिशय ओशाळला.

शास्त्रीबुवांच्या त्या मध्येंच बोलण्याचा परिणाम असा झाला कीं, समोरच उभ्या असलेल्या प्रमिलेकडे भगवंतरावांचें लक्ष जाऊन, ते तिला म्हणाले, " आपण उभ्या कां प्रमिलाबाई ? बसा ना—"

" वा, वा, हा काय प्रश्न विचारला आपण, भगवंतरावजी ? अतिथीला मधुपर्क सादर केल्याशिवाय त्या कशा बरं आसनस्थ होतील ? " शास्त्रीबुवांनीं पुन्हा मध्यें तोंड घातलें.

" मग आपण काय घेणार ? कॉफी कीं पन्हं ? " प्रमिलेनें स्मितपूर्वक विचारलें.

" खरं म्हणाल, तर कांहींच नको आतां इतक्या उशिरानं.—शिवाय सर जीवनलालांकडून परत येतांना वाटेंत आम्ही घरीं कॉफी घेऊनच निघालों—"

" वा, कांहींच न घेऊन कसं चालेल ?—काय नानासाहेब, मग काय आणायचं ?—"

" पन्हें आणा बापडें हवें तर थोडेंसें;—चवपालटही होईल. काय शास्त्रीबुवा, तुम्हीही घ्यालच आमच्याबरोबर. आज आमची वाट न पहातांच प्रदोष सोडलेला दिसतोय तुम्ही—"

" छे छे, असं कसं होईल ? आपली प्रतीक्षा करीतच होतों आम्ही.—पण प्रेमाबाईनीं आपल्याला यायला विलंब होईल असं सांगितल्यामुळं अल्पोपहार उरकून घेतला आम्ही.—खरंच पण नानासाहेब, आज रावसाहेब कसे नाहीं आले अजून ? " शास्त्रीबुवांनीं तो विषय टाळण्यासाठीं विचारलें.

शास्त्रीबुवांच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतात न पडतात, तोंच प्रमिला ट्रे घेऊन दिवाणखान्यांत आली. ते शब्द ऐकल्याबरोबर तिच्या ओठावर खेळणारें स्मित मावळून, तिचा चेहरा एकदम गंभीर झाला. पण खिडकीला ओठंगून उभ्या असलेल्या केशवशिवाय कुणाच्याच ध्यानांत तो फरक आला नाहीं.

" रावसाहेब ?—रावसाहेब असतील व्रुईनसाहेबांच्या ऑफिसांत अडकलेले आज ! " प्रो. राळे मध्येंच आवेशानं उद्गारले. " रौलट सत्याग्रहाच्या वेळीं सरकारनं त्यांना मुद्दाम बोलावून कामावर घेतलं, तसेच आतांही घेणार असतील.—या बबनरावांना असेल ना बातमी !—काय हो, कसल्या संशोधनांत गुंतले आहेत तुमचे रावसाहेब ?—क्रांतिकारकांच्या का इतिहासाच्या ?—' हर हर महादेव ' पासून ' हिप हिप हुर्रा ' कसं निघालं, याची व्युत्पत्ति बसविण्याच्या उद्योगांत गढलेले असतील बहुधा—"

त्यांच्या या प्रश्नाला बबनराव उत्तर देणार, तोंच केशररंजित पन्ह्यानें भरलेला चांदीचा नक्षीदार पेला त्यांच्या हातांत देत प्रमिलेनें म्हटलें, " रावसाहेबांच्या संशोधनावर बराच राग दिसतोय आपला.—प्रत्येक माणसाला कसला ना कसला तरी नाद असतो, तसा त्यांना संशोधनाचा आहे.—अन् आपण जसा जगांतल्या सगळ्या चांगल्या गोष्टींचा संबंध इंग्रजीशीं जोडतां, तसा ते मराठीशीं जोडतात.—त्यांच्या त्या अतिरेकांत निदान देशाभिमानाची तरी भावना आहे—"

" वा वा, केवढा देशाभिमान !—आपल्यासारख्यांनीं त्यांची बाजू घेतल्यावर आम्हांला तरी नाहीं बुवा धैर्य होणार त्यांना नांवं ठेवायचं," प्रोफेसरसाहेब पेला ओठाला लावतां लावतां उद्गारले.

पण त्यांना उत्तर न देतां ट्रेमधील शेवटचा पेला केशवला देण्यासाठीं प्रमिला त्याच्याजवळ गेली; व त्याच्या हातांत पेला देत तिनें त्याला हळूच स्मितपूर्वक विचारलें, " कधीं आलांत माथेरानहून परत ?—चंद्रशेखरसुद्धां आले का ? "

" हो,—चार पांच दिवस झाले परत आल्याला.—ललिताताई थोडीशी आजारी असल्याचं पत्र आलं दादांकडून;—म्हणून जरा लवकरच निघालों.—शिवाय आतां निकालही आलाय जवळ परीक्षेचा—"

शेवटचें वाक्य उच्चारतांना केशव किंचित् हंसला.

" निकालाची काय काळजी आहे तुम्हांला ? मग कधीं येणार तुम्ही आमच्याकडे ?—चंद्रशेखरांना मी बोलावलंय म्हणून सांगा एक दोन दिवसांत.—थोडंसं काम आहे माझं त्यांच्याशीं—"

" ताईला सध्यां बरं नाहीं.—मी निकाल लागल्यावरच येईन.—चंद्राला सांगतों निरोप आपला—"

इतक्यांत त्या दोघांचें लक्ष नानासाहेबांनीं प्रो. राळे यांना विचारलेल्या प्रश्नाकडे वेधलें. मेजावर ठेवलेल्या चिनी मातीच्या सुबक सफरचंदांतील थोडीशी मिरपूड पन्ह्यांत टाकीत नानासाहेबांनीं विचारलें, " कां हो राळेसाहेब, मघाशीं तुम्ही आमच्या त्या चंद्रशेखरविषयीं बोलत होतां;—त्याचा काय संबंध वीरेंद्राच्या जाहिरनाम्याशीं ? —"

" अरे हो, मी सुद्धां तेंच विचारणार होतों;—पण विस्मरणच झालं पहा अगदीं या आम्रासवपानाच्या गडबडींत," शास्त्रीबुवा रिकामा झालेला पेला खालीं ठेवीत उद्गारले.

" तसा विशेष कांहीं नाहीं म्हणा; अन् कदाचित् असलाच, तरी आपल्याला तो कसा कळणार ?—रावसाहेब कदाचित् कांहीं सांगू शकले तर, " प्रो. राळे प्रमिलेकडे पहात हंसत म्हणाले. " बी. ए. च्या परीक्षेंतून मोकळा झाल्याबरोबर त्यानं सोशॅलिस्ट क्लब काढल्याचं मी ऐकलं; अन् परवाही मजुरांच्या वस्तींत जाऊन रात्रीचीं व्याख्यानं देत असतो म्हणे तो. शिवाय त्यानं यूनियनमध्येंही शिरण्याचा प्रयत्न चालवलाय, असं परवांच मला एकॉनॉमिक सोसायटीच्या सभेच्या वेळीं चितळ्यांनीं सांगितलं.—आमच्या कॉलेजांतलीं बरींच पोरं लागलीं आहेत मागं त्याच्या. माझी खात्री आहे कीं, सर जीवनलालांच्या कानावर जर या साऱ्या गोष्टी गेल्या, तर ते कांहीं त्याला डोंगरी दाखवल्या-शिवाय राहणार नाहींत ! "

बोलतां बोलतां त्यांनीं वामांगवेपनपूर्वक विकट हास्य केलें.

पण त्यांच्या त्या हंसण्याला कोणीच साथ दिली नाहीं. उलट भगवंतरावांच्या गंभीर चेहऱ्यावर किंचित् उग्रतेची छटा येऊन ते उद्गारले, " निघू या आतां नानासाहेब;—आधींच उशीर झालाय पुष्कळ—"

ते लगेच उठून उभे राहिले.

त्याबरोबर इतका वेळ आंवरून धरलेली आपली जिज्ञासा तृप्त करून घेण्यासाठीं बबनरावांनीं मोठ्या उत्कंठेनें त्यांना विचारलें, " सर जीवनलालांनीं कशाला बोलावलं होतं आपल्याला अन् नानासाहेबांना ?—कांहीं सांगितलं नाहीं आपण.—विशेष खाजगी तर नव्हतं ना ? "

" छे, खाजगी कसलं आलंय ?—त्यांना एवढंच आश्वासन आमच्याकडून हवं होतं कीं, आम्ही गांधींच्या चळवळीला पाठिंबा देणार नाहीं—"

" मग आपण दिलं तें आश्वासन ? " शास्त्रीबुवांनीं मध्येंच विचारलें.

" आम्ही त्यांना निश्चित असं कांहींच सांगितलं नाहीं.—मी त्यांना एवढंच म्हटलं कीं, खिलापतीचा संबंध हिंदी राजकारणाशीं जोडण्याची गांधींची कल्पना

आम्हांला पसंत नाहीं; व त्यांच्या कार्यक्रमांतील बहुतेक गोष्टी आम्हांला अव्यवहार्य वाटतात.—इतकं बोलणं होतंय तों 'न्यूज'चा अंक आल्या-मुळं संभाषणाला निराळाच फांटा फुटला.—बरं, मग निघतों प्रमिलाबाई आम्ही आतां—"

भगवंतरावांनीं तिच्याकडे पाहून स्मित करित निरोप घेतला.

"आजचें पन्हें अगदीं नामी झालें होतें, काय शास्त्रीबुवा?" नाना-साहेब हातांतील काठीवर आपला भार टाकीत हंसत हंसत म्हणाले.

"वा वा, तें काय सांगायला हवं? मघांशींच मी प्रोफेसरसाहेबांना म्हटलं कीं, आमची पर्पटी तुच्छ आहे या इथं मिळणाऱ्या पेयांपुढं—"

"आहांतच आपण तसे रसिक! आपलं हें वैदग्ध्य बघितलं म्हणजे केव्हां केव्हां मला असं वाटतं कीं, आपण चुकून हा वैद्याचा पेशा पत्करला.—आपली योग्यता खरोखरी कवि व्हायचीच होती शास्त्रीबुवा—"

"अहो, कवि आणि वैद्य यांत तुम्ही व्यर्थ भेद करतां आहां! आमच्या वंगभाषेंत वैद्याला जी कविराज म्हणून अभिधा आहे, ती कांहीं उगाच नव्हे. वैद्य हा व्याधींवर उपचार करतो; तर आधींचं—साऱ्या मनसिज वेदनांचं—मनोरुजांचं निदान आणि निरसन कवि करतो. वस्तुतः एकाच व्यवसायाचीं दोन अंगं आहेत हीं.—आमचा आयुर्वेद तुमच्या मटीरिया मेडिकासारखा नीरस नाहीं, प्रोफेसरसाहेब! त्यांतलीं रसायनांचीं अन् मात्रांचीं नांवं म्हणजे काव्यं आहेत मूर्तिमंत! चंद्रकला, प्राणेश्वर, पुष्पधन्वा, वसंत-कुसुमाकर.—वा वा!—आहे कांहीं असं तुमच्या त्या ॲलोपॅथींत? असल्या काव्यमय औषधींची योजना करणाराचं हृदयही पण काव्यमयच हवं.—वाटल्यास अनुभव घेऊन पहा—"

"चला शास्त्रीबुवा!—प्रोफेसरसाहेबांकडे प्रमदानंदपर्पटीची एक कुपि पाठवून द्या तुम्ही;—ती या वक्तृत्वापेक्षां अधिक खात्री पटवील त्यांची तुमच्या कवित्वाविषयीं," बबनराव शास्त्रीबुवांच्या पाठीवर थाप मारीत त्रासून उद्गारले.

ती मंडळी गेल्यानंतर प्रमिलेनें दिवाणखान्यांतील सर्व दिवे मालवले; व आपल्या अंगावर प्रकाश न येईल अशा रीतीनें, मेजावरील निळें आच्छादन

घातलेल्या, वेळ्या मंद दिव्याचें तोंड फिरवून ती खिडकीजवळच्या कोंचावर येऊन पडली. तिच्या विषण्ण मनाला तो एकांत आणि तो अंधार म्हणजे एक विरंगुळाच वाटला. दुःखाच्या कोणत्याही प्रसंगीं मनुष्याला उजेडापेक्षां अंधारच अधिक प्रिय वाटतो. कारण, प्रकाशांत जशी मनाला उल्लसित करण्याची, तशी अंधारांत मनाचें सांत्वन करण्याची शक्ति असते. आणि, रात्रीच्या तिमिरांत दिवसा कधींच न दिसणारे अनेक द्युतिपुंज व्यक्त होऊन, आपल्या मधुर तेजानें ज्याप्रमाणें त्याचा भयाणपणा नाहींसा करितात, त्याप्रमाणें दुःखाच्या वेळीं अंधाराला अभिमुख होणाऱ्या मनांत पुष्कळदां मृदु स्मृतींचे कल्लोळ उठून, त्यांत साऱ्या दुःखद भावनांचा विलय होऊन जातो. त्यांतून ज्यांना कोणी जिव्हाळ्याचें माणूस नसतें, अशा व्यक्तींना तर दुःखाच्या प्रसंगीं अंधारासारखा दुसरा निवारा नाहीं. कारण, जगाला विटलेल्या व्यथित मनाला अंतर्मुख होऊन स्वतःचें सांत्वन करून घेण्याची संधि तो देत असतो.

प्रो. राळे यांनी सघांशीं केलेल्या त्या अतिप्रसंगामुळें प्रमिलेचें मन अत्यंत त्रस्त झालें होतें. आपण पत्करलेल्या जीवनक्रमाच्या हीनतेची किंवा आपल्या अशरणतेची ज्या प्रसंगांमुळें तिला केव्हां केव्हां जाणीव होत असे, त्यांपैकींच तो एक प्रसंग होता. तारुण्याच्या आरंभीं आपल्यापेक्षां वयानें किंचित् मोठ्या, पण यौवनाचा बहर अणुमात्रही न ओसरलेल्या, रसिक पुरुषाचें साहचर्य लाभल्यामुळें बुद्धिमान् स्त्रीच्या जीवनाला जी एक प्रकारची गोडी येते, तिचा अनुभव तिला अद्याप आलेला नव्हता. रावबहादुरांचा कृपाकटाक्ष ज्या वेळीं तिच्यावर पडला, त्या वेळीं ते आयुष्याच्या उतरणीला लागले होते. त्यामुळें त्यांच्या सहवासांत तिला समवयस्क अननुभवी प्रेमिकाच्या दुर्दम उत्कंठेपेक्षां तरुणींची मृगया करण्याच्या कसबांत मुरलेल्या कितवाच्या सावध अनुनयाची सहेतुकताच नेहमीं प्रत्ययाला येत असे. अर्थात् तिच्या मनाची आंतरिक तृष्णा कधींच तृप्त झाली नाहीं; व इतर रीतींनीं तिचें आयुष्य जों जों यशस्वी होत गेलें, तों तों ती तृष्णा वाढतच गेली.

भगवंतरावांची ओळख झाल्यावर त्यांच्या बुद्धीचा प्रभाव पाहून प्रमिला मोहित झाली; व त्यांच्या सहवासांत आपल्याला उच्च बौद्धिक प्रेमाचा लाभ होईल, असें तिला वाटलें. पण भगवंतरावांना तिच्या प्रेमाचा अंगीकार करणें

अशक्य होतें. एक तर, तसें करण्यानें पार्वतीवरील प्रेमाशीं प्रतारणा केल्यासारखी होईल, असें त्यांना वाटे; व दुसरें असें कीं, देशमुखबंधूंनीं तिच्या भोंवतीं कोणते पाश पसरून ठेवले आहेत, याची त्यांना पूर्ण जाणीव होती. त्यामुळें तिच्याविषयीं आपल्याला वाटणारें आकर्षण त्यांनीं वाढूं दिलें नाहीं. ते आपल्याशीं तुटकपणानें वागतात, ही गोष्ट प्रमिलेच्या मनाला फार जाचत असे. आपल्याविषयीं त्यांचें मन शुद्ध नाहीं, अशी तिची भावना झाली होती; व या भावनेचा तिच्या मनावर इतका विदारक परिणाम झाला होता कीं, आपल्या विचित्र जीवनक्रमामुळें आपल्याला निरभिलाप प्रेमाचा लाभ कधींच घडणार नाहीं, असें तिला अलीकडे पुष्कळदां वाटत असे. त्यामुळें सर्व प्रकारची समृद्धि सभोंवतीं असतांना सुद्धां तिचें जीवन काळवंडल्यासारखें झालें होतें. आणि, मनाला लागण्यासारखा कोणताही प्रसंग घडला, म्हणजे स्वतःचा सारा शबल जीवनक्रम डोळ्यांपुढें उभा राहून तिच्या हृदयाला दारुण वेदना होत असत.

कोंचावर येऊन पडतांच त्याच्यावरील मऊ गिरद्यांत तिनें आपलें मस्तक लपविलें. त्याबरोबर तिच्या तोंडांतून अगदीं अस्पष्ट असा हुंदका आपोआप बाहेर पडला. जणुं कांहीं, मानवी हृदयाच्या ठिकाणीं कधीं न आढळणारें असें मार्दव तिला त्या गिरद्यांच्या ठिकाणीं अनुभवाला आल्यामुळेंच, अंतःकरणांत गदमदत असलेल्या तिच्या दुःखाला अशा रीतीनें वाचा फुटली. थोडा वेळ ती तशीच पडून राहिली होती. पण तितक्यांत तिला कसली तरी आठवण झाल्यामुळें ती उठली; आपलें किंचित् विसकटलेलें प्रसाधन तिनें नीटनेटकें केलें; व टेबलावर असलेली हॉल केनची 'इटर्नल सिटी' ही कादंबरी घेऊन ती पुन्हा कोंचावर येऊन पडली.

तिनें ती कादंबरी उघडून वाचण्याचा प्रयत्न केला. पण तिचें मन लागेना. इतक्यांत अकस्मात् बटन ओढलें जाऊन, तिच्या अंगावर प्रकाशाचा झोत पडला. त्याबरोबर दचकून तिनें दाराकडे पाहिलें. तेव्हां, रावसाहेब आंत आलेले असून, ते आपल्याकडे विस्मित दृष्टीनें पहात आहेत, असें तिला दिसलें. त्यांना पाहून ती लगबगीनें उठणार, तोंच रावसाहेब तिच्याजवळ येऊन कोंचापाशीं असलेल्या खुर्चीवर बसत उद्गारले, "उठूं नकोस, प्रेमा.—तुला बरं वाटत नाहीं का आज? मी मोटारींतून जेव्हां दिवाणखान्यांत अंधार असल्याचं बघितलं,

तेव्हां मला वाटलं तूं कदाचित् त्या प्रोफेसराबरोबर फिरायला गेली असशील—"

" आपल्याला असं भलतंच कसं वाटलं, रावसाहेब ? त्या आचरट माणसाबरोबर फिरायला जाणं मला शक्य कसं आहे ?—"

" नाहीं, नाहीं; मला माहित आहे तुझा स्वभाव.—पण नुसती शंका येऊन गेली.—आतांशा तो फारच लघळपणा करीत असतो;–म्हणून वाटलं कीं, त्याच्या आग्रहाला त्रासून तूं गेली असशील कदाचित् त्याच्याबरोबर.—पण खरं सांग, तुला काय होतंय प्रेमा, आज ?

रावसाहेबांनीं मोठ्या प्रेमानें तिचे हात आपल्या हातांत घेत विचारलें.

" कांहीं नाहीं. ही सारी मंडळी उठून गेल्यावर, चैन पडेना म्हणून फक्त एवढा एक दिवा शिल्लक ठेवून, कांहीं तरी वाचीत पडलें होतें कोंचावर.—पण रावसाहेब आज आपल्याला इतका उशीर कां झाला यायला ? आम्ही फार वाट पाह्यली आपली—"

" मी आज सकाळीं नवाला जो घरांतून बाहेर पडलों, तो आतां घरीं परत चाललोंय—"

" म्हणजे ?—मग खायला आणूं का आपल्याला कांहीं ? आल्याबरोबर कां नाहीं आपण सांगितलं मला हें ?" प्रमिला लगबगीनें उठत म्हणाली. " अन् आज इतका वेळ आपण कुठं होतां ? ब्रुईनसाहेबांकडे तर नव्हे ?—"

" होय, तिथंच होतों. आणि माझं जेवण वगैरे सारं त्याच्याचबरोबर झालं आज." रावसाहेब तिचे हात सोडून देऊन उद्गारले. " पण हें बघ बेटा, मला तूर्त कांहींच खायला वगैरे नकोय.—आधीं मला हें सांग बरं,—इथं आज कांहीं विशेष बोलणं निघालं होतं का ?—"

" हो, वीरेंद्र चक्रवर्तीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्याचं भगवंतरावजींनीं सांगितलं अन् त्यावर वादही झाला थोडासा—"

" चंद्रशेखरचं नांव निघालं होतं त्या वादांत ?"

" कां बरं ?" प्रमिलेनें किंचित् चपापून विचारलें.

"सांग तर खरं आधीं मला.—मग मी तुला सांगणारच आहें साऱ्या गोष्टी.—तेवढ्याचसाठीं तर मी ब्रुईनसाहेबाकडून निघाल्यावर आधीं इथं आलों"—

"त्यानं सोशॅलिस्ट क्लब काढल्याचं राळ्यांनीं सांगितलं; अन् तो हल्लीं परळला मजुरांच्या वस्तींत व्याख्यानं देत असतो, असंही म्हणत होते ते. पण रावसाहेब, आपल्या आजच्या कामाशीं या साऱ्या गोष्टींचा संबंध काय ?

"तेंच सांगणार आहे तुला मी," रावसाहेब अगदीं गंभीर आवाजांत म्हणाले. "ब्रुईनसाहेबानं मला आज सकाळीं नवाला फोन केला.—मी ऑफिसांत गेल्याबरोबर त्यानं प्रथम तो जाहिरनामा माझ्यापुढं ठेवला, अन् त्या जाहिरनाम्याच्या मागं मुंबईत जे तरुण आहेत, त्यांच्या हालचालींची माहिती काढण्याचं काम माझ्यावर सोंपवलं—"

"पण एवढं सांगण्यासाठीं सारा दिवस त्यानं आपल्याला ठेवून घेतलं ?–छे, छे, आणखी कांहीं तरी बोलणं खास झालं असलं पाहिजे—"

"तें तूं आतां विचारूं नकोस !—जसजसं तूं जाळं आंवळीत जाशील, तसतसं प्रसंगाप्रसंगानं मी सांगेन तुला सारं कांहीं.—ब्रुईनसाहेबानं आज पुष्कळ कागदपत्र दाखवले मला.—तो जाहिरनामाच मुळीं आमच्या खात्याच्या हातीं आल्याला आतां दोन महिने झाले असतील.—पण तो मुद्दामच दाबून ठेवला होता इतके दिवस.—गांधींची चळवळ सुरू झाल्यावर त्याच्याविषयीं मनांतून सहानुभूति बाळगणाऱ्या मवाळांना बुजगावणं दाखवून आपल्या बाजूला ओढण्यासाठीं तो या वेळीं प्रसिद्ध करण्यांत आला आहे.—अन् त्याचं प्रत्यंतरही अगदीं हातोहात आलं !—सर जीवनलाल अन् सर माणेकजी संध्याकाळीं आफिसांत आले होते आज आमच्या.–त्या जाहिरनाम्याला आम्ही भीत नाहीं.—पण गेल्या सहा महिन्यांत जो पत्रव्यवहार आम्ही पकडला आहे, त्यावरून क्रांतिकारकांचीं तत्त्वं आणि पैसा दोन्ही मुंबईत चांगलीं फैलावलीं आहेत, हें स्पष्ट दिसतं.—त्याचा माग काढायचं काम माझ्यावर सोंपवलंय ब्रुईनसाहेबानं.—प्रेमा, तुला माहीतच आहे,—या कामांत माझी सारी भिस्त तुझ्यावर आहे." बोलतां बोलतां रावसाहेबांनीं तिच्या तुळतुळीत केशकलापावरून लडिवाळपणानें हात फिरवावयाला सुरवात केली; आणि क्षणैक थांबून विचारलें, "चंद्रशेखर परत आल्याचं मी कळवलं होतं तुला;—तूं कधीं बोलावलं आहेस त्याला इथं ?—"

प्रमिला कांहींच बोलली नाहीं.

"कां बेटा, बोलत कां नाहींस ?–मला वाटलंच तुला आज कांहीं तरी होतंय म्हणून," रावसाहेब तिचे हात आपल्या हातांत घेऊन कुरवाळीत म्हणाले.

"नाहीं, मला कांहींही होत नाहीं.—पण रावसाहेब, उगाच घातलं आपण मला या कामांत ? माझ्या मदतीशिवाय चालणार नाहीं का आपलं ?—"

तिच्या त्या उद्गारांत इतकी कांहीं कणव भरलेली होती कीं, ते ऐकून रावसाहेब अगदीं चकित झाले; व या वेळेपर्यंत आपल्या हातांत असलेले तिचे दोन्ही हात एकदम सोडून देऊन त्यांनीं तिच्याकडे निरखून बघितलें. पण, देंठाच्या नाजूकपणामुळें कललेल्या अर्धोन्मीलित कमलांतील केसर जसे दिसूं नयेत, तसे तिच्या अवनत नेत्रांतील भाव त्यांना न्याहाळतां आले नाहींत. तिचें तें सारेंच वर्तन त्यांना मोठें चमत्कारिक वाटलें; आणि, तिच्या अवनम्र मुखावर आपली नजर रोंखून, त्यांनीं किंचित् अधीरतेनें बोलावयाला प्रारंभ केला.

"प्रेमा, आजपर्यंत कधीं ऐकली नव्हती मी ही भाषा तुझ्या तोंडून. बेटा, तूं जर अशा रीतीनं हातपाय गाळलेस, तर मी मदतीसाठीं कुणाच्या तोंडाकडे बघावं ?—चंद्रशेखरच्या हालचालींचा ठाव तुलाच कदाचित् काढतां आला तर येईल. मी आज दोन महिने त्याच्या आईकडे नानासाहेबांबरोबर खेटे घालतोंय. पण त्या बाईला गंधसुद्धां नाहीं मुलाच्या उद्योगांचा.—अन् तो माझ्याशीं इतक्या लाघवीपणानं वागतो, पण पत्ता नाहीं लागूं देत कुठल्याही गोष्टीचा.—त्याच्या त्या गुप्तेमास्तराकडेही अलीकडे मी ज्ञानेश्वरीची चर्चा करायला जात असतों. पण तोही गृहस्थ अगदीं पक्का आहे. प्रेमा, तूंच काढली पाहिजेस सारी माहिती आतां चंद्रशेखरपासून.—अन् त्याचा थांग जरी कदाचित् तुला लवकर लागला नाहीं, तरी भगवंतरावजींच्या बाबूला तुला सहज फोडतां येईल. तो पोर अगदीं कोंवळ्या मनाचा अन् कच्चा आहे अजून—"

बोलतां बोलतां पुन्हा रावसाहेबांनीं तिचे हात आपल्या हातांत घेतले.

"आपण म्हणतां तें सारं खरं, रावसाहेब.—पण मला वाटत नाहीं, हें काम माझ्या हातून निभेल म्हणून.—माझ्या अन् त्याच्या आतांपर्यंत दोन भेटी झाल्या. त्याचं माझ्याशीं वर्तन अत्यंत सावधपणाचं असतं. अन् शिवाय—"

"शिवाय काय ?"

"त्याला पाहिल्याबरोबर मला व्यर्थ हें काम हातीं घेतल्यासारखं वाटतं.—रावसाहेब, क्षमा करा मला.—त्याच्याशीं अशा रीतीनं वागायला माझं मन घेत नाहीं," प्रमिलेनें त्यांच्याकडे पहात भीत भीत म्हटलें.

पण तिला त्यांच्या चेहऱ्यावर रागाचें किंवा निराशेचें यत्किंचित्ही चिन्ह दिसलें नाहीं. ते क्षणभर गप्प होते. नंतर किंचित् हंसून म्हणाले, "प्रेमा, समजलों मी तुझ्या बोलण्याचा अर्थ.—त्याला बघितल्यावर त्याच्याविषयीं मनांत लोभ उत्पन्न व्हावा असाच मुलगा आहे खरोखरी तो. पण तूं विसरूं नकोस,—हें राजकारण आहे.—अन् बेटा, असल्या या नाजूक कामांत तूं या पांढऱ्या केंसांना दगा देणार ?—नाहीं, नाहीं. हें काम तुझ्याशिवाय होणं अशक्य आहे. अन् तुला तें केलंच पाहिजे—"

रावसाहेब अत्यंत मायेच्या पण हुकमी आवाजांत उद्गारले.

प्रमिला स्तब्धच होती.

"कां ?—बोलत कां नाहींस, बेटा ?" रावसाहेबांनीं तिच्या केशकलापावरून पुन्हा हात फिरवावयाला सुरवात केली. "प्रेमा, आज तूं वचन दिलं पाहिजेस मला हें काम करीन म्हणून. बोल, बोल, बेटा—"

"पहातें प्रयत्न करून;—आपला शब्द मी कसा मोडीन ? आतांच बाबू-बरोबर निरोप पाठवलाय मी त्याला—"

"शाबास बेटा !—माझा म्हाताऱ्याचा सारा धीर परत आला तुझ्या या शब्दांनीं.—बरं मी जाऊं आतां ?"

"पण आपल्याला कांहींसुद्धां खायचं नाहीं ?—पन्हं आणूं का थोडं ?"

"नको.—माझं पोट अगदीं भरलेलं आहे आज ब्रुईनसाहेबाच्या कृपेनं," रावसाहेब हंसत हंसत म्हणाले; व तिच्या पाठीवर एकवार हात फिरवून ते उभे राहिले.

ते दारांतून बाहेर पडतांच प्रमिलेनें पुन्हा दिवे मालवून आपलें मस्तक गिरद्यांत लपविलें.

---

## प्रकरण २२ वें

# उर्वशीचा निष्फळ अभिसार



चंद्रशेखरचा तिथें एकट्यानें येण्याचा तो पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें दिवाणखान्यांत पाऊल टाकतांच त्याचें चित्त किंचित् बावरल्यासारखें झालें. सूर्य अद्याप मावळलेला नव्हता. पण, आकाश इतकें भरून आलेलें होतें कीं, या दिवसांत पुष्कळ वेळ टिकणारा संधिप्रकाश आज अगदींच अंधुकून गेला होता. खिडकींतून वाऱ्याची एकाद दुसरी झुळूक क्वचित् आंत येत होती. जणुं कांहीं, वर्षर्तूच्या आगमनाची वाट उत्कंठेनें पहात असलेल्या सृष्टीनें वैतागानें टाकलेला तो उसासाच होता. ती झुळूक आंत आली, म्हणजे निष्प्रकाश होत चाललेल्या त्या दिवाणखान्यांतील खिडक्यांतून ठेवलेल्या फुलांचा परिमळ सुस्तपणानें दरवळत असे. वाऱ्याची ती विरळ झुळूक, तो प्रकाशाचा वाढता अभाव आणि त्या कुंद वातावरणांत पसरलेला फुलांचा मंद गंध;–चंद्रशेखरचें मन त्या परिस्थितीनें अधिकच अस्वस्थ केलें.

त्याला तिथें यावयाला थोडा उशीर झाला होता. त्यामुळें, प्रमिला आपली वाट पहातच बसलेली असेल, अशी त्याची अपेक्षा होती. पण, दिवाणखान्यांत कोणीच नाहीं असें पाहिल्यावर, त्याला किंचित् आश्चर्य वाटलें. त्यानें थोडा वेळ वाट पाहून नंतर टेबलावरील घंटा दाबली. त्याबरोबर दारावर सोडलेला सुंदर पडदा बाजूला सारून प्रमिलेनें हंसत हंसत दिवाणखान्यांत प्रवेश केला.

प्रमिला या वेळीं अतिशय मोहक दिसत होती. ती पारव्या रंगाचें तलम पातळ नेसली होती; व कानांवरून केंस वर्तुलाकार घेऊन त्यांचा तिपेडी अंबाडा तिनें घातला होता. केंसांच्या त्या वर्तुलाखालीं शोभणारीं तिच्या कानांतील हिऱ्यांचीं कुडीं काळ्याभोर ढगाच्या कडेलगत तळपणाऱ्या शुक्राच्या ताऱ्यासारखीं दिसत होतीं. पडदा बाजूला सारून आंत येतांना ती, दिव्याचें बटन दाबण्यासाठीं म्हणून, उंबरठ्यापाशींच क्षणार्ध थांबली. त्या वेळीं तिच्या तोंडावर उसळलेल्या हास्याच्या उर्मींत असे कांहीं भाव व्यक्त झाले कीं, चंद्रशेखरच्या गुदमरलेल्या

भावनांना आपल्या अंगावर एकदम खुल्या दिलाच्या चांदण्याचे कवडसे पडल्याचा भास झाला.

पण तिची आणि त्याची दृष्टादृष्ट होतांच तो गोंधळून गेला; व तिच्या गालांवर खेळत असलेल्या हास्याचें प्रतिबिंब त्याच्या मुखावर उमटण्याऐवजीं, पूर्वी कधीं न वाटलेला असा, एक प्रकारचा चमत्कारिक संकोच त्याला वाटून, त्याचें मन अधिकच बावरलें. आपल्याला हा कसला संकोच वाटत आहे, हें त्याचें त्यालाच समजेना. आपण इथें प्रथमच एकटे आल्यामुळें तर आपल्या मनाची अशी अवस्था झाली नसेल ना, अशी एक कल्पना त्याच्या मनांत आली; व क्षणैक तो अगदीं स्तब्ध राहिला.

त्याची ती गोंधळलेली मनःस्थिति प्रमिलेच्या लक्षांत आली; आणि, सरोवराचें पाणी पायानें मुद्दाम चाळवून त्यांत पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाची चलबिचल कुतूहलानें बघणाऱ्या लीलावतीप्रमाणें, आपल्या दृष्टभेटीमुळें बावरलेलें त्याचें तें मुखमंडल तिला मोठें मनोहर वाटलें. ती मेजापाशीं येऊन उभी राहिली; व त्याच्या मुद्रेवरील आपली दृष्टि ढळूं न देतां तिनें त्याला स्मितपूर्वक विचारलें, " माझी वाट पहात बसावं लागलं नाहीं तुम्हांला? अन् आज तुम्ही एकटे कसे? मला वाटलं होतं, नेहमींप्रमाणं कृष्णार्जुनांचं दर्शन होईल म्हणून! ललितेची प्रकृति बरी आहे ना आतां?—मग बाबुराव कां नाहीं आले?—"

" प्रकृति बरी आहे तशी.—पण नेहमीं कुणी तरी बसावं लागतं जवळ. शिवाय त्याच्यावांचून तर अगदीं पान नाहीं हलत लतातोईचं.—त्यामुळं नाहीं आला तो आज—"

" तुम्ही एकटे आलांत हें बरंच झालं एका परीनं. मला तुमच्याशीं आज कांहीं विशेष बोलायचंय.—पण आधीं तोंड थोडंसं गोड करूं अन् मग बोलत बसूं सावकाश.—तुम्हांला आज घाई नाहीं ना जाण्याची?—"

इतकें बोलून, त्याच्या उत्तराची वाट न पहातांच, ती लगबगीनें आंत गेली.

तिचे ते उद्गार आणि तें वर्तन सारेंच चंद्रशेखरला मोठें अनपेक्षित वाटलें; व त्याच्या मनांत नाहीं नाहीं त्या शंका आल्या.

इतक्यांत पन्ह्यानें भरलेले चांदीचे दोन पेले घेऊन ती आंत आली; व एक पेला त्याच्या हातांत देऊन समोरच्याच खुर्चीवर ती बसली. तिचें तें मोकळें,

निर्भीड वर्तन पाहून, चंद्रशेखरला आपल्या बावरलेल्या मनःस्थितीची लाज वाटली. त्यानें वर बघितलें. त्याबरोबर तिचे ते शोधक नेत्र आपल्या मुद्रेवर खिळले आहेत, असे त्याला दिसलें; व तो अतिशयच ओशाळला.

पण, आपल्या मनाची ती स्थिति प्रमिलेच्या लक्षांत येऊं नये, म्हणून पन्ह्याचे दोन घोंट घेऊन, त्यानें तिला विचारलें, "काय विचारणार आहां आपण आज मला ?"

"मी विचारणार आहे पुष्कळ;—पण तुम्ही मला खुल्या मनानं सांगाल कां ?" प्रमिलेनें अगदीं गंभीरपणानें त्याच्या दृष्टीला दृष्टि भिडवून विचारलें.

"सांगण्यासारखं असेल तर खचित सांगेन. आपण विचारून तर पहा—"

"नाहीं;—माझा शब्द फुकट जावा अशी माझी इच्छा नाहीं. मी तुम्हांला प्रश्न विचारला, अन् तुम्ही उत्तर देण्याचं टाळलं तर ? मग माझी काय शोभा राहिली ? माझ्याशीं मोकळ्या मनानं बोलण्याइतका माझा विश्वास तुम्हांला वाटेल का, चंद्रशेखर ?—"

"मला आपला कांहींच अनुभव नाहीं—"

"अनुभव नसेल.—पण तुम्ही माझ्यासंबंधीं पुष्कळ गोष्टी ऐकल्या असतील.—मुंबईतल्या साऱ्या सुशिक्षितांच्या अड्ड्यांतून माझ्या वर्तनाची चर्चा होते.—माझ्याविषयीं कोण काय बोलत असेल याची मला चांगली कल्पना आहे.—तुमची माझ्याविषयीं काय भावना आहे, मला माहित नाहीं.—पण जग मला स्वैरिणी समजतं.—पुरुषांत निर्भीडपणानं मिसळणारी, त्यांच्या सहवासांत तास न् तास घालविणारी स्त्री,—त्यांतून विधवा !—मला लोक स्वैरिणी समजत असले तर नवल नाहीं. स्त्रीला इतक्या स्वतंत्रपणानं वागतांना पहाण्याची संवय आपल्या समाजाला अद्याप झालेली नाहीं.—मी बोलून चालून समाजाच्या साऱ्या मर्यादा ओलांडल्या आहेत.—त्यांतून माझा अन् रावबहादुरांचा स्नेह-संबंध !"—बोलतां बोलतां ती एकदम उठून उभी राहिली; व आपली विस्फारित दृष्टि चंद्रशेखरच्या दृष्टीला भिडवून तिनें आवेशानें म्हटलें, "लोक काय नाहीं नाहीं तें बोलतात आमच्याविषयीं.—पण चंद्रशेखर, एकाद्या निराश्रित तरुण विधवेला जो पुरुष संकटाच्या काळांत हातभार देतो, त्याच्याविषयीं जर तिला

अतिशय कृतज्ञता,—कृतज्ञतेमुळं उत्पन्न होणारं प्रेम वाटलं, तर तुम्ही तें गैर म्हणाल का? माझ्या आईला आपल्या समाजानं इतक्या वाईट रीतीनं वागवलं कीं, शेवटीं तिला मिशनचा आसरा घ्यावा लागला. आणि मी !—रावबहादुर जर मला भेटले नसते तर !—तर मी आज एकाद्या मिशनमध्यें काम करतांना तुमच्या दृष्टीस पडलें असतें. मदर मला बाप्तिस्मा घेण्यासाठीं किती आग्रह करीत होती !—मी आजपर्यंत या गोष्टी कुणाजवळ बोललें नव्हतें. पण कुणाला ठाऊक कां तें !—तुमच्यापुढं आपल्या आयुष्याचा सारा ग्रंथ उघडा करून ठेवावा, असं मला वाटलं. तुम्हांला पहातांच तुमच्याविषयीं एक प्रकारचा विश्वास माझ्या मनांत उत्पन्न झाला; अन् जिव्हाळ्याच्या पुरुषाशीं सुद्धां स्त्री ज्या गोष्टी कधीं बोलणार नाहीं, त्या गोष्टी तुमच्याशीं मी आज अगदीं निस्संकोच बोलत आहें.—मी किती मजेंत आयुष्य घालवीत आहें, हें तुम्ही पहातांच आहां. पण चंद्रशेखर, तुम्हांला खरं वाटेल का? सुखविलासांच्या या तलम, जरतारी आभरणाखालीं मी माझ्या भग्न हृदयाचीं शकलं झांकून ठेवलेलीं आहेत.—माझ्या इतकी हताश, माझ्या इतकी अभागी स्त्री—"

बोलतां बोलतां तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

तिच्या त्या हृदयाविष्करणानें चंद्रशेखर अधिकच गोंधळून गेला. त्याला काय बोलावें, हें सुचेना. पण, लगेच त्याला वाटलें कीं, इतक्या विश्वासानें ती आपल्याशीं बोलत असतां आपण गप्प बसणें अनुचित होईल. म्हणून तो कांहीं तरी बोलणार तोंच तिनें त्याला म्हटलें, "चंद्रशेखर, माझ्यासारख्या स्त्रीविषयीं तुम्हांला विश्वास वाटेल का?—"

"आपण इतका विश्वास माझ्यावर टाकल्यानंतर आपल्याशीं मोकळ्या मनानं बोलूं नये, असं मला कसं वाटेल? आपण काय विचारणार होतां मला?"

"मला तुमची सहकारी होणं शक्य आहे का?"

"सहकारी? अन् तें कोणत्या कामांत?"

"सध्यां तुम्ही जें काम आपल्या अंगावर घेतलं आहे, त्यांत. बेझंटबाईच्या त्या सभेच्या दिवशीं जेव्हां मी तुम्हांला प्रथम पाहिलं, तेव्हांपासून ही कल्पना माझ्या मनांत घोळते आहे. त्यानंतर मी तुमच्याविषयीं माहिती मिळविण्याचा

प्रयत्न केला; व तुमचे ते प्रोफेसर राळे,—त्यांनीं मला तुमची सारी हकिकत सांगितली—"

"अन् तरी आपल्याला माझ्याशीं सहकार्य करावंसं वाटतं ?—नवल आहे.—त्यांच्या तोंडून माझी हकीकत ऐकून तुमचा ग्रह माझ्याविषयीं वास्तविक प्रतिकूल व्हायला हवा होता—"

"झाला नाहीं खरा. पण त्याला कारण सर्वस्वीं तुमचे गुण. त्यांनीं मजजवळ तुमची कोणतीही नालस्ती करायची शिल्लक ठेवली नाहीं.—पण चंद्रशेखर, तुम्हांला पाहिल्यावर तुमच्याविषयीं लोभ न वाटणं अशक्य आहे. आणि त्यांतून मी तर स्त्री;—जिला जगांत आईच्या करड्या मायेशिवाय दुसरं प्रेम माहीत नाहीं. स्त्रीला कन्या, भगिनी, कांता आणि माता अशा चार प्रकारांनीं अस्तित्व असतं.—हे चार प्रकार म्हणजे तिच्या जीवनाच्या विकासाच्या जणुं कांहीं चार पायऱ्याच आहेत.—आणि, या साऱ्या पायऱ्या चढण्याचं भाग्य ज्या स्त्रीला लाभतं, तिच्याच आयुष्याला पूर्णता येते.—यांपैकीं एकही पायरी जरी दुर्दैवानें चुकली, तरी तिचं जीवन अपुरं राहतं; तिच्या जीवनाची एक ना एक कला तरी अविकसित रहाते; आणि, एक प्रकारच्या अतृप्ततेनं तिच्या भावना सदैव तळमळत राहतात. यांतली एक पायरी चुकली, तरी मनाला जर इतक्या वेदना होतात, तर जिला यांपैकीं कोणतीच पायरी पुरती चढण्याचं सुख लाभलेलं नाहीं, त्या स्त्रीचं आयुष्य कसं जात असेल ?—चंद्रशेखर, मी किती अभागी आहें याची तुम्हांला कधीं कल्पना यायची नाहीं. कळी उमलतांच कोळपून जावी, तसं माझं झालं. स्त्रीच्या जीवनांतल्या धड कोणत्याच अवस्थेचा मला अनुभव आलेला नाहीं. तुम्ही पुरुष जसे पराक्रम करण्यांत आपल्या आयुष्याचं सार्थक मानतां, तशा आम्ही स्त्रिया प्रेम करण्यांत आपल्या जीविताचं साफल्य समजतों. आणि, ही प्रेम करण्याची संधि जेव्हां स्त्रीला मिळत नाहीं, तेव्हां तिचं जीवन आंतल्या आंत पिचून जातं.—चंद्रशेखर, तुम्ही जर मला आपली सहकारी होण्याची संधि द्याल, तर माझ्या आयुष्याला थोडी तरी टवटवी येईल—" बोलतां बोलतां पुढें होऊन तिनें चटकन त्याचा हात धरला.

तिच्या त्या अनपेक्षित कृत्यानें चंद्रशेखर अगदीं स्तिमित झाला; व त्याच्या सर्व अंगांतून एक प्रकारची चमक उठल्यासारखी होऊन, त्याचें तोंड लालबुंद

झालें. आईशिवाय अन्य स्त्रीचा स्पर्श होण्याचा त्याच्यावर तो पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें तो शरमेनें अगदीं चूर झाला; व आपला हात हळूच तिच्या हातांतून सोडवून घेऊन, त्यानें घामानें डबडबलेलें आपलें तोंड रुमालानें पुसलें.

तो स्तब्धच होता.

पण प्रमिलेला ती स्तब्धता दुःसह वाटली.

"चंद्रशेखर, तुम्हांला माझा राग तर नाहीं आला? माझ्या वर्तनाबद्दल तुम्ही गैरसमज करून घेणार नाहीं, अशी मला आशा आहे—"

तिनें मराठींतून सुरू केलेलें भाषण इंग्रजींतून पुरें केलें.

"खास नाहीं.—पण मला आजचा साराच प्रकार अनपेक्षित आणि चमत्कारिक वाटत आहे.—त्याला मात्र इलाज नाहीं—"

त्यानें इंग्रजींतूनच उत्तर दिलें.

ती कांहींच बोलली नाहीं. बाहेर या वेळीं वारा सुटून पावसाचे मोठमोठे थेंब पडावयाला प्रारंभ झाला होता.

"मग मी जाऊं आतां?" त्यानें इंग्रजींत विचारलें.

"नाहीं—माझं वर्तन तुम्हांला चमत्कारिक वाटलं तरी चालेल.—पण मी आज तुमच्याशीं मोकळेपणानं साऱ्या गोष्टी बोलणार आहें. चंद्रशेखर, मला तुमच्यापासून दोन गोष्टींची अपेक्षा आहे.—तुमचं सहकार्य अन् स्नेह. किंबहुना तुमचा स्नेह संपादन करण्याच्या आशेनंच तुमची सहकारी होण्याची माझी इच्छा आहे.—चंद्रशेखर, मला तुमच्या प्रेमाची गरज आहे."

तिनें शेवटचें वाक्य इंग्रजींत उच्चारिलें.

"आपली पहिली अपेक्षा कदाचित् पूर्ण होईल. पण दुसरी मात्र पूर्ण होणं अशक्य आहे—"

"कां बरं?"

"आईशिवाय दुसऱ्या कोणत्याच स्त्रीवर प्रेम करायचं नाहीं, असा माझा निश्चय आहे."

"स्त्रीप्रेम तुम्ही त्याज्य समजतां का, चंद्रशेखर?"

"नाहीं. स्त्रीप्रेमाची महती मी जाणून आहें. पण तो एक विलक्षण मोह

आहे. अन् ज्यानं आपलं आयुष्य एकाद्या कार्याला वाहून घेतलं आहे, त्यानं त्या मोहापासून सर्वथैव अलिप्त राहिलं पाहिजे, असं मला वाटतं—"

"तुमच्या सारख्या सोशॅलिस्टाच्या तोंडून असले उद्गार ऐकायला मिळ-तील, असं वाटलं नव्हतं मला! स्त्रीप्रेमाविषयीं जर तुमची अशा प्रकारची भावना असेल, तर तुमच्यांत आणि एकाद्या जुनाट मताच्या वेदांत्यांत फरक तो काय राहिला? जगांत आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं मोठमोठीं कार्यं केलीं, त्या सगळ्याच महापुरुषांनीं काय स्त्रीप्रेमाचा अव्हेर केला होता? उलट त्यांच्या उग्र आणि कठोर जीवनाला स्त्रीप्रेमाच्या चंद्रिकेमुळं माधुरी प्राप्त होऊन, त्यांच्या कर्तव्याचा खडतर मार्ग सुकरच झाला. प्रेम करणारी स्त्री जर मनानं दुर्बळ असेल, आपल्या दयिताच्या ध्येयाशीं समरस व्हायला जर ती असमर्थ असेल, तर तिचं तें मोहांत पाडणारं निष्क्रिय प्रेम कर्तृत्ववान् पुरुषाला अडचणीसारखं होऊन बसतं, ही गोष्ट खरी. पण आपल्या सहचराच्या आकांक्षांशीं एकरूप होणारी आणि त्याच्या अंगीकृत कार्यात भाग घ्यायला उत्सुक असलेली स्त्री;—तिच्या प्रेमाइतकी प्रेरक आणि पूरक शक्ति जगांत दुसरी कोणती असूं शकेल? चंद्रशेखर, मला कल्पनासुद्धां नव्हती कीं, तुमच्यासारखा समाजसत्तावादी, तुमच्यासारखा नव्या पिढींतील तरुण, मानवी जीविताला पूर्णता आणणाऱ्या या दैवी शक्तीला इतकी तुच्छ लेखील—"

बोलतां बोलतां तिचा चेहरा रागानें लाल झाला. खिडकींतून या वेळीं वाऱ्याचा गार झोत सारखा आंत येत होता. त्यामुळें कबरीबंधनांतून निसटलेले केंस तिच्या कपाळावर भुरुभुरु उडत होते; व पदराचें वक्षःस्थलावरील सैल आवरणही सारखें थरथरत होतें. रागाच्या भरांत तिनें आवेशानें आपले खांद्यांपर्यंत उघडे असलेले हात उरोजांपर्यंत वर उचलले. त्याबरोबर दीपप्रका-शांत उज्ज्वल दिसणारा त्यांचा तो गौरवर्ण आणि हाताच्या नाजूक, चिमुकल्या तळव्यांचा रक्तिमा चंद्रशेखरला अत्यंत मनोहर वाटला; व मघांशीं घडलेल्या प्रसंगामुळें विरसलेलें त्याचें मन तिच्या त्या रोषरम्य वक्तृत्वानें उल्लसित होऊन, त्याच्यावरील विषादाचें दडपण दूर झालें.

पहिल्या सपाट्याला त्याला तिच्या त्या वक्तृत्वाची थट्टा करावीशी वाटली.

परंतु लगेच त्यानें आपला विचार बदलला; व तिला किंचित् हंसून म्हटलें, "पण हा वाद कशाला ?—मी जें ठरवलंय तें सांगितलं आपल्याला—"

त्याच्या त्या उत्तरांतील उपरोधाची छटा तिला अतिशयच झोंबली; व तिनें त्याच्याकडे रोखून पहात रागानें विचारलें, "चंद्रशेखर, तुम्ही आपल्या आई-शिवाय आजपर्यंत दुसऱ्या कोणत्याच स्त्रीवर प्रेम केलेलं नाहीं का ? तुम्हांला कोणत्याच तरुणीविषयीं कधीं आकर्षण वाटलं नाहीं ?—आश्चर्य आहे—"

त्याबरोबर त्याची मुद्रा आरक्त झाली.

पण लगेच तो म्हणाला, "केव्हां केव्हां आकर्षण वाटलं असेल, नाहीं असं नाहीं. पण मी तें कधींच वाढूं दिलं नाहीं.—माझ्यासारख्या कार्यैकनिष्ठ मनुष्याला स्त्रीप्रेम वर्ज्य आहे.—"

"एकटं स्त्रीप्रेमच कां ? सर्वच प्रकारचं प्रेम वर्ज्य आहे, असं कां म्हणत नाहीं ?–कारण प्रेम म्हटलं कीं, तिथं मोह हा ठेवलेलाच. मग तें प्रेम कोणत्याही स्वरूपाचं असो !—वाऱ्याचा सोसाटा काय किंवा अगदीं मंद झुळूक काय, चलबिचल करण्याचं सामर्थ्य थोड्या फार प्रमाणांत दोहोंतही असतंच—"

"खरं आहे आपलं म्हणणं. पण, कुठं तरी मर्यादा घातली पाहिजे, म्हणून मी ती स्त्रीप्रेमापाशीं घातली आहे.—शिवाय वाऱ्याच्या सोसाट्यानं प्रसंगीं प्रचंड वृक्षसुद्धां मुळासकट उपडून निघतो. उलट मंद झुळकेनं फार तर त्याचीं पानं थरारतील—"

"पण तें थरारणंच एकादे वेळीं अधिक घातक ठरायचं ! उपमा या नेहमींच फसव्या असतात; अन् आपला हा वादही जगाच्या अंतापर्यंत संपायचा नाहीं." इतकें बोलून ती थोडा वेळ थांबली; व नंतर किंचित् आर्जवाच्या स्वरांत तिनें त्याला विचारलें, "चंद्रशेखर, तुम्हांला स्त्रीचं प्रेम वर्ज्य असेल, पण सहकार्य तर वर्ज्य नाहीं ना ?—"

"नाहीं.—पण आपण माझ्याशीं कोणत्या कामांत सहकार्य करणार ?"

"तुम्ही हातीं घेतलेल्या कार्यांत.—चंद्रशेखर, मला तुमचीं मतं, तुमचे विचार, तुमच्या कल्पना ऐकून माहीत आहेत. श्रमजीवी वर्गाचं संघटन करून हल्लींची राज्यपद्धति उलथून पाडण्याच्या उद्देशानं तुम्ही सध्यां परळला चळवळ करीत

आहां. परवां तो वीरेंद्र चक्रवर्तीचा जाहिरनामा मी जेव्हां वाचला, तेव्हां माझ्या डोळ्यांसमोर तुमची मूर्ति उभी राहिली !—माझा अंदाज बरोबर आहे ना ?—"

"कदाचित् असेल. पण या कामांत आपली मदत मला कुठं व कशी होणार ?"

"कां बरं ?—कामगारांच्या स्त्रियांत मी वर्गकलहाची भावना जागृत करीन. तें काम कोणत्याही पुरुषापेक्षां माझ्याच हातून नाहीं का अधिक चांगलं होणार ?"

"होय. खरं आहे आपलं म्हणणं. पण आज मी आपल्याला नक्की कांहींच सांगूं शकत नाहीं."

इतकें बोलून त्यानें आपल्या मनगटावरील घड्याळाकडे पाहिलें व तो उठून उभा राहिला.

"पण एक गोष्ट तर तूर्त करायला तुमची हरकत नाहीं ?"

"कोणती गोष्ट ?"

"तुम्ही जें सोशॅलिझमचं अभ्यासमंडळ काढलंय, त्यांत मला कां घेत नाहीं ?"

"तें विद्यार्थ्यासाठीं आहे. त्यांत आपल्याला कसं घेतां येईल ?"

"कां बरं ? मी विद्यार्थी नाहीं असं तुम्ही समजतां का ?" तिनें हंसून म्हटलें. "बरं, त्या मंडळांत जर तुमच्या मनांत मला घ्यायचं नसेल, तर मग तुम्ही स्वतःच आपलं तत्त्वज्ञान आणि कार्यक्रम यांची माहिती मला करून द्या. प्रो. राळ्यांनीं दिलेलीं कांहीं पुस्तकं मी वाचलीं आहेत. पण त्यांनीं दिलेल्या पुस्तकांत प्रतिकूल विवेचनाचाच भाग जास्त होता. शिवाय तुमच्या कार्यक्रमाची जी माहिती त्यांनीं मला दिली, तीही अगदीं विचित्र होती—"

"माहिती द्यायला कांहींच हरकत नाहीं. एक दोन दिवसांत मी आपल्याकडे पुस्तकं पाठवून देतों. मग जातों मी आतां—"

त्यानें किंचित् वांकून तिला नमस्कार केला; व खुर्चीच्या पाठीवर टाकलेला पाऊसकोट हातावर घेऊन, तो दिवाणखान्यांतून बाहेर पडला.

चंद्रशेखर जातांच प्रमिला खिडकींत येऊन उभी राहिली. रस्त्यानें झपाझप पावलें टाकीत चाललेली त्याची ती भव्य मूर्ति दिसेनाशी होईपर्यंत तिची दृष्टि त्याच्यावर खिळलेली होती. पाऊस अद्याप रीतसर सुरू झालेला नव्हता. पण, आकाश इतकें कांहीं भरून आलेलें होतें कीं, क्षणोक्षणीं जोराची सर येईल, अशी भीति वाटत होती. इतकेंच नव्हे, तर वाऱ्याच्या प्रत्येक सोसाट्याबरोबर

पाण्याचे थेंब जोरानें जमिनीवर टपाटप पडत होते. वाऱ्याचा झोत आला, म्हणजे चंद्रशेखर पाऊसकोट अंगाभोंवतीं घट्ट लपेटून घेई; व तोंडावर पडणारे पावसाचे टपोरे थेंब रुमालानें पुशीत असे.

तो लवकरच रस्त्यावरील गर्दीत दिसेनासा झाला. तरीसुद्धां प्रमिला किती तरी वेळ खिडकींत विचार करीत उभी होती.

## प्रकरण २३ वें

## अवचित पडलेली दुष्ट सांवली



चंद्रशेखर थोडासा रस्ता चालून जातो न जातो, तोंच विजांचा प्रचंड कडकडाट होऊन, पाऊस एकदम जोरानें पडूं लागला. त्याबरोबर त्यानें आपला पाऊसकोट अंगाभोंवतीं घट्ट लपेटून घेतला; व उघड्या मस्तकावर पडणारें पाणी आंत ओघळून अंगांतील कपडे भिजून जाऊं नयेत, म्हणून गळ्याभोंवतीं रुमाल गुंडाळला. अद्याप कांहीं म्हणण्यासारखी रात्र झालेली नव्हती. पण पावसाच्या उपद्रवामुळें रस्ता अवेळींच निर्मनुष्य झाल्यासारखा दिसत होता. सॅंढर्स्ट पुलाजवळ आल्यावर चंद्रशेखरला थोडें थांबावें लागलें. कारण, पोलीसच्या अंगुलिनिर्देशाची सोत्कंठ वाट पहात असलेल्या मोटारींनीं रस्ता अडवून धरिला होता. त्याची स्वतःची इच्छा अशी होती कीं, शक्य तितक्या लवकर केशवचें घर गांठावें. पण मोटारींच्या त्या गर्दीमुळें त्याला उभें रहाणें भाग पडलें. त्या संधीचा फायदा घेऊन त्यानें आपल्या पावसानें भिजलेल्या केसांतील पाणी रुमालानें टिपलें; व तो पिळून पुन्हा मानेभोंवतीं गुंडाळला. इतक्यांत मोटारींची ती आतांपर्यंत स्तिमित असलेली रांग हलली. तेव्हां, झटकन पलीकडे जावें म्हणून तो त्या हळू हळू पुढें सरकत असलेल्या रांगेच्या जवळ आला. आणि, दोन मोटारींच्या मध्यें असलेल्या जागेतून पुढें निसटणार, तोंच त्याच्या कानांवर इंग्रजींतून काढलेले पुढील उद्गार आदळले—

"तोच तो तरुण !—ज्याच्या हालचालींविषयीं आपण सध्यां माहिती गोळा करीत आहों—"

"अरेरे, किती उमदा मुलगा आहे !—या मार्गापासून त्याला कोणीच परावृत्त करूं शकणार नाहीं काय ?—"

ते शब्द कानांवर पडतांच पलीकडे गेलेल्या चंद्रशेखरनें एकदम मागें वळून पाहिलें. तोंच, ज्या मोटारींतून ते उद्गार आल्याचा भास त्याला झाला, ती वेगानें सुरू झाली. तथापि, त्या मोटारींत एक गोरा व एक हिंदी असे दोन गृहस्थ बसले असून, ते दोघेही आपल्याकडे निरखून पहात होते, एवढी गोष्ट त्याला कळून चुकली. इतकेंच नव्हे, तर आपण जो आवाज प्रथम ऐकला, तो रावसाहेब देशमुखांचा असावा, असेंही त्याला वाटलें. ती कल्पना मनांत येतांच त्यानें आपला खालचा ओठ जोरानें चावला; कपाळावर आलेले केंस त्वेषानें मागें सारले; व आवेशाच्या भरांत त्याचीं पावलें झपाट्यानें पुढें पडूं लागलीं.

केशवच्या घराजवळ येतांच तो बागेच्या फाटकापाशींच क्षणभर थबकला. वस्तुतः, मघाशीं जो अनपेक्षित प्रकार प्रमिलेच्या घरीं घडला, त्याबद्दल केशवशीं कांहीं तरी बोलावें, या उद्देशानेंच तो तिथें आला होता. पण, आतां त्याला असें वाटलें की, केशव कदाचित् या वेळीं जेवणाच्या गडबडींत असेल; व एवढ्या पावसांत त्याला आपण बाहेर बोलावलेलें ललितेला आवडणार नाहीं. हा विचार त्याच्या मनांत येऊन तो परत फिरणार, तोंच अत्यंत मधुर असा हंसण्याचा आवाज त्याच्या कानांवर पडला. त्याबरोबर त्यानें चमकून वर पाहिलें. तेव्हां, केशवच्या खोलींत कांहीं तरी वादविवाद चालला असून, तिथूनच तो हंसण्याचा आवाज आला, अशी त्याची कल्पना झाली. त्याबरोबर, आपला परत जाण्याचा बेत रद्द करून, तो फाटक उघडून आंत शिरला.

वऱ्हांड्यांत आल्यावर त्यानें आपला पाऊसकोट काढून कठड्यावर ठेवला; व रुमालानें डोकें आणि तोंड पुसून तो जिना चढून वर आला. तोंच त्याच्या कानांवर क्षीण पण सावेश आवाजांत उच्चारलेले पुढील शब्द आले—

"पण साम्यवादाशिवाय दुसरा कांहीं देशोद्धाराचा मार्गच नाहीं का, बाबू ?"

तो आवाज त्यानें तत्क्षणींच ओळखला; व ते उद्गार ऐकतांच मघाशीं घडलेल्या प्रकाराच्या आणि त्याहीपेक्षां रस्त्यांत ऐकलेल्या उद्गारांच्या स्मृतीची

विषण्ण छाया त्याच्या मनावरून तावडतोब दूर होऊन, त्यानें खोलींत शिरतांना एकदम उल्हासानें म्हटलें, "नाहीं.—तेवढा एकच मार्ग आतां आपल्याला उरला आहे."

त्याला पहातांच केशवनें एकदम पुढें होऊन त्याचे हात आपल्या हातांत घेत म्हटलें, "का रे, एवढ्या पावसांतून आलास, चंद्रा? ठरल्याप्रमाणं गेला होतास कीं नाहीं तिथं?"

"हो. तिथूनच तर इथं आलों. म्हटलं लतातार्इची तब्बेत कशी काय आहे तें पहावं अन् तुलाही भेटावं. मग कॉलेजांत येणार ना आमच्या? सहाच दिवस उरले आतां कॉलेज उघडायला." चंद्रशेखरनें ललिता आणि सुमति यांच्याकडे पाहून हंसत हंसत विचारलें.

ललिता झुलत्या आरामखुर्चीवर बसलेली होती. तिला पुरता आठवडाभरही ताप आला नसेल. पण एकाद्या अवघड दुखण्यांतून उठलेल्या माणसासारखी कळा तिच्या शरीरावर आली होती. पुष्कळदां असें होतें कीं, मनुष्य एकाद्या हृद्रोगानें सतत पोखरला जात असतो. पण त्या पोखरणीचे परिणाम त्याच्या शरीरावर दिसावयाला कांहीं तरी बाह्य व्याधीचें निमित्त व्हावें लागतें. तसेंच ललितेचें झालें. तिच्या गोरेपणांतला पूर्वींचा तजेला नाहींसा झाला होता; व गालांचा फुगीरपणा जरी कायम राहिला होता, तरी डोळे मात्र आंत ओढल्या-सारखे दिसत असत. आणि, अति उन्हानें गुलाबाच्या कळा जशा आहाळून जाव्या, तसा त्या डोळ्यांभोंवतालचा भाग काळा पडला होता. तिनें अंगांत गरम स्वेटर घातला होता. त्याच्या निळ्या रंगामुळें तिच्या गौरवर्ण, नाजूक अव-यवांची म्लानता अधिकच जाणवत होती. आजारांतून नुकत्याच उठलेल्या मनुष्याच्या वृत्तींत एक प्रकारची अस्थिरता उत्पन्न होत असते. त्या अस्थिरते-मुळें म्हणा किंवा स्वाभाविक चंचलतेमुळें म्हणा, शेजारच्या खुर्चीवर बसलेल्या सुमतीच्या हातावर हात ठेवून, ती मधून मधून झोके घेत होती. त्यामुळें, दिव्याचा उज्ज्वल प्रकाश तिच्या शरीरावर हेलकावून, तशा त्या मलूल अव-स्थेंतही तिची मूर्ति रमणीय दिसत होती.

माथेरानहून परत आल्यावर चंद्रशेखर स्टेशनवरून तसाच परस्पर तिला भेटावयाला आला होता; व त्यानंतर तिचा ताप उतरेपर्यंत तो रोज नेमानें तिथें

येत असे. ज्या रात्रीं ताप जास्त झाला होता, ती रात्र तर सारीच त्यानें केशवबरोबर जागून काढली होती. तो रोज तिच्यासाठीं निरनिराळीं फळें आणीत असे; व तिचा ताप थोडा कमी झाला, म्हणजे तिची करमणूक व्हावी म्हणून खूप गप्पाही मारीत असे. तिच्या आजाराच्या त्या आठ दिवसांत तो राजकारणाविषयीं कधीं एक अवाक्षरही बोलला नाहीं. जणुं कांहीं, त्याच्या जीवनाचा तो कालावधि ललितेसाठींच वेगळा काढून ठेविलेला होता. त्याच्या दिलदार, खेळाडू, प्रेमळ स्वभावाची ओळख तिला याच प्रसंगीं प्रथम झाली; व त्याचें तें उल्हासयुक्त सान्निध्य म्हणजे आपल्या अलीकडे उदास होत चाललेल्या जीवनावर पडलेला बालरवीचा हंसरा प्रकाशच होय, असें तिला वाटलें. केशवच्या त्याच्यावरील आत्यंतिक प्रेमाचा हेवा तिला अजूनही वाटे. पण, तें प्रेम अस्थानीं नाहीं; किंबहुना, चंद्रशेखर कोणाच्याही एकनिष्ठ प्रेमाचा विषय व्हावा, अशी त्याची योग्यता असल्याबद्दल तिच्या मनाची आतां खात्री पटली होती.

जिना चढून वर आल्याबरोबर तीच प्रथम चंद्रशेखरच्या दृष्टीस पडली; व त्याचे डोळे तिच्या कमनीय मूर्तीवर क्षणार्ध स्थिर झाले. कदाचित् तो कांहीं वेळ तसाच तिच्याकडे पहात उभा राहिला असता. पण, आपण अ-कुलीन असल्याची जी एक जाणीव त्याच्या मनांत सतत जागृत असे, तिनें त्याला तत्क्षणींच भानावर आणलें. तथापि, मनाच्या त्या संयत स्थितींतही तिचा आवाज ऐकून त्याला वाटलेला उल्हास तिची मूर्ति पाहून द्विगुणितच झाला; व त्या भरांत त्यानें खोलींत प्रवेश करितांना तिला तें उत्तर दिलें.

तो आंत येतांच केशवनें त्याला विचारलेला प्रश्न व त्यामुळें त्याच्या चेहऱ्यावर झालेला सूक्ष्म फरक ललितेच्या लक्षांत आला. म्हणून, त्यानें स्वतःच्या मनाची चलबिचल लपविण्यासाठीं, कॉलेजांत जाण्याविषयींचा प्रश्न आपल्याला विचारला, असें तिला वाटलें. आणि, ती त्याला म्हणाली, "बरीच लवकर झाली म्हणायची माझ्या प्रकृतीची आठवण ?"

"मनुष्य आजारांतून उठल्यावर त्याच्या प्रकृतीची आठवण कशाला ठेवायची ?" चंद्रशेखरनें तिला बोलण्याची संधि न देतां म्हटलें. "काय सुमाताई, कालच सांगत होते मास्तर मला, तुम्ही आमच्या कालेजांत येणार म्हणून.— खरंच, तुम्ही दोघी तिथं आलांत, म्हणजे एक नवंच वातावरण उत्पन्न होईल.—

मी तर असं ठरवून टाकलंय कीं, आमची मराठी सोसायटी तुम्हां दोघींच्या ताब्यांत देऊन टाकायची अन् आपण मोकळं व्हायचं.—पुष्कळ झालं चार वर्षं काम केलं तेवढं—”

“वा, ही छान युक्ति आहे तुमची स्वतःला सगळ्या कामांतून सोडवून घ्यायची. एवढ्याचसाठीं तुम्ही आग्रह करीत होतांत वाटतं मामांना मला आपल्या कॉलेजांत पाठविण्याबद्दल ! पण आमच्याशिवाय काय मुली थोड्या आहेत का तुमच्या कॉलेजांत ? अन् तुमच्या मराठी सोसायटीच्या कमिटीवर आहेतच ना त्या दोघी,—तुमच्या कॉलेजांतल्या प्रसिद्ध लेखिका ? कोण ग ताई त्या ?”

“अग, ती कुंदा केळवकर अन् ती सुलोचना शहाणे. कुठलंही मासिक उघडा; त्यांत यांची गोष्ट नाहीं तर कविता ही आपली असायचीच. एवढ्या खंद्या लेखिकांचा आधार तुमच्या सोसायटीला असतांना आमची काय गरज आहे तिथं ? त्यांनीं केलंच आहे कीं कॉलेजांत नवं वातावरण निर्माण !”

“खचित केलंय !—तुला माहित आहे का ती गंमत चंद्रा ? ‘मनोरंजना’च्या फेब्रुवारीच्या अंकांत त्या कुंदाची एक गोष्ट आली होती ‘निष्फळ प्रेम’ म्हणून. गोष्ट होती सरासरीच.—पण तुझ्या सोसायटींतला तो केळकर कवि आहे ना ? त्यानं त्या गोष्टींतल्या नायिकेवर एक प्रेमपर गज्जल रचून, तो पाठवून दिला कुंदाकडे! अन् तें प्रकरण म्हणे प्रिन्सिपॉलपर्यंत जाणार होतं. पण यानं तिच्या वडिलांकडे जाऊन नाकदुऱ्या काढल्यामुळं निभावलं—”

“तें कांहीं विचारूं नकोस, बाबू.—अलीकडे ती एक टूमच होऊन बसली आहे. कॉलेजांत येणारी प्रत्येक मुलगी कविता न् गोष्टी लिहिते; आणि मासिकांचे आचरट संपादक केवळ त्यांची जात लक्षांत घेऊन तें सारं छापतात. आम्हांला शोभेसाठीं कमिटीवर मुली हव्या होत्या, म्हणून मी या दोघींना घेतल्या. मी जेव्हां त्या कुंदाला कमिटीवर येण्याबद्दल विनंती करायला गेलों, तेव्हां तिनं किती आढेवेढे घेतले; अन् शेवटीं कबूल केलं, तें जसं कांहीं माझ्यावर उपकार करण्यासाठींच. खरोखरी, या मुलींचं हें असलें वर्तन म्हणजे सहशिक्षणाची विटंबनाच म्हणायची!—कधीं कमिटींत तोंड उघडायच्या नाहींत; कधीं कामासाठीं गेलं तर धड बोलायच्या नाहींत; अन् स्वतः होऊन कोणतंही काम हौसेनं अंगावर घ्याय-

च्या नाहींत.—हें कसलं आलं आहे सहशिक्षण.? मुलांमुलींनीं नुसतं एका वर्गांत बसणं म्हणजे कांहीं सहशिक्षण नव्हे.—कुठं एका तरी बाबतींत आमचं कधीं सहकार्य होतं आहे का ? मागें त्या कोकण जलप्रलय फंडासाठीं आमच्या कॉले-जांतल्या अमेटूर्सनीं एक नाटक केलं. त्या वेळीं त्या सुलोचनेला मी तिकिटं खपविण्यासाठीं विनंती करायला गेलों होतों;—पण तिनं साफ सांगितलं, यंदां माझं सीनियर ईअर असल्यामुळं मला वेळ नाहीं, म्हणून ! आणि त्यानंतर पंध-राच दिवसांनीं बेल्जममधील लोकांच्या मदतीसाठीं टाऊन हॉलमध्यें भरलेल्या मीनाबाजारांत पारशी पद्धतीचा पेहराव करून एका स्टॉलवर बसलेली मी पाहिली तिला !—असल्या मुली काय नवीन वातावरण निर्माण करणार ? विला-यती आभरणांनीं नटलेल्या बाहुल्या या ! यांचा सारा वेळ कपडे बदलण्यांत न् माना मुरडण्यांत जायचा.—मुलांत धीटपणानं मिसळणाऱ्या, त्यांच्याबरोबर सहकार्य करण्याची हौस असलेल्या अन् देशहिताची कळकळ बाळगणाऱ्या मुली कॉलेजांत आल्या, तरच कदाचित् हल्लींच्या सहशिक्षणाला कांहीं अर्थ येईल. म्हणून तर मला फार उत्सुकता आहे तुम्हीं दोघींनीं आमच्या कॉलेजांत यावं अशी !"—

"पण तुम्हांला कुणी सांगितलं आम्ही इतर मुलींपेक्षां निराळ्या आहोंत म्हणून ?"

"सांगायला कशाला पाहिजे ?—मी आजपर्यंत कोणत्याही मुलीला सामाजिक अन् राजकीय चळवळींविषयीं आस्थेनं बोलतांना ऐकलेलं नाहीं; आणि समाज-सत्तावाद या नांवाची एकादी चीज जगांत आहे, या गोष्टीचा तर त्यांना पत्ता-सुद्धां नाहीं—"

पण इतक्यांत चंद्रशेखरला आठवण झाली; व हातांतल्या घड्याळाकडे पाहून त्यानें केशवला म्हटलें, "बाबू, तूं चलतोस का जरा माझ्याबरोबर बाहेर ? तुझं जेवण झालं नसलं तर आमच्याचकडे जेवूं आपण ?—"

"आतां बाहेर पडलं तुमच्या येण्याचं खरं कारण," ललितेनें हंसण्याचा प्रयत्न करून म्हटलें.

पण तिच्या आवाजांत झालेला सूक्ष्म फरक चंद्रशेखरच्या लक्षांत आला; व तो तिला म्हणाला, "ताई, तसंच कांहीं काम आहे निकडीचं; म्हणून मी बाबूला

बोलावतोंय. नाहीं तर तुमच्या गप्पागोष्टींचा लोभ सोडून या पावसांत कुणाला बाहेर जावंसं वाटेल ? ”

“ मी बाहेर येतों तुझ्याबरोबर, चंद्रा. पण आपल्याला थांबावं लागेल थोडा वेळ—”

“ कां रे ?—तूं म्हणशील तर थांबूं या. पण उशीर होईल मग फार.”

“ मी सांगतें तुम्हांला थांबण्याचं कारण.—मी आजारी पडल्यापासून दादा आतांशा नियमानं बाहेरून आल्याबरोबर माझी चौकशी करण्यासाठीं एकदां इथं येऊन जातात.—त्यांच्या कार्यक्रमांत माझ्या आजारामुळं ही एक नवीन भर पडली आहे.—पण ते येईपर्यंत बाबूला इथं बसलंच पाहिजे असं नाहीं कांहीं. सुमा आहेच नाहीं तरी माझ्यापाशीं—”

बोलतां बोलतां तिनें पुन्हा एकदां हंसल्यासारखें केलें. पण तिच्या त्या हंसण्यांत उपरोधाचा आणि त्याहीपेक्षां अत्यंत गूढ अशा मनोवेदनेचा ध्वनि उमटल्याचा भास सर्वांनाच झाला.

आणि क्षणभर कोणीच कांहीं बोललें नाहीं.

पण ललितेनेंच पुन्हा बोलावयाला प्रारंभ केला.

“ तुमचा क्लब कसा काय चाललाय, चंद्रशेखर ? ”

“ छान चाललाय. आम्ही त्याची एक शाखा परळला अन् एक दादरला उघडली असून, आठवड्यांतून रात्रीचीं तीन व्याख्यानं तिथं देत असतों.—”

इतक्यांत भगवंतराव आंत आले. बाहेरून आल्यावर कपडे न उतरतांच ते तिथें आल्याचें दिसत होतें. ते आल्याबरोबर ललितेच्या जवळ गेले; व तिच्या केंसावरून हात फिरवीत त्यांनीं विचारलें—

“ काय लता, कॉलेजच्या पहिल्या दिवसाचा मुहूर्त साधायचा बेत आहे ना तुझा ?—तोंपर्यंत अशक्तपणा सारा गेला पाहिजे बरं का;—आजच मी डॉक्टरांना तसं बजावून सांगितलं सकाळीं—”

तीं वाक्यें त्यांनीं उभ्या उभ्याच उच्चारलीं; व तीं उच्चारीत असतांना आपली शोधक दृष्टि सर्वत्र फिरवून त्यांनीं एकवार सारें कांहीं न्याहाळून पाहिलें. टेबलाला टेंकून उभा असलेला चंद्रशेखर त्यांच्या दृष्टीला पडतांच, त्यांचा चेहरा थोडा गंभीर झाला. त्यांनीं खोलींत पाऊल ठेवल्या क्षणापासून चंद्रशेखर त्यांची प्रत्येक

हालचाल बारकाईनें पहात होता. त्यामुळें, आपल्याकडे दृष्टि जातांच त्यांच्या भुंवयांना आलेली ईषद्वक्रता व कपाळावर उमटलेली आंठीची रेषा त्याच्या नजरेंतून सुटली नाहीं. पण, त्यांच्या चेहऱ्यांत झालेला तो फरक इतर कुणाच्या ध्यानांत येण्यापूर्वीच, ते चंद्रशेखरकडे बघून हंसत हंसत म्हणाले, "तुम्ही उभे कां राहिलांत सारे ?—काय चंद्रशेखर, कसा काय चाललाय तुमचा क्लब ? अलीकडे तुम्ही बरीच गडबड चालवली आहे म्हणे परळच्या बाजूला—"

"तसं कांहीं विशेष नाहीं. वर्तमानपत्रांची ती एक पद्धतच आहे नाहीं तरी गोष्टी घडतात त्यापेक्षां भडक करून सांगण्याची—"

"तें कांहीं असलं, तरी तुम्ही काय करायचं तें जपून करा." इतकें बोलून ते थांबले; व ललितेकडे वळून म्हणाले, "बरं, बसा तुम्ही. आज पाऊस फार पडतोय. मफलर कां नाहीं तूं गळयाभोंवतीं गुंडाळलास, लता ? आणखी कांहीं दिवस तरी फार जपलं पाहिजे तुला—"

ते खोलींतून बाहेर पडतांच चंद्रशेखर केशवला म्हणाला, "मग, निघायचं ना बाबू ?—आधींच उशीर फार झालाय; तूं आतां आमच्याकडेच जेव म्हणजे झालं.—जातों आम्ही ताई—"

"आठ दिवसांनीं आठवण झाली माझी या वेळीं तुम्हांला; आतां बहुधा महिनाभर नाहीं होणार—"

"नाहीं.—आतां आठवण ठेवण्याचं मुळीं कारणच पडणार नाहीं. कॉलेजांत यापुढं रोजच भेट होत जाईल आपली," चंद्रशेखरनें किंचित् हंसून म्हटलें.

आणि लगेच ते दोघे बाहेर पडले.

रस्ता या वेळीं अगदीं ओसाड पडला होता. पदपथावरील कोरड्या जागेंत हातापायांची जुडी करून निजलेला एकादा भिकारी, दुकानासमोर खाट टाकून हुक्का ओढीत बसलेला एकादा पठाण किंवा तशा त्या पावसांत धूम्रपान करीत हिंडणारा एकादा कलंदर यांच्याशिवाय एकही मनुष्य रस्त्यावर दिसत नव्हता. जणुं कांहीं, दिवसभर नाना प्रकारचे व्यवहार करून श्रांत झालेल्या औद्योगिक समृद्धीनें कंगालपणा, क्रौर्य आणि कलंदरी यांच्या स्वाधीन आतां सारे रस्ते केले होते. त्या रस्त्यावरील कांहीं खिडक्यांतून या सुमारास हटकून बाहेर पडणारे गायनवादनाचे आलापही आज ऐकूं येत नव्हते; व रात्रीं उशिरापर्यंत उघडीं

रहाणारीं पानतंबाकूचीं दुकानेंसुद्धां बहुतेक बंद झालीं होतीं. पावसाची झिमझिम मात्र सारखी चालू होती; व मधूनच एकादी वाऱ्याची झुळूक आली, म्हणजे नारळीच्या झांवळ्या जोरानें सळसळून सोसाट्याचा वारा सुटल्याचा भास उत्पन्न करीत असत. आणि, रस्ता साराच मोकळा सांपडल्यामुळें, मधूनच भरधांव जाणारी एकादी मोटार आपल्या बेफाम वेगानें त्या स्थितीचा भयाणपणा वाढवीत होती.

बाहेर आल्याबरोबर चंद्रशेखरनें केशवला म्हटलें, "आपण आधीं इंडो–पर्शियनमध्यें जाऊं या, बाबू. मी आज घरून निघतांना रात्रीं जेवायचं नाहीं असं आईला सांगूनच बाहेर पडलों होतों. पण तुला अजून जेवायचंय अन् मलाही लागली आहे भूक थोडीशी आतां.—शिवाय तिथं बसल्यावर गप्पाही मारतां येतील निवांतपणानं.—मग पसंत आहे ना हा बेत तुला ?—"

"तुझा कोणता बेत मला पसंत नसतो ?—पण काय रे, तू तिथं काय बोलणं झालं तें सांगितलं नाहींस मला अजून ?—"

"सांगतों सारं कांहीं रेस्टोरंटमध्यें गेल्यावर."

इंडो-पर्शियनमध्यें प्रवेश करितांच त्या दोघांना रस्त्यापेक्षांही तें सुसज्जित विश्रांतिगृह अधिक ओसाड वाटलें. त्यांच्याशिवाय या वेळीं एकही गिऱ्हाइक तिथें नव्हतें. दाराजवळील अर्धवर्तुलाकृति द्रव्यपीठावर बसलेला तुंदिल रक्तमुख इराणी पेंगत होता; व वर लोंबणाऱ्या विद्युद्दीपाच्या प्रकाशांत तांबड्या नाकाइतकेंच त्याचें तुळतुळीत टक्कल शोभायमान दिसत होतें. त्याच्या खुर्चीलगत एक केंसाळ कुत्रा मान लांब करून पसरला होता. आणि, गिऱ्हाइकांच्या अभावीं रिकाम्या पडलेल्या खुर्च्यांवर सुखेनैव बसून, दोन तीन नोकर खालच्या आवाजांत गप्पा छाटीत होते. पावसाच्या जवर सपाट्यामुळें बाहेरील सृष्टि जशी श्रांत झाली होती, तसाच त्या विश्रांतिगृहामध्येंही या वेळीं निरुत्साह पसरला होता. ते दोघे आंत येतांच कुत्र्यानें मान उचलली; व डोळे किलकिले करून एकवार त्यांच्याकडे बघितलें. पण, त्यांच्या आगमनांत लक्ष देण्यासारखें कांहीं नाहीं, असें वाटल्यामुळेंच कीं काय, तो पाय एकवार ताणून पुन्हा पसरला.

आंत आल्यावर चंद्रशेखर तिथें अगदीं कोंपऱ्यांत असलेल्या एका टेबलाजवळ गेला; व आपला पाऊसकोट खुर्चीच्या पाठीवर टाकून, त्यानें मागोमाग आलेल्या मुलाला कोको आणि इतर कांहीं पदार्थ आणावयाला सांगितलें.

तो आपल्याशीं कांहीं तरी बोलेल अशा अपेक्षेनें केशव त्याच्याकडे पहात होता. पण, तो कसल्या तरी विचारांत मग्न आहे, असें त्याला दिसलें.

तेव्हां केशवनें टेबलावर असलेल्या त्याच्या हातावर आपला हात ठेवला; व त्याला विचारलें, " चंद्रा, तूं काय सांगणार होतास मला ? "

इतक्यांत नोकरानें कोकोचे पेले व केक्सनें भरलेलें एक कांचपात्र त्यांच्या-पुढें ठेवलें.

चंद्रशेखरनें पेला तोंडाला लावून एक घुटका घेतला; व तो केशवला म्हणाला, "आज साराच प्रकार तिथं माझ्या अपेक्षेपलीकडला घडला, बाबू.—आणि तें दुश्चिन्ह समजावं कीं सुचिन्ह,—कांहीं कळत नाहीं मला—"

असें म्हणून त्यानें प्रमिलेच्या घरीं घडलेल्या सर्व गोष्टी केशवला सांगितल्या. त्या ऐकून केशव कांहीं वेळ स्तब्ध राहिला.

नंतर तो म्हणाला, " मला कांहीं हें सारं तितकं अनपेक्षित वाटत नाहीं. प्रमिलाबाईनीं आपल्याला स्वतंत्र रीतीनं बोलवायला सुरवात केली, तेव्हांच मला त्यांच्या हेतूबद्दल शंका आली. आणि तो हेतु, चंद्रा, तुझ्या सहज लक्षांत येईल."

केशवनें त्याच्याकडे साभिप्राय पाहिलें.

" माझ्या लक्षांत तो हेतु तेव्हांच आला. पण केवळ त्याच्याचसाठीं एवढं सारं नाटक झालं ?—"

" तें सांगणं कठीण आहे. पण प्रमिलाबाईच्या स्वतःच्या मनांत जरी कदाचित् सारंच किल्मिष नसलं, तरी रावसाहेब आहेत ना ? त्यांचा जिथं संबंध येतो, तिथं विश्वास टाकणंच अशक्य—"

तो पुढं आणखी कांहीं बोलणार, तोंच चंद्रशेखरनें त्याला एकदम मध्येंच म्हटलें, "अरे, तुला एक महत्त्वाची गोष्ट सांगायची विसरूनच गेलों होतों मी अगदीं—"

आणि त्यानें रस्त्यांत ऐकलेलें तें संभाषण केशवला सांगितलें.

ती हकिकत ऐकून केशवचा चेहरा अगदीं गंभीर झाला. कोकोचा घेतलेला घोट त्याला गिळवेना; व त्यानें हातांतील पेला खालीं ठेवून चंद्रशेखरला म्हटलें, "चंद्रा, तूं त्या घरांत पुन्हा पाऊल ठेवूं नकोस. दादांनीं मघांशीं जो इषारा तुला

दिला, त्यांत पुष्कळच खोल अर्थ होता म्हणायचा !—रावसाहेबांचा ससेमिरा इतक्या लवकर तुझ्यामागं लागेल अशी माझी कल्पना नव्हती—"

"कां बरं ?—ते माझ्या पाळतीवर आहेत ही गोष्ट त्या बेझंटबाईच्या सभेच्या प्रकरणापासूनच माझ्या लक्षांत येऊन चुकली होती. आमच्या घरीं त्यांचं नानासाहेबांबरोबर नेहमीं नेहमीं येणं, माझ्या खोलींत येऊन सोशलिझमवर गप्पा मारीत बसणं;—तुला माहित आहे ?—मास्तरांकडे सुद्धां ते अलीकडे जात असतात ज्ञानेश्वरीची चर्चा करायला !—या त्यांच्या साऱ्या हालचालींचा अर्थ एकच आहे. पण म्हणून कांहीं त्यांना भिऊन चालणार नाहीं. मलाही एकदां तुझ्याप्रमाणंच वाटत होतं कीं, प्रमिलाबाईचं घर वर्ज्य करावं.—पण तेवढ्यानं काय होणार ? शिवाय बाबू, रावसाहेबांचा हा मंत्र आपल्याला त्यांच्यावर नाहीं का उलटवतां येणार ? मला वाटतं, प्रमिलाबाईच्या आजच्या वागण्यांत कपटाइतकाच कळकळीचाही भाग होता—"

"पण तूं जाणून बुजून विषाची परीक्षा करण्याच्या भानगडींत कां पडतोस ?—"

"नाहीं—मी कांहीं दिवस फक्त प्रयत्न करून पहाणार आहें.—शिवाय त्यांच्या हालचाली कळायला तेवढंच एक साधन आहे आपल्याला. आपण त्याचा कां उपयोग करून घेऊं नये ?—"

"पहा घेतां आला तर," केशवनें म्हटलें. त्याच्या त्या उद्गारांत नाराजीचा ध्वनि स्पष्ट उमटला होता.

कांहीं वेळ ते दोघेही स्तब्ध होते. केशवनें कोको कसाबसा संपविला; पण एकाही केकला हात लाविला नाहीं. चंद्रशेखरनें तर कोकोही पुरता संपविला नव्हता.

थोडा वेळ तसाच स्तब्धतेंत गेल्यावर चंद्रशेखर केशवला म्हणाला, "बाबू, तुला आणखी एक गोष्ट सांगायची आहे मला. वीरेंद्र बहुधा लवकरच इथं येतील. कलकत्त्याला जी जादा कॉंग्रेस भरणार आहे, तिला हजर राहण्याचा विचार दिसतोय त्यांचा—"

केशवनें एकदम चमकून विचारलें, "केव्हां कळलं तुला हें ? आणि येणार कसे ? जन्मठेपीच्या शिक्षेची तरवार त्यांच्या शिरावर लटकत असतां इथं येणार ते ?—"

“ महायुद्धाच्या ऐन धामधुमींत नव्हते येऊन गेले ?—तसेच आतां येतील. त्यांत काय मोठंसं ?” चंद्रशेखरनें किंचित् हंसून म्हटलें. “ मला ते कसे येणार याची कांहींच कल्पना नाहीं. पण येणार एवढं मात्र निश्चित—”

तो बोलत असतांना केशवला असा भास झाला कीं, त्याच्या तोंडावर कसली तरी सांवली पडली आहे. म्हणून त्यानें मागें वळून पाहिलें. तेव्हां त्याला असें दिसलें कीं, रस्त्यांतील दिव्याच्या खांबाजवळ उभा राहून एक धिप्पाड पोलिस शिपाई विडी ओढीत आहे.

त्याची ती सांवली होती.

ती गोष्ट लक्षांत येतांच, केशवच्या मनांत अगदीं चमत्कारिक कल्पना येऊन, त्याच्या अंगाचा थरकांप झाला.

प्रकरण २४ वें

# कर्तव्यच्युतीचा पहिला दिवस

कॉलेज उघडेपर्यंत ललितेला आलेला अशक्तपणा बहुतेक कमी होईल, अशीच सर्वांची कल्पना होती. पण ती चुकली. ज्या दिवशीं कॉलेज उघडलें, त्या दिवशीं केशव आणि सुमति यांच्याबरोबर ती मोटारींतून तिथें गेली. सुदैवानें त्या वेळीं ऊन स्वच्छ पडलें होतें. मृगाचा पहिला पाऊस होऊन गेलेला असल्यामुळें, त्याच्या वर्षावानें न्हाऊन निघालेले कॉलेजच्या प्रशस्त आवारांतील हिरवळीचे गालिचे आणि फुलझाडांचे ताटवे त्या मंदोष्ण उन्हांत अधिकच कांतिमान् आणि प्रसन्न दिसत होते. कॉलेजच्या समोर पसरलेल्या समुद्राच्या लाटांचें सौम्य गर्जित आणि वाऱ्याच्या झुळकांमुळें होणारी झाडांची मंद हालचाल अतिशय सुखकर वाटत होती. त्यांची मोटार ज्या वेळीं कॉलेजच्या आवारांत येऊन थांबली, त्या वेळीं पोर्चजवळ उभ्या असलेल्या चंद्रशेखरनें त्यांचें स्मितपूर्वक स्वागत केलें. केशव मोटारींतून खालीं उतरतांच त्याला बाजूला ओढून घेऊन त्याच्याशीं तो थोडा वेळ बोलला; पण त्या दोघींशीं मात्र तो एकही शब्द बोलला नाहीं. तथापि, त्याच्या त्या निःशब्द पण स्मितयुक्त दृष्टिक्षेपांत इतके आनंददायक भाव व्यक्त झालेले होते कीं, त्यामुळें ललितेच्या मनाला फार उल्हास वाटला.

तिचा तो उल्हास प्रिन्सिपॉलसाहेबांचें व्याख्यान संपेपर्यंत कायम होता. किंबहुना, कॉलेजच्या भव्य दिवाणखान्यांत मुलांनीं व्याख्यानाच्या आधीं केलेली दंगल, तिच्या मैत्रिणींनीं केलेलें तिचें प्रेमळ अभिनंदन व तिथल्या वातावरणांत खेळणारा एकंदर उत्साह यामुळें तिचा वेळ फार आनंदांत गेला. पण, कॉलेजांतला हा सारा कार्यक्रम आटोपण्याच्या सुमारास आभाळ भरून येऊन जोराची सर आली; व हवेंत एकदम बराच गारठा उत्पन्न झाला. घरून निघतांना लख्ख ऊन पडलेलें असल्यामुळें ललितेनें अंगांत गरम कपडे घातलेले नव्हते; व मोटारींतून परत येत असतां थंड वारा तिच्या अंगाला सारखा झोंबत होता. त्यामुळें म्हणा किंवा एकदम श्रम फार पडल्यामुळें म्हणा, तिला घरीं आल्याबरोबर आपल्याला कसर आल्यासारखें वाटलें. पण, कदाचित् गारठ्यामुळें तसें वाटत असेल, अशा समजुतीनें तिनें तिकडे लक्ष दिलें नाहीं; आणि, गड्याकडून कुमुदला बोलावून आणवून, तिच्याबरोबर खेळण्यांत व गाण्याबजावण्यांत तिनें उरलेला दिवस घालविला. परंतु, संध्याकाळीं तिला जास्त थकवा वाटूं लागून तिचें अंग चांगलेंच तापलें. तिची ती स्थिति लक्षांत येतांच सुमतीनें तिला आग्रह करून निजविलें; व केशवनें लगेच रात्रीं डॉक्टरकडे जाऊन औषधाची व्यवस्था केली. त्यामुळें, सकाळीं तिचा ताप जरी साफ उतरला, तरी कॉलेजांत जाण्याइतकी शक्ति तिच्या अंगीं उरली नाहीं.

चंद्रशेखरला ती आजारी असल्याचें दुसऱ्या दिवशीं कॉलेजांत कोणाकडून कळलें. पण त्या दिवशीं सायंकाळीं परळला त्यांच्या क्लबाचा कांहीं कार्यक्रम होता. त्यांत सारा वेळ मोडल्यामुळें तिला भेटावयास जाणें त्याला शक्य झालें नाहीं. त्यामुळें त्याच्या मनाला एकसारखी रुखरुख लागून राहिली; व उद्यां सकाळीं उठल्याबरोबर प्रथम केशवच्या घरीं जावयाचें, असा निश्चय त्यानें निजतांना मनाशीं केला. त्याप्रमाणें सकाळीं आठच्या सुमारास तो जों घरांतून बाहेर पडणार, तोंच नानासाहेब आणि रावसाहेब यांची दुकल त्याच्या भेटीला आली; व ब्रिटिश मजूरपक्षाच्या उत्कर्षाच्या इतिहासावर 'प्रबोधना'कडे आलेला एक लेख नानासाहेबांनीं त्याच्याकडून सुधारवून घेतला. त्या लेखाविषयीं बोलणें चालू असतां रावसाहेबांनीं साम्यवादावरील अनेक पुस्तकांची माहिती त्याला विचारली; व त्यांपैकीं ज्या पुस्तकांना हिंदुस्थानांत यावयाला मनाई केलेली होती,

अशीं पुस्तकें ते वाचावयाला म्हणून त्याच्याजवळ मागूं लागले. विशेषतः, वीरेंद्र चक्रवर्तीचें स्वराज्याच्या चळवळीवरील, युरोपांत प्रसिद्ध झालेलें, एक पुस्तक त्या वेळीं फार गाजलेलें व जप्त झालेलें होतें. तें त्यांनीं त्याच्याजवळ आग्रहपूर्वक मागितलें. पण चंद्रशेखरनें त्यांना हंसत हंसतच सांगितलें कीं, "मलाही तें पुस्तक वाचण्याची फार उत्कंठा असून तुम्हीच त्याची एकादी प्रत मला आणून द्या. ब्रुईनसाहेबांनीं नुकत्याच झडत्या घेऊन त्याच्या प्रती जप्त केलेल्या आहेत. त्यांच्याकडून एकादी प्रत तुम्हांला खात्रीनें मिळेल !"

अशा रीतीनें त्याचा सकाळचा सारा वेळ गेला. त्या दिवशीं कॉलेज सुटल्या-बरोबर लिटररी सोसायटीची सभा असल्यामुळें त्याला घरीं यावयाला पांच वाजले. त्यामुळें चहा वगैरे न घेतां तो तसाच केशवकडे जावयाला निघाला. तोंच त्याला आठवण झाली कीं, आज आपल्या सहकाऱ्यांची खासगी बैठक आपण घरीं बोलाविली असून, तींत कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचा विचार व्हावयाचा आहे.

त्या कामाची आठवण होतांच, तो स्वतःवर अतिशय रागावला. ललिता पुन्हा आजारी पडल्याला आजचा तिसरा दिवस. आजही आपण तिच्या भेटीला गेलों नाहीं, तर तिला काय वाटेल ? पण, आजच्या बैठकींत निकालांत काढावयाचीं कामेंही तशींच महत्त्वाचीं होतीं.—शुक्रवारच्या विलायतच्या डांकेनें पाठ-वावयाच्या पत्रांचें स्वरूप त्या खासगी बैठकींत निश्चित व्हावयाचें होतें. आज बुधवार;—उद्यांवर या बैठकीचें काम ढकललें तर ?—काम वेळेवर होऊन पुन्हा आज आपल्याला ललितेलाही भेटावयाला मिळेल, असा विचार त्याच्या मनांत आला. पण, लगेच त्याला असें वाटलें कीं, अशा तऱ्हेची महत्त्वाची बैठक पुढें ढकलल्याबद्दल आपले सहकारी आपल्याला काय म्हणतील ? आणि, समजा, एका दिवसांत साऱ्या प्रश्नांचा निकाल लागला नाहीं तर ?—त्याच्या कर्तव्यबुद्धीला ती कल्पना कशीशीच वाटली.

परंतु, त्याच क्षणीं त्याच्या मनांत असा विचार आला कीं, कांहीं झालें तरी उद्यांच्या दिवसांत आपल्याला सर्व कामें हातावेगळीं करणें शक्य आहे. पण, ललितेला जर आपण आज भेटलों नाहीं तर ?—तर आजचा हा दिवस पुन्हा कधींही उगवणार नाहीं !—

—हा विचार मनांत येतांच तो उठला; त्यानें घाईघाईनें चार चिठ्या खरडून त्या पाकिटांत घातल्या; व ज्या आपल्या सहकाऱ्यांना त्यानें घरीं बोलाविलें होतें, त्यांना तीं पत्रें ताबडतोब नेऊन देण्याबद्दल त्यानें गड्याला सांगितलें. आणि तो केशवकडे जाण्यासाठीं घरांतून बाहेर पडला.

कर्तव्यच्युतीचा त्याच्या जीवनांतील तो पहिलाच प्रसंग होता.

तो घरांतून बाहेर पडला, त्या वेळीं त्याचें चित्त अस्वस्थच होतें. आपण करीत आहों हें योग्य नव्हे, अशी एक सूक्ष्म जाणीव त्याच्या मनाला सारखी टोंचीत होती. पण, तो रस्त्यावर येतांच, क्षितिजावर उतरलेल्या सूर्याच्या सुखोष्ण, पाटल प्रभेचा स्रोत एकदम त्याच्या अंगावर पडल्यामुळें, त्याचें मन प्रसन्न झालें. गेल्या दोन दिवसांत ऊन असें आज हें प्रथमच पडत होतें. आकाश या वेळींसुद्धां बहुतेक धूसरच होतें; व सूर्यबिंबाच्या थोडा वर एक भला थोरला काळसर पावसाळी ढग ओथंबलेला होता. त्या ढगाच्या ढांपणामुळें सूर्याच्या किरणांची वरची गति रोधली जाऊन, त्याच्या अधोमुख झालेल्या प्रकाशाचा सारा स्रोत, अनिर्वचनीय अशा उज्ज्वलतेनें, चोंहीकडे पसरला होता. जणुं कांहीं, वर्षर्तूच्या कोपकलुष मुखावर क्वचित् काळीं झळकणारें तें निर्भर हास्यच होतें. किंवा, जणुं कांहीं, आपल्या किरणांचा हवा तेव्हां कोंडमारा करणाऱ्या लहरी आकाशावर रागावून सूर्यानें आपली सारी प्रभा भूमीवर चौफेर उधळली होती. त्या प्रकाशामुळें झाडांचा हिरवा रंग सतेज दिसत होता; इमारतींना लावलेलीं तावदानें दिव्यांसारखीं झळकत होतीं; व पक्ष्यांच्या किलबिलाटांत गोड उच्छृङ्खलपणा भरल्यासारखा वाटत होता. रस्त्यांत मोटारी व माणसें यांची या वेळीं रोजच्यासारखीच गर्दी होती. पण त्या गर्दींत सुद्धां श्रांततेऐवजीं उत्साह खेळत असल्याचा भास चंद्रशेखरला झाला; व वर्तमानपत्रांचे ताजे अंक घेऊन रस्त्यांतून ओरडत धांवणाऱ्या पोरांची गडबड त्याला कुरणांत बागडणाऱ्या वांसरांच्या धांवपळीसारखी आनंददायक वाटली. आणि, थोड्या वेळापूर्वी त्याच्या मनावर असलेलें विषादाचें दडपण दूर होऊन, त्याच्या चित्तवृत्ति आतां उल्लसित झाल्या.

त्या उल्हासाच्या भरांत, केशवला नेहमींप्रमाणें आधीं हांक न मारतां किंवा आगाऊ कोणत्याही प्रकारचा कानोसा न घेतां, तो घाईनें तसाच जिना चढून वर

गेला. आणि, अर्धवट लोटलेलें दार उघडून त्यानें खोलींत पाऊल टाकलें. तेव्हां, तिथें त्याला केशव न दिसतां, ललिता आणि सुमति या दोघीच त्याच्या दृष्टीस पडल्या.

त्याला असा अचानक आलेला पाहिल्यावर त्या दोघी गोंधळल्या; व त्याच्या स्वतःच्याही मनाचा थोडासा गोंधळ झाला. केशव बरोबर नसतांना त्यांना भेटण्याचा हा त्याचा पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें त्याला कसेंसेंच वाटलें; व तो क्षणैक कांहीं न बोलतां नुसता उभा राहिला.

त्याच्या मनाची ती अवस्था ललितेनें ओळखली; व समोर असलेल्या खुर्चीकडे हात करून ती त्याला किंचित् हंसून म्हणाली, " बसा ना; आज अवचित इकडे कुठं वाट चुकलां ?—बाबू घरीं नसल्यामुळं तुमची निराशा होणार आहे—"

तिच्या त्या चतुर स्वागतानें त्याला प्रथम वाटलेला संकोच नाहींसा होऊन, त्याच्या स्वभावांतली खेळकर धिटाई चाळवली गेली. आणि, त्यानें तिला हंसत हंसतच म्हटलें, " नाहीं,—माझी निराशा होणं अशक्य आहे. मी आज मुद्दाम तुम्हांलाच भेटायला आलों आहें, लताताई.—तुमच्या प्रकृतीची आठवण ठेवण्याची पाळी मजवर येणार नाहीं, असं मला वाटलं होतं. पण तुम्ही पुन्हा आजारी पडून मला आठवण ठेवणं भाग पाडलं.—वास्तविक परवां तुमच्या आजाराची बातमी कळल्याबरोबरच मी यायला हवं होतं—"

" बरं झालं उशीरां आलांत ते !—मला पाहिल्यावर तुम्हांला आतां वाटलं असेल माझ्या आजाराची ती बातमी खोटी होती म्हणून—"

" खोटी कोण म्हणेल ग ? ताप उतरला असला म्हणून काय झालं ?—सहा महिन्यांच्या दुखणेकऱ्यासारखी तूं दिसायला लागली आहेस ताई, या दोन दिवसांत.—पण चंद्रशेखर, तुम्ही उभे कां ?—"

" आतां बसण्याची कांहीं जरूर नाहीं.—मी फक्त यांची प्रकृति कशी काय आहे तें बघायला आलों होतों—"

" आणि तें काम बसण्याची तसदी न घेतां अर्ध मिनिटांत होऊं शकलं असंच कीं नाहीं तुमचं म्हणणं ?—एकंदरींत माझी प्रकृति नुसती पहायला आलां

होतां तुम्ही; आमच्याशीं गप्पा मारायला नव्हे कांहीं.—शिष्टाचार फार छान पाळतां तुम्ही, चंद्रशेखर—"

ललितेनें तीं वाक्यें थट्टेच्या उद्देशानें म्हणून हंसत हंसतच उच्चारलीं. पण त्यांतील उपरोध अगदीं उघड होता.

चंद्रशेखर लगेच खुर्ची थोडी अलीकडे ओढून घेऊन तिच्यावर बसला.

त्यावरोबर सुमतीनें त्याला म्हटलें, "बाबुरावांना आज दादा घेऊन गेले आहेत आपल्याबरोबर बहुधा ' प्रबोधन ' कचेरींत. तेव्हां तुम्हांला दुसरं कांहीं काम असेल—"

" मला आज कांहींच काम नाहीं; व थोड्या फुरसतीनं तुम्हां मंडळीबरोबर गप्पा माराव्यात म्हणूनच मीं मुद्दाम आलों होतों.—"

" वर्तमानकाळीं तुम्ही भूतकाळ वापरतां आहां, त्यावरून तुम्हांला अवेळीं आल्यासारखं वाटतंय असं दिसतं—"

" होय.—पहिल्यांदां वाटलं खरं तसं; पण आतां नाहीं वाटत. अन् तसं वाटल्याबद्दल तुम्ही मला खचित दोष देणार नाहीं, लताताई—"

इतकें बोलून त्यानें अशा कांहीं रीतीनें ललितेकडे बघितलें कीं, त्याच्या त्या दृष्टिक्षेपांत प्रकट झालेले अशरणतेचे भाव पाहून, आपण उगाच याला लागण्यासारखें बोललों, असें तिला वाटलें; व ती अगदीं वरमून गेली.

कांहीं वेळानें सुमतीनें त्याला विचारलें, " पण आज तुम्हांला इथं यायला वेळ कसा मिळाला चंद्रशेखर, तुमचं नेहमीचं काम सोडून?—"

" कदाचित् आज माझं काम इथंच व्हावं असा योग असेल," चंद्रशेखरनें किंचित् हंसून म्हटलें. पण लगेच तो गंभीर होऊन ललितेकडे पहात म्हणाला, " तुम्हांला मी पुष्कळ दिवसांपासून कांहीं गोष्टी विचारीन म्हणत होतों, लताताई.—आज अनायासं चांगली संधि आली आहे. सुमाताईंशीं माझं बोलणं झालंय पुष्कळदां मास्तरांच्या घरीं.—पण तुमच्याशीं मात्र आजवर कधीं माझ्या मनांतल्या या गोष्टी बोलण्याचा धीर मला झाला नाहीं; अन् बाबूला जेव्हां जेव्हां मी याविषयीं म्हणत असें तेव्हां तेव्हां तो मोडता घालीत असे.—पण आज मी तुम्हांला विचारून टाकणार आहें सारं कांहीं—"

त्यानें क्षणभर थांबून ललितेकडे पाहिलें. पण ती कांहीं बोलली नाहीं. तिचे डोळे मात्र त्याच्या मुखावर स्थिर झाले होते; व त्या डोळ्यांत उत्कंठेपेक्षां एक प्रकारच्या सभय श्रांततेची अगदीं सूक्ष्म छटा उमटली आहे, असें चंद्रशेखरला वाटलें. त्यामुळें पुढें बोलावें कीं नाहीं या शंकेनें तो घोंटाळला. इतक्यांत तिनें तोंडावर आलेले केंस मागें सारून किंचित् सांवरून बसल्यासारखी हालचाल केली. तेव्हां, तिची ती अस्थिरता म्हणजे, जणुं कांहीं, आपल्याला बोलावयाची अनुमतीच आहे, असें समजून चंद्रशेखरनें पुन्हा बोलावयाला सुरवात केली.

"तुम्हांला माहीतच आहेत माझीं सारीं मतं, लताताई. गेलीं तीन वर्षं त्या मतांच्या प्रसारासाठीं मी सारखा प्रयत्न करीत आहें. कॉलेजांत मी लिटररी सोसायटी काढली तीसुद्धां या हेतूनं कीं, विद्यार्थ्यांत आपल्या मतांचा प्रसार करतां यावा अन् समाजसत्तावादी तरुणांची संघटना निर्माण करावी. आणि तो माझा हेतु थोडासा सफळही झाला. मुंबईंत आमचा एक स्वतंत्र पक्ष आम्ही लवकरच उत्पन्न करूं, अशी मला खात्री वाटते.—पण आतां आमच्या कार्याचं क्षेत्र बदललं आहे. गेल्या उन्हाळ्यापासून आम्ही गिरण्यांच्या भागांत काम करायला सुरवात केली आहे. तिथं कामाला आरंभ केल्यापासून आम्हांला एका गोष्टीची आवश्यकता फार जाणवूं लागली. ती गोष्ट म्हणजे स्त्रियांची सहकारिता. आमच्या प्रयत्नांचं स्वरूप जर नुसतं राजकीय असतं, आम्हांला जर केवळ आपल्या मतांचाच प्रसार कामगारवर्गांत करायचा असता, तर कदाचित् स्त्रियांची इतकी गरज आम्हांला भासली नसती. पण मतप्रसारासाठीं मजुरांच्या वस्तींत पाऊल टेवल्याबरोबर मला इतके दिवस असलेलं एक कोडं उलगडलं;— धर्माचा प्रसार करण्यासाठीं निघालेले ख्रिस्ती मिशनरी इस्पितळं, अनाथाश्रम, शाळा कां काढतात, याची मला कल्पना आली. सामान्य मनुष्य हा मतांचा भुकेला नसतो; तर त्याला मदतीची गरज असते. त्याच्या रोजच्या संसारांत त्याला ज्याची मदत होईल, त्याच्याच मतांचा प्रभाव त्याच्यावर होतो. पांढरा शुभ्र पोषाख केलेल्या गोऱ्या मिशनरी बाया कोळ्यामाळ्यांच्या अन् महार-मांगांच्या वस्तींतून औषधपाणी देत हिंडतांना पाहिल्या, म्हणजे लहानपणीं मला मोठं नवल वाटत असे. पण, आतां मला हें कळून चुकलं कीं, त्यांच्या त्या औषधपाण्यांतूनच मतांचा प्रसार जास्त जलद होतो—"

तो थोडा थांबला; व त्यानें ललितेकडे पाहिलें. पण ती स्तब्ध आणि अधो-मुख होती. तेव्हां त्यानें पुन्हा बोलावयाला आरंभ केला—

"त्यांतून आम्ही पांढरपेशे;—मजुरांच्या दृष्टीनं आम्ही त्यांच्या परिश्रमांवर जगणाऱ्या भांडवलवाल्यांइतकेच उपरे. त्यांच्यांत अन् आमच्यांत जर ममत्वाचा खरा जिव्हाळा उत्पन्न व्हायला हवा असेल, तर आम्ही त्यांच्या रोजच्या जीव-नाशीं समरस झालं पाहिजे;—ज्या लहानसहान अडचणींमुळं त्यांचं संसारसुख कडवटून जातं, त्या दूर करण्यासाठीं आम्ही झटलं पाहिजे. तसे आम्ही ज्या दिवशीं झटूं, त्याच दिवशीं त्यांच्यांत आणि आमच्यांत खरा जिव्हाळा उत्पन्न होईल.—त्यांना असं वाटेल कीं, हे लोक जरी पांढरपेशे असले, तरी त्यांचं आणि आमचं आंतडं एक आहे. स्त्रियांच्या सहकारितेची निकड जर कुठं जाणवत असेल, तर ती याच बाबतींत. आम्ही पुरुष व्याख्यानं देऊं, चळवळ करूं, जरूर तर तुरुंगांतही जाऊं. पण, संसारांतील ज्या बारीकसारीक अडचणींनीं माणसाचं जीवन कडवट होऊन जातं, त्या अडचणी दूर करण्याची जादू आम्हां पुरुषांच्या जवळ नाहीं. लताताई, मला जें तुम्हांला विचारायचंय तें याबद्दलच.—सुमा-ताईंनीं आधींच कबूल केलंय.—पण आमच्या या कामांत तुमचं सहकार्य जर आम्हांला लाभलं, तर मी स्वतःला दैववान् समजेन—"

उत्तराच्या अपेक्षेनें तो थांबला. तें शेवटचें वाक्य उच्चारीत असतांना त्याच्या आवाजांत उत्पन्न झालेला कंप ललितेला जाणवला; व तिचेंही हृदय कंपित झालें.

त्याच्या त्या विनंतीनें ती गोंधळून गेली. गेल्या दीड वर्षांत त्याच्या विष-यींच्या आपल्या कल्पनांत कसकसे फरक पडत गेले, याचें चित्र तिच्या डोळ्यां-पुढें उभें राहिलें, व क्षणार्धांत अनेक विकारांच्या ऊर्मि तिच्या मनांत उठल्या. अगदीं आरंभीं तिला त्याच्याविषयीं एक प्रकारचें सभय कौतुक वाटे. एखादा चमत्कारिक, भयदायक प्राणी पाहिल्यावर ज्या प्रकारची जिज्ञासायुक्त भावना मनुष्याच्या मनांत उत्पन्न होते, तशा प्रकारचें तिचें तें कौतुक होतें. त्याच्या करारी स्वभावाच्या अनेक गोष्टी केशवनें तिला सांगितल्या होत्या; व त्याची ती तुटलेली करांगळी पाहिली, म्हणजे एखाद्या किल्ल्याचा भंगलेला बुरूज जसा त्याच्या रोमहर्षण इतिहासाचें स्मरण देतो, तशा त्याच्या धाडसाच्या त्या साऱ्या

गोष्टी तिला आठवत असत. केशवच्या मनावर जसजसा त्याच्या विचारांचा पगडा बसत गेला, तसतसें तिला त्याच्याविषयीं वाटणाऱ्या या कौतुकाचें पर्यवसान असूयेंत होत गेलें. आणि तिची हीच वृत्ति कदाचित् कायम राहिली असती. पण, गेल्या सहा महिन्यांत चंद्रशेखर हळू हळू तिच्या सान्निध्यांत इतका आला कीं, त्याच्या गुणांची मोहनी तिच्यावर पडून तिच्या मनांतील असूयेचें रूपांतर आदरांत होत गेलें. आणि, गेल्या आजारांत चंद्रशेखरनें जें प्रेमपूर्ण अगत्य तिच्याविषयीं दाखविलें, त्यामुळें त्या आदराची परिणति स्नेहभावांत झाली.

त्यामुळें त्याचे ते गंभीर, भावपूर्ण शब्द कानांवर पडत असतां तिला असें वाटलें कीं, सुमतिप्रमाणें आपणही त्याला सहकार्याचें आश्वासन द्यावें. पण लगेच तिच्या मनानें पलट खाल्ली.—मग इतके दिवस आपण बावूला कशाबद्दल दोष दिला ?—असा प्रश्न तिच्या विवेकबुद्धीनें तिला विचारला; व केशवशीं या विषयावर झालेलीं सारीं कडू बोलणीं तिला आठवून, तिच्या अभिमानी स्वभावानें उचल केली.

आणखीही एक नाजूक भावना तिच्या मनाला स्पर्श करून गेली. आणि, तिनें आपलें मन घट्ट करून, त्याची विनंती अमान्य करण्याचें ठरविलें.

तरीसुद्धां त्याला दुखवावें, असें मात्र तिला वाटेना. आणि ती स्तब्धच राहिली. चंद्रशेखर आपल्याकडे उत्कंठेनें पहात आहे, याची जाणीव तिला होती. त्यामुळें, तिचें मन अधिकच अस्वस्थ होऊन, कांहीं तरी चाळा हवा म्हणून तिनें खुर्चीला हेलकावे द्यावयाला सुरवात केली.

"माझी विनंती आपल्याला मान्य नाहीं, असं समजूं मी ?" चंद्रशेखरनें अधीरतेनें विचारलें.

"चंद्रशेखर, तुम्ही विनाकारण काढलात हा विषय आज.—तुम्हांला अवचित आलेले पाहून आमची संध्याकाळ फार मजेंत जाईल असं वाटलं होतं मला—"

"कां बरं ? ज्याला जो विषय अत्यंत प्रिय असतो, ज्या विषयाला त्यानं आपलं आयुष्य वाहिलेलं असतं, त्याला त्या विषयावर बोलण्यांतच आनंद वाटतो. लताताई, मला माहीत आहे, तुम्हांला माझे विचार पसंत नाहींत. पण असा योग—तुम्हां दोघां मैत्रिणींशीं मोकळेपणानं बोलण्याची अशी संधि पुन्हा मिळणार नाहीं,

असं वाटल्यामुळंच मी आज हें सारं बोललों. मी तुम्हांला जी विनंती केली, यांत मतांचा कांहीं संबंध नाहीं. तो केवळ समाजसेवेचा प्रश्न आहे—"

" नाहीं, चंद्रशेखर, हा नुसता समाजसेवेचा प्रश्न नाहीं. या समाजसेवेचं पर्यवसान अखेर कशांत होईल याची तुम्हांला कल्पना आहे अन् मलाही कल्पना आहे." बोलतां बोलतां ललिता उठून उभी राहिली; व चंद्रशेखरच्या दृष्टीला दृष्टि भिडवून तिनें त्याला म्हटलें, " यांत मतांचा कांहीं संबंध नाहीं असं तुम्ही कसं म्हणतां ? तुमच्या मतांविषयीं जिला प्रेम नाहीं, तुमच्या कार्यपद्धतीविषयीं जिला अभिमान नाहीं, अशा स्त्रीला कामगारांच्या वस्तींत जाऊन कष्ट करायला कसा हुरूप वाटेल ?—चंद्रशेखर, मी तुमचं तत्त्वज्ञान वाचलेलं नाहीं अन् मला त्यावर बोलण्याचाही पण अधिकार नाहीं. परंतु एक गोष्ट मात्र मला माहीत आहे.—देशोन्नतीबद्दलचीं तुमचीं मतं अन् देशसेवेच्या तुमच्या कल्पना भयंकर आहेत;—आमच्यासारख्या सामान्य माणसांनीं त्या मार्गानं न जाणंच चांगलं—"

"लताताई, तुम्ही व्यर्थ गैरसमजानं बोलतां आहां. तुमच्या मैत्रिणीला ज्या गोष्टी पटतात त्या तुम्हांला कां पटूं नयेत ?—"

" सुमाला तुमचीं मतं पटतात, यांत नवल नाहीं. ती मुळीं पहिल्यापासूनच तशा वातावरणांत वाढलेली आहे. पण, मला वाटतं, आपण या विषयावर अधिक न बोललेलंच बरं—"

" लताताई, आज मी केवढ्या आशेनं इथं आलों होतों ?"

" चंद्रशेखर, तुमचा शब्द मी सुखानं मोडला असं वाटतं का तुम्हांला ?"

इतकें बोलून ललितेनें एक उसासा टाकला आणि चंद्रशेखरकडे पाहिलें. त्याची दृष्टभेट होतांच, त्याच्या दुखावलेल्या भावनाच जणुं त्या विशाळ नेत्रांतून आपल्याकडे आर्ततेनें पहात आहेत, असें तिला वाटलें; व तिच्या मनाला अतिशय वेदना झाल्या.

थोडा वेळ कोणींच कांहीं बोललें नाहीं. खोलींतील प्रकाश आतां अगदीं कमी झाला होता. पण दिव्याची आवश्यकता कोणालाच वाटली नाहीं. कांहीं क्षण तशा त्या चमत्कारिक स्थितींत गेल्यावर सुमति विषय बदलण्याच्या हेतूनें म्हणाली, " आज तुमचं व्याख्यान असेल ना परळला रात्रीं ? "

" नाहीं. आज माझ्यामागं दुसरं एक काम होतं. पण तेंही मी केलं नाहीं."

त्याचा शब्द इतका जड येत होता कीं, दुरून कोठून तरी प्रतिध्वनित होऊनच तो येत आहे, असें त्या दोघींना वाटलें. तें वाक्य उच्चारून तो जाण्यासाठीं उठला.

त्याबरोबर ललिता त्याला म्हणाली, "बसा ना आणखी थोडा वेळ; कदाचित् बाबू इतक्यांत येईलही—"

तिला पुढें काय बोलावें हें सुचेना.

"जातों आतां.—तुम्ही जर उद्यां कॉलेजांत आलां नाहीं, तर मी कॉलेजांतूनच येईन इथं अन् तुम्हांला कंटाळा येईपर्यंत गप्पा मारीत बसेन तुमच्याशीं—"

एवढें बोलून तो हंसला. पण त्या हंसण्यांत त्याच्या मनोवेदना स्पष्ट उमटल्या होत्या. त्यानें दोघींना लवून अभिवादन केलें आणि तो बाहेर पडला.

तो रस्त्यावर आला, त्या वेळीं काळोख चांगलाच पडला होता; व पावसाचा एकाद दुसरा थेंबही मधून मधून पडत होता. पश्चिमेच्या क्षितिजावर चंद्राची कोर कुठेंच दृष्टीला पडत नव्हती. पण, क्षितिजाच्या त्या अभ्राच्छादित भागावरील मेघाचें एक काळसर शकल मात्र, दीपप्रभा रोधून धरणारें धूसर तावदान जसें उजळून दिसावें, तसें त्या काळोखांत झळकत होतें; व त्याच्या आड असलेल्या चंद्रकलेच्या गुदमरलेल्या प्रकाशांत क्षितिजावर सर्वत्र पसरलेल्या ढगांच्या वेड्यावांकड्या आकृति स्पष्ट दिसत होत्या. रस्ता माणसांनीं व मोटारींनीं अगदीं गजबजलेला होता. पण, चंद्रशेखरच्या उदास, चिंतनमग्न मनाला आपण जणुं एकटेच त्या रस्त्यांतून जात आहों, असें वाटत होतें. मोटारींच्या कर्ण्यांचें किंचाळणें किंवा रस्त्यांतून जाणारांचें खिदळणें यांपैकीं कसलाच आवाज त्याला ऐकूं येत नव्हता. त्याचीं पावलें इतक्या विमनस्कतेनें पडत होतीं कीं, त्याला अपघात होऊं नये म्हणून एका हातानें घोड्याचा लगाम जोरानें मागें खेंचीत त्याच्या अंगावर खेंकसणाऱ्या व्हिक्टोरियावाल्याचे दुःशब्दही त्याला ऐकूं आले नाहींत.

घरीं आल्यावर तडक आपल्या खोलींत जाऊन, त्यानें टेबलावरील दिव्याचें बटन दाबलें. त्याबरोबर त्याला पेपरवेटखालीं ठेवलेला एक लिफाफा दिसला. त्यावर तांबड्या पेन्सिलीनें 'निकडीचें' अशीं इंग्रजी अक्षरें लिहिलेलीं होतीं.

चंद्रशेखरनें तो घाईघाईनें फोडला. त्याच्या एका शपथबद्ध सहकाऱ्याचें तें इंग्रजी पत्र होतें; व त्यांत पुढील मजकूर होता—

प्रिय चंद्रशेखर,

आजची सभा तहकूब झाल्याचा निरोप आपल्याकडून येईल, असें मला स्वप्नांतही वाटलें नव्हतें. आपण एकाएकीं सभा कां रद्द केली, हें आम्हांला कळेल काय? हिंदुस्थानांत येण्याच्या बाबतींत वीरेंद्रांना करावयाच्या सूचनांपेक्षां तुम्हांला इतर कामांची निकड अधिक वाटावी, हें दुर्दैव होय.

तें पत्र वाचल्यावर, चंद्रशेखरला आपल्या डोळ्यांपुढें एकदम अंधार पसरला आहे, असें वाटलें.

प्रकरण २५ वें

# प्रथमच डोळ्यांत आलेले अश्रु



त्या दिवशीं चंद्रशेखरला निजून उठावयाला अतिशयच उशीर झाला; व त्याची चौकशी करीत खालीं कोणी तरी आल्यामुळें नोकरानें जर त्याला विद्युद्घंटेचा उपयोग करून मुद्दाम उठविलें नसतें, तर तो कदाचित् आणखी एकाद तास तसाच निजून राहिला असता. कारण त्यानें सारी रात्र बिछान्यावर तळमळत पडून घालविली होती. पहांटचा गार वारा सुटल्यावर, रात्रभर विचार करून थकवा आल्यामुळेंच बहुधा, त्याला झोंप लागली. त्याचा नेहमींचा प्रघात असा होता कीं, रात्रीं कितीही जागरण झालें, तरी सहाच्या नंतर अंथरुणावर पडून राहावयाचें नाहीं; व बहुधा त्याच्या आईच्या भूपाळ्यांच्या मंजुळ आलापांनींच रोज त्याला जाग येत असे. पण, आज खिडकींतून ऊन्ह आंत येऊन हवेंतला गारवा बहुतेक नाहींसा झाला, तरीही त्याची झोंप उघडली नाहीं.

विद्युद्घंटेचा आवाज झाल्याबरोबर तो उठला; व पलंगावरून झटकन खालीं उतरून त्यानें दाराची कडी काढली. तेव्हां दाराशीं उभ्या असलेल्या नोक-

रानें त्याला सांगितलें कीं, "रावसाहेब खालीं दिवाणखान्यांत आपली वाट पहात आहेत."

ती बातमी ऐकून तो विस्मित झाला. अलीकडे रावसाहेब त्याच्याकडे बरेच येत असत, ही गोष्ट खरी. पण, त्यांची भेट होऊन अद्याप पुरते चोवीस तासही लोटले नसतां, त्यांनीं आपल्याला पुन्हा दर्शनाचा लाभ द्यावा, याचें त्याला नवल वाटलें.

पण तो कांहीं बोलला नाहीं. त्यानें नोकराला फक्त एवढेंच सांगितलें कीं, "मी दहा मिनिटांत येतों; तोंपर्यंत बसायला सांग तूं त्यांना."

नंतर तो आंत आला; व खिडकींत ठेवलेल्या पुष्पपात्रांतील सायलीच्या गुच्छाचा वास घेऊन, त्यानें आपले कपडे बदलले. त्याला फुलें अतिशय आवडत असत. म्हणून त्याची आई त्याच्या निजावयाच्या खोलींतील खिडक्यांतून फुलांचे गुच्छ ठेवीत असे; व झोंपेंतून उठल्याबरोबर प्रथम त्या पुष्पगुच्छांचा वास घेऊन, नंतर आईला वंदन करावयाला जावयाचा त्याचा प्रघात होता. आज कपडे बदलल्याबरोबर तो घाईनें खालीं आला; व दिवाणखान्यांत बसलेल्या रावसाहेबांना नमस्कार करून, आपल्या भेटीसाठीं वाट पहात बसावें लागल्याबद्दल त्यानें त्यांची क्षमा मागितली.

"काल रात्रीं कांहीं विशेष कार्यक्रम होता कीं काय तुमच्या क्लबाचा ?—तुम्ही नाहीं तरी फारच श्रम करतां बुवा, चंद्रशेखर !" रावसाहेबांनीं म्हटलें.

"नाहीं.—काल रात्रीं मी घरींच होतों. पण झाला खरा उशीर उठायला. आपण वर माझ्या खोलींत बसा. मी आलोंच पांच मिनिटांत चहाची व्यवस्था करून."

एवढें बोलून तो आंत गेला; व नोकरानें रावसाहेबांना वर नेऊन त्याच्या अभ्यासाच्या खोलींत बसविलें.

त्या खोलींत येण्याचा रावसाहेबांचा तो पहिलाच प्रसंग होता. आजपर्यंत ते एकटे असे त्याच्याकडे कधींच आलेले नव्हते. ते नेहमीं नानासाहेबांच्या बरोबर तिथें येत असत; व चंद्रशेखर आपल्या आईच्या दिवाणखान्यांतच त्यांची भेट घेत असे. त्यामुळें त्या खोलींत आल्याबरोबर रावसाहेबांनीं

आपली चौकस दृष्टि मोठ्या आतुरतेनें चौफेर टाकली. तेव्हां, एक प्रकारचें विलक्षण गांभीर्य तेथील वातावरणांत भरलेलें आहे, असें त्यांना वाटलें. चंद्रशेखरची ती अभ्यासाची खोली म्हणजे तो एक लहानसा दिवाणखानाच होता. मात्र तिथें शोभिवंत पण निरुपयोगी अशी एकही वस्तु नव्हती. नाहीं म्हणावयाला, खोलीच्या मध्यभागीं असलेल्या त्याच्या लिहिण्याच्या मोठ्या टेबलावर एका बाजूला त्याच्या आईचा व दुसऱ्या बाजूला मार्क्सचा असे दोन छोटेखानी सुंदर बेंड फोटो तेवढे होते. एका कोंपऱ्यांतील टेबला-वर टाईपरायटर ठेवलेला होता; व दुसऱ्या कोंपऱ्यांतील टेबलावर ताजीं वर्तमानपत्रें पडलेलीं होतीं. मधल्या प्रशस्त टेबलावर पुस्तकें व लिहिण्याचें सामान होतें. त्या खोलीची बहुतेक भिंत पुस्तकांच्या मोठमोठ्या कपाटांनीं झांकून गेलेली होती; व खिडक्यांतील पुष्पपात्रांतून निरनिराळ्या सुवासिक फुलांचे गुच्छ ठेवलेले होते. पूर्वेकडील खिडक्यांतून सकाळचें हंसरें, सुखकर ऊन्ह आंत आलें होतें; व पश्चिमेकडील खिडक्यांतून आंत येणाऱ्या वाऱ्याच्या झुळका पहांटे फुललेल्या जाई, जुई, चमेलींच्या कळ्यांच्या मधुर परिमळाची लूट करीत होत्या.

रावसाहेब आंत आल्यावर साहजिकच त्या मधल्या टेबलाजवळ गेले; व त्यावर ठेवलेलीं पुस्तकें पहावयाला त्यांनीं सुरवात केली. त्याबरोबर आदल्या रात्रीं चंद्रशेखरनें वाचून विषादाच्या भरांत टेबलावर तसेंच उघडें टाकून ठेव-लेलें तें पत्र त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पत्र त्यांनीं वाचलें. आणि, सावज आटो-क्यांत आलेलें दिसतांच शिकाऱ्याच्या डोळ्यांत ज्या प्रकारच्या क्रूर हर्षाची चमक खेळते, तशा प्रकारची चमक एकदम त्यांच्या डोळ्यांत खेळली. त्यांनीं ताबडतोब दाराजवळ येऊन एकदां कानोसा घेतला; व झटकन परत येऊन लिफाफ्यासह तें पत्र आपल्या कोटाच्या आंतल्या खिशांत ठेवून दिलें.

हा कार्यभाग उरकल्यावर, ते कोंपऱ्यांतील टेबलाजवळ जाऊन, टाइम्सचा ताजा अंक वाचीत तिथें उभे राहिले.

इतक्यांत चंद्रशेखर व त्याच्या मागोमाग चहाचें सर्व साहित्य असलेला ट्रे हातांत घेतलेला नोकर आंत आला.

त्याला आंत आलेला पहातांच रावसाहेब हंसत हंसत म्हणाले, " चंद्रशेखर, तुमची ही अभ्यासाची खोली पाहून फार आनंद झाला बुवा मनाला !—आपण एकाद्या तत्त्वज्ञान्याच्या खासगी वाचनालयांतच उभे आहों, असं वाटलं मला. तुम्ही खरोखरीच शिष्य शोभतां आमच्या गुप्ते मास्तरांचे! तुमच्यासारखे निष्ठावंत अन् व्यासंगी तरुण पाहिले, म्हणजे या हतभागी राष्ट्राच्या भवितव्या-बद्दल मनांत थोडी तरी आशा उत्पन्न होते—"

बोलतां बोलतां त्यांचा आवाज गंभीर पण मार्दवपूर्ण होत गेला.

" रावसाहेब, आपण या वयांत जे परिश्रम इतिहासावर करतां आहां, त्या मानानं आमचा हा उद्योग कांहींच नव्हे. टिळक, चिंतामणराव वैद्य, शांताराम-पंत देसाई, राजवाडे यांच्यासारखीं आपल्या पिढींतलीं माणसं कुठं अन् आम्हीं कुठें!—त्यांची ती उद्योगशीलता, तो करारीपणा, ती चिकाटी—सारंच कांहीं विलक्षण!—पण चहा घेऊं या आतां आधीं आपण—"

ते दोघे बोलत असतां नोकरानें वेताचें सुबक चौकोनी टेबल मध्यें ठेवून, त्यावर चहाचें सर्व साहित्य व्यवस्थित मांडलें.

चंद्रशेखरनें चहा तयार करून तो रावसाहेबांना दिला; व टोस्टची एक बशीही त्यांच्यापुढें ठेवली. त्यांनीं लगेच टोस्टचा तुकडा तोंडांत घालून, त्याला मदत म्हणून चहाचा एक घुटकाही घेतला. तेव्हां, चंद्रशेखरनें त्यांना हंसत हंसत म्हटलें, " काल जेव्हां मी आपल्याबरोबर सकाळीं चहा घेतला, तेव्हां पुन्हा इतक्या लवकर एकत्र चहा घेण्याचा योग येईल असं वाटलं नव्हतं मला! —कालचा वाद फार छान झाला नाहीं ?—"

" हो तर!—त्या तुमच्या वादानंच तर आणलं मला इथं इतक्या लवकर आज!—हें पाहिलंत मी काय आणलंय तें तुमच्यासाठीं ?—"

बोलतां बोलतां रावसाहेबांनीं आपल्या डगल्याच्या खिशांतून एक पांढरा पुठ्ठा घातलेलें छोटें पुस्तक बाहेर काढलें.

चंद्रशेखरनें तोंडाला लावलेला चहाचा कप खालीं ठेवून मोठ्या उत्सुकतेनें तें पुस्तक त्यांच्या हातांतून घेतलें. तेव्हां त्याच्या पुठ्ठयावर पुढील सुंदर अक्षरें लिहिलेलीं त्याच्या दृष्टीस पडलीं—

India At The Cross-Road

तें नांव वाचून चंद्रशेखर अतिशय चपापला; व तें अक्षरही आपल्या ओळखीचें असावें असें त्याला वाटलें.

पण, रावसाहेबांची शोधक नजर आपल्या चेहऱ्यावर रोंखलेली आहे, याची त्याला जाणीव असल्यामुळें, त्यानें आपण चकित झाल्यासारखें दाखवून त्यांना विचारलें, " हें तर काल आपण मजजवळ मागत होतां तें पुस्तक !—अन् आपल्याला कुठं मिळालं हें ? मला द्याल ना दोन तीन दिवसांसाठीं ? एवढं महत्त्वाचं पुस्तक एकदां तरी डोळ्यांखालून गेलेलं असावं ?—"

" अहो, तुमच्यासाठींच तर आणलं मी तें मुद्दाम ! काल तुमच्याकडून उठल्यावर रा. ब. केळवकरांकडे गेलों होतों आम्ही.—ते माझे कॉलेजपासूनचे स्नेही. पुढें ते ॲडव्होकेट जनरल झाल्यावर तर आमचा फार निकट संबंध आला. त्यांची मुलगी कृष्णा;—तुमच्याबरोबरच यंदां बी. ए. झाली ती;—तिच्याकडून आणलं हें पुस्तक मी—"

" तिच्याकडून ? अन् तिच्या हातीं कसं काय आलं हें पुस्तक ? तिला तर वावडं आहे अगदीं असल्या विषयांचं—"

"तिचं स्वतःचं नाहीं हो हें पुस्तक ! नांव तर पहा आंतलं एकदां वाचून—"

इतकें बोलून रावसाहेबांनीं तें पुस्तक उघडून त्याच्यासमोर धरिलें. त्यांतल्या आरंभींच्या कोऱ्या पानावर लिहिलेलें नांव वाचतांच, चंद्रशेखरची मुद्रा एकदम विवर्ण झाली.

तें नांव त्याच्या एका अगदीं विश्वासांतल्या सहकाऱ्याचें होतें. कृष्णा केळवकरशीं त्याचा थोडासा प्रेमसंबंध असल्याची कुणकुण चंद्रशेखरच्या कानांवर आलेली होती. पण, तिच्यासारख्या चैनी, चंडोल मुलीला अशा तऱ्हेचें पुस्तक आपला स्नेही देईल, ही गोष्ट मात्र त्याच्या स्वप्नांतही आली नव्हती. त्यामुळें तें नांव वाचतांच त्याच्या मनाला एकदम चरका बसल्यासारखें झालें; व रावसाहेबांशीं निर्विकार मुद्रेनें बोलण्याचा, आतांपर्यंत यशस्वी झालेला, त्याचा प्रयत्न त्या क्षणीं फसला.

त्याच्या चेहऱ्यांत झालेला तो फरक रावसाहेबांच्या तीक्ष्ण दृष्टींतून सुटला नाहीं. पण, जणुं कांहीं, आपलें तिकडे लक्षच नाहीं, अशा आविर्भावानें त्यांनीं आपलें बोलणें चालूच ठेवलें.

"कळलं ना पुस्तक कुणाचं आहे तें?—त्यानं दिलं होतं तें कृष्णाला वाचायला म्हणून.—तें राहून गेलं तिच्याजवळ. काल आम्ही तिथं गेल्यावर वीरेंद्र चक्रवर्तीविषयीं बोलणं निघालं होतं सहज. तेव्हां रावबहादुरांनीं मुद्दाम कृष्णाला हांक मारून हें पुस्तक तिच्याकडून मला देववलं; अन् हंसत हंसत ते म्हणाले, "तुमच्या ब्रुईनसाहेबाची झडती माझ्या घरावर येऊं नये, म्हणून आधींच देतों हें पुस्तक तुमच्याजवळ मी!"—पुस्तक असं अचानक मिळाल्याबद्दल काय आनंद झाला बघा मला! काल रात्रींच्या रात्रीं मी तें वाचून टाकलं सारं; अन् मुद्दाम घेऊन आलों उठल्याबरोबर तुमच्याकडे! पण काय हो, वीरेंद्र इथं येणार आहे म्हणे कलकत्त्याच्या जादा कॉंग्रेसला हजर राहण्यासाठीं?—कालच संध्याकाळीं कुठल्या तरी वर्तमानपत्रांत वाचलं मी—"

"नाहीं बुवा, मला तर नाहीं कुठं वाचलेलं आठवत!—चहा घेतां का रावसाहेब थोडा आणखी?" असें म्हणून त्यानें रावसाहेबांची नजर चुकविण्यासाठीं लगेच चहाचे कप पुन्हा भरावयाला सुरवात केली.

त्याची ती बावरलेली मनःस्थिति रावसाहेबांच्या लक्षांत आली. पण तिकडे दुर्लक्ष करून त्यानें पुढें केलेला चहाचा कप घेत ते म्हणाले, "नाहीं कसं?—मला वाटतं, 'पत्रिके'तच वाचली मी ती बातमी काल—"

"असेल कदाचित्.—पण पुस्तक कसं काय वाटलं हें आपल्याला—"

"तें कांहीं विचारूं नका. फार सुंदर—अगदीं अप्रतिम. एकदां वाचायला घेतल्यावर खालीं ठेववत नाहीं हातांतून! काल रात्रीं ते आमच्या मंडळांतले प्रो. पोतनीस आले होते आमच्याकडे.—त्यांच्याशीं रात्रीं अकरा वाजेपर्यंत शिवाजी महाराजांच्या हस्ताक्षराबद्दल वाद झाला. त्यानंतर मी हें पुस्तक घेतलं वाचायला अन् पहांटे तीनच्या सुमारास संपवलं बघा.—पण इतक्या लवकर कसं संपलं म्हणूनच मनाला चुटपुट लागली अन् समाधान कांहीं झालं नाहीं मनाचं! हिंदी राजकारणावर असा अचूक मार्ग दर्शविणारा ग्रंथ आपण तरी

वाचला नव्हता आजपर्यंत.—खरं सांगतों तुम्हांला चंद्रशेखर, अशा क्रांतिकारक तत्त्वज्ञाच्या सहवासांत रहायला मिळालं पाहिजे कांहीं दिवस !—तुम्हांला नाहीं असं वाटत ?—"

" वाटतं पुष्कळ रावसाहेब; पण उपयोग काय ? तसा योग येणार कसा ? आपण म्हणतां, वीरेंद्र इथं येणार असल्याची बातमी आहे म्हणून. पण मला नाहीं वाटत ते इथं येऊन आपला जीव धोक्यांत घालतील म्हणून ! जन्मठेपीच्या शिक्षेचा शाप डोक्यावर कडाडत असतां कोणता मनुष्य इथं येण्याचं धाडस करील ?—"

" चंद्रशेखर, उगाच ठेवलाय हा मार्क्सचा फोटो तुम्ही आपल्या टेबलावर ! राग नका मानूं माझ्या स्पष्ट बोलण्याचा.—तुम्ही अजून बच्चे आहांत ! तुम्हांला क्रांतिकारक कशा रीतीनं आपल्या गुप्त चळवळींचीं सूत्रं खेळवतात याची कल्पना नाहीं दिसत अद्याप.—अहो, हा वीरेंद्र महायुद्धाच्या ऐन धामधुमींत हिंदुस्थानांत येऊन गेला !—मी नोकरीवर होतों त्या वेळीं. अन् आमच्या खात्यानं त्याला पकडण्यासाठीं जंग जंग पछाडले.—पण आम्हांला पत्ता न लागतां सरहद्दीवरील सारे पहारे चुकवून तो अफगाणिस्थानांत पळाला ! महायुद्धासारख्या कडव्या बंदोबस्ताच्या काळांत जो गृहस्थ हिंदुस्थानांत येऊन गेला तो काय या शांततेच्या काळांत इथं यायला कचरेल ? पुस्तकांच्या कपाटांत तुम्ही जें हें स्वतःला कोंडून घेतलंय, त्याच्या ऐवजीं जर अशा तऱ्हेच्या गुप्त चळवळींतून तुम्ही प्रत्यक्ष भाग घ्याल, तर तुम्हांला कल्पना येईल या साऱ्या गोष्टींची पुस्तकं सारखीं वाचीत राहिल्यानं मनुष्य फार तर क्रांतीच्या तत्त्वांवर एकाद उत्तम ग्रंथ लिहील. पण क्रांति घडवून आणणं, गुप्त मंडळांचीं सूत्रं हलविणं !—अं हं, त्या गोष्टींना कांहीं निराळ्याच प्रकारची तयारी लागते—"

रावसाहेब इतकें बोलून मोठ्यानें हंसले.

" पण आपल्याला ज्या गांवाला जायचं नाहीं त्याची वाट पुसाच कशाला मी मार्क्सचा फोटो माझ्या टेबलावर ठेवला असला, त्याचं वर्गकलहाचं तत्त्व मला मान्य असलं, तरी शस्त्राच्या धारेनंच फक्त तो कलह तुटेल, असं मानणारा मात्र मी नाहीं. मला तडजोडीचाच मार्ग व्यवहार्य वाटतो. आपण बघतां

आहांत.—गेले तीन चार महिने जीं व्याख्यानं मी आपल्या कामगारवर्गांत दिलीं, त्यांतूनसुद्धां मी कधीं क्रांतीच्या कल्पनेचा पुरस्कार केला नाहीं.—अहो, ज्या देशांतल्या मजुरांना अजून संघटनेचा ओनामा देखील माहीत नाहीं, त्या देशांत मार्क्सच्या न् लेनिनच्या कार्यपद्धतीचा अवलंब करण्याच्या गोष्टी बोलणं नादानपणाचं नाहीं का होणार? वीरेंद्रांना काय होतं स्वित्झर्लंडांत बसून क्रांतीचा पुरस्कार करणारीं पुस्तकं न् पत्रकं लिहायला! त्यांना परदेशांत जाऊन बारा वर्षं होत आलीं आतां;—त्यांना काय कल्पना आहे इथल्या कामगारवर्गाच्या स्थितीची? युरोपांतल्या कामगारांच्या चळवळी ते पहातात, तिथल्या क्रांतिकारकांच्या भेटीगांठी घेतात, आणि त्यांचीं तत्त्वं जशींच्या तशीं हिंदुस्थानाला लागू करण्याचा वेडेपणा ते करतात! पण, त्यांनीं कांहींही लिहिलं अन् तें वाचायला कितीही मोहक वाटलं, तरी इथल्या कामगार पुढाऱ्यांनीं शक्याशक्यतेच्या दृष्टीनंच आपला मार्ग आंखला पाहिजे—"

"कसली घेऊन बसलां आहांत शक्याशक्यता तुम्ही, चंद्रशेखर! शक्याशक्यतेच्या संशयपिशाचानं ज्यांना एकदां झपाटलं, त्यांच्या हातून कधींच क्रांति घडून आलेली नाहीं! तुम्हांला काय असं वाटतं का, कीं लेनिननं ज्या वेळीं क्रांतीचं निशाण उभारलं, त्या वेळीं रशियांतल्या प्रत्येक शेतकऱ्याला साम्यवादाचीं तत्त्वं पटलीं होतीं म्हणून? त्यानं संधि पाहिली न् निशाणीं घाव घातला. देशांतील प्रत्येक मनुष्य क्रांतीला तयार होईपर्यंत जर वाट पहायचं ठरलं, तर क्रांति मुळीं कधीं घडून येण्याची आशाच नको!—बहुजनसमाज हा स्वयंस्फूर्तीनं कधींच क्रांति घडवून आणीत नाहीं. कोणी तरी साहसी वीरपुरुष आपल्या कर्तृत्वानं त्याला क्रांतीला प्रवृत्त करतो.—तुमचं आपलं नुसतं पुस्तकी पांडित्य आहे असं मी जें म्हणतों, तें हेंच. एकाद्या देशांत क्रांति घडून आली, म्हणजे स्वतःच्या अभ्यासाच्या खोलींत बसून, जग जणुं कांहीं पार्थिव लिंगाप्रमाणं आपल्या तळहातावर ठेवलेलं आहे अशा भावनेनं, साऱ्या उलाढालींचा विचार करणारे जडबुद्धि ग्रंथकार त्या क्रांतीचे धागेदोरे धुंडाळण्याच्या उद्योगाला लागतात. अन् असं सिद्ध करून दाखवितात कीं, वर्षानुवर्षं त्या क्रांतीची पूर्वतयारी चालली होती! आमच्या खरेशास्त्र्यांनीं चालवलाच आहे कीं उद्योग सध्यां शिवाजी महाराजांनीं केलेल्या राज्यक्रांतीचं सारं श्रेय तंजावरांत जाऊन नामशेष झालेल्या

शहाजीराजांच्या गळयांत बांधायचा !—हे सारे निव्वळ या इतिहासकारांच्या कल्पनाशक्तीचे खेळ असतात.—तुमच्यासारख्या रोमँटिक कल्पनांनीं भारलेल्या भोळसट मुलांनींच ते खरे मानावे ! अहो, क्रांति म्हणजे कांहीं लॅबोरेटरींत प्रोफेसराच्या देखरेखीखालीं तोलून मापून केलेला प्रयोग नव्हे ! कोणत्याही प्रकारच्या पूर्वतयारीशिवाय घडून येते, म्हणूनच ती क्रांति—"

बोलतां बोलतां रावसाहेबांचा आवाज इतका चढला कीं, कांहीं दिवसांपूर्वी शिवजयंतीच्या उत्सवानिमित्त मारवाडी विद्यालयांत त्यांनीं दिलेल्या व्याख्यानाची चंद्रशेखरला आठवण झाली. त्यांच्या असल्या वक्तृत्वापासून तो नेहमींच आपली करमणूक करून घेत असे. पण आज मात्र त्याला तें असह्य झालें; व हातांतल्या घड्याळाकडे पहात, खुर्चीवरून अर्धवट उठल्यासारखें करून, तो त्यांना म्हणाला, "मी आतां स्नानाला उठतों, रावसाहेब. कॉलेज आहे मला आज.—आपण वाटल्यास आईशीं बोलत बसा खालीं—"

त्याच्या त्या उद्गारांत व्यक्त झालेला उबग रावसाहेबांना जाणवला. पण, त्याकडे लक्ष न देतां ते म्हणाले, "किती ? साडे नऊ वाजले का ? माफ करा हं.—फार वेळ घेतला मी तुमचा आज, चंद्रशेखर !—पण तुमच्याशीं एकदां बोलायला लागलं, म्हणजे उठून जाऊं नयेसं वाटतं इथून. खरोखर तुमच्यासारख्या तरुणाशीं वाद घालणं हा एक मोठाच सुखविषय आहे—"

हें शेवटचें वाक्य रावसाहेबांनीं इंग्रजींत उच्चारलें; व ते काठी सांवरून उभे राहिले. पण, तितक्यांत आठवण झाल्यासारखें करून ते चंद्रशेखरला म्हणाले, "मग काय ठेवतांना तुम्ही तें पुस्तक ?—तुम्ही जरी कायमचं ठेवलंत तरी सुद्धां माझी हरकत नाहीं. माझ्यासारख्या म्हाताऱ्या पेन्शनराजवळ रहाण्यापेक्षां तुमच्यासारख्या तरुण पिढीच्या उदयोन्मुख पुढाऱ्याजवळ राहिलं, तर कॉलेजांतल्या देशाभिमानी विद्यार्थ्यांच्या वाचनांत तरी येईल तें—"

तें अखेरचें वाक्य उच्चारतांना त्यांनीं पुन्हा इंग्रजीचा आश्रय केला; व ते मनःपूर्वक मोठ्यानें हंसले.

"तूर्त तरी मी ठेवून घेतों.—खरोखरी रावसाहेब, क्रांतिकारकांविषयीं आपल्याला इतका जिव्हाळा असेल, असं वाटलं नव्हतं कधीं मला ! आपलं शरीर म्हातारं झालं असलं, तरी त्यांत वास करणारं मन मात्र अगदीं तरुण आहे—"

चंद्रशेखरनें त्यांना इंग्रजींतूनच उत्तर दिलें; व ते दोघे बोलत बोलत बाहेर आले. बंगलीच्या फाटकापर्यंत त्यांना पोंचवून तो परत आला. तेवढ्या वेळांत नोकरानें चहाचें सामान उचलून, सर्व वस्तु पुन्हा जिथल्या तिथें ठेवल्या होत्या. खोलींत आल्यावर तो आपल्या लिहिण्याच्या टेबलाजवळ गेला. त्याबरोबर त्याला एकदम रात्रीं वाचून तिथेंच टाकलेल्या त्या पत्राची आठवण झाली. पण तें त्याला दिसलें नाहीं. आपण कदाचित् तें पॅडमध्यें ठेवलें असेल, अशी शंका त्याच्या मनांत आली. म्हणून त्यानें पॅडचें प्रत्येक पान चाळून पाहिलें; पुस्तकें सर्व तपासलीं; व शेवटीं टेबलावर कुठेंच जेव्हां तें सांपडलें नाहीं, तेव्हां त्यानें भराभर टेबलाचे सारे खणही उपसून बघितले.

पण त्याची निराशा झाली.

अखेर त्यानें गड्याला बोलावून त्यालाही विचारलें. पण त्यानेंही, आपण तें पत्र मुळींच पाहिलें नाहीं, असें सांगितलें. त्याचें तें उत्तर ऐकतांच रावसाहेबांनीं तर तें पत्र उचललें नसेल ना, अशी एक शंका झटकन त्याच्या मनाला शिवून गेली.

लगेच त्याच्या मनांत दुसरीही एक शंका आली.

वीरेंद्र हिंदुस्थानांत येणार असल्याची जी बातमी रावसाहेबांनीं आपल्याला सांगितली, ती त्या पत्राच्या आधारानें तर नव्हे ? कारण ती बातमी अत्यंत गुप्त होती; व रावसाहेबांनीं जरी 'पत्रिके'चें नांव त्या बातमीच्या बाबतींत घेतलें होतें, तरी ती कोणत्याही वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेली नाहीं, याबद्दल त्याची खात्री होती. मग रावसाहेबांना ती बातमी कशी कळली ?

अर्थात् त्या पत्रावरून !—आणि त्यांनींच तें पत्र लांबविलें.

ती कल्पना मनांत येतांच, आपल्या भोंवतालचें जग फिरतें आहे, असा भास त्याला झाला. त्याला असें वाटलें कीं, आपल्या शरीराला आंतून जणुं शोष लागला आहे, आपल्या मनाच्या सर्व शक्ति गहिरून गेल्या आहेत. संताप आणि अनुताप यांनीं त्याच्या जिवाची होरपळ झाली.

त्याच्या मनानें त्याला नाहीं नाहीं तो दोष दिला. आपण ललितेकडे कां गेलों ? तिच्या भेटीला जाण्याचा मोह जर आपण आंवरला असता तर ?—तर

सभा तहकूब करावी लागली नसती, तें पत्र आपल्याला आलें नसतें आणि रावसाहेबांसारख्या काळसर्पाच्या हातीं तसला अव्वल दर्जाचा पुरावा गेला नसता. ललितेकडे जाण्याचा मोह ?—होय, मोहच तो ! तिच्याविषयीं आपल्या मनांत उत्पन्न झालेली आसक्ति;—ती आसक्ति आपण वेळींच दाबून टाकली नाहीं, म्हणूनच अखेर हा प्रसंग ओढवला. पंधराच दिवसांपूर्वी आपण प्रमिलेला मोठ्या दिमाखानें सांगितलें होतें कीं, स्त्रीप्रेम आपल्याला वर्ज्य आहे. पण तो दिमाख आज धुळीला मिळाला ! ललितेविषयींचा मोह !—हाय, त्या मोहापायीं आज केवढा हा अनर्थ झाला !

आणि, तो अनर्थ असा कीं, ज्याचे दुष्परिणाम टाळणें कालत्रयींही शक्य नाहीं.

चंद्रशेखर मटकन खुर्चीवर बसला; व त्यानें आपलें मस्तक टेबलावर टेंकलें. त्याच्या डोळ्यांतून आजपर्यंत फक्त संतापाचे स्फुलिंग तेवढेच बाहेर पडले होते. पण, आज त्यांतून अनुतापाच्या अश्रूंचा लोट वाहून त्याच्या मस्तकाखालचें पॅड भिजून गेलें.

पण त्याचा हा दुःखावेग अगदीं थोडा वेळ टिकला. लगेच त्याला वाटलें कीं, आपल्या मनानें अशा रीतीनें हाय खाणें, हें आपल्याला शोभत नाहीं. तशा तऱ्हेचें पत्र रावसाहेबांच्या हातीं जाणें, हा अनर्थ तर खराच. पण म्हणून काय आपण टिपें गाळीत बसावयाचें ? अश्रु म्हणजे मूर्तिमंत अशरणता;—दुर्बलतेचा द्रवीभूत आविष्कार. त्या अशरणतेच्या भावनेनें आपल्याला जर आणीबाणीच्या प्रसंगीं पछाडलें, तर आपल्या हातून, वीरेंद्रांच्या अपेक्षेप्रमाणें, इतकीं कामें कशीं होतील ?

हा विचार मनांत प्रादुर्भूत होतांच तो एक प्रकारच्या ईर्ष्येनें ताबडतोब उठला. त्याला असें वाटलें कीं, काय वाटेल तें झालें तरी चालेल, रावसाहेबांच्या हातून तें पत्र परत मिळविलेंच पाहिजे. पण तें परत कसें मिळवावयाचें ?

त्याला एक कल्पना सुचली. ती सुचतांच त्यानें टेबलाचा चोरखण घाईघाईनें उघडला; व त्यांतून आपला रिव्हॉल्वर बाहेर काढला.

पण लगेच त्याला वीरेंद्रांचा तो आदेश आठवला. जालियनवाला बागेंतील हत्याकांडानंतर त्यांच्या कांहीं पंजाबी मित्रांच्या मनांत जनरल डायरचा सूड घेण्याची कल्पना आली होती. पण, वीरेंद्रांनीं त्यांना स्पष्ट कळविलें कीं, असल्या

वैयक्तिक अत्याचारांनीं आपल्या कार्याचा विघात मात्र होईल. आपलें ध्येय सामुदायिक उठावणीचें,—बहुजनसमाजाकडून क्रांति घडवून आणण्याचें आहे. अशा प्रकारच्या वैयक्तिक अत्याचारामुळें जी प्रतिक्रिया घडून येते, तिचा बहुजन-समाजाच्या मनावर अत्यंत अनिष्ट परिणाम होतो. एका व्यक्तीवरील अत्याचाराच्या पायीं अनेक साहसी व्यक्तींच्या जन्माची माती होते; राज्यसत्तेच्या बालाग्रालाही धका पोंचत नाहीं; व लोकांना मात्र प्रतिक्रियेची दहशत बसते. म्हणून, समाजसत्ताक क्रांतीच्या प्रवर्तकांनीं व्यक्तिविषयक अत्याचार करण्याच्या मोहाला केव्हांही बळी पडतां कामा नये.

हा त्यांचा आदेश त्याला आठवला; आणि त्याबरोबर पुन्हा एकवार असहायतेच्या भावनेनें त्याला पछाडलें. हा उपाय जर अपायकारक असेल, तर मग रावसाहेबांच्या हातून तें पत्र परत मिळवावयाला दुसरा कोणता मार्ग आहे? त्या पत्राच्या जोरावर ते मला आणि माझ्या सहकाऱ्यांना तर तुरुंगांत डांबतीलच; पण, साम्यवादाच्या प्रसाराची जी चळवळ आतां नुकती कुठें सुरू झाली आहे, तिचाही ते उच्छेद करितील.

ही आपत्ति कशी टळणार?

तो खुर्चीवरून उठला; व एक प्रकारच्या विवशतेच्या भरांत त्यानें खोलींत फेऱ्या घालावयाला सुरवात केली.

इतक्यांत नोकरानें आंत येऊन त्याच्या हातांत एक लिफाफा दिला. तो लिफाफा फोडून वाचतांच त्याच्या मनांत एक कल्पना आली; व त्याच्या त्या दुःखाविष्ट नेत्रांत एका चमत्कारिक आशेचें तेज लकाकलें.

तो लिफाफा प्रमिलेचा होता.

---

प्रकरण २६ वें

## विषाची परीक्षा यशस्वी ठरली



दिलरुब्याचे ते मधुर सूर कानांवर पडतांच चंद्रशेखर मोहित झाला. क्षणभर त्याला असें वाटलें कीं, आपण इथेंच रस्त्यावर ऐकत उभें राहावें. कारण, आपण

आंत गेलों, तर प्रमिला ताबडतोब वादन थांबवील. तिच्या संगीतनैपुण्याची ख्याति त्यानें ऐकिली होती. पण, ती दिलरुबा इतका उत्कृष्ट वाजवीत असेल, अशी मात्र त्याला मुळींच कल्पना नव्हती. म्हणून, ती वाजवित असलेली तेवढी चीज संपेपर्यंत तो पदपथावर उभा राहिला. पावसाची झिमझिम सुरू होती; व संधिप्रकाश जरी अद्याप पुरता लोपलेला नव्हता, तरी रस्त्यावरील दिवे लागलेले होते. संध्याकाळच्या कुंद वातावरणांत त्या दिव्यांचा फिका, पिंवळसर प्रकाश निराशेनें घेरलेल्या हृदयांत लुकलुकणाऱ्या दुर्बल आकांक्षांसारखा वाटत होता. वर आभाळांत विजा सारख्या चमकत होत्या; व खालीं ट्रॅमच्या तारांतूनही पांढऱ्या निळ्या प्रकाशाची दीप्ति मधून मधून उफाळत होती. ती गर्दीची वेळ असून सुद्धां, हवेच्या अननुकूलतेमुळेंच बहुधा, रहदारी थंडावल्यासारखी वाटत होती. नाहीं म्हणावयाला, कोटाच्या बाजूनें ट्रॅमच्या गाड्या मात्र माणसांनीं एकसारख्या भरभरून येत होत्या. त्यांच्या घंटांचा सतत होणारा तो आवाज सायंकाळच्या वेळीं जमावानें घरट्याकडे परत येणाऱ्या पक्ष्यांच्या गोंगाटासारखा वाटत होता.

पण, चंद्रशेखर दिलरुबा ऐकण्यांत इतका तल्लीन झाला होता कीं, त्या अरुंद पदपथावरून घाईनें जाणाराचा क्वचित् धक्का लागला, तरीही तो त्याला समजत नसे. आणि, आज डोक्यावर हॅट असल्यामुळें, पदपथाला अगदीं भिडून जाणाऱ्या मोटारीनें पाणी अंगावर उडविल्याशिवाय त्याला पाऊस सुरू असल्याचीही जाणीव फारशी होत नव्हती. त्याला तिथें तसा उभा असलेला बघून, रस्त्यावर वर्तमानपत्रें विकीत असलेल्या पोरांना तो ट्रॅमची वाट पहात आहे, असें वाटलें; व त्यांच्यापैकीं एक मुलगा त्याच्याजवळ येऊन, आपल्या खांकोटींतील वर्तमानपत्राचा एक अंक त्याच्या पुढें करीत म्हणाला, "साहेब, ईव्हनिंग न्यूज घेतां का ?—"

त्याच्या त्या केंविलवाण्या प्रश्नानें चंद्रशेखरला त्या संगीतसमाधींतून ओढून बाहेर काढलें; व त्यानें त्या समोर उभ्या असलेल्या पोराकडे न्याहाळून पाहिलें. पावसानें त्या मुलाचे कपडे भिजून गेले होते. खांकोटींतील जाड पुठ्ठयामध्यें व्यवस्थित रीतीनें गुंडाळलेला वर्तमानपत्रांचा गठ्ठा तेवढा कोरडा होता. डोक्यावर पडलेल्या पावसाच्या पाण्याचे व सारखी धांवपळ करीत असल्यामुळें आलेल्या घामाचे ओघळ त्याच्या तोंडावर निथळत होते; आणि फाटक्या सद-

ज्यांतून त्याच्या बरगड्या व पाठीला भिडलेल्या पोटावरील डागाचा मोठा थोरला वण स्पष्ट दिसत होता.

इतर कोणी जर चंद्रशेखरला या वेळीं त्या तंद्रेंतून जागें केलें असतें, तर तो खरोखरीच त्याच्यावर अतिशय रागावला असता. पण, अंक पुढें करून आपल्या-कडे उत्कंठेनें बघत उभ्या असलेल्या त्या मुलाची ती दीन मूर्ति पहातांच, त्याच्या मनांत पहिल्या सपाट्याला उसळून आलेले रागाचे सारे विचार मावळले. आणि, त्या वेळीं जरी कोणतेंच वर्तमानपत्र घेण्याची त्याला इच्छा नव्हती, तरी त्या मुलाच्या हातून तो अंक घेत चंद्रशेखरनें त्याला म्हटलें, "हें घे.—डेली मेल नाहीं का रे तुझ्याजवळ ?—"

"नाहीं साहेब—"

तो पुढें कांहीं बोलणार, तोंच ट्रॅम आली. तेव्हां, चंद्रशेखरनें हातांत टाकलेलें नाणें कसलें आहे हें न पहातां, आपल्या सदऱ्याच्या झोळणेवजा खिशांत तें घाईघाईनें टाकून, तो धांवतच ट्रॅमजवळ गेला.

तो गेल्यावर चंद्रशेखरनें त्या अंकावर नजर टाकली. त्याबरोबर त्याला अगदीं पहिल्याच पानावर पुढील प्रश्नचिन्हांकित मथळा दिसला—

'निर्वासित क्रांतिकारक हिंदुस्थानांत येणार ?'

त्या मथळ्याखालीं वीरेंद्र चक्रवर्तीचा हिंदुस्थानांत येण्याचा विचार असल्याची बातमी दिली होती; व नंतर महायुद्धाच्या धामधुमींत ते हिंदुस्थानाला निसटती भेट देऊन कसे गेले होते, याचें थोडक्यांत चटकदार वर्णन केलें होतें.

ती बातमी वाचून चंद्रशेखर चकित झाला नाहीं. कालपासून आपल्या हातून घडत आलेल्या चुकांचें हें स्वाभाविक पर्यवसान आहे, असेंच त्याला वाटलें; व त्याच्या मनाला वेदना झाल्या. पण क्षणभरच. या वेळीं कोणत्याही मनोविका-राला बळी पडण्यापेक्षां, रावसाहेबांच्या हातून तें पत्र परत मिळविण्याचा प्रयत्न आधीं केला पाहिजे, असा विचार त्याच्या मनांत आला. आणि तो तडक जिना चढून वर गेला.

प्रमिला कोंचावर बसून दिलरुबा वाजवीत होती. टेबलावरील विद्युद्दीपावर निळें आच्छादन घातलेलें असल्यामुळें व संधिप्रकाश अद्याप पुरता नाहींसा झालेला नसल्यामुळें, फिका पडलेला दिव्याचा प्रकाश उदास वाटत होता;

व त्या मंदनील प्रकाशांत पारव्या रंगाचें पातळ नेसलेली त्या नादमुग्धेची कमनीय मूर्तिही उदास दिसत होती. आणि, तिच्या उन्नत वक्षःस्थलाला अलगत टेंकलेल्या त्या वाद्यांतूनही उदासीनतेला अनुकूल असे संवादी सूर निघत होते.

चंद्रशेखर आंत येऊन खुर्चीवर बसला, येतांना त्याच्या बुटांचा आवाज झाला, तरीही प्रमिलेचें लक्ष त्याच्याकडे गेलें नाहीं. ती जर इतर कोणती वेळ असती, तर त्यानेंही त्या नादमोहितेच्या समाधीचा भंग न करितां, तिचें तें भावमधुर वादन मुकाट्यानें ऐकलें असतें. पण, रस्त्यांत वाचलेल्या बातमीमुळें बेसुमार चाळवलेलें त्याचें मन त्याला स्वस्थ बसूं देईना; व तिच्याकडे सस्मित मुद्रेनें पहात त्यानें इंग्रजींत हळूच म्हटलें, "आपल्या वादनांत व्यत्यय आणल्याबद्दल मला फार वाईट वाटतें. आपण कशाला बोलावलं होतं मला ?—"

"अगदीं वेळेवर आलांत तुम्ही आज," हातांतला दिलरुबा लगबगीनें खालीं ठेवीत तिनें हंसून इंग्रजींत म्हटलें; व लगेच तिनें पुढील वाक्य मराठींत उच्चारलें, "वाद्यांच्या निरर्थक सुरांत किती तरी अधिक अर्थ भरलेला असतो नाहीं ?"

आणि तिनें दिलरुब्याला गवसणी चढवावयाला सुरवात केली.

"केशवसुतांनीं म्हटलंच आहे, 'व्यर्थी अधिकचि अर्थ वसे' !"

त्याच्या त्या उद्गारांत कुचेष्टा गर्भित आहे, असें तिला वाटलें; व तिच्या भुंवया वर चढून ती किंचित् रागानें म्हणाली, "मी असं ऐकलं होत कीं गाणं तुम्हांला फार आवडतं म्हणून.—पण मला वाटतं कीं, माणसानं एकदां कोणत्याही एकाद्या गोष्टीचं वेड डोक्यांत घेतलं, म्हणजे त्याच्या रसिकतेला अन् अभिरुचीला ग्रहण लागतं—"

"खरं आहे आपलं म्हणणं थोडंसं.—पण आपण मला कशाला बोलावलं होतं ?—"

"अगदीं उगाच.—तुम्ही आपण होऊन कांहीं कधीं गप्पा मारायला येणार नाहीं, म्हणून मुद्दाम बोलावणं पाठवलं.—का ? तुमच्या कार्यक्रमांत तर कांहीं कुठला बदल करावा लागला नाहीं ना माझ्या बोलावण्यामुळं ?—"

इतक्यांत तिची दृष्टि त्यानें आल्याबरोबर टेबलावर ठेवलेल्या वर्तमानपत्राकडे गेली; व तिनें तो अंक घाईनें उघडून पाहिला. त्याबरोबर पहिल्याच पानावरील ती प्रश्नचिन्हांकित बातमी तिच्या दृष्टीस पडली. ती बातमी वाचतांच खेद

आणि विस्मय यांनीं प्रमिलेच्या भृकुटि वक्र होऊन, तिचे ओंठ तिला अगदीं न कळत आंत मुरडले. आणि तिच्या डोळयांत विलक्षण भीरुता प्रकट झाल्याचा भास चंद्रशेखरला झाला.

ती बातमी पुरती वाचून होतांच प्रमिलेनें पत्र खालीं टाकलें. किंबहुना तिच्या हातांतून तें गळून पडलें म्हटलेलेंच अधिक शोभेल. आणि हंसल्यासारखें करून अत्यंत स्थिर अशा दृष्टीनें तिनें चंद्रशेखरकडे पाहिलें.

पण, त्या हास्यांत तिच्या मनांत या वेळीं उत्पन्न झालेल्या भीतीचा दारुण भाव स्पष्ट उमटला होता; व तिच्या ओंठांच्या ईषत्कंपावरून तिच्या मनाची त्रस्त स्थिति स्पष्ट दिसत होती. चंद्रशेखर तिच्याकडे अगदीं न्याहाळून, तिच्या दृष्टीला अगदीं दृष्टि भिडवून, पहात होता. त्याच्या दृष्टीचा भेदकपणा यापूर्वी तिला कधीं जाणवला नव्हता. पण आज त्याचा तो दृष्टिपात म्हणजे तिला विद्युत्पातच वाटला.

" रावसाहेब आज सकाळीं आमच्याकडे आले होते.—आपल्याला माहितच असेल बहुतेक—"

" होय.—तिथूनच ते बहुधा इथं आले साडे दहाच्या सुमारास—"

" अन् इथून ते ब्रुईनसाहेबांकडे गेले ?"

" तें कसं मला कळणार ?" प्रमिलेनें रागानें विचारलें. आपण मनाच्या बावरलेल्या स्थितींत भलतीच गोष्ट बोलून गेलों, असें तिला वाटलें.

" खरंच कसं कळेल ?—पण माझा आपला एक तर्क आहे—"

इतकें बोलून तो क्षणभर थांबला. नंतर, त्याच्या मनांत काय आलें कोणाला ठाऊक, तो उभा राहिला; व प्रमिलेकडे एकाग्र दृष्टीनें पहात तिला म्हणाला, " प्रमिलाबाई, मी आज अत्यंत संकटांत आहें अन् त्यांतून तुमच्याशिवाय दुसरं कोणीही मला सोडवूं शकत नाहीं—"

त्याचे ते उद्गार ऐकतांच तिचा चेहरा एकदम विवर्ण झाला; व तिच्या डोळयांत अश्रु येत आहेत, असें त्याला वाटलें. आपल्या बोलण्याचा असा अपेक्षित परिणाम झालेला दिसतांच तो तिला म्हणाला, " गेल्या खेपेस आपण मजजवळ सहकार्याची गोष्ट काढली होती.—त्या वेळीं मला कल्पनाही नव्हती

कीं, आठ दिवसांच्या आंत मला आपल्याजवळ स्वतःच्या बचावासाठीं याचना करण्याचा प्रसंग येईल. आपण त्या दिवशीं मला म्हणालांत, ‘ तुमच्याविषयीं मला आपलेपणा वाटतो, ’ म्हणून. आपल्या त्या उद्गारांमुळेंच आज मला आपल्याजवळ हें सारं बोलण्याचा धीर झाला. प्रमिलाबाई, माझ्यावरल्या संकटाची आपल्याला कल्पना आहे ?—”

“ चंद्रशेखर, तुम्हांला वांचवणं आतां माझ्या हातीं राहिलेलं नाहीं. तुमचा तर्क खरा आहे. रावसाहेब तुमच्याकडून माझ्याकडे आले अन् इथून जेवून ते तडक ब्रुईनसाहेबांकडे गेले—”

तिच्या डोळ्यांतील आंवरून धरलेले अश्रु आतां अनिर्बंध वाहूं लागले.

“ त्यांनीं आपल्याला कांहीं पत्र वगैरे दाखवलं का ?”

“ नाहीं. मला ते फक्त एवढंच म्हणाले कीं, ‘ माझ्या हातीं केवळ दैवयोगानं आज पहिल्या दर्जाचा पुरावा आला आहे.’—तो पुरावा एव्हांना ब्रुईनसाहेबांच्या दप्तरांत जाऊन बसला असेल. चंद्रशेखर, तुम्हांला वांचवणं आतां माझ्या शक्ति-बाहेरचं आहे—”

“ नाहीं प्रमिलाबाई, आपण चुकतां. इतक्या लवकर तें पत्र रावसाहेब ब्रुईनसाहेबांच्या हातांत देणार नाहींत. त्यांनीं फक्त त्यांतली बातमी तेवढी ब्रुईन-साहेबांना सांगितली असेल. अन् बहुधा त्यांच्या ऑफिसांतूनच ती बातमी टाइम्सला मिळालेली असावी. आपण मनांत आणलं, तर अजूनही आपण मला वांचवूं शकाल. माझ्या टेबलावरून रावसाहेबांनीं आज सकाळीं उचललेलं तें पत्र जर आपण त्यांच्या हातून परत मिळवलं, तर माझ्यावरचं संकट बहुधा टळेल.—अजूनही वेळ गेलेली नाहीं.—तें पत्र खात्रीनं रावसाहेबांच्याच जवळ आहे–”

“ पत्र जर रावसाहेबांच्या जवळ असेल, तर तें मिळवण्याचा मी शक्य तितका प्रयत्न करीन.—पण तुम्ही रावसाहेबांना ओळखतांच.—ते सहसा फसण्या-सारखे नाहींत. माझ्या हातीं प्रयत्न करून पहाणं आहे. त्यांत कसूर होणार नाहीं, एवढं मी तुम्हांला सांगतें—”

“ आपण प्रयत्न करण्याचं कबूल केलंत, एवढ्यानंच माझं अर्धं काम झालं, असं मी समजतों. मला जाणीव आहे, मी आपल्याला कोणत्या संकटांत लोटतोंय, या गोष्टीची. रावसाहेबांच्या जर हें सारं लक्षांत आलं, तर आमच्या-

साठीं जो पाश त्यांनीं तयार केला आहे, त्यांत आपला गळा गोंवायला ते कमी करणार नाहींत. माझ्या एकट्याचाच जर प्रश्न असता, तर मी हें धाडस करायला आपल्याला सांगितलं नसतं.—पण त्या एका चिठोऱ्यापायीं माझ्यासारख्या आपल्याला भावासमान असलेल्या अनेक तरुणांच्या आयुष्याचं मातेरं होईल.—म्हणून मी ही विनंती आपल्याला करीत आहें—"

"नको नको, चंद्रशेखर, तुम्ही मला इतकं विनवून सांगण्याची गरज नाहीं. माझं आयुष्य आजपर्यंत अशा रीतीनें गेलेलं आहे कीं, असं एकादं सत्कृत्य जर माझ्या हातून घडलं, तर माझ्या जिवाची तळमळ थोडी तरी कमी होईल. शिवाय चंद्रशेखर, तुम्ही मला किती आवडतां, याची तुम्हांला कल्पना नाहीं. तुमच्या उपयोगी पडण्याची ही संधि मी कशी दवडीन?—रावसाहेब इथं येण्यापूर्वीच सकाळीं ती चिठी मी तुम्हांला पाठविली होती. पण रावसाहेबांनीं जेव्हां आल्यावर सारी हकिकत मला सांगितली, त्या एका पत्राच्या जोरावर आपण केवढा व्यूह रचणार आहों याचं चित्र जेव्हां त्यांनीं माझ्या डोळ्यांपुढं उभं केलं, तेव्हां त्याच क्षणीं तुम्हांला भेटून सावध करावं, तुमच्या सुटकेचा कांहीं तरी मार्ग काढावा, असं माझ्या मनांत आलं.—चंद्रशेखर, तुमच्यासारख्या देशाभिमानी तरुणाच्या उपयोगी पडण्याइतकी आनंददायक गोष्ट दुसरी कोणती असेल?—"

"आपण जर आमचं एवढं काम केल, तर मी आपला जन्मभर ऋणी राहीन," चंद्रशेखरनें इंग्रजींत म्हटलें व हॅट डोक्यावर ठेवून तो उठला.

"कां बरं? एवढ्या लवकर निघालांत आज? कॉफी घेतां का थोडीशी? आज हवा किती सर्द आहे?"

"माफ करा.—या वेळीं कांहींसुद्धां नको. एवढं हें काम झालं म्हणजे मी दिलरुबाच ऐकायला येईन एक दिवस फुरसतीनं," चंद्रशेखरनें हंसून म्हटलें; व ती कांहीं बोलणार, तोंच तो तिला अभिवंदन करून दिवाणखान्यांतून बाहेर पडला.

तो खालीं आल्यावर कांहीं वेळ पदपथावरच उभा राहिला. पाऊस आतां अजिबात थांबला होता; व रात्रही फारशी झाली नव्हती. त्याला तसा उभा असलेला पाहून रस्त्यांतील एका व्हिक्टोरियावाल्यानें मुद्दाम जवळ येऊन विचारलें, "साहेब, कुठं जायचंय आपल्याला?" त्याच्या त्या प्रश्नानें तो भानावर आला; व जणुं कांहीं कुठें जावयाचें तें ठरवूनच जलदीनें चालावयाला त्यानें

सुरवात केली. गिरगांव सोडून तो ऑपेरा हाऊसच्या रस्त्याला लागतांच, त्याच्या अंगावर वाऱ्याची जोराची झुळूक येऊन, उकाड्यानें गुदमरलेल्या त्याच्या मनाला बरें वाटलें. ढगांची पांगापांग होऊन आकाशाची पूर्वेकडील बाजू आतां बहुतेक स्वच्छ झाली होती. आणि त्या गहिऱ्या, नील पार्श्वभूमीवर झळकणारे शुभ्र नक्षत्रपुंज अतिशय तेजस्वी दिसत होते. पश्चिमेकडील क्षितिजावर मात्र खवल्यांसारखीं दिसणारीं चिमुकलीं, काळसर अभ्रखंडें सर्वत्र पसरलेलीं होतीं. चंद्राची कोर अद्याप फारशी खालीं उतरलेली नव्हती. तिच्या प्रभेनें उजळलेला क्षितिजाचा तो अभ्राच्छादित भाग थोडासा मोराच्या पिसाऱ्यासारखा दिसत होता. सँडर्स्ट पूल ओलांडून पलीकडे येतांच, भजनाचे अत्यंत मधुर सूर चंद्रशेखरच्या कानांवर पडून, त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. ते सूर आजवर अनेकदां त्यानें ऐकलेले होते. पण, आज ते आर्त सूर कानांवर पडतांच, त्याच्या मनाचें सारें गांभीर्य विरघळून गेलें; व भावी संकटाच्या कल्पनेनें गेल्या दोन तीन दिवसांत आंतून कोळपून निघालेल्या त्याच्या मनाला असें वाटलें कीं, लहानपणीं जसे आपण आईच्या मांडीवर पडून भजन ऐकत होतों, तसाच याही वेळीं वर जाऊन तिच्या मांडीचा आसरा घ्यावा. मनाच्या तशा त्या विवश स्थितींत तो क्षणमात्र रस्त्यावर उभा राहिला.

पण इतक्यांत त्याच्या कानांवर एक चमत्कारिक, किंकाळीसारखा आवाज आला; व त्या आवाजानें त्याला त्या संमोहांतून जागें केलें.

पलीकडच्या बाजूला असलेल्या पिठ्यापाशीं बरीच गर्दी जमलेली होती. त्या गर्दीतून तो आवाज आला होता.

चंद्रशेखर धांवतच त्या पिठ्याजवळ गेला. तेव्हां, एका दारू पिऊन झिंगलेल्या तरुण इसमाला पोलीस धक्के मारीत असून, तो मोठमोठ्यानें शिवीगाळ करीत आहे, असा देखावा त्याच्या दृष्टीस पडला. चंद्रशेखरला तो आवाज ओळखीचा वाटल्यामुळें गर्दीतून वाट काढून तो त्या इसमाजवळ गेला.

त्याचा चेहरा पहातांच चंद्रशेखर चमकला; व त्याच्या तोंडून आपोआप उद्गार बाहेर पडला—

" कोण सुभान ?—"

तो नेहमींच्या ओळखीचा स्निग्धगंभीर आवाज कानांवर पडतांच सुभाननें एकदम वळून त्याच्याकडे पाहिलें; व तशा त्या स्थितींतही शरमेनें मान खालीं घातली.

चंद्रशेखरनें त्याच्याशीं अधिक कांहीं न बोलतां त्या एकंदर प्रकाराची चौकशी केली. तेव्हां, सुभानची पिठेवाल्याकडे बरीच बाकी थकलेली असून, त्यानें दारू उधार पिण्याचा हट्ट धरल्यामुळें, त्याची व पिठ्याच्या मालकाची मारामारी होऊन हा प्रसंग ओढवला, असें त्याला कळलें. ती हकीकत ऐकून चंद्रशेखरनें मुकाट्यानें पोलीसच्या हातावर एक रुपया ठेवला, पिठेवाल्याची बाकी चुकती केली व सुभानला त्याच्या तावडींतून सोडविलें.

त्या गर्दीतून बाहेर पडून चालावयाला लागल्यावर, चंद्रशेखरनें त्याला विचारलें, "सुभान, ही काय भानगड आहे? तूं गेल्याच महिन्यांत शपथ घेतली होतीस ना आपल्या तान्ह्या मुलाच्या अंगावर हात ठेवून दारू न पिण्याबद्दल? अन् आज तुला काय बुद्धि आठवली ही? तुझ्यासारखा उमदा मनुष्य जर असं करायला लागला, तर आम्ही कुणाच्या जिवावर काम करायचं?"

त्याच्या त्या उद्गारांत रोष आणि अनुकंपा यांचें असें कांहीं चमत्कारिक मिश्रण झालें होतें कीं, सुभान अगदीं खजील होऊन गहिंवरून गेला. सुभाननें आपला अपराध कबूल केला. पण, त्याबरोबरच त्यानें चंद्रशेखरला असें सांगितलें कीं, आपल्या एका दोस्तासाठीं आपण पिठेवाल्याला जामीन राहिलेलों असल्यामुळें हा प्रसंग आपल्यावर ओढवला.

त्याचा तो खुलासा ऐकून चंद्रशेखरनें त्याच्याकडे न्याहाळून पाहिलें व त्याला विचारलें, "पण तूं तर परळला रहातोस? अन् इथं कसा आलास तूं आज?"

त्याच्या त्या प्रश्नानें सुभान जास्तच शरमिंधा झाला. त्यानें चंद्रशेखरला असें सांगितलें कीं, आपण पूर्वीं याच बाजूला राहात होतों; व तेव्हांपासूनचे हे सारे ऋणानुबंध आहेत. त्याची ती सारी हकिकत ऐकून चंद्रशेखरनें एवढेंच म्हटलें, "सुभान, पोटच्या गोळ्यावर हात ठेवून माणसं ज्या शपथा घेतात, त्या साऱ्या मोडण्यासाठींच का रे?"

"नाहीं साहेब, पुन्हा नाहीं घडणार ही गोष्ट माझ्या हातून—"

ते बोलत बोलत या वेळीं केशवच्या घराजवळ आले होते. म्हणून चंद्रशेखर त्याला निरोप देऊन, बागेचें फाटक उघडून आंत शिरला.

त्याला वर आलेला पहातांच केशव खुर्चीवरून एकदम उठून आनंदानें म्हणाला, "वा वा, चंद्रा, आज होतास तरी कुठं तूं इतका वेळ ? मी दोनदां जाऊन आलों तुझ्याकडे संध्याकाळीं ! अन् काय रे, रावसाहेब सकाळीं कशाला आले होते तुझ्याकडे ?—"

चंद्रशेखरनें आपली हॅट काढून टेबलावर ठेवली; व सभोंवार दृष्टि फेंकून त्याला म्हटलें, "तें सांगतों सारं कांहीं.—पण बाबू, तूं एकटा कसा इथं आज ? ललिता कुठं आहे ?—"

"तिला आज सुमानं मुद्दाम आपल्याकडे जेवायला नेली आहे—"

"कशी काय प्रकृति आहे तिची ? तुला कळलं काल तिचं न् माझं काय बोलणं झालं तें ? तिनं सांगितलंच असेल बहुधा तुला—"

"तिनं नाहीं सांगितलं.—सुमानं सांगितली ती सारी हकिकत कॉलेजांतून परत येतांना आज मला—"

बोलतां बोलतां त्याच्या आवाजांत फरक पडत गेल्यासारखा चंद्रशेखरला वाटला. आणि तो त्याच्याजवळ गेला; व त्याच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवून त्याच्याकडे पहात म्हणाला, "बाबू, सुमा तुला फार आवडायला लागली आहे नाहीं रे अलीकडे ? कॉलेजांत जेव्हां पहावं तेव्हां तुम्ही एकत्र असतां आतांशा !—उगाच लपवण्याचा प्रयत्न कशाला करतोस माझ्यापासून ?—कुणालाही आवडावी अशीच मुलगी आहे ती. पण तूं जपून वाग एवढंच सांगतों मी तुला—"

स्वतःच्या मुखावर स्थिर झालेल्या चंद्रशेखरच्या त्या भेदक दृष्टीला दृष्टि भिडविण्याचें धैर्य केशवला झालें नाहीं. तो लाजेनें अगदीं लाल झाला; व त्याच्या अंगावर रोमांच उभे राहून, कांहीं तरी बोलण्याच्या उत्सुकतेनेंच कीं काय, त्याचे ओंठ किंचित् थरथरले.

त्याची ती अवस्था चंद्रशेखरच्या लक्षांत आली; व आपले हात त्याच्या खांद्यांवरून काढून घेऊन तो खुर्चीवर बसून म्हणाला, "बाबू, मी आतांच प्रमिलाबाईकडून जाऊन आलों.—रावसाहेबांनीं आज सकाळीं चोरी केली आमच्या घरीं—"

"चोरी ?"

"होय,—चोरी—"

नंतर चंद्रशेखरनें परवां संध्याकाळपासून घडलेला सारा प्रकार त्याला सांगितला; व ईव्हनिंग न्यूज मधील ती बातमीही त्याला सांगितली. ती हकीकत ऐकून केशवचं तोंड अगदीं उतरून गेलें.

"मग, कसं तोंड देणार आपण या संकटाला ? तुला वाटतं, प्रमिलाबाई तें पत्र परत मिळवूं शकतील म्हणून ?"

"त्या प्रयत्न खास करतील. पण तें परत मिळेल कीं नाहीं, हें कोणी सांगावें ?—पण तें पत्र परत मिळालं नाहीं तरीही कांहीं हरकत नाहीं. तेवढ्या एका चिठोऱ्यावर थोडेच ते अवलंबून आहेत ? गेले सहा महिने माझीं पत्रं सारखीं फोडलीं जात आहेत. त्यांत या आणखी एका चिठोऱ्याची भर.—मला वाईट वाटतं तें एवढयाचबद्दल कीं, माझ्या चुकीमुळं हा पुरावा त्यांच्या हातीं गेला. आमच्यावरचं संकट टळो वा न टळो; ही माझी चूक जन्मभर माझ्या मनाला खात राहील, बाबू—"

बोलतां बोलतां तो थांबला. क्षणभर ते दोघेही स्तब्ध होते.

थोड्या वेळानें केशवनें त्याला विचारलें, "पण हें संकट कसं टळणार ?"

"तें टळत नाहीं. त्याबद्दल माझी पूर्वीच खात्री होऊन चुकली आहे. पण रावसाहेबांची चोरी उमगल्याबरोबर एक गोष्ट मात्र मी ताबडतोब केली. आमच्या सगळ्या सेंटर्सना ही हकीकत तारेनं कळविली; व वीरेंद्रांनाही इथं येऊं नका अशी तार केली आहे आम्ही. पण मला भीति एवढीच वाटते, आमची तार त्यांना मिळते कीं मध्येंच दडपली जाते ?—"

"कां बरं ? नेहमींप्रमाणें सांकेतिक लिपींत केलेली आहे ना ती तार ?—"

"होय.—पण ती लिपि फुटली नसेल कशावरून ? खरोखरी बाबू, जों जों या प्रकाराविषयीं विचार करावा, तों तों मला असं वाटतं कीं, गेल्या दोन दिवसांत माझ्या हातून ज्या चुका झाल्या, त्यांचं प्रायश्चित्त मला फार भयंकर असं भोगावं लागणार; आणि मन निराशेनं भरून येतं—"

त्यानें दुःखातिरेकानें आपलें तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलें.

---

## प्रकरण २७ वें

# असह्य झालेला ऋणानुबंध



"आजचा 'प्रागतिक' वाचून आपली तर बुवा निराशा झाली अगदीं, नानासाहेब!" प्रो. राळे सिगारेटच्या तोंडावर सांचलेली राख झटकीत उद्गारले.

"कां बरं?–मला तर असं वाटतं कीं, गांधींच्या नव्या कार्यक्रमावरलं आजचं आमचं आर्टिकल वाचून आपली सारी मंडळी खूप होऊन गेली असतील अगदीं—"

"गांधींच्या कार्यक्रमाचा इतका काथ्याकूट सध्यां सगळ्या वर्तमानपत्रांतून चाललाय कीं, त्याच्यावरलं तुमचं तें चऱ्हाट वाचायला उत्सुकता आहे कोणाला?—आज अगदीं एक निराळीच बातमी वाचायला मिळेल, असं वाटलं होतं मला. पण माझा अंदाज साफ चुकला—"

"अहो, पण गांधींच्या कार्यक्रमाशिवाय दुसरा कोणता महत्त्वाचा विषय आज लोकांच्या पुढं आहे?—"

"वा वा, हा काय प्रश्न नानासाहेब?—प्रोफेसरसाहेबांची विषयलोलुपता किती विविध आहे, याची कल्पना नाहीं दिसत आपल्याला!—मनुष्याची रसिकता जितकी व्यापक, तितके त्याच्या अभिरुचीचे विषय जास्त—"

"तुमच्या श्लेष न् कोट्या घटकाभर जरा बाजूला ठेवा, शास्त्रीबुवा!—मी सांगतें, त्यांच्या मनांत कोणता विषय घोळतोय तो नानासाहेब आपल्याला. सर दिनानाथांचं 'न्यू इरा इन् इंडिया' म्हणून एक पुस्तक प्रसिद्ध झालं आहे, तें पाहिलं नाहीं का तुम्ही? त्याच्यावर कालच्या टाइम्समध्यें 'पोलिटिकस'चं केवढं मोठं परीक्षण आलंय!—मग तुम्हीच सांगा आतां त्या पुस्तकाशिवाय जगांत कांहीं दुसरा महत्त्वाचा विषय असूं शकेल का? अन् तुमच्या 'प्रागतिकां'त तर त्या पुस्तकाचा उल्लेख सुद्धां नाहीं. मग कां नाहीं होणार प्रोफेसरसाहेबांची निराशा आजचा अंक पाहून?—"

"छान छान, चांगली बाजू उलटवली आमच्यावर, प्रेमाबाई," प्रो. राळे व्याजस्मितामुळें किंचित् वक्र झालेल्या प्रमिलेच्या ओष्ठयुगुलाकडे अतृप्त दृष्टीनें

पहात म्हणाले. "पण आमची आज निराशा झाली, ती या कारणामुळं मात्र नव्हे हो! मी आज सकाळीं अंक आल्याबरोबर किती उत्सुकतेनं उघडला! मला वाटलं होतं, चांगलं पांच कॉलमांचं आर्टिकल असेल त्या बातमीवर म्हणून—"

"अहो, पण बातमी कोणती तें तर सांगाल कीं नाहीं? उगाच मोघम कां बोलतां?—"

"का बबनराव, तुम्ही सुद्धां आज अगदीं वेड पांघरलेलं दिसतंय.—अहो, परवांच्या ईव्हनिंग न्यूजमध्यें सर्वात महत्त्वाची बातमी कोणती होती?"

"वीरेंद्र चक्रवर्ती हिंदुस्थानांत येणार असल्याबद्दलची ना?"

"हो हो, तीच. मला वाटलं होतं, आपला 'प्रागतिक' किती झालं तरी सोशॅलिस्ट पेपर. तेव्हां वीरेंद्राचं चरित्र, त्याचं तत्त्वज्ञान, त्याच्या आगमनाचे हिंदी राजकारणावर होणारे परिणाम वगैरे वगैरे विषयावर एक मोठा थोरला अग्रलेख येईल आजच्या अंकांत!—पण अंक उघडून पहातों, तों बातमी सुद्धां नाहीं दिलेली त्याच्या येण्याबद्दलची—"

"मुद्दामच नाहीं दिली. मीच वाचून दाखवली ती बातमी भगवंतराव-जींना. ते म्हणाले, 'गप्प आहे ही एक निव्वळ; कांहीं देऊं नका आपल्या अंकांत.'—म्हणून नाहीं दिली आम्ही." नानासाहेब आपल्या पत्रांतील बातमीच्या अभावाचें समर्थन करण्याच्या उद्देशानें म्हणाले.

"बरोबर सांगितलं भगवंतरावजीनीं. अहो, आहे काय त्या बातमींत एवढं मोठं?" रावसाहेब तोंडांत भरलेला विड्याचा बोकणा चघळीत उद्गारले. "तुम्हांला खरंच वाटतं का प्रोफेसरसाहेब वीरेंद्र हिंदुस्थानांत येईल म्हणून?—"

"हो हो, न यायला काय झालं?" प्रोफेसरसाहेब रावसाहेबांकडे मिस्किल-पणानें पहात म्हणाले. "पूर्वी अनेकदां आला आहे अन् पुढेंही येईल. आतां तुमच्या खात्याची बातमी जर कांहीं निराळी असली, तर मात्र मग कांहीं सांग-वत नाहीं बुवा! आहे कां कांहीं तुम्हांला तशी नक्की बातमी?—"

"वा वा, भले! मी एक आपला सहज सुचणारा तर्क सांगितला. अहो, माझ्यासारख्या पेन्शनांत निघालेल्या अन् त्यांत पुन्हा राष्ट्रीय चळवळींत भाग घेणाऱ्या इसमाला कशा कळणार हो असल्या बातम्या?"

“तें खरंच आहे, रावसाहेब.—पण आतांशा दोन चार वेळां ब्रुईन-साहेबांच्या मोटारींतून हिंडतांना बघितलं तुम्हांला, तेव्हां वाटलं अशाच कांहीं भानगडींत असाल बहुधा! ब्रुईनसाहेब कांहीं उगाच सुखासुखी कुणाला मोटारींत घालून हिंडणारे नव्हेत.—काय प्रेमाबाई, तुम्हांला काय वाटतं?”

“माझ्या वाटण्याचा काय प्रश्न आहे यांत?” प्रोफेसरसाहेबांच्या प्रश्नांतील खोंच ओळखून प्रमिलेनें किंचित् रागानें म्हटलें. “तुम्ही रावसाहेबांना शहरां-तल्या एकाद्या फलाण्या इसमाबरोबर हिंडताना पाहिलंत व त्यावर तुमची स्वतःची एक कल्पना बसवलीत.—ती कल्पना बरोबर आहे कीं चूक आहे, हें मी कशी सांगणार बाई? तुमच्या त्या ब्रुईनसाहेबाला मी ओळखीत सुद्धां नाहीं—”

“ओळखीचा काय प्रश्न आहे इथं?—मी फक्त तुमचं मत विचारलं. अन् मला तरी ही शंका कां आली? परवांच ब्रुईनसाहेबांनीं मला मुद्दाम फोन करून बोलावलं अन् त्या मांजरेकराविषयीं माहिती विचारली.—चांगले दीड तास बोलत बसलों होतों आम्ही त्यांच्या ऑफिसांत!—तेव्हां मला आपला उगाच एक संशय आला कीं, हें जें कांहीं शिजतंय त्यांत रावसाहेबांचा हात कुठं तरी असावा!—ब्रुईनसाहेबांनीं नाहीं हो रावसाहेबांचं एकदां सुद्धां नांव घेतलं! तसा तो मोठा सज्जन आहे बघा!—हा आपला माझा एक तर्क आहे नुसता.—” त्यांनीं वाक्य पुरें करितांना प्रमिलेकडे सहेतुक निरखून पाहिलें. पण, टेबलावर ठेवलेल्या प्रशस्त पुष्पपात्रांतील फुलांशीं खेळण्यांत ती इतकी गुंग झाली होती कीं, आपल्या भाषणाचा जो परिणाम तिच्या मुद्रेवर पहाण्याची त्यांना इच्छा होती, तो त्यांना दिसला नाहीं.

“छान बसवला तर्क तुम्हीं हा प्रोफेसरसाहेब! नुसत्या तर्कटाच्या जोरावर दुसऱ्याचं नांव बद्दू करण्याची विद्या तुम्हांला उत्तम साधली आहे! अहो, ब्रुईनसाहेबाचा न् माझा इतका स्नेह आहे कीं, मी पेन्शन घेऊन आतां पांच वर्षं होत आलीं, तरी निदान एक दोन दिवसांनीं तरी आमची छोटी हजिरी एकत्र झडतेच. किती झालं तरी पंधरा वर्षं आम्ही एका कचेरींत अन् एका दिलानं काम केलं आहे. शिवाय तो माणसांचाही मोठा लोभी आहे बघा आणि

त्यांत महाराष्ट्रीय तर त्याला विशेषच प्रिय! तो नेहमीं म्हणतो कीं, मराठ्यांपासून आम्ही हिंदुस्थानाचं राज्य जिंकून घेतलं अन् मराठेच एक दिवस आमच्यापासून तें परत घेतील. बंगालयांत एवढी गुप्त कटांची धामधूम सारखी चालू आहे;—बॉंब उडताहेत अन् खून पडताहेत! पण अं हं! त्याचा आपला सारा विश्वास महाराष्ट्रीयांच्या कर्तबगारीवर! अहो, तशीच जर कांहीं नामांकित शिकार जवळपासच्या जंगलांतून कधीं करून आला, तर माझ्याशिवाय खाना नाहीं व्हायचा त्याचा त्या दिवशीं!"

"वा वा, तें काय विचारावं?—आपण आहांतच तसे दर्दी," शास्त्रीबुवा तोंडाला सुटलेलं पाणी उपरण्यानं टिपीत म्हणाले. "पण मला वाटतं, आपल्या-सारख्या स्नानसंध्याशील ब्राम्हणाला ब्रुईनसाहेबांच्या त्या खान्यांत सामील होणं मोठं दुष्कर वाटत असेल नाहीं?"

"कां बरं? त्यांत एवढं दुष्कर वाटण्यासारखं काय आहे, शास्त्रीबुवा? तुम्हांला जर मत्स्याहार चालतो, तर रावसाहेबांना मांसाहार कां चालू नये?"

"उगाच भलतीच तुलना काय करतोस, बबनराव? अरे, मत्स्याहाराची गोष्ट अगदीं निराळी; जवळ जवळ शाकाहारच आहे तो! हिंदुस्थानांतले सारे द्रविडेतर ब्राह्मण आज मत्स्याहार करताहेत. तसं मांसाहाराचं आहे का? मला आश्चर्य वाटतं कीं, अंड्यांची शाकाहारांत गणना करणाऱ्या आगरकरांना मत्स्या-हाराविषयीं कांहींच कसं लिहायचं सुचलं नाहीं? बाकी मांसाहारसुद्धां तसा कांहीं निषिद्ध मानलेला नाहीं. मनूनं म्हटलंच आहे, 'पंच पंचनखा भक्ष्याः'. शिवाय, आमच्या चरकांत तर स्पष्टच सांगितलेलं आहे कीं, मृगयेनं मेद झडतो अन् मांसाहारानं कांति वाढते!—काय रावसाहेब, ब्रुईनसाहेबांच्या मृगयाकर्मांत सुद्धां आपण केव्हां केव्हां अंशभागी होत असाल नव्हे?"

"तें काय शास्त्रीबुवा, सांगितलं का पाहिजे? अहो, जन्मभर यांनीं ज्या शिकारी केल्या, त्या साऱ्या मुळीं संगनमतानंच केल्या.—मग त्या सुंदरबनांत असोत कीं सिंहगडच्या रानांत असोत! पण काय रावसाहेब, हल्लीं त्या मांजरे-कराची माहिती ब्रुईनसाहेब कशासाठीं गोळा करताहेत? कालची ती वीरेंद्र हिंदुस्थानांत येणार असल्याबद्दलची बातमी वाचल्यापासून मला असं वाटायला लागलंय—"

"काय वाटायला लागलंय ?" आतांपर्यंत फुलांशीं खेळत असलेल्या प्रमिलेनें एकदम प्रो. राळे यांच्याकडे वळून अधीरतेनें विचारलें.

"—कीं या बातमीचा न् त्या माहिती गोळा करण्याच्या खटपटीचा कांहीं तरी कार्यकारणसंबंध असला पाहिजे," प्रोफेसरसाहेब तिच्या त्या प्रश्नानें उत्तेजित होऊन म्हणाले. अधीरतेच्या भरांत हातांतील फुलें खालीं टाकतांना व मान मुरडून त्यांच्याकडे बघतांना तिचा जो आविर्भाव झाला, त्यामुळें त्यांचें चित्त विचलित झालें; व तिच्या मानेच्या वळलेल्या भागाला पडलेल्या नाजूक चुण्यांचें चुंबन घेण्याची त्यांना उत्कट इच्छा झाली. पण, त्या वासनेपेक्षांही रावसाहेबांचा पाण-उतारा करण्याची त्यांची इच्छा अधिक प्रबळ होती. म्हणून, तिच्या मनोहर कंबुकंठावरील आपली दृष्टि ढळूं न देतां, पण रावसाहेबांना खिजविण्याच्या उद्देशानें, ते उद्गारले, "पहा बुवा! रावसाहेब, तुम्हीच कांहीं प्रकाश पाडूं शकलांत तर पाडाल या बातमीवर!—पण आग्रह नाहीं हो आमचा—! नाहीं तर तुमचं आपलं कांहीं तरी गुप्त राजकारण असायचं अन् त्याची उगाच वाच्यता व्हायची या चव्हाट्यावर—"

"इतकं दुटप्पीपणानं कशाला बोलतां, प्रोफेसरसाहेब ? रावसाहेबांवर पाहून आरोप तर करायचा, त्यांच्यापासून बातमी काढायची तर धडपड चालली आहे सारखी मघांपासून अन् पुन्हा वरती सोज्वळपणाचा आव आहे तो आहेच! त्या बिचाऱ्या मांजरेकराची नालस्ती ब्रुईनसाहेबांजवळ करून तुम्ही त्या बातमीवर स्वतःच्या माहितीचा उजेड पाडलात तेवढा पुष्कळ झाला. —रावसाहेबांनीं कशाला आतां आणखी उत्तर द्यायला पाहिजे तुम्हांला ? मीच देतें उत्तर तुम्हांला!—त्यांना यांतलं कांहींसुद्धां माहीत नाहीं अन् तुम्ही आतां ही चर्चा लांबवूंही पण नका. याच्याशिवाय दुसरा एकादा चांगला विषय नाहीं का तुम्हांला बोलायला ?"

"हें पहा प्रेमाबाई, प्रोफेसरसाहेबांनीं उपस्थित केलेल्या या चर्चेला प्रतिबंध करण्याची तुम्हांला जर खरोखरीच इच्छा असेल, तर तुम्ही त्यांच्या जिव्हेला दुसरा सरस विषय उपलब्ध करून द्या! बाहेर ही अशी पावसाची बुरबूर अन् आंत प्रोफेसरसाहेबांची कुरबूर!—आपल्याला तर आतां अगदीं कंटाळा आला या शुष्क वादाचा.—आतां कांहीं तरी रसाळ विषय येऊं द्यात टेबलावर अन्

मग पहा संभाषणाचा ओघ आपोआप बदलतो कीं नाहीं ?—काय बबनराव ?" शास्त्रीबुवा आपल्या तपकिरीच्या डबीवर तर्जनीचा प्रहार करीत उद्गारले.

" उठलेंच मी शास्त्रीबुवा.—अगदीं वेळेवर केलीत सूचना तुम्ही ! प्रोफेसर-साहेबांच्या या रिकामटेकड्या चौकश्यांमुळं मला विसरच पडला होता आपल्या नेहमींच्या कार्यक्रमाचा—"

प्रमिला लगेच उठून लगबगीनें आंत गेली.

" हें पहा शास्त्रीबुवा, मला एक शंका विचारायची आहे प्रोफेसरसाहेबांना. —पण थोडी भीति वाटते," बबनराव त्यांनीं पुढें केलेल्या डबींतून तपकिरीची एक भली थोरली चिमूट घेत म्हणाले.

" अरे, आमची भीति वाटून काय उपयोग ?—इथं अबला प्रबला आहे !—प्रेमाबाईची तूं जर अनुमति संपादन केलीस, तर मग भीतीचं प्रयोजनच उरत नाहीं मुळीं—"

" कसली भीति बबनराव ?" ट्रे घेऊन आंत येत असलेल्या प्रमिलेनें हंसत हंसत विचारलें. " ब्रुईनसाहेबांनीं तुमच्याविषयीं तर नाहीं ना चौकशी केली राळेसाहेबांजवळ ? मग मात्र भिण्यासारखी गोष्ट आहे खरी बाई !"

" म्हणजे ? मी काय पोलिसखात्याला माहिती पुरवण्याचा का धंदा करीत असतों, प्रेमाबाई ? "

" छे छे, तसं नव्हे हो !—पोलीसखातं मुद्दाम तुम्हांला आमंत्रण पाठवून माहिती काढीत असतं तुमच्याकडून !—आतांच नाहीं का सांगितलंत, ब्रुईन-साहेबांनीं तुम्हांला मुद्दाम बोलावून त्या मांजरेकराची माहिती विचारली, म्हणून ! कांहीं लोक स्वतः होऊन माहिती पुरवतात तर कांहींना अगत्यपूर्वक बोलावून त्यांच्यापासून माहिती काढून घ्यावी लागते.—माहिती पुरवण्यांत फरक असला, तरी तो फक्त पद्धतींत आहे—"

प्रमिलेनें तें वाक्य पुरें करितांना हंसत हंसत ट्रेमधील एक बशी प्रो. राळे यांच्या हातांत दिली. ती जर इतर कोणती वेळ असती, तर तिचें तें मोहक हास्य आणि ती जवळ येतांच जाणवलेला तिच्या प्रसाधनाचा मदिर गंध त्यांना अत्यंत अभिलषणीय वाटला असता. पण, तिच्या त्या उद्गारांतील खोंच त्यांना इतकी झोंबली कीं, रागानें त्यांचा अधरोष्ठ हलूं लागला; व तितकेंच मर्मभेदक उत्तर

देण्याची त्यांना अनिवार इच्छा झाली. परंतु, ते बोलावयाला तोंड उघडणार, तोंच बबनराव प्रमिलेला म्हणाले, "माझ्या या शंकेचा अन् ब्रुईनसाहेबांचा कांहीं संबंध नाहीं. ती शंका एका अगदीं निराळ्याच प्रकरणाबद्दल आहे. पण तुमचं अभय असेल तर विचारतों—"

"माझं तुम्हांला सदाचंच अभयवचन आहे, बबनराव. मला कीं नाहीं उगाच कुणी तेढं बोलत सुटलं म्हणजे फार राग येतो. विशेषतः चार मंडळी स्नेहभावानं गप्पा मारायला एकत्र जमली असतां अशा रीतीनं बोलणं, म्हणजे आपल्याला शिष्टाचाराची सुद्धां जाणीव नाहीं, असं जाहीर करण्यासारखंच आहे! तुम्ही खुशाल बोला तुम्हांला काय बोलायचं असेल तें.–तुमच्यासारख्या बहुश्रुत माणसाची शंका झाली तरी ती मार्मिकच असायची—"

"मला प्रोफेसरसाहेबांना एवढंच विचारायचंय कीं, नव्या सुधारणांचं स्तुतिस्तोत्र गाणारं जें इंग्रजी चोपडं सर दिनानाथांनी नुकतंच प्रसिद्ध केलं आहे अन् ज्याच्यावर खुद्द त्यांनीं स्वतः टाइम्समधून एवढा स्तुतीचा वर्षाव केला आहे, त्याबद्दल शहरांत चालू असलेले तर्क खरे आहेत कीं खोटे?"

"पण लोकांनीं काय तर्कटं रचलीं आहेत, तीं कळतील तेव्हां ना मी उत्तर देणार?"

"त्या पुस्तकाच्या बाबतींत एक तर्क असा आहे, निदान माझ्या तरी कानावर असं आलंय कीं, मुंबई कौन्सिलचं अध्यक्षपद आपल्याला मिळावं म्हणून सर दिनानाथांच्या ज्या अनेक खटपटी सध्यां चालू आहेत, त्यांपैकीं त्या पुस्तकाचं प्रकाशन ही एक आहे—"

"अशीं कुठं पुस्तकं प्रसिद्ध करून का बबनराव, कौन्सिलांचीं अध्यक्षपदं मिळवतां येत असतात? सारा दिवस लेखणी हांकण्यांत जात असल्यामुळं तुमच्या लेखणीच्या कर्तबगारीविषयींच्या कल्पना बऱ्याच भडकलेल्या दिसतात—"

"मला वाटतं, Pen is mightier than the Sword हें सुभाषित कीं नाहीं आपल्या कानांवरून गेलेलं नसावं कधीं!"

"असल्या फसव्या सुभाषितांवर भोळसट बायकांनीं किंवा अर्धवट पुरुषांनींच विश्वास टाकावा, प्रेमाबाई. सरसाहेबांना बबनरावांच्या कल्पनेप्रमाणं जर

उद्यां खरोखरीच कौन्सिलचं अध्यक्षपद मिळालं, तर तें त्या पुस्तकामुळं मिळणार नाहीं. उभ्या मुंबईत आज सर दिनशांशिवाय सर दिनानाथांइतका राजकारणांत मुरलेला मुत्सद्दी दुसरा कोणता आहे? अन् त्यांच्यासारख्या मुत्सद्याला न् कायदेपंडिताला जर अध्यक्षपद मिळायचं नाहीं, तर मग तें काय बबनरावांना किंवा भगवंतरावांना मिळायचं?"

"अहो, पण इतके एकेरीवर कां येतां प्रोफेसरसाहेब? सर दिनानाथ हे अध्यक्ष व्हायला पात्र नाहींत, असं कुणी तरी म्हटलंय का इथ? प्रश्न फक्त एवढाच आहे कीं, त्यांनीं तें पुस्तक कोणत्या हेतूनं लिहिलंय?"

"तुमचं म्हणणं असं आहे का नानासाहेब, कीं मला आदरणीय असलेल्या एकाद्या व्यक्तीवर एकाद्या फाटक्या माणसानं जरी इथ असद्हेतूचा आरोप केला, तरी मी गप्प बसावं?" प्रो. राळे यांनीं संतापानें विचारलें. त्यांच्या वामांगाचें स्पंदन या वेळीं इतक्या जोरानें होत होतें कीं, वारंवार उडणाऱ्या त्यांच्या डाव्या गालाच्या व डाव्या भुंवईच्या त्या विचित्र थरथरण्यामुळें त्यांच्या चेहऱ्याला एक प्रकारचा भेसूरपणा आला होता. रागाच्या भरांत त्यांनीं हातांतील कॉफीचा अर्धवट पिऊन झालेला कप खालीं ठेवला; ते उठून उभे राहिले; व प्रमिलेकडे तीव्र दृष्टिक्षेप करून म्हणाले, "माझं इथं येणं तुम्हांला कुणाला आवडत नसावं असं दिसतं अलीकडे; आणि मलाही या उप्पर माझी संगति तुमच्यावर लादण्याची इच्छा नाहीं.—बुद्धिमत्ता आणि सौंदर्य यांच्याविषयींच्या आकर्षणानं मला इथं ओढून आणलं. पण, तें आकर्षण मी माझ्या स्वाभिमानापेक्षां वरचढ होऊं देईन, अशी जर कुणाची अपेक्षा असेल, तर ती मात्र चुकीची आहे—"

शेवटचीं तीं दोन वाक्यें त्यांनीं इंग्रजींत उच्चारलीं; व ते तडक दिवाणखान्यांतून बाहेर पडले.

त्यांच्या संतापाचा तो स्फोट सर्वांनाच एकंदरींत अनपेक्षित वाटला; व बबनरावांना आणि नानासाहेबांना जरी मनांतून झालेल्या प्रकाराबद्दल समाधान वाटलें, तरी शास्त्रीबुवांना व त्याहीपेक्षां रावसाहेबांना ती गोष्ट गैर वाटली. त्या दोघांनींही प्रमिलेकडे पाहिलें. तिचा अधरोष्ठ किंचित् आंत मुरडला होता; व तिचे फुगीर गाल स्मिताच्या अपेक्षेनें किंचित् उंचावल्यासारखे त्यांना दिसले.

आणि, एकादी बहुमोल पण कांहीं कारणामुळें अप्रिय झालेली वस्तु फेंकून दिल्यावर, मनाला जें एक प्रकारचें तुच्छतागर्भ समाधान लाभतें, तें तिच्या अवनत नेत्रांत बिंबित झालें होतें.

क्षणभरानें तिनें वर पाहिलें; व शास्त्रीबुवांना ती हंसत हंसत म्हणाली, "कॉफी ओतू कां तुमच्या कपांत थोडी आणखी, शास्त्रीबुवा?—तुमचं लक्ष नव्हतं पिण्याकडे; त्यामुळं निवून गेलेली दिसतेय—"

त्यांच्या उत्तराची वाट न पहातां ती उठली; व शास्त्रीबुवांच्या जवळ जवळ रिकाम्या झालेल्या कपांत तिनें कॉफी ओतावयाला प्रारंभ केला.

तिच्या वृत्तींतील ती खेळकर बेपर्वाई पाहून शास्त्रीबुवा विस्मित झाले. पण, आपल्या मनाची चलबिचल झांकण्याच्या हेतूनें ते म्हणाले, "काय उद्दाम मनुष्य आहे हा राळे तरी!—मला वाटलं नव्हतं, हा इतका शीघ्रकोपी असेल म्हणून.—बाकी बबनराव, तुम्ही तरी मोठे खट्याळ बुवा! नेमका अगदीं वर्मावर अंगुलिनिक्षेप केलात त्याच्या— "

"त्याचा हा नेहमींचाच स्वभाव आहे," नानासाहेब त्यांना पुष्टि देण्याच्या उद्देशानें म्हणाले. "स्वतः दुसऱ्याच्या खजाळ्या नेहमीं काढायच्या अन् आपल्यावर बेतली म्हणजे अगदीं डोक्यांत राख घालून जटा आपटायला सुरवात करायची!—लोकांनीं तरी याचा हा उर्मटपणा किती दिवस सोसावा?—मग काय चलतां शास्त्रीबुवा, भगवंतरावजींकडे? पुष्कळ दिवसांत बघितली नाहीं ललूला अलीकडे.—आजारीच असते बिचारी आतांशा.—तुम्ही तरी करा एकदां निदान तिच्या दुखण्याचं— "

"याच्यापूर्वीच केलं असतं मी नानासाहेब! पण तुमच्या पक्षांतल्या मंडळीला आयुर्वेद म्हणजे उपहासाचा विषय वाटतो ना? त्याला काय करणार?" शास्त्रीबुवा उठतां उठतां उद्गारले. "इतके आपण नेहमीं तिथं जातों, पण भगवंतरावजी एकदां तरी म्हणाले आहेत का मला आपल्या मुलीचा हात पहाण्याबद्दल कधीं?—"

नानासाहेब, शास्त्रीबुवा व बबनराव गेल्याबरोबर रावसाहेब प्रमिलेच्या जवळ आले; व तिच्या खुर्चीच्या कमानीवर हात ठेवून म्हणाले, "प्रेमा, तूं काय केलंस हें आज? आपण माणसं जोडायचीं की तोडायचीं?"

"असह्य झालं म्हणजे तोडावंच लागतं, रावसाहेब! अलीकडे या राळयाला पाह्यला म्हणजे शिसारी येते मला अगदीं.—अतिशय लोंचट अन् घमेंडखोर! भगवंतराव अन् चंद्रशेखर यांच्याविषयीं नाहक वाईट बोलत असतो तो नेहमीं. आणि आपल्याविषयीं तरी किती वर्मी बोलत होता तो आज!—मला पक्की खात्री आहे, ब्रुईनसाहेबांच्या कानांत त्यानं चंद्रशेखरविषयीं काळकूट ओतलं असेल अगदीं. खरंच पण रावसाहेब, परवां आपण कसला पुरावा चंद्रशेखरच्या घरीं सांपडला म्हणून म्हणालांत, तो दाखवला नाहीत मला?—मला न दाखवण्या-सारखं कांहीं आहे का त्यांत?" प्रमिलेनें त्यांनीं खुर्चीवर ठेवलेला हात आपल्या हातांत घेऊन तो आपल्या गालावर दाबीत म्हटलें.

रावसाहेबांनीं आपल्याकडे वळलेल्या तिच्या मुद्रेकडे एकवार भेदक दृष्टीनें पाहिलें; व ते तिला हंसून म्हणाले, "अग अव्वल दर्जाचा पुरावा का मी स्वतःजवळ ठेवणार आहें, प्रेमा? मी तो त्याच दिवशीं ब्रुईनसाहेबांच्या स्वाधीन केला. तसं त्या पत्रांत विशेष कांहीं नव्हतं. पण आम्हांला माहित असलेल्या गोष्टींवर त्या पत्रानं प्रकाश पडतो, चांगला प्रकाश पडतो, म्हणून त्याचं महत्त्व. तू त्या वेळीं म्हटलं असतंस तर दाखवलं असतं तुला!—पण हें काय? तुला घेरी येतेय बेटा!"

असें म्हणून त्यांनीं झटकन खालीं वांकून प्रमिलेला आधार दिला. त्यांचे ते उद्गार ऐकून तिला भोवंड आल्यासारखी वाटली; व तिचा तोल गेला. पण क्षणार्धच. अपेक्षित निराशेच्या त्या आवेगानें तिला हतबुद्ध केलें. पण लगेच तो आवेग गिळून तिनें रावसाहेबांना म्हटलें, "चंद्रशेखर एक दोन दिवसांत पकडला जाईल म्हणायचा आतां?"

"कशावरून?" रावसाहेब एकदम उद्गारले. त्यांची दृष्टि तिच्या विवर्ण मुद्रेवर स्थिर झाली होती. जणुं कांहीं, तो प्रश्न विचारतांना जी सानुकंप आणि भीतियुक्त जिज्ञासा तिच्या डोळ्यांत व्यक्त झाली होती, तिच्या पोटीं दडलेले भाव ते न्याहाळून पहात होते. "या तुझ्या प्रश्नाचं उत्तर तो ब्रुईनसाहेबच देऊं शकेल, बेटा?"

"पण आपल्यालाही कांहीं कल्पना असेलच कीं नाहीं?"

"होय आहे—इतक्यांत धरपकड होत नाहीं असं मला निश्चित वाटतं. —बहुधा आणखी महिनाभर तरी ब्रुईनसाहेब त्याच्यावर आपले पाश टाकणार नाहींत.—पण प्रेमा, त्या चंद्रशेखरची तुला फारच काळजी लागलेली दिसते—"

आपल्या त्या वाक्याला विनोदी स्वरूप देण्यासाठीं ते मोठ्यानें हंसले.

पण त्यांचें तें हंसणें तिला भयप्रद वाटलें. कावेबाज माणसें हीं पुष्कळदां हास्याचा उपयोग स्वतःच्या उक्तीचें किंवा कृतीचें मर्म लपविण्यासाठीं करीत असतात. त्यांचें तें हास्य तिला तशा प्रकारचें वाटलें; व भयाण अशा खोल विहिरींत मोटेचें पाणी पडलें असतां त्याचा आवाज ऐकून मनाला जसा दचका बसावा, त्याप्रमाणें त्यांचें तें हंसणें ऐकून तिची अवस्था झाली. आपलें हृद्गत, आपल्या प्रश्नाचें इंगित त्यांनीं ओळखलें, असें तिला वाटलें. इतकेंच नव्हे, तर आपल्या हृदयांत उद्भूत झालेल्या स्नेहगर्भ भीतीची पायमल्लीच जणुं त्यांनीं त्या हास्याच्या रूपानें बुद्धिपुरस्सर केली, असा विचार तिच्या मनांत आला. आणि त्यांच्याविषयीं एक प्रकारची विलक्षण शिसारी तिला वाटली.

परंतु, रावसाहेबांची नजर आपल्या हालचालींवर रोंखलेली आहे, याची जाणीव तिला होती. शिवाय, अजूनही त्यांच्यापासून कांहीं बातम्या काढून चंद्रशेखरचा बचाव आपल्याला करितां येईल, व त्या दृष्टीनें त्यांच्याशीं जपून वागणेंच जरूर आहे, अशीही कल्पना तिच्या मनांत आली. त्याबरोबर तिनें आपलें मन आंवरलें; व हंसण्याचा प्रयत्न करून ती म्हणाली, "होय, मला त्याच्याविषयीं खरोखरीच आपलेपणा वाटतो.—पण रावसाहेब, तो मी आपण सांगितलेल्या कामाच्या आड कधीं तरी येऊं दिला आहे काय?—"

"नाहीं. मी तरी कुठं म्हणतों तसं?" रावसाहेब तिच्या केंसांवरून हात फिरवीत म्हणाले. "पण बेटा, तूं मला एक गोष्ट अजून सांगितली नाहींस. त्या दिवशीं संध्याकाळीं तुझं न् त्या चंद्रशेखरचं काय बोलणं झालं?—"

"तो त्या हरवलेल्या पत्राविषयींच मजजवळ बोलत होता; व म्हणूनच मला तरी तें पहाण्याची इतकी उत्सुकता वाटली. मी त्याला पूर्वी कधींच इतका उदास झालेला पाहिला नव्हता, रावसाहेब!—"

"मी सांगितलंच तुला, तें पत्र तशाच महत्त्वाचं आहे, म्हणून. प्रेमा, मला सुद्धां त्या पोराची फार दया येते. पण कर्तव्यबुद्धीपुढं इलाज नाहीं—"

प्रमिलेकडे त्यांनीं उत्तराच्या अपेक्षेनें पाहिलें.

पण, ती कसल्या तरी विचारांत मग्न आहे आणि आपलें बोलणेंही बहुधा तिनें ऐकलें नसावें, असें त्यांना वाटलें; व त्यांच्या ओंठाभोंवतीं उपरोधिक स्मिताच्या सुरकुत्या पडल्या. आणि, तिच्या उत्तराची वाट न पहातां, ते दिवाणखान्यांतून बाहेर पडले.

प्रकरण २८ वें

## न कळत घेतलेलें चुंबन



केशव कॉलेजच्या पायऱ्यांवर एका बाजूला उभा होता. प्रो. पार्कर यांचें 'शेलेच्या काव्याचें अंतरंग' या विषयावरील व्याख्यान नुकतेंच संपलें होतें; व विद्यार्थी हॉलमधून बाहेर पडत होते. त्यांचा आपसांत चाललेला हास्यविनोद सारखा कानांवर येत होता. पण, प्रो. पार्कर यांनीं आपल्या व्याख्यानांत शेलेच्या काव्यमय जीवनाचें इतकें रम्य शब्दचित्र रेखाटलें होतें कीं, त्याच्या चिंतनांत गुंगलेल्या केशवला भोंवतालीं चाललेल्या त्या खिदळण्याची जाणीव नव्हती. इंग्रजी कविता शिकवण्यांत प्रो. पार्कर यांचा अगदीं हातखंडा होता. कविता शिकवितांना बहुधा ती गाऊन व प्रसंगीं जरूर तर अभिनयही करून ते तिचें मर्म विशद करीत असत. त्यांतून शेले हा तर त्यांचा आवडता कवि. त्याच्या प्रणयजीवनाचें रहस्य उकलून सांगतांना त्यांनीं आज इतकें सुंदर भाषण केलें कीं, केशवला त्यांचें तें भाषण म्हणजे एक गद्यकाव्यच वाटलें. आणि, व्याख्यानाच्या ओघांत शेलेचीं जीं तीन चार भावगीतें आपल्या किंचित् घोगऱ्या पण गोड आवाजांत त्यांनीं साभिनय म्हणून दाखविलीं, त्यांचे मधुर निनाद अद्याप त्याच्या कानांत घुमत होते.

हॉलमध्यें त्यांचें तें व्याख्यान ऐकत असतांना त्याची चित्तवृत्ति जितकी आंदोलित झाली नव्हती, तितकी ती आतां बाहेर आल्यावर झाली. वाऱ्याच्या गार झुळका एकसारख्या येत होत्या; व बागेंतील अर्धवट उमललेल्या कळ्यांच्या

सुवासानें वातावरण मदिर होऊन गेलें होतें. आणि, पश्चिमेकडलें क्षितिज जरी धूसर होतें, तरी अष्टमीच्या शुभ्र चांदण्याची शोभा सर्वत्र पसरली होती. चांदणें हें केव्हांही रमणीयच. पण, अष्टमीच्या चांदण्यांत प्रकाश आणि छाया यांची अशी कांहीं चमत्कारिक सरमिसळ झालेली असते कीं, त्यामुळें हृदयांत उत्कंठापूर्ण असे आभास उत्पन्न होतात. शिवाय, आज त्या चांदण्याच्या शोभेंत एक प्रकारची खिन्नतेचीही पण छटा होती. कारण, पश्चिम क्षितिजावरले ढग हळुहळू वर सरकत होते; व चंद्र थोडासा कललेला असल्यामुळें तिरप्या झालेल्या झाडांच्या सांवल्या, वाऱ्याच्या झुळकेबरोबर जास्त लांब होऊन, सुस्तपणानें हलत होत्या. आणि, पश्चिमेच्या कोंपऱ्यांत दबा धरून बसलेल्या त्या ढगांच्या समूहांत वीजही मधून मधून चमकत होती. हॉलमधून बाहेर येतांच चांदण्याची ती उदासरम्य शोभा केशवच्या दृष्टीस पडली; व आकाशाच्या मध्यापासून ढळलेलें चंद्राचें तें कलंकित, किंचित् फिकें अर्धबिंब पाहून, प्रो. पार्कर यांनीं थोड्या वेळापूर्वी म्हणून दाखविलेलें शेलेचें चंद्राविषयींचें पुढील गीत त्याला आठवलें—

Art thou pale for weariness  
Of climbing heaven, and gazing on the earth,  
Wandering companionless,  
Among the stars that have a different birth

त्या गीतांतील तो 'कंपॅनियनलेस' हा शब्द त्याच्या मनाला तीव्रतेनें जाणवला. कारण या वेळीं चंद्रबिंबाच्या जवळ एकही तारका नव्हती. पूर्वेकडील क्षितिजावर अनेक तेजोगोल तळपत होते, पण, चंद्रबिंबाच्या भोंवतालीं जें थोडेंसे निरभ्र आकाश होतें, त्यांत मात्र एकही तारका चमकत नव्हती. उलट पश्चिमेकडचे ढग आतां झपाट्यानें जवळ येत होते. आकाश तारकांनीं एवढें गजबजलेलें असतांना चंद्राला तेवढा एकट्यानेंच प्रवास करावा लागावा, ही शेलेनें वर्णिलेली अवस्था;—प्रेमळ साहचर्याशिवाय जीवित कंठण्याचें हें दुर्भाग्य;—या दुर्भाग्याइतकें जगांत दुसरें खडतर काय असूं शकेल, अशी कल्पना केशवच्या मनांत आली; व समानशील दयितेच्या साहचर्यामुळें उत्फुल्ल झालेलें शेलेचें प्रेममय जीवन त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. आणि, त्याच्या मनांत लगेच

असा विचार आला कीं, सुमाचें साहचर्य जर आपल्याला लाभलें, तर शेलेप्रमाणें आपलेंही जीवन—

तोंच त्याच्या पाठीवर कोणी तरी दणकन थाप मारली; व म्हटलें—

" काय रे पाध्ये, कुणाची वाट पहात उभा राह्यला आहेस इथं?—आजचा दिवस चल ना आमच्याचबरोबर—"

" अरे, तो कसला येतो आपल्याबरोबर? आपल्या मेरी गॉडविनची वाट पाहात उभा राह्यलाय तो इथं! किती झालं तरी आपल्या कॉलेजचा शेले आहे तो, हें विसरूं नकोस तूं!—"

ते कुत्सित उद्गार, त्या उद्गारांमागोमाग तुच्छतेनें केलेलें विकट हास्य व त्याबरोबरच तोंडांतून सोडलेला सिगारेटच्या धुराचा भपकारा केशवच्या अंगावर आला; आणि, विचारांच्या ज्या गोड तंद्रींत तो आतांपर्यंत गुंगून गेला होता, ती एकदम भंग पावून त्याचें मन अत्यंत विषण्ण झालें. त्याचें आणि सुमतीचें नांव अलीकडे कॉलेजांत ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें होतें; व वर्गांत एकदां फळ्या-वरही त्यांच्या प्रणयाचा परिस्फोट त्याच्या एका प्रतिस्पर्ध्यानें केला होता. सुमती-विषयीं त्याच्या मनांत एक प्रकारची आत्मीयता उत्पन्न झाली होती, व तिला प्रत्यहीं अधिकाधिक सांद्रता येत चालली होती, हें खरें. तथापि, त्या आत्मीय-तेला आपल्या वर्गबंधूंनीं ' प्रेम ' हें नांव ठेवावें;—इतकेंच नव्हे, तर तें प्रेम हा त्यांच्या चर्चेचा आणि चेष्टेचा सार्वत्रिक विषय व्हावा, ही गोष्ट मात्र त्याला सहन झाली नाहीं. त्यामुळें ते उद्गार कानांवर पडतांच त्याला अतिशय उद्वेग वाटला.

पण तो उद्वेग फार तर क्षणभरच टिकला असेल. कारण, तितक्यांत त्याला परिचित असलेलें मधुर हास्य त्याच्या कानांवर पडलें; व म्हणून त्यानें मागें वळून पहातांच सुमति इतर विद्यार्थिनींबरोबर बोलत हॉलमधून बाहेर येत असलेली त्याच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर, त्यांना संकोच वाटूं नये म्हणून, तो थोडा बाजूला झाला. पण, त्याला पहातांच आपल्या मैत्रिणींचा निरोप घेऊन, सुमति त्याच्याजवळ आली; व तीं दोघें झरझर पायऱ्या उतरून कॉलेजच्या आवारा-बाहेर पडलीं.

रस्त्यावर येतांच सुमतीनें त्याला विचारलें, “ कसं वाटलं आजचं व्याख्यान तुम्हांला ?”

“ फार सुंदर,” केशव रस्ता ओलांडून पदपथाकडे जात असतां म्हणाला. “ शेलेचं जीवन म्हणजे मूर्तिमंत काव्य होतं. इतर कवि कविता लिहितात.—पण शेलेनं काव्य जीवनांत कसं आणावं, हें आपल्या चरित्रानं मानवजातीला शिकवलं—”

“ तें खरं.—पण हॅरियटच्या बाबतींत त्यानं केलेलं वर्तन निष्ठुरपणाचं झालं, असं नाहीं कां तुम्हांला वाटत ?—मला तरी बाई पार्करनीं केलेलं शेलेच्या वर्तनाचं तें समर्थन मुळींच पटलं नाहीं—”

पदपथावर पाऊल ठेवतां ठेवतां किंचित् आवेशानें तिनें तें वाक्य उच्चारलें. आणि, आतां सरळ घरीं जावयाचें अशा कल्पनेनें, ती सँढर्स्ट पुलाच्या दिशेनें चालावयाला लागली.

तोंच केशव तिला म्हणाला, “ इतक्या लवकर घरीं जायचं आज ?—आतां फार तर आठ वाजले असतील.—चांदणं किती छान पडलंय. मला वाटतं, आपण टेकडीच्या पायथ्यापर्यंत फिरून आलों, तर उशीर नाहीं कांहीं होणार घरीं जायला—”

“ नाहीं होणार.—पण आपण लौकर घरीं गेलों, तर ताईला किती आनंद वाटेल ! ती आपल्या वाटेकडे डोळे लावून पडली असेल अगदीं.—अशा या वेळीं घरांत बिछान्यावर एकटं पडून रहाणं याच्यासारखं संकट नाहीं दुसरं.—अन् ती पाहिली का त्या बाजूला वीज चमकतेय आणि आभाळ कसं अगदीं गच्च भरून आलंय— ”

“ पण इतक्यांत पाऊस खात्रीनं नाहीं येत. आपण फक्त टेकडीच्या पायथ्यापर्यंत जाऊन लगेच परत फिरूं—”

आणि, हें वाक्य उच्चारून, ती काय बोलते याची वाट न पहातां, केशव त्या दिशेनें चालावयालाही लागला. तेव्हां नाइलाज होऊन सुमतीनेंही त्याच्या बरोबर चालावयाला प्रारंभ केला. वारा थोडा जोरानें सुटल्यासारखा वाटल्यामुळें तिनें आपला पदर अंगाभोंवतीं लपेटून घेतला; व हातांतील छत्रीच्या सुबक मुठीला पदराचें टोंक गुंडाळून, त्याच्याशीं खेळत, शक्य तितक्या लवकर

घरीं जातां यावें या बुद्धीनें, तिनें झपाट्यानें पावलें टाकावयाला सुरवात केली. खालीं वाळवंटांत जरी लोकांचे थवे बरेच बसलेले होते, तरी, पावसाच्या भीती-मुळेंच बहुधा, पदपथावर या वेळीं फारशी रहदारी नव्हती; व त्याच्या बाजूला असलेलीं बहुतेक बांकेंही रिकामीं पडलीं होतीं. नाहीं म्हणावयाला, एकाद दुसरें पारशी दांपत्य मात्र एकमेकांच्या हातांत हात घालून गप्पागोष्टी करीत चाललें होतें; व पदपथालगत उभ्या असलेल्या मोटारींत बसून, फिरावयाचा कंटाळा असलेली, धनिक मंडळी चांदण्यांतील भरतीची शोभा पहात होती. त्यामुळें भिक्षेच्या आशेनें एकाद दुसरा अपंग भिकारी आणि विक्रीच्या आशेनें एकादा नारिएलवाला किंवा गंडेरीवाला मात्र पदपथावर संचार करीत होता.

तीं दोघें अगदीं मुकाट्यानें चाललीं होतीं. केशवच्या मनांत अजूनही त्या व्याख्यानाविषयींचे विचार घोळत होते; व चांदण्याची शोभा अनुभवण्यापेक्षां सुमतीबरोबर गप्पा मारण्याच्या हेतूनें जरी त्यानें ती फिरण्याची कल्पना काढली होती, तरी रस्त्यानें तो एकही शब्द तिच्याशीं बोलला नाहीं. पण शेलेच्या चरित्राबद्दल विचार करीत तिच्याबरोबर चालण्यांत मात्र एक प्रकारचा विलक्षण आनंद त्याला होत होता. तें चांदणें, समुद्राची सतत कानांवर येणारी ती गर्जना, शेलेच्या प्रणयजीवनाचें तें मधुर चिंतन आणि त्या चिंतनाची माधुरी वाढविणारा आवडत्या सहाध्यायिनीचा सहवास,–या कारणांमुळें त्याचें मन अगदीं उत्फुल्ल होऊन गेलें होतें. सुमतीला मात्र त्याच्या त्या मुग्धतेचें थोडें नवल वाटलें. आपण हॅरियटविषयीं मघांशीं विचारलेला प्रश्न;—तो प्रश्न त्याला न आवडून तर तो बोलेनासा झाला नाहीं ना, अशी एक शंका तिच्या मनांत आली. पण, स्वतः होऊन तो किंवा आणखी कोणता विषय आपण काढावा, असें मात्र तिला वाटलें नाहीं. ती जात्याच मितभाषिणी. त्यांतून या वेळीं ललि-तेला घरीं एकटी टाकून फिरण्यांत आपण कांहीं चांगलें करीत नाहीं, अशी टोंचणी सतत तिच्या मनाला लागलेली होती. तथापि, केशव जर तिच्याशीं बोलला असता, तर तिला तें फिरणें कदाचित् सुखकर वाटलेंही असतें. पण तो कांहींही न बोलल्यामुळें तिच्या मनाचा अगदींच विरस झाला.

पदपथाच्या टोंकाशीं तीं जातात न जातात, तोंच चंद्रावर ढग येऊन एकदम काळोख पडला; व पावसाचे मोठमोठे थेंबही अंगावर येऊं लागले. त्याबरोबर

परत फिरून हातांतील छत्री उघडीत सुमतीनें केशवला म्हटलें, "मी म्हटलं नव्हतं मघांशीं पाऊस आपल्याला गांठील म्हणून !—आज रेनकोट सुद्धां आणलेले नाहींत. आतां आली भिजत घरीं जाण्याची पाळी—"

तिच्या त्या सरोष शब्दांनीं केशव आपल्या सुखस्वप्नांतून जागा झाला; व त्यानें एकवार सभोंवतीं पाहिलें. पाऊस पडावयाला अद्याप रीतसर सुरवात झालेली नव्हती. पण, वाऱ्याचा सोसाटा आणि ढगांचा गडगडाट मात्र सुरू झाला होता; व पाऊस लवकरच येणार आणि तोही अगदीं जोराचा, हें स्पष्ट दिसत होतें. त्यामुळें पदपथालगतच्या मोटारी चालू झाल्या; व वाळवंटांत आणि बांकावर बसलेले लोकही घरच्या वाटेला लागून दोन तीन मिनिटांतच सारा रस्ता जवळ जवळ निर्मनुष्य झाला. क्षितिजाची पूर्वेकडील बाजू अजूनही बहुतेक निरभ्र होती. पण, पश्चिमेकडचें क्षितिज मात्र अगदीं काळवंडून जाऊन, त्यावर चाललेलें विजेचें चमचमणें फार भयानक दिसत होतें; व वारा इतक्या जोरानें वहात होता कीं, त्याच्या सोसाट्याबरोबर वारंवार चलिततेज होणारे रस्त्यावरील दिवे मालवतात कीं काय, अशी भीति एकसारखी वाटत होती.

तो देखावा पाहून केशव थोडासा वरमला; व हंसल्यासारखें करून तिला म्हणाला, "चांदण्यानं चांगलंच फसवलं म्हणायचं आपल्याला.—आतां जरा झपाट्यानं पाऊल टाकलं पाहिजे.—म्हणजे कदाचित् पाऊस चांगला सुरू होण्यापूर्वीच आपण घरच्या रस्त्याला लागूं. बाकी अशा एकादे वेळीं पावसांतून भिजत जाण्यांत सुद्धां मजा आहे एक प्रकारची ! रेनकोट न् छत्र्या या नेहमीं लागल्याच आहेत मागं. आज हा एक नवा अनुभव ! पावसांतून भिजत समुद्रावर फिरण्याची असली नामी संधि तरी कधीं मिळणार आहे आपल्याला ?"

बोलतां बोलतां त्यानें आपली छत्री उघडली; व तीं दोघेंही झपाट्यानें चालूं लागलीं. इतक्यांत एकदम पावसाच्या थेंबांसह वाऱ्याचा झोत अंगावर येऊन, सुमतीच्या किंचित् मागें झुकलेल्या छत्रीचें कापड त्याच्या जोरानें उलटलें. त्याबरोबर, आतां छत्री आपल्या हातांतून सुटून जाते, अशा कल्पनेनें भिऊन ती उद्गारली "अगबाई, छत्री चालली माझ्या हातांतून—"

तिची ती अवस्था पाहून केशवनें झटकन आपल्या हातांतील छत्री मिटली; व तिच्या हातांतील उलटलेली छत्री घेण्याच्या उद्देशानें त्यानें तिचा हात धरला.

पण तिच्या हाताचा स्पर्श होतांच त्याला छत्री घेण्याचें भान उरलें नाहीं. त्यानें एकदम,—स्वतःच्या अगदीं न कळत,—त्या भयविवश किशोरीला जवळ घेतली; व छत्री सांवरण्याच्या गडबडींत तिनें त्याच्याकडे वळविलेल्या ईषदार्द्र मुखाचें त्यानें अभावितपणें चुंबन घेतलें.

त्याच्या ओठांचा—उष्ण निःश्वासांचा स्पर्श गालाला होतांच, सुमतीला आपल्या अंगांतील रक्त उसळल्यासारखें वाटलें; त्याच्या हातांनीं लपेटलेल्या तिच्या शरीराच्या प्रत्येक गात्राला अननुभूत संवेदना झाल्या; व ती अगदीं सुन्न, अगदीं बेभान होऊन गेली.

त्या स्थितींत तीं दोघे फार तर क्षणार्धच असतील.

तिच्या स्पर्शसुखाचा आस्वाद आपण घेतला, याची जाणीव मनाला होतांच, केशव अतिशय वरमला; व तिच्या शरीराभोंवतालचा आपला हात काढून त्यानें मुकाट्यानें तिची छत्री घेतली. आणि ती विरुद्ध दिशेला धरून तिचें कापड नीट केलें. त्याच्या बाहुपाशांतून मुक्त होतांच सुमतीनें आपले अस्ताव्यस्त झालेले कपडे नीट केले; व त्यानें पुढें केलेली छत्री मुकाट्यानें हातांत घेऊन ती चालावयाला लागली. पावसाचा एकाद दुसरा थेंब मधून मधून पडत होता. पण वाऱ्याचें थैमान मात्र आतां अगदीं कमी झालें होतें. आणि, चंद्रावर आलेले ढग त्याच्या मंद झोतानें बाजूला ढकलले जाऊन, भोंवतालच्या भयाण घनतमांतून त्याची प्रभा पुन्हा एकवार सर्वत्र पडली. जणुं कांहीं, त्या प्रेमिकांना परस्परांचें स्पर्शसुख अनुभवण्याची संधि देण्यासाठींच निसर्गानें चंद्राला कांहीं काळ लपविलें आणि वाऱ्याला मोकाट सोडला होता.

मात्र मीलनाच्या त्या क्षणापासून जी एक प्रकारची लज्जा आणि अनुताप यांनीं मिश्र अशी मुग्धता त्या दोघांत उत्पन्न झाली, ती घरीं येऊन पोंचेपर्यंत कमी झाली नाहीं. रस्त्यांत अवचित घेतलेल्या त्या चुंबनानें त्यांना परस्परांविषयीं वाटणाऱ्या आकर्षणाची सांद्रता जशी त्यांच्या अनुभवाला आणून दिली, तसाच अननुभवी प्रेमिकांत वसणारा नाजूक संकोचही पण त्यांच्यामध्यें उत्पन्न केला. चुंबनाचा तो क्षण इतका प्रभावी होता की, जणु कांहीं त्यांचें सर्व अस्तित्व त्या एका क्षणांत सांठविल्यासारखें झालें. त्यामुळें रस्त्यानें चालतांना एकमेकांचे निःश्वास जरी मधून मधून ऐकूं आले, तरी त्यांना कसेसेच वाटे. वस्तुतः, परस्परांच्या

सहवासांत फिरण्याचा हा कांहीं त्यांचा पहिलाच प्रसंग नव्हता. किंबहुना, कॉलेज उघडल्यानंतर थोड्याच दिवसांनीं ललितेनें अंथरुण धरल्यामुळें, गेले तीन चार महिने त्यांचा कॉलेजांतील बहुतेक कार्यक्रम व त्या निमित्तानें होणारें हिंडणें फिरणें सर्व एकत्रच होत असे. पण, आपण एकमेकांच्या सान्निध्यांत हिंडत आहों, याची जाणीव या वेळीं जितक्या तीव्रतेनें त्यांना क्षणोक्षणीं होत होती, तितकी ती पूर्वी कधींच झाली नव्हती. आणि, त्या जाणिवेंत जशी पूर्वी कधीं न अनुभविलेल्या सुखाची मधुर संवेदना, तशीच स्वतःच्या मनाला वाटणारी स्वतःच्या विवेकबुद्धीची भीतीही मिसळलेली होती. आपण कांहीं विशेष गैर केलें, असे त्या दोघांनाही वाटत नव्हतें. पण, कधीं न केलेली गोष्ट पहिल्यांदाच केली, व ती करितांना कुलीनपणाचा धरबंद थोडा सुटला,—आणि तो सुटला नसता तर बरें झालें असतें, अशा तऱ्हेचे विचार वारंवार त्यांच्या मनांत येत होते. त्यामुळें त्यांच्यांत संकोचाचा आडपडदा उत्पन्न झाला; व स्पर्शसुखाचा मोह उत्पन्न करणारा तो एकांतही त्यांना नकोसा वाटूं लागला.

घरीं आल्यावर तीं दोघेंही घाईघाईनें जिना चढून वर गेलीं. खोलींत पाऊल टाकतांच त्यांनीं जें दृश्य तिथें पाहिलें, त्यामुळें त्यांना स्वतःविषयीं इतका वेळ वाटत असलेला उबग दुणावला. ललिता लोडाला ओठंगून बिछान्यावर बसली होती; व तिच्या पलंगालगतच्या झुलत्या आरामखुर्चीवर बसून, चंद्रशेखर मोसंब्याची एक एक फोड काळजीपूर्वक सोलून तिला देत होता. तें काम करीत असतांना तो कांहीं तरी गंमतीदार गोष्टी तिला सांगत असे; व ती आपल्याला त्रास न होईल अशा रीतीनें हळुहळू हंसत होती. हंसण्याचे श्रम सहन न झाल्यामुळें म्हणा किंवा पुष्कळ दिवसांनीं इतकें हंसूं आल्यामुळें म्हणा, अलीकडे पांढऱ्या पडलेल्या तिच्या गालांवर किंचित् लाली चढली होती; व वारंवार हंसल्यामुळें आणि त्याहीपेक्षां तें दाबण्याचा सारखा प्रयत्न केल्यामुळें तिच्या विशाळ नेत्रांच्या पापण्यांवर पाणी तरारलें होतें. गोष्ट सांगतांना चंद्रशेखर स्वतः मनसोक्त हंसत असे. पण, ललिता जरा जोरानें हंसली म्हणजे तिला मात्र तो म्हणावयाचा, "तुम्ही अशा सारख्या हंसत राहाल, तर मी तुमच्याशीं बोलणार नाहीं बरं का आतां, ताई? या एकसारख्या हंसण्यामुळं तुम्हांला थकवा पहा बरं किती आलाय तो—"

त्याचें तें सांगणें कांहीं चुकीचें नव्हतें. दुखणेकरी माणसाला हंसण्याचे श्रम झाले असतां अशक्तपणामुळें जो खोकला येतो, तो मधून मधून तिला येत होता; तिचें कपाळ घामानें ओलसर झालें होतें; व तिला स्वतःलाही आपल्याला थकवा आल्यासारखा वाटत होता. पण, समोर बसलेल्या त्या युवकाच्या प्रत्येक हालचालींत, प्रत्येक हावभावांत, हास्याच्या प्रत्येक निनादांत जो विलक्षण उल्हास भरला होता, त्यानें त्या खोलींतील रोगट वातावरण नष्ट करून तिचें मन उल्लसित केलें. सूर्याचे किरण विशिष्ट रीतीनें पाडले असतां जसा शरीरावरील रोगाचा अंमल हटतो, तशी त्याच्या त्या प्रसन्न हास्यानें तिच्या मनावर पडलेली विषादाची दुष्ट सांवली दूर केली. त्यामुळें तिला एरवीं अलीकडे ज्या गोष्टी सोसवत नसत, त्याही आज सोसवत होत्या. गोष्ट सांगतां सांगतां चंद्रशेखर हंसला, म्हणजे खुर्ची जोरानें हेलकावत असे; व एकादे वेळीं तिचे धक्के पलंगालाही बसत असत. एरवीं कधीं पलंगाला धक्का लागला, तर ललितेला तो सहन होत नसे. पण आज तो त्रास तिला उल्हासाच्या भरांत सुसह किंबहुना सुखकर वाटला. परंतु त्या सारख्या सारख्या हंसण्यामुळें तिला एक प्रकारची श्रांतता मात्र झपाट्यानें येत होती. आणि ती गोष्ट लक्षांत आल्याकारणानेंच चंद्रशेखर तिला न हंसण्याबद्दल बजावीत होता.

पण, त्यानें न हंसण्याबद्दल कांहीं म्हटलें कीं, ती लगेच त्याला उत्तर देत असे, "आज किती तरी दिवसांनीं मी इतकी हंसतेंय.—अन् तुम्ही कसं म्हणतां मला हंसूं नको म्हणून ?—आयुष्याचे जे थोडे दिवस आतां मला या जगांत काढायचे आहेत, ते तरी मला हंसून खेळून घालवूं द्यात. खरंच चंद्रशेखर, तुम्ही जर रोज इथं येऊन मला अशा गोष्टी सांगाल कीं नाहीं, तर माझा संध्याकाळचा वेळ किती तरी मजेंत जाईल—"

"—अन् प्रकृतीही सुधारेल. तुमच्या प्रकृतीवर गोष्टी सांगणं हें जर औषध असेल, तर तें मी आनंदानं देईन. पण बाबू न् सुमति असतात ना इथं संध्याकाळीं ?—"

" असतात.—पण सुमा आपण होऊन कधीं फारशी बोलायची नाहीं; अन् बाबूचं काम आतांशा थोडं लहरी झालंय. रोज रोज आजारी माणसाजवळ बसावं

लागलं, म्हणजे कोणीही झालं तरी कंटाळायचंच.—सुमा मला बरं वाटावं म्हणून वाचून दाखवते, पेटी वाजवते, गाते.—पण माझ्याच मनाला उल्हास वाटत नाहीं, त्याला ती तरी काय करणार ?"

"उल्हास हा आपल्या मानण्यावर आहे, ताई.—मी पुष्कळ दिवसांनीं आलों, म्हणून मला पाहून तुम्हांला बरं वाटलं. पण, हाच जर मी रोज आलों, तर त्यांत कांहीं मग तुम्हांला विशेष वाटणार नाहीं—"

"वा, छान युक्ति काढलीत तुम्ही रोज यायचं टाळण्याची! मला माहीत आहे, तुमच्या मागं फार कामं असतात—"

"कुणी सांगितलं तुम्हांला माझ्या मागं कामं असतात म्हणून? बाबूनं कांही तरी विचित्र कल्पना करून दिलेली दिसतेय माझ्याबद्दल तुमची.—यंदां तर मी एम्. ए. चा सुद्धां अभ्यास करायचा नाहीं असं ठरवलंय," तिच्या हातांत मोसंब्याची फोड देतां देतां तो म्हणाला.

"पुरे आतां.–तुम्ही कीं नाहीं आज मला गोष्टींच्या नादांत गुंगवून सबंध मोसंब खायला लावलं.—आतां तुम्ही त्या उरलेल्या दोन फोडी सोलूं नका अन् मीही पण खायची नाहीं—"

"छे छे, तेवढ्या दोन फोडी तरी तुम्हांला घेतल्याच पाहिजेत, ताई. आज इतका वेळ जो हसण्याचा व्यायाम झाला, त्याचा शीण थोडा तरी जाईल हें सबंध मोसंब तुम्ही खाल्ल्यानं; अन् मलाही माझ्या बसण्याचं सार्थक झालं असं वाटेल. खरंच, तुम्ही जर माझ्या हातचीं दोन मोसंबीं खायचं कबूल करीत असाल, तर मी रोज इथं यायला तयार आहें—"

इतकें बोलून तो हंसला; व पायानें खुर्चीला हेलकावा देऊन, त्यानें मोसंब्याची फोड सोलावयाला सुरवात केली.

त्याच्या त्या प्रश्नाला ललिता कांहीं उत्तर देणार, तोंच सुमति आणि तिच्या मागोमाग केशव आंत आला.

तीं दोघे आंत येतांच चंद्रशेखरनें एकवार त्यांच्याकडे न्याहाळून पाहिलें. आंत येत असतांना, आणि विशेषतः त्याला तिथें तशा रीतीनें गप्पा मारीत बसलेला पाहिल्यावर, त्यांच्या चेहऱ्यांवर झालेली चलबिचल त्याच्या नजरेंतून

सुटली नाहीं. किंबहुना त्यांच्या वृत्तींत आज उत्पन्न झालेला तो संकोच त्याला अपूर्व आणि चमत्कारिक वाटला; व केशवकडे जिज्ञासेनें पहात त्यानें विचारलें, "कसं काय झालं रे व्याख्यान, बाबू ?"

त्याची तीक्ष्ण दृष्टि आपल्या मुद्रेवर स्थिर झालेली आहे, याची जाणीव केशवला होती. म्हणून, अंगांतील कपडे काढण्याच्या मिषानें त्याच्याकडे पाठमोरा होऊन, तो तुटकपणानें म्हणाला, "छान झालं.—पण तूं केव्हां आलास इथं चंद्रा ?—मला कांहीं म्हणाला नव्हतास तूं आज येणार म्हणून—"

"मला येऊन तास झाला असेल नाहीं आतां, ताई ? मी अगदीं अचानक आलों. आज एकॉनॉमिक सोसायटीची सभा होती. पण कोरम न भरल्यामुळं कंटाळून शेवटीं निघून आलों मी !—या लोकांना जर कामं करायची इच्छा नसते, तर हे संस्था तरी कशाला काढतात कुणाला ठाऊक !—पण काय रे, आज पार्करसाहेबांचं व्याख्यान बरंच लांबलेलं दिसतं, बाबू ?—"

त्याच्या त्या प्रश्नगर्भ वाक्याचा रोख केशवनं ओळखला. पण, त्याला उत्तर न देतां अगर त्याच्याकडे वळूनही न पहातां तो घाईघाईनें त्याला एवढेंच म्हणाला, "तूं बसतोयस ना चंद्रा ?—मी थोडा जाऊन येतों आंतून. मग मी तुझ्याबरोबर बाहेर फिरायलाच येतों—"

हे शब्द उच्चारून तो लगेच खोलींतून बाहेर पडला.

तो बाहेर गेल्यावर चंद्रशेखरनं सुमतीकडे पाहिलें. तेव्हां, ललितेचे दोन्ही हात तिनें आपल्या हातांत घेतले असून, तिच्या डोळ्यांतून टपटपां अश्रु गळत आहेत, असें त्याला दिसलें. त्या बरोबर त्याला अतिशय अचंबा वाटला.

सुमतीचे ते अश्रु कशाचे निदर्शक होते ?

---

## प्रकरण २९ वें

# टिळकांच्या समाधीपाशीं

—:o:—

सुमतीचे ते अश्रु हातांवर पडतांच ललिता एकदम दचकली. इतका वेळ तिचें लक्ष चंद्रशेखर आणि केशव यांच्यांत चाललेल्या संभाषणाकडे होतें. त्यामुळें, सुमतीनें आल्याबरोबर कांहीं न बोलतां, तिचे दोन्ही हात आपल्या हातांत

घेतले, या गोष्टीचें तिला कांहीं वाटलें नाहीं. किंबहुना, सुमति पुष्कळदां तिचे हात आपल्या हातांत किंवा मस्तक आपल्या मांडीवर घेऊन, तास न् तास तिच्याकडे नुसती बघत बसत असे. तसाच आजचाही तो प्रकार तिला वाटला. शिवाय, सुमति दिव्याला पाठमोरी आणि अधोवदन अशी बसलेली असल्यामुळें, तिच्या चेहऱ्यावर जरी कदाचित् कांहीं फरक झालेला असला, तरी तो ललितेला कळणें शक्य नव्हतें. त्यामुळें सुमतीचे अश्रु हातांवर पडतांच तिला अगदीं कसेंसेंच वाटलें; व तिनें सुमतीला घाबऱ्या घाबऱ्या विचारलें, "काय झालं ग सुमा?"

तिचा तो प्रश्न ऐकतांच सुमति भानावर आली; व तिनें आपले अश्रु आंवरले. ज्या कारणामुळें तिच्या डोळयांत अश्रु आले, त्या कारणाची वाच्यता करणें तिला शक्य नव्हतें. चौपाटीवर घडलेला प्रकार जर आपण ललितेला सांगितला, तर तिच्या मनाला किती यातना होतील, याची सुमतीला पूर्ण जाणीव होती. म्हणून, ज्या अनुतापामुळें ललितेला पाहिल्यावर, व त्याहीपेक्षां केशव आणि चंद्रशेखर यांच्यांत झालेलीं ती प्रश्नोत्तरें ऐकल्यावर, तिच्या डोळयांत अश्रु आले, तो अनुताप मुकाट्यानें सोसण्यांतच शहाणपणा आहे, असें तिला वाटलें; व आपले डोळे पदरानें पुसून ती ललितेला म्हणाली, "कांहीं झालं नाहीं ग ताई. तुझे हात हातांत घेतांच मला कसंसंच वाटलं अन् माझे डोळे भरून आले—"

"तुझ्या मनाला कीं नाहीं खचित कांहीं तरी लागण्यासारखं घडलंय, सुमा—" पण ललिता तेवढेंच बोलून थांबली. तिला वाटलें कीं, चंद्रशेखरच्या समोर कदाचित् सुमतीला आपलें दुःख सांगावयाला संकोच वाटत असेल; व म्हणून ती बोलत नसावी. ती कल्पना मनांत येतांच संभाषणाचा ओघ बदलण्याच्या हेतूनें तिनें म्हटलें, "काय ग, तूं व्याख्यानाविषयीं कांहीं सांगितलं नाहींस आम्हांला अजून?"

"हो, कसं काय झालं व्याख्यान, सुमाताई," चंद्रशेखरनें ती संधि साधून विचारलें. ललितेच्या त्या प्रश्नाचा हेतु त्याच्या लक्षांत आला; व सुमतीच्या डोळयांत अश्रु कां आले हें जाणण्याची जरी त्याला उत्कट इच्छा होती, तरी ती दाबून टाकून त्या दोघींना आपल्या तिथें बसण्यामुळें संकोच वाटूं नये, या उद्देशानें त्यानें तो प्रश्न सुमतीला विचारला. "बाबू, तर आज कांहीं न सांग-

तांच निघून गेला. आतां तुम्हीच सांगा आम्हांला पार्करसाहेब आपल्या व्याख्या-नांत काय म्हणाले तें. एवढ्या कसल्या घाईत तो आज होता कुणाला ठाऊक—"

तो आणखी कांहीं बोलणार, तोंच केशवनें खालून मारलेल्या हांका त्याच्या कानांवर आल्या. त्याबरोबर चंद्रशेखरनें उठून खिडकीजवळ जाऊन त्याला विचारलें, "काय रे, वर नाहीं का येत तूं?"

"नाहीं, नाहीं. तूं चल लवकर—"

त्याच्या त्या वर्तनाचा चंद्रशेखरला चमत्कार वाटला; व त्याच्या मनांत क्षणैक अशी कल्पना येऊन गेली कीं, सुमतीचे ते अश्रु आणि केशवचा हा तुटकपणा यांचा कांहीं संबंध तर नसेल ना? पण, तो अधिक विचार न करितां, त्या दोघींचा निरोप घेऊन खालीं आला; व त्यानें केशवला म्हटलें, "काय रे कसल्या धांदलींत आहेस तूं आज एवढ्या? तूं जेवलास तरी का? अन् कपडे सुद्धां घातले नाहींस?—"

"करायचे आहेत काय कपडे? आपण चौपाटीवर जाऊं; अन् जातां जातां इंडो-पर्शियनमध्यें थोडा वेळ मुक्काम करूं."

इतकें बोलून तो लगेच चालावयाला लागला. जणुं कांहीं, चंद्रशेखर आपला हात धरून आपल्याला वर येण्याचा आग्रह करील किंवा आणखी कांहीं प्रश्न विचारील, अशी भीति त्याला वाटली. आणि, चंद्रशेखरचा स्पर्श एरवीं त्याला अत्यंत प्रिय असतांनासुद्धां, आपल्या हृदयांत हेलावत असलेले विचार त्याच्या स्पर्शानें कदाचित् उचंबळून येतील, या भीतीनें त्यानें स्वतःच्या खांद्यावर हात ठेवण्याचीही संधि त्याला दिली नाहीं. त्याची ती मुग्ध अस्वस्थता पाहून चंद्र-शेखरही अधिक कांहीं न बोलतां त्याच्या बरोबर चालावयाला लागला. चांदणें आतां स्वच्छ पडलें होतें; व रस्ता अगदीं शांत होता. नाहीं म्हणावयाला, क्वचित् एकाद्या खिडकींतून येणारा गायनवादनाचा सूर त्या शांततेचा मधुर भंग करीत असे, एवढेंच. ते रेस्टोरंटमध्यें शिरले, त्या वेळीं तिथें एकही मनुष्य नव्हता. केशव आंत शिरतांच कोंपऱ्यांतल्या टेबलाजवळ गेला; व आपल्या मागोमाग आलेल्या छोकऱ्याला कोको आणि कांहीं खाद्यें आणावयाला सांगून, त्यानें टेबला-वर पडलेलें वर्तमानपत्र चाळावयाला सुरवात केली. वस्तुतः सकाळचें तें शिळें

वर्तमानपत्र या वेळीं चाळण्यांत कोणत्याही प्रकारचें स्वारस्य नव्हतें. पण, आपल्या भावनांची हालचाल आणि त्याहीपेक्षां मुद्रेवर उमटणारें त्यांचें प्रतिबिंब जवळ बसलेल्या जिव्हाळ्याच्या माणसाच्या लक्षांत येऊं नये, अशी आपली इच्छा असली, म्हणजे त्याचा दृष्टिक्षेप टाळण्यासाठीं वाटेल त्या साधनाचा अवलंब आपण केव्हां केव्हां करितों. तसेंच या प्रसंगीं केशवचें झालें होतें. चंद्रशेखरला त्याच्या त्या वर्तनाचें राहून राहून नवल वाटत होतें. पण, केशव स्वतः होऊन बोलेपर्यंत आपण त्याला कांहीं विचारावयाचें नाहीं, अशा भावनेनें तो गप्प राहून त्याच्या हालचाली काळजीपूर्वक पहात होता. केशवनें दोन तीन मिनिटेंच त्या पत्रावर नजर फेंकली असेल. नंतर तें अधीरतेनें खालीं टाकून त्यानें टेबलावर जोरानें थाप मारली. तेव्हां, चंद्रशेखरनें हंसून त्याला म्हटलें, "आज तुला फार भूक लागलेली दिसतेय, बाबू?—पण कोको कांहीं चहासारखा तयार नसतो नेहमीं. तो यायला थोडासा वेळ लागणारच. बिचाऱ्या पोऱ्यावर डोळे वटारण्यांत काय अर्थ?—"

चंद्रशेखर हें बोलत आहे, तोंच छोकऱ्यानें कोकोचे पेले व केक्सनीं भरलेलें कांचपात्र टेबलावर आणून ठेवलें. चंद्रशेखरनें चमचानें एकवार कोको ढवळला; व तो प्यावयाला सुरवात केली. पण, इतका वेळ अधीरतेनें त्या पदार्थांची वाट पहात असलेला केशव मात्र त्या गरम कोकोंतून निघत असलेल्या वाफेच्या वर्तुळांकडे शून्य दृष्टीनें बघत स्वस्थ बसला होता. तेव्हां, थोडा वेळ वाट पाहून चंद्रशेखरनें त्याला विचारलें, "तूं पिण्यासाठींच मागवला आहेस ना हा कोको?"

"म्हणजे? मी समजलों नाहीं तुझ्या बोलण्याचा अर्थ!" केशवनें भुंवया किंचित् चढवून त्याच्याकडे न पाहतांच उलट विचारलें.

पण चंद्रशेखरनें त्याच्या त्या आविर्भावाकडे लक्ष न देतां त्याला मृदु आवाजांत विचारलें, "बाबू, आज असं काय घडलंय कीं ज्यामुळं तुझं मन इतकं विचारांत गढून जावं?" नंतर कोकोचा एक घोंट घेऊन तो पुन्हा म्हणाला, "मघांशीं मी आणखी एक चमत्कार पाहिला—"

"कोणता चमत्कार?" केशवनें तोंडाशीं नेलेला पेला एकदम खालीं ठेवून विचारलें.

" तूं ज्या वेळीं आंत गेला होतास, त्या वेळीं सुमा रडत होती." कोकोचा घोंट घेण्याच्या मिषानें तो पुन्हा थोडा थांबला; तें वाक्य कानांवर पडतांच केशवच्या मुद्रेवर झालेली चलबिचल त्यानें बारकाईनें न्याहाळली; व टेबलावरील वर्तमानपत्रावर ठेवलेला त्याचा हात आपल्या हातांत घेऊन त्याला विचारलें, " आज तुम्ही दोघं अशा चमत्कारिक रीतीनं कां वागतां आहां मघांचपासून ?"

केशव कांहीं वेळ थांबला. नंतर त्यानें चंद्रशेखरकडे न पहातांच त्याला म्हटलें, " चंद्रा, आपण चौपाटीवर गेल्यावर मी सगळं सांगतों तुला—"

असें म्हणून तो अर्धवट प्यालेला कोको तसाच टाकून उठला.

" थांब, पुरता पी तो कोको.—तूं आज कांहींसुद्धां न खातां घरून निघाला आहेस, बाबू. तूं थोडंसं तरी खा. मग आपण वाटल्यास रात्रभर बोलत बसूं चौपाटीवर." चंद्रशेखरनें त्याला हात धरून खालीं बसवीत म्हटलें.

केशवनें मुकाट्यानें तो उरलेला कोको एका घोंटांतच संपविला; व बशींतल्या त्या केक्सपैकीं एक केक घाईघाईनें तोंडांत कोंबून, ती खाण्याची कटकट लवकर संपवावी म्हणूनच कीं काय, त्यानें ग्लासांतील पाण्याचे दोन तीन घोंट झपाझप घेतले. आणि लगेच तो उठला. बाहेर जाण्याच्या त्या घाईत इराण्याला दिलेल्या रुपयाची उरलेली मोडही त्यानें मोजून पाहिली नाहीं.

ते समुद्रावर आले, त्या वेळीं एकही मनुष्य वाळवंटावर बसलेलें नव्हतें. भरतीच्या पाण्यानें वाळू सर्व भिजून धुपून गेली होती; व मघांशीं पडलेल्या पावसाच्या शिडकाव्यामुळें हवेंतही थोडा गारठा आला होता. चंद्राचें खालीं उतरलेलें बिंब किंचित् मोठें व पांडुर दिसत होतें. त्याच्या पिंवळसर प्रकाशांत ओहोट लागलेल्या समुद्राच्या पाण्याची शोभा मनोहर दिसत होती; व लाटांचाही आवाज अगदीं मंद असा येत होता. पदपथावर येतांच ते दोघेही क्षणभर थबकले. जणुं कांहीं, अष्टमीच्या मावळत्या चंद्रिकेचा तो क्वचितच दृष्टीस पडणारा शांत रूपोल्लास त्यांनीं एकवार डोळे भरून पाहून घेतला. आणि वाळवंटांत बसण्याच्या इच्छेनें ते खालीं उतरले. पण, त्या भिजलेल्या रेतीवर पाय पडतांच चंद्रशेखरनें त्याला म्हटलें, " काय रे, या ओल्या रेतीवरच बसणार का बाबू ?"

"मग कुठं बांकावर बसायचं? माझी तर मुळींच इच्छा नाहीं तिथं बसण्याची—"

"ठीक आहे. पलीकडे त्या बाजूला वाळू थोडी कोरडी दिसतेय. तिथं बसूं या—"

असें म्हणून चंद्रशेखर त्या बाजूला वळला; व ते दोघेही त्या दमट वाळूवर बसले. बसल्याबरोबर चंद्रशेखरनें एकवार त्या निर्मनुष्य वाळवंटाकडे नजर फेंकून म्हटलं, "बाबू, आपण कुठं बसलों आहों माहीत आहे तुला?"

"होय, माझ्या लक्षांत आलं.—तें पहा तें शिवलिंग न् त्याच्यावरलीं तीं फुलं. आपल्याला इथं येऊन अद्याप पुरता महिना नसेल झाला नाहीं, चंद्रा? काय त्या दिवशींचा तो विलक्षण प्रसंग!" केशव अगदीं गंभीर होऊन उद्गारला.

"त्या प्रसंगाचे संस्कार माझ्या हृदयावरून कधींही पुसटले जाणार नाहींत, बाबू! टिळकांच इतर सारं चरित्र जसं विलक्षण, तसंच त्यांचं मरण आणि दहनही पण विलक्षण. लोकांच्या मनावर त्यांनीं किती अमर्याद प्रभुत्व गाजविलं, याची साक्ष हें शिवलिंग देत आहे. त्यांच्यासारखा पुरुष जर एकाद्या स्वतंत्र राष्ट्रांत जन्माला आला असता, तर विद्यापीठांनीं त्याला डॉक्टरेट दिली असती आणि सरकारनें त्याच्यावर मानसन्मानांचा वर्षाव करून त्याच्या राष्ट्रसेवेचा गौरव केला असता. पण, मराठी भाषा आणि महाराष्ट्र, हिंदु धर्म आणि हिंदुस्थान यांच्या सेवेंत ज्याचं सर्व आयुष्य गेलं, त्यांच्या उद्धारासाठीं ज्यानं स्वतःच्या बुद्धि-शक्तींचा यज्ञ केला, त्या या महानुभावाला राष्ट्रीय सभेचं अध्यक्ष-पद मिळायला सुद्धां किती वर्षे लोटावीं लागलीं! या दृष्टीनं विचार केला म्हणजे टिळक मला केव्हां केव्हां अभागी वाटतात, बाबू! शील, विद्वत्ता आणि कर्तृत्व या त्यांच्या तिन्ही गोष्टी इतक्या लोकोत्तर कीं, हिंदुस्थानांतले इतर सारे पुढारी त्यांच्या मानानं हीणकस वाटतात. त्या पुढाऱ्यांच्या चारित्र्याला कुठं ना कुठं तरी ढळ आढळतो. त्यांचं जीवन मोत्यासारखं तेजस्वी असलं, तरी त्या मोत्याला कुठं ना कुठं तरी वेज पडलेलं दिसून येतं. पण टिळक म्हणजे अगदीं बेलाग कडा. त्यांचं चारित्र्य हिऱ्यासारखं तेजस्वी, निर्मळ पण अत्यंत कठोर. परंतु, अशा या लोकाग्रणीला राष्ट्रीय सभेच्या जुन्या पुढाऱ्यांनीं बहिष्कृतासारखं वागवलं आणि त्याचा तेजोभंग करण्यासाठीं प्रसंगीं सरकारच्या सुद्धां हाताला हात लावला!

आपल्या शीलाची शुद्धता सिद्ध करण्यासाठीं, आपल्या विद्वत्तेचं तेज जगाच्या निदर्शनाला आणून देण्यासाठीं आणि आपल्या कर्तृत्वाची छाप राष्ट्रीय सभेवर पाडण्यासाठीं टिळकांना किती दिव्यांतून पार पडावं लागलं, किती खडतर तपश्चर्या करावी लागली ! नाहीं तर गोखल्यांचं नशीब पहा.—वेल्बी कमिशनपुढं त्यांचं वजन पडावं म्हणून रानड्यांनीं आपलं बुद्धिसामर्थ्य खर्च केलं आणि त्यांना वरिष्ठ कायदेमंडळांत जातां यावं म्हणून फेरोजशहांनीं आपली जागा रिकामी केली.—त्या मानानं टिळकांना मिळालेलं लहानसहान यश सुद्धां किती कष्टार्जित आहे !—देवांच्या दास्यविमोचनासाठीं दधीचीनं आपल्या अस्थि दिल्या. तो त्याचा आत्मयज्ञ दिव्य तर खराच. पण तिथं एका आहुतीनं काम झालं.—आणि टिळकांना आपल्या जीवनसर्वस्वाचं हवन अणुअणूंनीं करावं लागलं;—आपल्या जीवितपुष्पाची एक एक पाकळी तोडतोडून वहावी लागली. या पोरक्या, परतंत्र राष्ट्रासाठीं इतक्या खस्ता दुसऱ्या कोणत्याही पुढाऱ्यानं खाल्ल्या नाहींत. शिवाजीमहाराजांनंतर महाराष्ट्रांत एवढा हा एकच पुरुष असा अवतीर्ण झाला कीं, ज्याचं स्मरण होतांच आम्हांला परवशतेची दिक्कत वाटूं नये आणि आत्मप्रत्ययानं आमचं रक्त उसळूं लागावं—"

बोलतां बोलतां तो एकदम थांबला. त्याचे डोळे भरून आल्यासारखे झाले. आणि, केशवचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन, तो त्याला म्हणाला, "राष्ट्र-सेवेची दीक्षा घ्यायला जर कोणती जागा योग्य असेल, तर ती हीच असं नाहीं वाटत बाबू तुला ?—"

" त्या दिवशीं रात्रीं ती चिता जळत असतांना किती तरी विद्यार्थ्यांनीं साश्रु नयनांनीं देशसेवेच्या शपथा घेतल्या—"

"पण त्यांपैकीं कितीजणांच्या लक्षांत आतां त्या शपथा राहिल्या असतील ?" चंद्रशेखरनें उद्वेगानें विचारलें. " तुला वाईट वाटेल बाबू, पण माझा गेल्या चार वर्षांचा कॉलेजांतला अनुभव असा आहे कीं, आपले विद्यार्थी अति थिल्लर, चैनीकडे त्यांचा ओढा फार आणि त्यांच्या ठिकाणीं उद्योग करण्याची बुद्धि अगदीं कमी.—जिव्हाळा अन् आस्था अशी त्यांना मुळीं कोणत्याच गोष्टीविषयीं वाटत नाहीं.—तुम्ही चांगलं भाषण केलंत कीं तेवढ्यापुरते ते तुमच्या भोंवतीं गोळा होतील, तुमच्याबरोबर काम करायचं कबूल करतील, त्या वेळीं खिशांत असले तर

पैसेही देतील.—पण दुसऱ्या दिवशीं त्यांतलं कांहीं शिल्लक राहायचं नाहीं.—जो तो मुलींच्या मागं लागण्यांत, टेनिस कोर्टावर बागडण्यांत किंवा धुराचे फवारे सोडण्यांत दंग—"

"खरं आहे तुझं म्हणणं.—चंद्रा, मी सुद्धां त्यांतलाच एक थिल्लर विद्यार्थी आहें—"

त्याच्या त्या उद्गारांचें चंद्रशेखरला मोठें नवल वाटलें; व त्यानें केशवच्या केंसावरून हात फिरवीत त्याला म्हटलें, "आज तूं अशा रीतीनं कां बोलतो आहेस स्वतःविषयीं?"

"माझ्या हातून आज एक अगदीं विलक्षण चूक झाली, चंद्रा." इतका वेळ अधोमुख असलेल्या केशवनें एकदम त्याच्या दृष्टीला दृष्टि भिडवून म्हटलें. त्या दृष्टींत अनुतापाची आर्तता ओतप्रोत भरलेली होती.

"कोणती चूक झाली?"

"चंद्रा, तूं दिलेला इषारा अगदीं योग्य होता. मी आज सुमाचं चुंबन घेतलं–"

"कुठं?"

"इथंच.—या रस्त्यावर—मघाशीं फिरून परत येत असतांना. चंद्रा, तुला माझा राग तर नाहीं ना आला?"

"राग कशाबद्दल?—मला वाटलंच होतं असं कांहीं तरी होईल म्हणून; अन् त्याबद्दल मी तुम्हांला दोषही पण देत नाहीं. मला एवढंच वाटतं कीं, तूं जरा अधिक जबाबदारपणानं वागायला हवं होतंस. स्त्रीशिक्षण जसजसं वाढत जाईल, विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांचे संबंध जसजसे निकट येत जातील, तसतशा अशा गोष्टी जास्त जास्त घडतील. तें यापुढं अपरिहार्यच आहे. स्त्रीशिक्षणाविषयीं आज आपल्या समाजाचं मत फारसं अनुकूल नाहीं. त्यांतच असले प्रकार घडून ते उघडकीला आले, म्हणजे शिकलेल्या मुलींविषयीं लोक वाईट बोलूं लागतात. पण लोकांना तरी कशाला नांवं ठेवायचीं? असलीं हीं चोरटीं रहस्यं कळलीं, म्हणजे आपण विद्यार्थी तरी आपसांत मुलींविषयीं किती अभद्र बोलतों? म्हणून, सध्यांच्या स्थितींत ज्यांना आपली जबाबदारी कळते, स्त्रीशिक्षणाकडे पहाण्याच्या समाजाच्या साशंक वृत्तीची ज्यांना जाणीव

आहे, त्या विद्यार्थ्यांनीं तरी आपलं वर्तन निर्मळ ठेवलं पाहिजे. त्यांतून तूं—बाबू,—निदान तूं तरी ही गोष्ट करायला नको होतीस. ज्याचं जीवित विशिष्ट ध्येयाला वाहिलेलं आहे, त्यानं एकांताची पहिली संधि लाभतांच विकारवश होऊन मोहाला बळी पडावं;—छे छे, मला ही कल्पनासुद्धां कशीशीच वाटते. ध्येयवादी माणसाचं जीवन टिळकांप्रमाणं सर्व मोहांपासून अलिप्त हवं. ज्या मनुष्याचं जीवन मोहमुक्त असेल, त्याचंच तेज फक्त या महाराष्ट्रांत पडूं शकतं. शत्रूच्या गोटांतून जिंकून आणलेली रूपसुंदरी ज्यानं मातेसमान गौरवून परत पाठविली, त्या शिवाजीमहाराजांचा हा देश आहे.–त्या देशाचं हें वैशिष्ट्य;–निष्कलंक चारित्र्याची शिवाजीमहाराजांनीं घालून दिलेली ही परंपरा भांडारकर, रानडे, आगरकर, टिळक, गोखले यांनीं या व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळांतही पुढें चालविली; व आपल्या पुढाऱ्यांविषयीं अत्यंत उदात्त अशी कल्पना समाजाच्या ठिकाणीं उत्पन्न केली. त्या कल्पनेच्या कसोटीला ज्याचं चारित्र्य उतरणार नाहीं, तो या महाराष्ट्रांत पुढारी म्हणून मान्य होणं अशक्य आहे. वाहिलेलं जीवन हें अनाघ्रात पुष्पासारखं असलं पाहिजे,—तरच त्याची मातब्बरी ! विशेषतः नव्या मतांचा, समाजाला विक्षिप्त—विध्वंसक वाटणाऱ्या मतांचा प्रसार करण्याची जबाबदारी ज्यांनीं आपल्या शिरावर घेतलेली असते, त्यांचं जीवन आगरकरांप्रमाणं अगदीं निष्कलंक, अगदीं निस्स्वार्थ असलं पाहिजे.—ही आपली जबाबदारी त्या मोहाच्या क्षणीं तूं विसरलास याचं मला वाईट वाटतं.—एकाद्या मुलीचं तिच्यावर अनुरक्त असलेल्या मुलानं चुंबन घेण्यांत कांहीं विशेष नाहीं.–पण तूं मात्र हें करायला नको होतंस, बाबू.—आतां मला कळलं सुमाच्या डोळ्यांत मघांशीं अश्रु कां आले ते !—लता तशी मरणाच्या दारांत येऊन पडलेली; आणि अशा वेळीं बाबू, तुला प्रणयचेष्टा सुचाव्यात !—याचं त्या हळव्या मनाच्या समंजस मुलीला दुःख झालं अन् पस्ताव्यानं तिच्या डोळ्यांतून अश्रु आले—"

"पुरे, पुरे, चंद्रा. मला कळून आला माझा सारा अविचार. आपण टिळकांच्या समाधीपाशीं बसलों आहों; व मी या शिवलिंगाला साक्ष ठेवून सांगतों कीं, पुन्हा असा अविचार माझ्या हातून घडणार नाहीं.—माझा स्वभाव तुला माहीत आहे. शेलेवरच्या त्या व्याख्यानानं मला या मोहांत पाडलं.—पण चंद्रा, तूं तेवढ्यावरून मला थिल्लर ठरवूं नकोस. तुझ्यासारखा मी विवेकी नसेन; पण इतर

मुलांसारखा मी विवेकभ्रष्टही नाहीं. या एका चुकीवरून तूं माझ्याविषयीं भलताच समज करून घेऊं नकोस—"

"तुझ्याविषयीं मी गैरसमज कसा करून घेईन, बाबू?—तुझं मन किती निष्पाप आहे याची मला कल्पना आहे. पण, आपलं जीवित वाहिलेलं आहे, एका कार्याला अर्पण केलेलं आहे, या भावनेनं तू यापुढं वागलं पाहिजेस.—तुला नाहीं का असं वाटत?"

"वाटतं ना.—पण चंद्रा, तुझ्याइतका मी कणखर नाहीं. ध्येयनिष्ठेमुळं तुझ्या वृत्तींत आलेला कठोरपणा माझ्या ठिकाणीं नाहीं. म्हणून, माझ्या हातून जर अशी एकादी चूक कधीं काळीं घडली, तर तूं तेवढ्यामुळं आपल्या या धाकट्या भावाविषयीं आपलं मन विटून देऊं नकोस," बोलतां बोलतां केशवच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. "मघांशीं मी वर आलों अन् तुला ललितेजवळ बसलेला पाहिला आणि मला स्वतःच्या वर्तनाची इतकी लाज वाटली चंद्रा, कीं नंतर वर येण्याची हिंमत मला झाली नाहीं. आणि सुमानं जर हें सारं लताला सांगितलं असलं तर!—तर मला तोंड दाखवायला जागा उरणार नाहीं तिला—"

"नाहीं रे, ती कशी सांगेल ललितेला ही गोष्ट? बायका असल्या बाबतींत आपल्यापेक्षां जास्त मुग्ध आणि भितऱ्या असतात." चंद्रशेखरनें त्याला धीर देण्याच्या उद्देशानें म्हटलें; व लगेच तो विषय बदलण्याच्या हेतूनें म्हणाला, "बाबू, ललितेची स्थिति एकंदरींत कठीण आहे, असं नाहीं वाटत तुला?"

"होय, मला कांहीं आशा नाहीं वाटत फारशी," केशवनें अनुतापाचा आंवंढा गिळून म्हटलें. "दादा तिला दिवाळी झाल्याबरोबर माथेरानला पाठवणार आहेत. त्यांचा पहिला विचार तिला लोणावळ्याला ठेवण्याचा होता. पण माझे अप्पा तिथं वारले.—त्या आठवणीचा परिणाम तिच्यावर वाईट होईल, म्हणून ते तिला माथेरानला ठेवणार आहेत. अन् तिथून कदाचित् नंतर पांचगणीला पाठवतील. त्यांची सुद्धां आशा सुटलेली दिसते एकंदरींत—"

"बाबू, ती तरी स्वतःविषयीं किती निराशेनं बोलते पाहिलंस ना?"

"तसं तर ती पहिल्यापासूनच बोलते आहे. आई वारली अन् तिच्या प्रकृतींत हळूहळू फरक पडत गेला. मला केव्हां केव्हां वाटतं कीं, तिचं हें दुखणं तिनं पुष्कळसं स्वतःच्या कल्पनेनं उत्पन्न केलंय.–अलीकडे तुझ्याकडे पहाण्याची तिची दृष्टि बदलली.–पण, आपल्या स्नेहाविषयीं अजूनही तिच्या मनांत अढी

असावी, असं मला वाटतं.-माझ्याविषयीं तरी तिचं मन खचित पूर्वीसारखं साफ नाहीं.—तुझ्याजवळ बोलली का कांहीं ती आज मजविषयीं ? "

" तसं कांहीं बोलली नाहीं. अन् ती कशी बोलेल ? अतिशय स्वाभिमानी आणि चतुर आहे ती. पण मला तसं थोडंसं वाटलं खरं. आजच्या एकंदर अनुभवावरून मला असं वाटलं कीं, आपण तिघांनीं–तूं, सुमा अन् मी–जर मनावर घेतलं, तर तिची प्रकृति सुधारणं अजूनही कांहीं फारसं कठीण नाहीं—"

" मग आपण जाऊं या का माथेरानला तिच्याबरोबर ? मी माझं यंदाचं वर्ष बुडवायला तयार आहें—"

" तूं जाऊं शकशील बाबू ;—पण मला इथून हलणं आतां शक्य नाहीं. अन् कुणाला ठाऊक ?—कदाचित् या महिना पंधरा दिवसांतच माझी स्वतंत्रता नाहींशी होईल—"

" कशावरून म्हणतोस तूं हें चंद्रा ? तुला प्रमिलाबाईकडून कांहीं सुगावा लागलाय का ? "

" नाहीं.—पण तें पत्र रावसाहेबांच्या हातीं गेल्यापासून मी असंच समजत आलोंय कीं, आपला एक पाय तुरुंगांत आहे. सध्यां माझं प्रत्येक पत्र फुटलं जातंय, प्रत्येक हालचाल टेहळली जातेय.—प्रमिलाबाईनीं आजच मला सांगितलं कीं, ब्रुईनसाहेबांनीं प्रो. राळ्यांना मुद्दाम भेटीला बोलावून माझ्या कॉलेजांतील उद्योगांची माहिती अन् त्यांचं स्वतःचं माझ्याविषयींचं मत काढून घेतलं त्यांच्यापासून.—माझ्याविरुद्ध पुरावा गोळा करण्याचं काम सध्यां जोरानं चालू आहे बाबू—"

" मग याच्यावर तोड काय आतां ? "

" तोड आहे. मुकाट्यानं तुरुंगांत जायला तयार होणं किंवा नाहींसं होणं—"

" नाहींसं होणं ?" केशवनें त्याच्या त्या उद्गारांचा बोध न होऊन भयसंमिश्र विस्मयानें विचारलें.

" होय, नाहींसं होणं.—वर्तमानपत्रांत आपण जाहिराती नाहीं का वाचीत नेहमीं माणसं हरवल्याच्या बाबू ?" चंद्रशेखरनें हंसून म्हटलें. " तीं माणसं कशीं हरवतात ? तसंच आपणही एक दिवस हरवून जायचं ! "

त्याचे ते उद्गार ऐकतांच केशवला आपलें मस्तक भ्रमूं लागल्यासारखें वाटलें.

## प्रकरण ३० वें

# हृदयांत दडवून ठेवलेला अनुराग

:o:

चंद्रशेखर बाहेर गेल्यावर ललितेनें आपला क्षीण हात सुमतीच्या गळयांत घातला; व अत्यंत प्रेमानें तिला म्हटलें, "सुमा, काय झालं ग ?—आज दिवस-भर तूं किती आनंदांत होतीस; अन् आतांच काय झालं तुझ्या डोळयांतून पाणी यायला ?"

तिचा तो प्रश्न ऐकतांच सुमतीच्या इतका वेळ आंवरून धरलेल्या दुःखाला वाचा फुटली; व तिला जोराचा हुंदका आला. पण ललितेला तिनें उत्तर मात्र कांहीं दिलें नाहीं. परंतु, त्या दुःखाचा मनावरील भार असह्य झाल्यामुळेंच कीं काय, "आई, अयाई ग" एवढा उद्गार मात्र तिच्या तोंडून बाहेर पडला. पण, त्या शब्दांच्या उच्चारांत दुःखाचा इतका तीव्र आवेग भरलेला होता कीं, तिच्या त्या मनस्तापाची कांहींच कल्पना नसलेल्या ललितेला अगदीं बावरल्यासारखें झालें. जवळ पास कुठें तरी अकस्मात् पाऊस पडावा, पण त्याची माहिती नसलेल्या लोकांना जसें नदीचें पाणी चढलेलें पाहून नवल वाटावें, तशी तिच्या मनाची अवस्था झाली. चंद्रशेखरप्रमाणें तिलाही क्षणैक अशी शंका आली कीं, केशवचें तें आल्यापासूनचें तुटक वर्तन आणि सुमतीच्या डोळयांतून गळणारे हे अश्रु यांचा कांहीं तरी संबंध असावा. पण, तो संबंध कोणत्या प्रकारचा असावा, याचा बोध मात्र तिच्या मनाला झाला नाहीं. आणि त्यामुळें तिला आपली शंका अप्रस्तुत वाटली. चौपाटीवर जो प्रकार घडला आणि ज्या प्रकारामुळें मन पस्ता-ऊन जाऊन सुमतीच्या डोळयांतून अश्रूंचे पूर लोटले, तशा तऱ्हेचा कांहीं प्रकार त्या उभयतांत घडला असेल, असा संशय तिला साहजिकच आला नाहीं. कारण, केशव आणि सुमति यांचे संबंध अलीकडे अधिकाधिक जिव्हाळयाचे होत चाल-ल्याचें जरी तिला प्रत्यहीं दिसत होतें, तरी त्या संबंधांनीं ही शेवटची मजल इतक्यांतच गांठली असेल, असें तिला कसें वाटावें ? केशव हा भावनावश पण निष्पाप आहे, व सुमति ही तर निष्पाप आणि पुन्हा विवेकीही आहे, अशी तिच्या मनाची पक्की खात्री. त्यामुळें तिला कोणत्याच प्रकारची भलतीच शंका आली नाहीं.

तथापि, एवढें मात्र तिला सारखें राहून राहून वाटे कीं, आज कांहीं तरी अगदीं चमत्कारिक प्रकार घडला असावा. एरवीं केशव इतका तुटक वागता ना आणि सुमतीच्या डोळ्यांतून इतका अश्रूंचा पूरही पण लोटता ना. पुष्कळदां असें होतें कीं, गोष्टी घडलेल्या दिसतात, त्यांचे संबंधही जाणवतात, पण त्यांच्यातला कार्यकारणभाव मात्र मनाला उलगडत नाहीं. तसेंच या बाबतींत ललितेचें झालें.

पण, सुमतीचे ते अश्रु, ते हुंदके आणि त्यांतून व्यक्त होणाऱ्या मनोवेदना तिला दिसत होत्या. त्यामुळें, अधिक विचार न करितां, ती थोडी तिच्या जवळ झाली; व तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन म्हणाली, "सुमा, मला सांग ना गडे काय झालं तें ? बाबू तर कांहीं बोलला नाहीं ना तुला ?— तो तसा अविचारी आहे थोडासा—"

तिच्या तोंडून ते शब्द बाहेर पडतांच सुमतीच्या अनुतप्त मनाला तीव्र वेदना झाल्या. अतिशय दुखावल्यामुळें अधु झालेल्या जागेला मायेच्या माणसानें न कळत स्पर्श करावा आणि त्या स्पर्शानें तें दुःख अधिकच चाळवावें, तशी तिच्या मनाची स्थिति झाली. ललिता अगदीं न कळत तिच्या दुःखाच्या–दुःखकारणाच्या जवळ गेली. इतकी जवळ गेली कीं, सुमतीला तिनें आपल्या दुःखावर बोट ठेवलें, असाच भास झाला. आणि, क्षणभर तिला असेंही वाटलें कीं, चौपाटीवर घडलेला सारा प्रकार ललितेला एकदां सांगून टाकावा. पण, लगेच तिच्या मनांत अशी कल्पना आली कीं, चंद्रशेखरवर असलेलें केशवचें उत्कट प्रेम जर तिला सहन होत नाहीं,—किंबहुना त्या प्रेमाची झळ लागूनच जर तिचें मन पोळल्यासारखें झालें आहे,—तर आपण हा आणखी एक प्रकार तिला सांगितला, तर तिच्या मनावर त्याचा काय परिणाम होईल ? केशवविषयीं तर तिचें मन उबगल्यासारखें झालेंच आहे; पण हा प्रकार कळल्यावर तिला आपलाही वीट येईल. आणि, तिच्या सध्यांच्या स्थितींत तरी तिला ही गोष्ट कळणें इष्ट नाहीं, असें सुमतीला वाटलें. आणखीही एक विचार तिच्या मनांत आला. तो असा कीं, मघाशीं जो प्रकार घडला, त्यांतला आपला भाग हा न कळत किंबहुना अनिच्छेनें घेतलेला होता. तेव्हां, जी गोष्ट आपल्या इच्छेविरुद्ध घडली, ती ललितेला सांगून आपण तिचें मन उगाच कशाला दुखवावें ?

वस्तुतः तिचा तो विचार आत्मवंचक होता. तिची इच्छा नसतांना केशवनें तिचें चुंबन घेतलें होतें, हें खरें. पण, त्यापासून तिला सुख झालें नव्हतें, असें मात्र नव्हे. परंतु, आपल्या जिव्हाळयाच्या मनुष्याला अप्रिय वाटेल असें एकादें कृत्य आपल्या हातून घडलें, व तें त्याच्यापासून आपल्याला लपवावयाचें असलें, म्हणजे अशा किती तरी आत्मवंचक कल्पना मनाला सुचूं लागतात !

पण, अशा तऱ्हेचे विचार तिच्या मनांत आले, तरी ललितेजवळ खोटें बोलण्याचा हिय्या मात्र तिला होईना. ललिता हें तिचें प्रेमसर्वस्व होतें;—जणुं कांहीं शरीराबाहेर संचार करणारा तो तिचा दुसरा आत्मा होता. चंद्रशेखर आणि केशव या दोघांच्याही विषयीं तिला एक प्रकारचें प्रबळ आकर्षण वाटत असे; व चंद्रशेखरविषयीं वाटणाऱ्या आकर्षणांत आदरयुक्त भीतीचा भाग बराच असल्यामुळें, तिला केशवचा सहवास हा त्यांतल्या त्यांत जास्त सुखावह वाटे. चंद्रशेखरचा तो उग्र आविर्भाव, त्याचें कठोर साहसी जीवन, आवेशपूर्ण व्याख्यानांत चटकन रूपांतर पावणारी त्याची भाषणपद्धति—या त्याच्या साऱ्या गोष्टींत एक प्रकारची आकर्षकता खचित होती. पण, त्या आकर्षकतेंत स्निग्धतेचा, मार्दवाचा भाग जवळ जवळ मुळींच नव्हता. त्यामुळें कल्पनातरंगांत स्वतः रमणारा आणि आपल्या काव्यमय भाषणांनीं इतरांनाही रमविणारा केशव तिला अधिक प्रिय वाटे. त्याच्या स्वभावांतील दोषांची—त्याचें मनोदौर्बल्य आणि मोहसुलभता यांची तिला पूर्ण जाणीव होती; व त्यामुळें तिला त्याच्याविषयीं आदर मात्र वाटावा तितका वाटत नसे. कॉलेजमध्यें जसजसा तिचा त्याच्याशीं जास्त संबंध येत गेला, तसतसे तिला त्याचे हे दोष जास्त जाणवत गेले. आणि, चंद्रशेखरच्या मानानें तो हिणकस आहे, अशी तिच्या मनाची खात्री पटली. ललिता त्या दोघांपेक्षांही तिला अधिक प्रिय होती. चंद्रशेखरप्रमाणें ललितेचा स्वभाव जसा तेजस्वी होता, तशीच केशवची काव्यात्मताही पण तिच्या ठिकाणीं वसत होती. आणि, आपल्या आवडत्या माणसावर उत्कटतेनें प्रेम करण्याच्या तिच्या वृत्तीमुळें सुमतीला तिच्या सहवासांत मातेचें निर्भर वात्सल्य आणि मैत्रिणीची समरस होण्याची तत्परता या दोहोंचाही अनुभव घ्यावयाला मिळत असे. ललितेपासून एकही गोष्ट आजपर्यंत तिनें लपविलेली नव्हती. पण, मघांशीं घडलेला प्रकार ललितेला आपण सांगितला, तर तिच्या प्रेमाला

कदाचित् कायमचें मुकण्याचा प्रसंग आपल्यावर येईल, या भीतीनें तिला आज प्रथमच तिची प्रतारणा करण्याचा मोह पडला.

परंतु, आपल्या आवडत्या मैत्रिणीची प्रतारणा करण्याची ती कल्पना मनांत येतांच, तिला स्वतःचा आणि त्याहीपेक्षां केशवचा मनस्वी राग आला. अविचाराचें कृत्य घडलें केशवच्या हातून; पण, त्याच्या त्या अविचाराचा विषय होण्याचा प्रसंग दुर्दैवानें आपल्यावर आल्यामुळें, ललितेशीं आज खोटें मात्र आपल्याला बोलावें लागणार!—ती स्थिति तिला दुःसह वाटली. आतांपर्यंत तिला अनुताप होत होता, तो मुख्यतः याच गोष्टीबद्दल कीं, ललिता अंथरुणावर खितपत पडलेली असतांना आपल्याकडून घडूं नये, तें अप्रशस्त वर्तन घडलें. परंतु, तें वर्तन तिला कळून तिचें मन आपल्याविषयीं कलुषित होऊं नये, म्हणून आतां आणखी तिच्याशीं खोटें बोलावें लागणार!

पण आपल्या लाडक्या ताईशीं खोटें बोलावयाचें? आणि तेंही ती मृत्युशय्येवर पडलेली दिसत असतांना? छे, छे, यापरता दुसरा अधमपणा तो कोणता? समजा, घडलेला सारा प्रकार आपण तिला सांगितला, त्या प्रकारांत आपल्याकडे कोणत्याही तऱ्हेचा दोष नाहीं, ही गोष्ट जर आपण तिला पटवून दिली तर?—तर ती आपल्यावर रागावण्याइतकी असमंजस खास नाहीं.

परंतु हाही विचार सुमतीला पटला नाहीं. ललिता असमंजस नाहीं, हें खरें. पण आजारामुळें तिचा स्वभाव किती हळवा, तिचें मन किती अधु झालें आहे? आणि, अशा स्थितींत आपण जर हा प्रकार तिला सांगितला, व जरी कदाचित् आपला त्यांत कांहीं दोष नसल्याबद्दल तिची खात्री पटली, तरी तिच्या मनाला यातना झाल्याशिवाय कशा राहतील?

आणि, त्या यातना जर तिला व्हावयाला नको असतील, तर घडलेला प्रकार तिच्यापासून लपविल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

हे सारे विरोधी विचार विद्युद्वेगानें तिच्या मनांत येऊन गेले; व आपले डोळे पुसून ती ललितेला म्हणाली, "ते बोलले नाहींत कांहीं.—पण आज कीं नाहीं अगदीं चमत्कारिक रीतीनं वागले ते माझ्याशीं, ताई.—मात्र तूं याबद्दल बोलूं नकोस त्यांच्याशीं कांहींसुद्धां." नंतर थोडें थांबून ललितेचे कृश हात आपल्या

हातांत घेत तिनें म्हटलें, "पण ताई तूं लवकर बरी हो गडे !—मला कीं नाहीं तुझ्याशिवाय कॉलेजांत जायचा आतां कंटाळा आला आहे अगदीं—"

"सुमा, तुला खरोखरीच वाटतं कां ग मी बरी होईन असं ?"

"असं कां भलतंच विचारतेस तूं, ताई ? इतके उपाय चालले आहेत अन् तूं बरी न व्हायला काय झालं ?—दिवाळी झाल्याबरोबर दादा तुला माथेरानला ठेवणार आहेत ना ?"

"कोणी पाह्यलंय दिवाळीपर्यंत काय होईल तें ?—सुमा, तुला सोडून मी कुठंही जाणार नाहीं.—मरण यायचं झालं, तर तें आपल्या आवडत्या माणसांत आलं पाहिजे. काकी वारली, त्या वेळीं आम्हीं कोणीसुद्धां जवळ नव्हतों. तसल्या त्या मरणाच्या कल्पनेनं सुद्धां माझ्या अंगावर शहारे येतात. आपल्या प्रेमाच्या माणसांच्या सान्निध्यांत ज्या वेळीं मृत्यु येतो, त्या वेळीं आशा मागें रेंगाळत नाहींत, ऋणानुबंधाचे धागे तुटल्यासारखे वाटत नाहींत आणि त्या मरणाला विश्रांतीचं—निद्रेचं मधुर स्वरूप येतं. सुमा, तुझ्या मांडीवर डोकं ठेवून, तुझ्या दृष्टीला दृष्टि भिडवून, तुझ्या हातांत हात देऊन मी जर मेलें, तर मला मरण आल्यासारखं वाटणार नाहीं;—झोंप लागल्यासारखीच वाटेल. मृत्यूची झांपड माझ्या डोळ्यांवर पडत असतांना, जर माझी दृष्टि तुझ्या दृष्टींत मिसळलेली असली, तर तान्हं बाळ जसं आईकडे बघत बघत डोळे मिटतं, तसं गोड मरण मला येईल. नाहीं नाहीं, सुमा, तुला सोडून मी कुठंही जाणार नाहीं—"

बोलतां बोलतां तिनें सुमतीचे हात घट्ट आपल्या हातांत धरिले.

"पण मी तरी कशी सोडीन ताई, तुला ? तूं कुठंही गेलीस तरी मी तुझ्या बरोबर येईन," सुमतीनें डोळ्यांत दाटलेले अश्रु आंवरीत म्हटलें. "पण ताई तूं मरणाविषयीं बोलूं नकोस अशी एकसारखी—"

"अग, जें इतक्या जवळ येऊन ठेपलंय, ज्याची सांवली माझ्या शरीरावर पडलेली उघड उघड दिसतेय, त्याच्याविषयीं जर बोलायचं नाहीं—"

पण, तिला त्या विषयावर अधिक बोलूं न देण्याच्या उद्देशानें सुमतीनें मध्येंच विचारलें, "चंद्रशेखर काय बोलत होते इतका वेळ ?—ताई, तुला कल्पना आहे का ते केवढ्या प्रसंगांत आहेत याची ?—मामा कालच सांगत होते आम्हांला—"

" काय सांगत होते मामा ? " ललितेनें सभय उत्कंठेनें विचारलें.

" चंद्रशेखर कांहीं फार दिवस मोकळे नाहीं रहात आतां—"

" खोटं नाहीं तें, सुमा. दादांचं न् बाबूचं कालच कांहीं तरी बोलणं झालं त्याबद्दल. काय झालं तें कळलं नाहीं मला. पण बाबू त्यांच्याशीं बोलून परत आला, तो अगदीं घाबरलेला दिसला. मी त्याला पुष्कळ विचारलं. पण कांहीं बोलला नाहीं तो. मला वाटतं, दादांना कांहीं तरी सुगावा लागलाय अन् म्हणून त्यांनीं बाबूला इषारा दिला असावा. खरंच सुमा, चंद्रशेखर जर पकडले गेले, तर त्यासारखं संकट नाहीं दुसरं आमच्यावर—"

" म्हणजे ? मी समजलें नाहीं तुझ्या बोलण्याचा अर्थ ? "

" ते पकडले गेले, कीं त्यांच्या मागोमाग बाबू बहुधा पकडला जाईल. अन् मला जी भीति वाटते ती याच गोष्टीची. सुमा, चंद्रशेखरांचं धैर्य इतकं विलक्षण आहे कीं, कसल्याही संकटांत, कोणत्याही प्रकारचा छळ झाला तरी, ते डगमगायचे नाहींत. तसं बाबूचं नाहीं. तो तोंडानं कांहींही बोलला, तरी कोणतंही संकट सोसण्याची धमक त्याच्या अंगीं नाहीं. त्यानं खरोखरी फक्त कविताच लिहाव्या. चंद्रशेखरांच्या नादीं लागण्यांत त्यानं चूक केली—"

" त्यांना स्वतःला या गोष्टी कळत नसतील का, ताई ? "

" कळतात. पण मोह आहे ना ? आकर्षक कल्पनांचा मोह कोणत्या विद्यार्थ्याला या वयांत सुटला आहे ? त्यांतून हा तर पराकाष्ठेचा भावनावश. चंद्रशेखरांचं ठीकच आहे. त्यांनीं जाणून बुजून हा आयुष्यक्रम पत्करला. आपल्या ध्येयाच्या पूर्ततेसाठीं ते जरूर तर स्वतःचा बळीसुद्धां देतील. आपल्यावर कोणतं संकट ओढवण्याचा संभव आहे, याची कल्पना काय त्यांना नसेल ? पण, जणुं कांहीं त्याची दरकारच नाहीं अशा भावनेनें, आयुष्यांतलीं सारीं सुखं, संसारांतले सारे मोह पायांखालीं तुडवीत, एक प्रकारच्या निर्धारानं आपल्या चळवळीचा प्रसार ते गेले सहा महिने करीत आहेत. क्रांति घडवून आणण्याची ज्यांची आकांक्षा आहे, त्यांच्या अंगीं मातेला दास्यमुक्त करण्यासाठीं स्वर्गांतून अमृतकुंभ हिरावून आणणाऱ्या गरुडाचं साहस पाहिजे !—नाहीं तर संपातीप्रमाणं लोळागोळा होऊन भूतळावर कुजत पडण्याची पाळी त्यांच्यावर यायची.

सुमा, बाबूचं असं होणार आहे,—धड वाङ्मयाची सेवा नाहीं, धड सोशॅलिस्टांची चळवळ नाहीं. साऱ्या प्रकारचं अपेश तेवढं पदरांत आणि पुढं निराशेंत पिचत सारं आयुष्य जायचं. मला वाईट वाटतं तें यामुळंच. काकीची, दादांची फार इच्छा कीं, त्यानं उत्तम लेखक व्हावं; 'प्रागतिका'ची जबाबदारी आपल्या शिरावर घ्यावी अन् आपल्या घराण्याचं सुधारणेचं आणि साहित्यसेवेचं व्रत पुढें चालवावं. पण काय बाबूची बुद्धि फिरली,—त्याला हा मार्ग चांगला वाटला. त्याच्यापेक्षां सुद्धां मला चंद्रशेखरांचा राग या बाबतींत जास्त येतो. हा किती दुबळ्या मनाचा आणि ठिसूळ स्वभावाचा आहे, हें त्यांना खचित समजत असलं पाहिजे. असल्या कातर दिलाच्या माणसाला आपला सहकारी म्हणून निवडण्यांत त्यांनीं त्याचा घात केला, स्वतःचाही घात केला. बाबूच्या स्नेहाचा हा पाश त्यांना कधीं तारक होणार नाहीं; झाला तर मारकच होईल. आपल्या मनाच्या स्वाभाविक प्रवृत्ति ज्या कामाला अनुकूल नसतात, त्या कामीं जर त्या जबरदस्तीनं राबविण्याचा प्रयत्न केला, तर त्या केव्हां ना केव्हां तरी उधळल्याशिवाय रहात नाहींत. मला कधीं कधीं असं वाटतं कीं, चंद्रशेखरांचं हें बाबूवरलं प्रेम म्हणजे आमच्या घराला एक शापच आहे—"

बोलतां बोलतां आवेशाच्या भरांत तिनें आपल्या पायांवरील पांघरूण बाजूला सारलें; व इतका वेळ घेतलेला लोडाचा आधार सोडून, ती एकदम उठून बसली.

"हें काय विचित्र बोलतेस तूं, ताई?" तिचा तो आवेश पाहून किंचित् घाबरलेल्या सुमतीनें विचारलें. "मला वाटलं होतं चंद्रशेखरांविषयींची तुझ्या मनांतली तेढ नाहींशी झाली. पण—"

"ही तेढ नव्हे, सुमा; तूं चुकतेस," ललिता तिला पुरतें बोलूं न देतांच उद्गारली. "एका काळीं त्यांच्याविषयीं मला खरोखरीच तेढ वाटत असे. मला असं वाटे कीं, बाबूला त्यांनीं माझ्यापासून हिरावून घेतला. पण, गेल्या सहा महिन्यांत बाबू जसजसा माझ्या मनांतून उतरत गेला, तसतसे ते माझ्या मनांत अधिकाधिक भरत गेले. सुमा, इतके दिवस कधीं कुणाला न सांगितलेली गोष्ट—माझ्या हृदयाच्या अगदीं आंतल्या कप्प्यांत दडवून ठेवलेलं गुपित मी आज तुला सांगत आहें. चंद्रशेखरांविषयीं मला अलीकडे विलक्षण प्रेम वाटतं. त्यांचीं मतं मला पसंत नाहींत, त्यांचा अन् बाबूचा स्नेह मला रुचत नाहीं, पण त्यांच्या-

विषयीं मात्र मला अतिशय प्रेम वाटतं. बाबूविषयीं ज्या प्रकारचं प्रेम मला अजूनही वाटतं, त्या प्रकारचं प्रेम मात्र हें नव्हे. गेल्या हिंवाळ्यापासून मी पहातें आहे, त्यांच्याविषयींचा माझा आदर सारखा कारणाकारणांनीं वाढत गेला अन् त्या आदरांतून हें प्रेम हळुहळू उत्पन्न झालं. मी आजारी पडेपर्यंत मला माझ्या मनांत उत्पन्न झालेल्या या नवीन भावनेची कल्पना नव्हती. पण, मी आजारी पडलें, आणि तेव्हांपासून असा एकही दिवस गेला नसेल कीं, ज्या दिवशीं चंद्रशेखर आपल्याला येऊन भेटावे, असें मला वाटलं नाहीं. माझ्या मनांत घडून आलेल्या या स्थित्यंतराचा मी किती तरी वेळां विचार केला. रात्रीच्या रात्री मी विचारांत तळमळत घालविल्या आहेत. कधीं कधीं मला असं वाटे कीं, बाबू माझ्या मनांतून उतरला, म्हणून चंद्रशेखर मला आवडूं लागले. पण तें खरं नव्हे. बाबूविषयीं माझ्या मनांत अजूनही पूर्वी इतकंच प्रेम आहे. त्याचा मला केव्हां केव्हां राग येतो; त्याचं तें तुटक वागणं मला अलीकडे अगदीं दुःसह होतं;—तरीसुद्धां मला त्याच्याविषयीं पूर्वीइतकंच प्रेम वाटतं. आणि, हें लक्षांत आलं, म्हणजे माझं मलाच माझ्या मनांतल्या या स्थित्यंतराचं कोडं उलगडत नाहीं. मी तापानं आजारी पडलें, तेव्हां चंद्रशेखर आपलीं सारीं कामं सोडून आमच्याकडे येऊन राहिले होते; अन् हें दुखणं माझ्या मागं कायमचं लागल्यापासून तर ते मला भेटायला वारंवार येतात. पण त्यामुळं मला ते अधिक आवडतात असं मी कसं म्हणूं?—ते कितीही येत असले अन् बोलत असले, तरी तुझ्यापेक्षां कमी—किती तरी कमी. मला खरोखरीच कळत नाहीं, सुमा, त्यांच्याविषयीं माझ्या मनांत इतकं प्रेम कां उत्पन्न व्हावं. कदाचित्, तूं नेहमीं म्हणतेस त्याप्रमाणं, त्यांच्या गुणांनीं मोहित केलं असेल मला. पण त्यांच्याविषयीं मला कितीही प्रेम वाटत असलं, तरी बाबूचा अन् त्यांचा स्नेह मात्र मला इष्ट वाटत नाहीं. बाबू जर करारी अन् कर्तव्यनिष्ठ असता, तर त्यांच्या स्नेहाचा खेद नसता वाटला मला.—पण बाबूचं मन चंचल अन् दुर्बळ.—आणि, चंद्रशेखरांनीं तर त्याला अशा मार्गाला लावला आहे कीं, त्या मार्गांत मनाच्या निर्धाराशिवाय पाऊल टिकणं कठीण.—मला हें सारं भवितव्य पहिल्यापासून दिसतंय. अन् कुणाला ठाऊक, चंद्रशेखर पकडले गेल्यावर पुढं कोणत्या दुःखाचं ताट वाढून ठेवलंय तें—"

तिनें आपलें तोंड एकदम दोन्ही हातांनीं झांकून घेतलें; व तिच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या.

तिची ती क्षुब्ध स्थिति पाहून सुमति गांगरून गेली. हुंदके देतांना तिचें अंग इतकें कांपत होतें कीं, ती तोल जाऊन मागें लोडावर पडेल कीं काय, अशी भीति सुमतीला एकसारखी वाटत होती. पांघरूण बाजूला सारल्यामुळें तिचीं रक्तहीन झालेलीं पांढरीं फटक कृश पाउलें उघडीं पडलीं होतीं; व आपल्या गळ्याभोंवतालचा मफलर तिनें सोडून दिल्यामुळें, खिडकींतून भणभणत आंत येणारा गार वारा तिच्या डोक्याला लागत होता. सुमतीला क्षणोक्षणीं वाटे, हा वारा हिला बाधला तर? परंतु तिची ती आविष्ट स्थिति पाहून, तिला कांहीं सांगण्याचाही पण धीर सुमतीच्या मनाला होईना. अंथरुणाला खिळल्यापासून ललितेचें बोलणें जवळ जवळ सर्व कमी झालें होतें. जणुं कांहीं, ज्या गूढ मनोवेदनांमुळें तिचें मन गेलें वर्ष दीड वर्ष सतत पिचत होतें, त्या मनोवेदनांविषयीं विचार करण्यांतच आपल्या आयुष्याचे उरलेले दिवस घालवावे, अशी तिची भावना झाली होती. तिच्या त्या मुग्धतेचें सुमतीला नवल वाटत नसे. पण, तिला एवढें मात्र वाटे कीं, आंतल्या आंत कुढत राहिल्यामुळें ललितेचें दुखणें दिवसेंदिवस विकोपाला जात आहे; व म्हणून ती तिला बोलावयाला लावण्याचा प्रयत्न पुष्कळदां करीत असे. आज जेव्हां ललिता आपण होऊन मनमोकळेपणानें बोलूं लागली, तेव्हां तिला आश्चर्य वाटलें आणि आनंदही झाला. विशेषतः, मनाच्या ज्या त्रस्त स्थितींत ती स्वतः तिथें आली होती, त्या स्थितीचा विसर पडण्यासारखें ललितेच्या तोंडून आपल्याला कांहीं ऐकावयाला मिळेल, अशी तिची मुळींच अपेक्षा नव्हती. त्यामुळें ललितेचें तें दिलखुलास भाषण ऐकून तिला सुरवातीला तरी समाधान वाटलें.

पण, तिचें तें समाधान फार वेळ टिकलें नाहीं. बोलण्याच्या भरांत ललिता जसजशी क्षुब्ध होत गेली, तसतसें सुमतीला तिच्या त्या बोलण्याचें भय वाटूं लागलें. तिचा तो आवेश, तो मनःक्षोभ आणि डोळ्यांना लागलेल्या त्या अश्रूंच्या धारा,—या साऱ्या गोष्टींचा परिणाम ललितेच्या प्रकृतीवर काय होईल, असा विचार एकसारखा तिच्या मनांत येत होता. पण, पोहण्याच्या

नादांत मनुष्य एकदां प्रवाहाच्या धारेंत सांपडला, म्हणजे त्याला जसें त्या धारेबरोबर वहात जाणें प्राप्त होतें, तसें सुमतीचें झालें. ललितेचें बोलणें थांबविणें, हें आतां तिच्या हातीं उरलें नव्हतें; व तिनें बोलूं नये असें जरी तिला एका अर्थानें सारखें वाटत होतें, तरी तिच्या मनांतले कधीं ऐकावयाला न मिळणारे विचार ऐकण्याची संधि आज अवचित लाभल्यामुळें, त्या बोलण्याचा मोहही तिला सोडवत नव्हता. आणि, मनाच्या तशा त्या दोलाचल स्थितींत ललितेचें सांत्वन करण्याच्या बुद्धीनें ती म्हणाली, " ताई, तुझ्या मनानं कीं नाहीं उगाच भलतीच दहशत घेतली आहे कांहीं तरी ! चंद्रशेखरांचा व बाबुरावांचा जरी स्नेह असला, तरी चंद्रशेखरांबरोबर त्यांनीं कधीं व्याख्यानं दिलेलीं नाहींत, कधीं त्यांच्या क्लबाच्या सभांना ते हजर रहात नाहींत, कधीं कुठल्या पत्रकावर त्यांचं नांव नसतं अन् पोलीस पकडणार कोणत्या पुराव्याच्या जोरावर त्यांना ?—"

" पुरावा एकच अन् तो म्हणजे सतत चंद्रशेखरांच्या सहवासांत असणं. तुला कल्पना नाहीं सुमा, दादा अलीकडे किती सचिंत असतात ते. मला कधीं आठवत नाहीं, आजपर्यंत ते आमच्या अभ्यासाच्या खोलींत आलेले. पण परवां रात्रीं—काय त्यांच्या मनांत आलं कोण जाणे !—ते अकस्मात् बाबूच्या खोलींत गेले व त्यांनीं तिथलं एकूण एक पुस्तक पाहिलं; अन् " तुझ्या टेबलांत काय लेख, कविता वगैरे असतील, तें दाखव सारं एकदां मला, " म्हणून बजावलं त्यांनीं आणखी. अलीकडे त्यांची बाबूच्या साऱ्या हालचालींवर नजर असते; अन् त्यांचं स्वतःचंही चित्त आतांशा स्थिर नाहीं. रात्रीं अपरात्रीं चंद्रशेखर येतात अन् त्याला बरोबर घेऊन जातात.—मला पुष्कळदां वाटतं, बाबूला आ-पण कांहीं तरी सांगावं. पण त्याला असं वाटायचं ही उगाच आपल्या मैत्रीच्या न् देशभक्तीच्या आड येते. मला थोडी जरी त्याच्या खंबीरपणाविषयीं खात्री असती, तरी मला इतकी भीति वाटती ना सुमा—"

तें वाक्य तिनें उच्चारलें आणि मागें असलेल्या लोडावर आपलें अंग टाकलें. पुष्कळ दिवस अंगांत राहिलेला ताप उतरल्यावर जसा शरीराचा शक्तिपात होतो, तसेच पुष्कळ दिवस मनांत सांचलेले दुःखदायक विचार बोलून टाकल्यावर मनाला विलक्षण श्रांतता येते. तसें या वेळीं ललितेचें झालें. तिनें लोडावर मस्तक

टेंकतांच, सुमतीनें जवळ होऊन तिचें तें क्षीण आणि श्रांत झालेलें शरीर हळुहळू आपल्या मांडीवर घेतलें; व तिच्या अंगावरून हात फिरवावयाला सुरवात केली. तिच्या त्या प्रेमळ स्पर्शामुळें म्हणा किंवा मनांत फार काळ घोळत असलेल्या दुःखद गोष्टी बोलून टाकल्यावर साहाजिकच कोसळणारें रडें न आंवरल्यामुळें म्हणा, ललिता सारखे हुंदके देत होती. आणि, प्रत्येक हुंदक्यागणिक तिचें शरीर इतक्या जोरानें हादरत होतें कीं, तिच्या हृदयाला ज्या वेदना या वेळीं होत होत्या, त्या जणुं तिचें शरीर दुभंगून बाहेर पडण्यासाठीं धडपडत आहेत, असें वाटे.

कांहीं वेळ त्या दोघी अगदीं स्तब्ध होत्या. हळुहळू ललितेचा मनःक्षोभ कमी झाला. ती उठून बसली. तोंडावर आलेले केंस तिनें मागें सारले; व बोलण्याचें त्राण अंगांत न उरल्यामुळेंच कीं काय, तिनें सुमतीचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन भावपूर्ण दृष्टीनें तिच्याकडे पाहिलें.

तिची दृष्टभेट होतांच सुमतीला बरें वाटलें. कारण त्या दृष्टींत आतां मनस्तापाची तीव्रता फारशी उरलेली नव्हती. त्यामुळें, जो प्रश्न ललितेला विचारावा असें तिला मघांचपासून एकसारखें वाटत होतें, पण जो विचारण्याचा धीर तिला इतका वेळ झाला नाहीं, तो प्रश्न विचारण्याची तिची इच्छा अनावर झाली. आणि, ललितेच्या मुद्रेवरील आपली नजर काढून घेऊन, तिच्या पायांवरील पांघरूण नीट करण्याच्या निमित्तानें खालीं पहात, सुमति म्हणाली—

"ताई, मी एक प्रश्न विचारूं का तुला?"

"विचार ना. तुझ्यापासून आतां कांहींही लपवून ठेवायचं नाहीं मला."

"चंद्रशेखरांवर जर तुझं इतकं प्रेम आहे, तर त्यांच्याशीं सहकार्य करायचं तूं कां नाकारलंस?"

"मला त्यांचीं मतं पटत नाहींत म्हणून—"

इतकें बोलून ललिता थोडा वेळ थांबली. आणि, एकदम न बोलून दाखविण्यासारखा नाजूक भाव मनांत उद्‌भूत झाला असतां मनुष्य ज्या प्रकारच्या संकोचानें घुटमळतो, तशा तऱ्हेनें प्रथम किंचित् घुटमळून नंतर तिनें एक प्रकारच्या निश्चयानें म्हटलें,—

"शिवाय आणखीही एक कारण आहे, सुमा—"

"कोणतं?"

सुमतीच्या त्या प्रश्नाबरोबर अश्रुमोचनामुळें श्रांत झालेल्या ललितेच्या नेत्रांत विलक्षण चमक खेळली; व तिनें सुमतीकडे स्थिर दृष्टीनें पहात अगदीं गंभीरपणानें म्हटलें, "त्यांच्या मनांतल्या माझ्याविषयींच्या भावना मी ओळखतें.—सुमा, त्यांच्या मार्गांतला मोह होऊन बसण्याची मला इच्छा नाहीं."

तिचें तें उत्तर ऐकून अनुतप्त सुमतीनें शरमेनें मान खालीं घातली.

---

## प्रकरण ३१ वें

# मध्यरात्रीं आणलेली बातमी



"काय रावसाहेब, आज इथंच वास्तव्य करण्याचा विचार दिसतोय आपला?" शास्त्रीबुवांनीं मिशा उपरण्यानें पुशीत विचारलें; व मेजावरील पारव्या कांचपात्रांत ठेवलेल्या पिस्त्यांचा एक बोकणा मुखशुद्धीदाखल तोंडांत भरला.

"वास्तव्य करण्याचा नाहीं, पण भोजनाचा मात्र आहे खरा—"

"कांहीं चलच्चित्रदर्शनचिंतनिका चालू आहे वाटतं? प्रो. राळ्यांचा आपल्या मंडळीवर रोष झाल्यापासून पुष्कळ दिवस आम्हांलाही योग आला नाहीं चलच्चित्रं पहाण्याचा. तेव्हां म्हटलं तसा कांहीं प्रत्यवाय नसेल, तर आम्हींसुद्धां आपल्या समवेत येऊं. प्रेमाबाई येणारच असतील बहुतेक!—काय बबनराव, तूं चलशील कीं नाहीं?"

"न चलायला काय झालं?—रावसाहेब नेत असले, तर आपली कांहीं हरकत नाहीं बुवा!" बबनराव विड्याच्या पानाच्या शिरा काढीत म्हणाले. "पण रावसाहेब खरोखरीच जाणार आहेत का सिनेमाला? सध्यांच्या या संपांच्या वगैरे धांदलीमुळं त्यांना वेळ कुठं आहे, शास्त्रीबुवा?"

"खरंच नाहीं, बबनराव.—मला असं झालंय, केव्हां एकदां हें जादा ड्यूटीचं सुदर्शन माझ्या मागून सुटतंय! चांगला पेन्शन खात स्वस्थ बसलों

होतों.—पण तो ब्रुईनसाहेब आहे ना! त्याच्या लोभानं पुन्हा या पाशांत गुंतवलं मला! आज मी फक्त जेवणापुरता इथं आहे—"

ते आणखी कांहीं बोलणार, तोंच प्रमिला दिवाणखान्यांत आली. तिच्या हातांतील ट्रेमध्यें निरनिराळ्या फळांच्या फोडीनीं भरलेल्या बशा होत्या. आंत येतांच तिचें लक्ष बबनरावांच्या हातांतील पानाकडे जाऊन, तिनें त्यांना हंसत हंसत म्हटलें, " वा वा बबनराव, इतक्या लवकर पान हातांत घ्यायला सांगितलं कुणी तुम्हांला ?—आज मला आमच्या सिस्टरकडून डाली आली आहे.—तिचा कांहीं थोडा समाचार घ्याल कीं नाहीं ? "

" आपल्याला तर अगदीं अशक्य आहे बुवा आतां ! मुखशुद्धीसाठीं म्हणून इतक्यांतच मी हीं शुष्क फळं सेवन केलीं—"

" मग पुन्हा नाहीं कां सेवन करतां येत तीं, शास्त्रीबुवा ? अन् तीं शुष्क फळं होतीं. हीं फळं पहा किती सरस, किती रसरशीत आहेत तीं ! ताज्या फळांच्या सेवनानं रक्तवृद्धि होते, असं तुम्हीच म्हणत असतां ना नेहमीं ?" प्रमिलेनें त्यांच्यापुढें बशी ठेवीत म्हटलें.

आणि, ती पुढें कांहीं बोलणार, तोंच रावसाहेब तिला म्हणाले, " प्रेमा, मी आज इथंच जेवणार आहे बरं का ?"

" छे, छे, रावसाहेब या फलाहारानंतर आतां भोजनाची काय आवश्यकता आहे ? बाकी आपल्यासारख्याची न् आमची तुलना नाहीं होऊं शकत या बाबतींत—"

" खरंच नाहीं होऊं शकत, शास्त्रीबुवा. मी तुमच्यापेक्षां वयस्क, पेन्शनांत निघालेला, संसारविमुख मनुष्य.—अहो, आमच्या सारख्यांनीं मिताहारी असणंच आतां योग्य," रावसाहेब बशींतील एक फोड तोंडांत टाकीत म्हणाले.

" पण आपण पक्वकेश असलां तरी उद्योगशील किती आहां ! पुन्हा ब्रुईनसाहेबांबरोबर मृगयाकर्म सदोदित चालू असतंच. खरोखरी, रावसाहेब, आपली ही कृष्णवर्ण, उदग्र मूर्ति पाहिली, म्हणजे आमचे स्वराज्यांतले योद्धे कसे असतील याची कल्पना येते मनाला—"

" अहो, कल्पना कशाला ? आमचा ब्रुईनसाहेब नेहमीं म्हणतो मला, 'राव-साहेब, तूं या सी. आय्. डी. ऐवजीं लष्करांत जायला हवं होतंस !'—दहा वर्षांपूर्वी

कांहीं कामासाठीं आमचा मुक्काम एकदां पन्हाळ्याला होता. त्या मुक्कामांत ब्रुईनसाहेबाची गोळी लागून चवताळलेली वाघीण उलटून अंगावर आली; न् बरोबरच्या मंडळीची कोण धांदल! पण मी तिची झेंप अंगावर घेऊन नुसत्या पट्टयानं कापून काढली तिला.-महाराज चकित झाले हा सारा प्रकार ऐकून अन् तिथल्या तिथं ब्रुईनसाहेबाजवळ मागणी केली त्यांनीं माझी.—खरोखरी शास्त्रीबुवा, आज जर मराठशाही असती, तर आम्ही सरंजामदार होऊन बसलों असतों स्वराज्यांतले. बळवंतरावजी म्हणत असत तें कांहीं खोटं नव्हे!—या इंग्रजी राज्यामुळं आमचं सारं कर्तृत्व वाव न उरून अगदीं खुरटून गेलं आहे—"

"रावसाहेब, आपल्या सारख्या सेवावृत्तींत सर्व आयुष्य कंठिलेल्या आणि मानमान्यता पावलेल्या बड्या अंमलदाराला जर असं वाटतं, तर आमची काय कथा?" शास्त्रीबुवा आपल्या पुढल्या बशींत उरलेली शेवटची फोड तोंडांत टाकीत म्हणाले. "अहो, आयुर्वेदाला राजाश्रय नाहीं म्हणून—"

"शास्त्रीबुवा, आणखी किती वेळ बसणार आहांत तुम्ही इथं? मला तर बुवा एकदां आमच्या कचेरींत गेलंच पाहिजे. तुम्ही बसत असलां, तर बसा. रावसाहेब आहेत, प्रेमाबाई आहेत; गप्पांना छान रंग येईल!" बबनराव मध्येंच म्हणाले. त्यांच्या पुढची बशी केव्हांच रिकामी होऊन ते या वेळीं तंबाकूची भुकटी चोळीत होते. रावसाहेबांचें स्वराज्य आणि शास्त्रीबुवांचा आयुर्वेद या दोहोंचाही त्यांना कंटाळा आला होता; व शास्त्रीबुवांना घेऊन शक्य तर 'प्रागतिक' कचेरींत जावें, या हेतूनें त्यांनीं तो प्रश्न विचारला होता. पण, गुराख्यानें, पुढें चलण्याचा इशारा देण्यासाठीं म्हणून, पाठीवर मारलेला काठीचा फटकारा लक्षांत न घेतां, ओढाळ गुरूं ज्याप्रमाणें तोंडांत घेतलेली हरळी संथ-पणानें चघळीत उभें रहातें, त्याप्रमाणें शास्त्रीबुवा तोंडांत टाकलेल्या त्या फोडीचें रवंथ करित प्रमिलेकडे साभिप्राय पहात स्वस्थ बसले होते. त्यांच्या त्या वर्तनाचा अर्थ ओळखून बबनराव म्हणाले, "मग बसतां आहां कां शास्त्रीबुवा तुम्ही इथं? माझा कांहीं चलण्याचा आग्रह नाहीं बरं का तुम्हांला—"

"वा बबनराव, फारच धांदल चालवली आहे तुम्ही निघण्याची! तरी बरं आज कांहीं पेपरचा दिवस नाहीं तुमच्या," प्रमिलेनें म्हटलें. शास्त्रीबुवांची तिथून जाण्याची इच्छा नाहीं, हें तिला उघड उघड दिसत होतें. पण, त्यांना

जेवावयाला रहा म्हटलेलें रावसाहेबांना या वेळीं कितपत आवडेल, याची तिला शंका होती; व ते राहिल्यास रावसाहेबांशीं आपल्याला कांहीं अधिक आगळें बोलतां येणार नाहीं, याही दृष्टीनें तिला त्यांना रहाण्याचा आग्रह करण्याची इच्छा होईना. म्हणून, अर्धवट थट्टेच्या सुरांत तिनें त्यांना म्हटलें, " शास्त्री-बुवांना घेऊन सिनेमाला जायचा बेत दिसतोय तुमचा, बबनराव. मीसुद्धां आलें असतें तुमच्याबरोबर.–पण रावसाहेब जेवायचे आहेत अन् मला आज बरंही नाहीं वाटत अगदीं. तरीच मघांशीं सिनेमाबद्दल गोष्टी चालल्या होत्या तुमच्या—"

तिच्या त्या उद्गारांचें आणि त्याहीपेक्षां रावसाहेबांनीं अवलंबिलेल्या मौनाचें मर्म शास्त्रीबुवांनीं ओळखलें; व त्यांना मनांतून रावसाहेबांचा अतिशय राग आला. तथापि, तो राग व्यक्त न करितां ते हातांतील तपकिरीची डबी त्यांच्यापुढें करून हंसत हंसत म्हणाले, " कां उगाच परिहास करतां आमचा प्रेमाबाई ?—तीं चलच्चित्रं, त्या रहःस्थली, ते जुहूवरले कौमुदीमहोत्सव,—या साऱ्या गोष्टी आपल्यासारख्या भाग्यशाली भामिनींसाठीं आहेत. आमचा सारा जन्म खल घोटण्यांत् न् पुड्या बांधण्यांत जायचा. चला बबनराव !—राव-साहेबांच्या मनांत कांहीं तरी विशेष राजकारण घोळतंय आज. एरवीं त्यांनीं मौन धारण केलं नसतं असं—"

ते उपरणें झटकून उठले. रावसाहेबांनीं त्यांच्या डबींतील तपकिरीची चिमूट मुकाट्यानें नाकांत कोंबली; व शिंक येत असल्याचा बहाणा करून त्यांच्याशीं बोलण्याचा प्रसंग टाळला. ते एक हात, दिव्याचा प्रकाश टाळण्यासाठीं, कपाळा-वर अधर धरून, तर्जनीनें आपल्या उजव्या नाकपुडीवर ईषत्प्रहार करीत होते. पण, त्या दोघांना पोंचवून प्रमिला परत आली, तरीसुद्धां रावसाहेबांना शिंक निघण्याचें कांहीं लक्षण दिसेना; व आतां ती काढण्याची विशेष गरजही उरलेली नव्हती. म्हणून, नाक एकवार जोरानें दरदरां हलवून, स्वतःकडे पहात टेबलाजवळ उभ्या असलेल्या प्रमिलेला ते म्हणाले, "काय करावं प्रेमा ? पावसाळा सरत आला तरी ही सर्दी कांहीं सोडीत नाहीं मला ! म्हातारपण आल्यासारखं जें अलीकडे केव्हां केव्हां मला वाटतं, तें ऋतुमानाप्रमाणं होणाऱ्या असल्या या उपद्रवामुळंच. नाहीं तर, थंडीच्या ऐन कडाक्यांतसुद्धां माझं पहांटे पांच वाजतांचं स्नान,

पार्थिवपूजन न् ध्यान कधीं चुकलं नाहीं. पण कधीं शिंक येत नसे चुकून ! अन् आतां हा त्रास अगदीं नित्याचा होऊन बसलाय. आणि घसासुद्धां असा सारखा खवखवतोय"—रावसाहेबांनीं, खोकल्याची अगदीं जोराची उबळ यावी त्याप्रमाणें अंग हलवून, खोकला काढावयाला सुरवात केली.

त्यांना एकाएकीं झालेल्या त्या सर्दीचें रहस्य प्रमिलेनें ओळखलें. पण, आपल्याला त्यांचा तो सारा आविर्भाव खराच वाटला असें भासवून ती म्हणाली, "मग वाफारा घेतां का थोडा वेळ ? नाहीं तरी जेवायला अजून अवकाश आहे थोडासा. तोंपर्यंत वाफारा घेतला म्हणजे घसा मोकळा होईल अन् सर्दीचाही जोर थोडा कमी होईल—"

"नको, नको;—वाफाऱ्याची कांहीं गरज नाहीं. प्रेमा, तूं बैस जरा इथं. मला तुला कांही विचारायचय—"

"आलेंच मी जरा आंत जाऊन. कुठपर्यंत आलंय, तें बघून येतें एकदां. पण कपडे नाहीं का काढायचे, रावसाहेब ? आणखी पंधरा मिनिटांनीं तयारी होईल सारी—"

"बन्यान आणि शर्ट असूं दे तसाच. पण हा फेटा न् कोट घे," रावसाहेबांनीं कपडे काढून तिच्याजवळ देत म्हटलें.

ते कपडे घेऊन दिवाणखान्यांतून आंतल्या खोलींत पाऊल टाकतांच, प्रमिलेला रावसाहेबांचा कोट तपासून पहाण्याची, आजपर्यंत सहसा कधीं न झालेली, इच्छा आज अकस्मात् झाली; व त्या खोलींत असलेल्या स्टँडला अडकवण्यापूर्वी तिनें घाईघाईनें तो चांचपून पाहिला. त्याबरोबर, त्या कोटाच्या आंतल्या मोठ्या खिशांतील रिव्हॉल्वरच्या आड कसलें तरी जाड लांब पाकीट आहे, असें तिला दिसलें. तो लिफाफा, त्यावरील सरकारी छाप दृष्टीस पडतांच, उघडून पहावा, अशी विलक्षण इच्छा तिला झाली; त्या लिफाफयाचा आणि रावसाहेबांच्या आजच्या इथें रहाण्याचा कांहीं तरी संबंध—कार्यकारणसंबंध असावा, असा प्रबळ संशय तिच्या मनांत आला; व तिनें तो लिफाफा बाहेर काढण्यासाठीं खिशांत हात घातला.

तोंच एकदम दार वाजलें.

त्याबरोबर, रावसाहेब मागें येऊन उभे राहिले असावे, अशा कल्पनेनें प्रमिला इतकी घाबरली कीं, तिच्या अंगाला दरदरून घाम आला; व कोणत्या बाजूचें दार वाजलें हें पहाण्याचेंही भान तिला उरलें नाहीं. आणि, तिनें प्रसंगावधान राखून जर कोट हातांत घट्ट धरून ठेवला नसता, तर तो खालीं पडून त्यांतील रिव्हॉल्वरचा आवाज होतांच, आतांपर्यंत आंत न आलेले रावसाहेब कदाचित् खरोखरीच आंत आले असते. भीतीचा तो आवेग आंवरून ती दाराकडे पहाण्याचा प्रयत्न करणार, तोंच तिची ती सभय हालचाल, उंबरठ्यापाशीं उभें राहून, विस्मयानें पहात असलेल्या स्वयंपाकिणीनें तिला म्हटलें, "रस्सा तयार होत आलाय.—तुम्ही पहातांना एकदां स्वतः ताई ?—"

तिचे ते अदबीचे शब्द कानांवर पडतांच, प्रमिलेला आपल्या लटक्या पडत चाललेल्या शरीरांत जणुं कांहीं पुन्हा चैतन्याचा संचार झाल्यासारखा वाटला; व तिनें आनंदून म्हटलें, " किती मोठ्यानं दार वाजवलंस, मंजुळा ! —रावसाहेबांचं पिस्तुल पहात होतें मी सहज.—घाबरून गेलें अगदीं ! काय म्हणालीस ?—रस्सा तयार झालाय ? मसाला न् त्या फोडी न् तें सारं कांहीं नीट मिळून आलंय ना ? तूं चल.—मी आलेंच, हे कपडे ठेवून कसा काय झालाय तो पाह्यला—"

ती गेल्याबरोबर प्रमिलेनें पुन्हा एकदां आपल्या हातांतल्या त्या कोटाकडे पाहिलें. तिला वाटलें, तो लिफाफा उघडून त्यांत काय आहे तें पहावें. आणि तिनें खिशांत हात घातलाही. तोंच तिच्या मनांत शंका आली कीं, रावसाहेब जर या वेळीं आंत आले तर ?—छे, ते जेवायला बसल्यावर सावकाशपणानें पहातां येईल तो लिफाफा !

ती कल्पना मनांत येतांच तिनें तो डगला स्टँडला अडकविला; व ती आंत गेली.

आणि, तिला आलेली ती शंका खरी ठरली. दिवाणखान्यांत एकट्यानें बसण्याचा कंटाळा आल्यामुळें म्हणा किंवा तिला बाहेर यावयाला उशीर लागल्यामुळें म्हणा, रावसाहेब तिच्या मागोमागच आंत आले. ती या वेळीं पाटावर पाठमोरी बसून भजीं तळीत होती. शेगडींतील रसरसलेल्या निखाऱ्यांची धग व

कढईतील तापलेल्या तेलाचा धूर लागून तिचें तोंड अतिशय लाल झालें होतें. आणि, मानेवरील नाजूक रेषांवर एकाद दुसरा स्वेदबिंदूही चमकत होता. झाऱ्यानें तेल चाळविण्यांत गुंतलेल्या तिच्या हातांतील मोत्यांच्या बांगड्या सारख्या वर-खालीं होत होत्या; व हातांबरोबर मनालाही चाळा असावा म्हणूनच कीं काय, ती तोंडानें अस्पष्टमधुर असें कांहींतरी गुणगुणत होती. तिची ती मनोहर लगबग पाहून रावसाहेब कौतुकानें उद्गारले, "कशाला करत्येस बेटा तूं हीं बोंडं आज? मघाशीं एवढं फराळाचं झालं अन् लगेच आतां चमचमीत जेवण.—तुम्हां मुलींना आपल्या वडील माणसांच्या तब्बेतीला कसं जपावं, हें मुळींच कळत नाहीं!—"

त्यांचे ते उद्गार कानांवर पडतांच प्रमिला इतकी दचकली कीं, तिच्या हातां-तील, कढईतून बाहेर काढलेला, झारा खालीं पडून, त्यावरील एक कढत भजें तिच्या पायावर पडलें. पण, पाटावर ठेवलेल्या स्वच्छ टुवालानें पोळलेला पाय झटकन पुसून, आपली ती भयसंत्रस्त स्थिति रावसाहेबांच्या लक्षांत येऊं नये या हेतूनें, तिनें मागे वळून न बघतांच त्यांना म्हटलें, "आपण कशाला आलांत इथं, रावसाहेब? एवढा घाणा काढून मी येतच होतें बोलवायला. मंजुळा, अग पानं घे झटकन—"

इतकें बोलून तिनें कढई खालीं उतरली; व आपल्याकडे कौतुकानें पहात असलेल्या रावसाहेबांकडे बघून इतक्या लाडिकपणानें हास्य केलें कीं, आपल्या त्या अचानक आंत येण्यानें तिच्या मनाची कांहीं चलबिचल झाली असेल, अशी शंकासुद्धां त्यांना आली नाहीं. आणि ते प्रेमभरानें तिला म्हणाले, "उगाच केलींस तूं ही एवढी सारी तयारी, प्रेमा. ब्रुईनसाहेबाच्या टेबलावर शिवप्रदोष सोडायचं जिवावर आलं माझ्या, म्हणून म्हटलं मी तुला जेवायला रहातों असं. मला कल्पना नव्हती, तूं इतका त्रास स्वतःला करून घेशील म्हणून! खरोखरी बेटा, तूं गृहलक्ष्मी व्हायला हवी होतीस आमच्या रावबहादुराची.—म्हणजे त्याच्या ऐश्वर्याचं अन् तुझ्या या गुणांचं सार्थक झालं असतं—"

पण त्यांच्या त्या बोलण्याकडे तिचें बिलकूल लक्ष नव्हतें. बोलण्याच्या भरांत त्यांच्या तोंडून निसटलेली ती बातमी—जेवल्याबरोबर ब्रुईनसाहेबांकडे जाण्याचा

त्यांचा बेत—कानांवर पडतांच प्रमिला पुढचें त्यांचें सारें भाषण विसरली; व त्यांना म्हणाली, " म्हणजे जेवल्यावर ब्रुईनसाहेबांकडे जाणार तर आपण ?"

तिचा तो सूचक प्रश्न ऐकतांच रावसाहेब चपापले; व आपल्या तोंडून भलतीच बातमी निघून गेल्याबद्दल त्यांना खेद झाला. पण, ते बाजू सांवरून घेण्याच्या हेतूनें म्हणाले, "हो—तो म्हणत होता, माझ्याबरोबर सिनेमाला चला म्हणून; अन् कामही आहे थोडंसं—"

बोलत बोलत ते पाटावर जाऊन बसले. प्रमिलेनें त्यानंतर त्यांना पुन्हा प्रश्न विचारला नाहीं. पण, तिनें ताट वाढून तें पुढें आणून ठेवतांच, त्यांतील निरनिराळ्या पदार्थांची तारीफ करून, ती आपल्या बंधूची गृहलक्ष्मी न झाल्याबद्दल रावसाहेबांनीं पुन्हा एकवार हळहळ व्यक्त केली. ते पुष्कळदां अशा रीतीनें तिच्याशीं बोलत असत; व त्यांनीं हा नाजूक विषय काढला, म्हणजे प्रमिला बहुधा मुग्ध रहात असे. पण आज तिनें लडिवाळपणानें त्यांची थोडी थट्टा केली. आणि, तिचें एकंदर वर्तन इतकें खेळकरपणाचें झालें कीं, त्या हास्यविनोदाच्या भरांत रावसाहेबांच्या खाद्यलोलुप जिव्हेला आपण किती घांस जास्त घेतले, याचें भान उरलें नाहीं. त्यांचें अर्धे जेवण होत आल्यावर, त्यांना वाढतां वाढतांच, एकदम प्रमिलेनें कानोसा घेतल्यासारखा केला; व स्वतःच्या मनाशीं बोलावें त्याप्रमाणें, पण जरा मोठ्यानें ती उद्गारली, " अग बाई घंटा वाजली वाटतं? कुणीतरी आलेलं दिसतंय बाहेर.—मजुळा, बघ बरं.—नको, पण मीच जाऊन पहातें. कदाचित् नानासाहेब आले असतील.—मला म्हणाले होते, मी संध्याकाळीं जरा उशिरानं आलों तर येईन म्हणून ! मंजुळा, मी आलेंच. जरा लक्ष ठेव पानाकडे—"

इतकें बोलून तिनें वाढावयाला घेतलेलें हातांतील भांडें खालीं ठेवलें; व टुवालानें हात पुसून ती लगबगीनें दिवाणखान्याकडे यावयाला निघाली. पण, स्वयंपाकघरांतून बाहेर पडतांच, सरळ दिवाणखान्यांत न जातां, ती अलीकडल्या खोलींत थांबली; तिनें दिव्याचा स्विच ओढला; व रावसाहेबांचा डगला घेऊन त्यांतून रिव्हॉल्वरच्या आड असलेलें तें पाकीट बाहेर काढलें.

अशा रीतीनें ज्या लिफाफ्यानें तिचें चित्त इतका वेळ व्यग्र केलें होतें, तो एकदांचा तिच्या हातीं आला. पण, तो फोडून कसा वाचावयाचा, अशी शंका

तिच्या मनांत आली. आणि, त्याची पुढली बाजू कोरी दिसल्यामुळें तिनें तो उलटून बघितला. तेव्हां, तो चिकटवून बंद केलेला नसून फक्त त्याच्या तोंडावरला रॅपर दुमडून आंत घातलेला आहे, असें तिच्या लक्षांत आलें. त्याबरोबर तिनें तो घाईघाईनें उघडून त्यांतून पिंवळसर रंगाचा कागद बाहेर काढला; व तो काळजीपूर्वक वाचला.

तें चंद्रशेखरला पकडण्याबद्दलचें वारंट होतें.

आणि त्यावर उद्यांची तारीख घातलेली होती.

तें वॉरंट वाचतांच, रावसाहेब जेवल्याबरोबर ब्रुईनसाहेबांकडे कोणत्या कामासाठीं जाणार आहेत, याचा उमज प्रमिलेला ताबडतोब झाला. आणि, तिला वाटलें कीं, कदाचित् उद्यांच्या दिवसांत—बहुतेक उद्यां उजाडतांच चंद्रशेखर पकडला जाईल !

ती कल्पना मनांत येतांच तिला भोवंड आल्यासारखें झालें; व तिनें भिंतीचा आधार घेऊन, आपलें मस्तक तिच्यावर टेंकलें. पण तिचा तो दुःखोद्रेक क्षणमात्रच टिकला. तशा तऱ्हेनें तिथें उभें राहाणें किती धोक्याचें आहे, याची तिला जाणीव झाली; व तो लिफाफा नीट रिव्हाल्वरच्या आड पुन्हा जसाच्या तसा ठेवून, ती लगेच दिवाणखान्यांत गेली. तिथें एका छोट्या मेजावरील कांचेच्या सुंदर सुरईत ठेवलेलें थंड पाणी तिनें आपल्या डोळ्यांना लावलें; कपाळावर त्याचा थोडा शिडकावा केला; व नंतर टुवालानें तोंड पुसून आपले केंस नीटनेटके केले. आणि, जातांना बरोबर कांहीं तरी न्यावें, या हेतूनें पानसुपारीचें तबक हातांत घेऊन ती परत फिरली.

पण, ती दिवाणखान्यांतून निघून आंतल्या खोलींत पाऊल ठेवते न ठेवते, तोंच टुवालानें तोंड पुशीत येत असलेले रावसाहेब तिला उंबरठ्यापाशींच भेटले. त्यांना पाहिल्याबरोबर चकित झाल्यासारखें दाखवून ती उद्गारली, " हें काय ? एवढ्या लवकर आटपलं जेवण, रावसाहेब ? मला वाटतं, मी इकडे आल्यावर कांहीं घेतलं नाहीं आपण.—माझीच चूक ! घंटा वाजल्याचा भास झाला न् मी वेड्यासारखी वाढायचं टाकून बाहेर आलें. नुसतं ताक पिऊन उठलां, खरं ना ?"

" नाहीं बेटा, चांगलं पोटभर जेवलों. तूं काय थोडा आग्रह केला होतास का आधीं ?—या वयांत मनुष्य जेवतो, तो पोट भरण्यासाठीं नव्हे; तर जिव्हा-लौल्याच्या तृप्तीसाठीं अन् वाढणारणीच्या प्रेमासाठीं.—तूं वाढायला होतीस म्हणून चार घांस जास्त गेले मला आज, प्रेमा. पण तूं आंत कशाला जातेस हें तबक घेऊन ? आहे एवढ्यावर भागेल काम माझं. चल थोड्या गप्पा मारूं ! पण तुला जेवायचंय ना बेटा ? माझ्या बरोबर बसली असतीस तर बरं नसतं झालं ?—पण कांहीं बाबतींत तुझ्या अगदीं जुन्या समजुती आहेत !—चल पण जरा बाहेर. मी अगदीं थोडा वेळ बसणार आहें. ब्रुईनसाहेब वाट पहात असेल माझी—"

बोलत बोलत रावसाहेब दिवाणखान्यांत येऊन कोंचावर रेलले; व प्रमिला पानाचें तबक टेबलावर ठेवून विडा तयार करीत त्यांच्यासमोर उभी राहिली. रावसाहेबांनीं मेजावरील चांदीची डबी उघडून त्यांतला एक चिरूट शिल-गावला. पण, त्याचा पहिला झुरका ते घेतात न घेतात, तोंच त्यांना ठसका लागल्यासारखें झालें. त्याबरोबर प्रमिलेनें झटकन पाण्याचा पेला त्यांच्यापुढें केला. त्याचे दोन तीन घोंट घेतांच त्यांना बरें वाटलें; व प्रमिलेनें दिलेला विडा तोंडांत टाकून त्यांनीं तिला विचारलें, " किती दिवस झाले चंद्रशेखर तुला भेट-ल्याला, बेटा ? "

" परवांच भेटला होता. पण तो एकटा नव्हता. कृष्णार्जुनांची जोडी आली होती त्या दिवशीं ! " तिनें हंसून म्हटलें. नंतर आपल्या आवाजांत कमालीचें मार्दव आणून तिनें विचारलें, " चंद्रशेखरला कधीं पकडायचा बेत आहे, ब्रुईन-साहेबांचा ?—"

तिचा तो प्रश्न ऐकून रावसाहेब मोठ्यानें हंसले व म्हणाले, " तें मला कसं माहित असणार, प्रेमा ? इतक्या दिवस माझ्या सहवासांत राहून तूं अगदीं भोळी, अल्लड राहिली आहेस, बेटा. अग, आमच्या खात्याची अशी शिस्त आहे कीं, एकाचा बेत दुसऱ्याला कळायचा नाहीं आणि वरिष्ठानं सोडलेला हुकूम शेवटच्या क्षणाशिवाय कनिष्ठांना कधीं पहायला मिळायचा नाहीं. शिवाय मी आतां रीतसर नोकरीवर थोडाच आहे ?—ब्रुईनसाहेब माझा सल्ला घेतो अन् या बाबतींत तर तो बराचसा माझ्या तंत्रानं चालला आहे. त्यामुळं कळतात

कांहीं गोष्टी मला मधून मधून इतकंच ! पण, मला वाटत नाहीं कीं, इतक्या लवकर अन् इतक्या थोड्या पुराव्याच्या जोरावर तो चंद्रशेखरला पकडील.— आमची केस टिकली तर पाहिजे ना ?"

"मग इतक्यांत नाहीं पकडला जाणार म्हणायचा तो ?"

"नाहीं.—आणखी महिना दीड महिना तरी खास नाहीं. बेटा, मी जाणून आहे तुझा जीव त्याच्यासाठीं किती तळमळतो तें. आतां मी जातोंच आहे तिकडे तर ब्रुईनसाहेबाला नक्की विचारीन; अन् तो कांहीं म्हणाला तर सांगेन तुला उद्यां सकाळीं. मलासुद्धां फार वाटतं त्या पोरासाठीं !—पण आपल्याला वाटलं तरी उपयोग काय ? आपण थोडंच तें टाळूं शकतों ?—"

"हो,—आपण म्हणतां तें खरंच आहे, रावसाहेब. या संकटापुढं कुणा-चाच कांहीं इलाज नाहीं.—पण रहावत नाहीं म्हणून विचारलं एवढंच.—मग कोट आणूं का आपला ?"

त्यांचा सहवास अत्यंत दुःसह झाल्यामुळेंच कीं काय, तिनें आपण होऊनच त्यांना अशा रीतीनें जाण्याची आठवण दिली.

"बरी आठवण केलीस. तुझ्याशीं बोलत बसलं, म्हणजे भान नाहीं रहात प्रेमा, वेळेचं न् कामाचं. कपडे आण माझे—"

तिनें लगेच आंतून डगला आणि फेटा आणला; व त्यांना डगला अंगांत चढवावयाला मदत केली. तो अंगांत घातल्यावर, त्याच्या सुरकुत्या ती साफ करीत असतां, रावसाहेब म्हणाले, "बेटा, मला केव्हां केव्हां वाटतं, पार्ल्याला न राहतां इथं तुजजवळ येऊन रहावं. तूं जशी माझी हर एक बाबतींत काळजी घेतेस, तशी काळजी घेणारं आतां कोणी नाहीं तिथं.—म्हातारपणीं विधुर होणं यासारखं दुसरं संकट नाहीं; अन् त्यांतून आमची सुंदर लग्न होऊन सासरीं गेल्यापासून तर कांहीं विचारूं नको !—सुना तरी काय करतील बिचाऱ्या ? आपल्या मुलांकडे न् नवऱ्यांकडे त्या लक्ष देतील ? का माझ्या म्हाताऱ्याच्या भोंवतीं नाचतील ? म्हणून मला अलीकडे वाटायला लागलं आहे—सुंदर गेल्या-पासून तर फार फार वाटतं—इथं येऊन तुझ्याजवळ राहावं.—जशी माझी सुंदर, तशीच तूं प्रेमा !"

बोलतां बोलतां त्यांनीं प्रेमभरानें तिच्या गालावर चापट मारली आणि ते बाहेर पडले.

ते गेल्याबरोबर प्रमिलेनें टेबलावरील घंटा वाजविली; व तिचा आवाज होतांच तांतडीनें तिथें आलेल्या मंजुळेला म्हटलें, "मला कीं नाहीं आज भूक नाहीं, मंजुळा. तूं जेवून घे अन् नीट आंवर सारं लवकर—"

इतकें बोलून ती घाईघाईनें आपल्या लिहिण्याच्या टेबलाजवळ गेली, त्यांतून एक पॅड तिनें बाहेर काढलें; व तें उघडून इंग्रजींत लिहावयाला प्रारंभ केला—

प्रिय चंद्रशेखर,
मला आतांच एक महत्त्वाची बातमी कळली...

पण तें वाक्य तिनें लिहिलें. आणि, लगेच तिला शंका आली कीं, अशा तऱ्हेची महत्त्वाची बातमी पत्रांतून कळवावी कीं नाहीं? कदाचित् तें पत्र त्याच्या हातीं न पडतां दुसऱ्याच कोणी घेऊन फोडलें तर? आणि, समजा, जरी तें पत्र त्याला मिळालें, तरी पुढें झडतींत तें पोलिसांच्या हातीं लागलें तर?—तर त्याचे परिणाम किती भयंकर होतील? त्या परिणामांच्या नुसत्या कल्पनेनें तिचें अंग थरारलें आणि तिनें हातांतील पेन खालीं ठेवलें. मग इतक्या धाडसानें मिळविलेली ही बातमी चंद्रशेखरला कशी कळवावयाची? त्याच्या घरीं जाऊन ती आपण त्याला समक्ष सांगितली तर?—

ती कल्पना मनांत येतांच तिनें हातांतल्या घड्याळाकडे पाहिलें. त्यांत साडे दहा वाजले होते.

पण लगेच तिच्या मनांत विचार आला,—आपण स्वतः तिथें जाणें कितपत इष्ट होईल? अलीकडे त्याच्या घरावर पोलिसांची टेहळणी असते, म्हणतात. अशा स्थितींत तिथें जाणें म्हणजे केवढें धाडस! समजा, तेंही धाडस करून आपण गेलों आणि तो घरीं नसला तर? सध्यां गिरण्यांच्या भागांत संपाची धामधूम सुरू आहे; व कामगारांच्या सभा तर रोज रात्रीं होत असतात. तेव्हां तो घरीं हटकून भेटेलच असा काय नियम? आणि, आपण नेत असलेला निरोप तर असा कीं, जो ज्याचा त्याला समक्षच सांगितला पाहिजे.

या साऱ्या शंकाकुशंकानीं तिचें मन सुन्न झालें; व त्या लिहिण्याच्या टेबला-जवळून उठून, ती कोंचावर येऊन पडली.

इतक्यांत दिवाणखान्यांतील मोठ्या घड्याळांत अकराचे ठोके पडले. जणुं कांहीं, जात असलेला प्रत्येक क्षण महत्त्वाचा आहे असें त्या कालचक्राच्या प्रति-निधीनें तिला अकरा वेळां बजावून सांगितलें.

तिच्या मनाची तळमळ प्रतिक्षणीं वाढत होती. तिला सारखें वाटत होतें कीं, चंद्रशेखरला जर आपण इषारा देऊन सावध केलें, तर तो खात्रीनें या प्रसंगां-तून निसटून जाईल.—त्याला वांचविणें हें आज सर्वस्वीं आपल्या हातीं आहे. त्याचें तें रावसाहेबांनीं लांबविलेलें पत्र आपण त्याला मिळवून देऊं शकलों नाहीं.—त्या गोष्टीला आपला इलाज नव्हता. पण आज त्याला सावध करणें मात्र आपल्याला शक्य आहे. आणि, एवढी साधी गोष्ट जर भीरुतेमुळें आपल्या हातून घडली नाहीं, तर आपल्यावर त्या साहसी तरुणानें व्यर्थ विश्वास टाकला म्हणावयाचा!

हा विचार मनांत येतांच ती उठली; अंतर्गृहांत जाऊन तिनें एक भस्मी रंगाचें पातळ आणलें; तें गुजराती पद्धतीनें नेसून त्याचा पदर ओढणीसारखा तोंडावर घेतला; व दाराला कुलूप लावून ती बाहेर पडली. खालीं पदपथावर येऊन ती उभी रहातांच, पलीकडे उभ्या असलेल्या व्हिक्टोरियावाल्यानें आपली गाडी जवळ आणली. त्याबरोबर, त्याला फ्रेंच पुलाचा पत्ता सांगून, ती झटकन आंत बसली. तथापि, सँढर्स्ट पुलाच्या पलीकडे व्हिक्टोरिया जातांच, तिनें ती थांबवून त्याचे पैसे चुकते केले, आणि ती चालतच चंद्रशेखरच्या घरासमोर आली.

पण, एवढ्या रात्रीच्या वेळीं आपण आंत कसें जावें, याचा तिला विचार पडला. इतक्यांत माडीच्या पश्चिमेकडील खिडकींत दिव्याचा प्रकाश तिच्या दृष्टीस पडल्यामुळें, त्या बाजूला जाऊन तिनें अगदीं हलक्या पण स्पष्ट आवा-जांत हांक मारली—

“चंद्रशेखर, चंद्रशेखर—”

तिच्या दुसऱ्या हांकेबरोबर चंद्रशेखर खिडकींत येऊन उभा राहिला; व आपल्याला कोणी तरी स्त्री हांक मारीत आहे हें बघून, अत्यंत विस्मयानें त्यानें विचारलें, "कोण पाहिजे आपल्याला ?"

"कृपा करून आपण लवकर खालीं या. मला आपल्याशीं कांहीं बोलायचंय—"

तिनें इंग्रजींत उत्तर दिलें.

तें ऐकून चंद्रशेखर अधिकच विस्मित झाला. पण, विचार करीत वर न थांबतां, तो झटकन उतरून खालीं आला. तेवढ्या वेळांत प्रमिलाही बागेच्या फाटकाजवळ येऊन उभी राहिली. त्यानें फाटकापाशीं उभें राहून, तें न उघडतांच, तिला इंग्रजींत विचारलें, "आपलं काय काम आहे माझ्याशीं ? आपल्याला माझ्या आईला भेटायचंय का ?—"

त्याच्या त्या प्रश्नाला प्रमिलेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं; फक्त आपल्या मस्तकावरील ओढणीवजा पदर मागें घेतला.

त्याबरोबर चंद्रशेखर अतिशय ओशाळला; व बागेचें फाटक उघडीत त्यानें घाईघाईनें तिला इंग्रजींत म्हटलें, "माफ करा हं मला. आपण या वेळीं इकडे कुणीकडे प्रमिलाताई ?"

"मला एक महत्त्वाची बातमी सांगायची आहे तुम्हांला. मी वर तुमच्या खोलींत यायला कांहीं हरकत आहे का तुमची ?"

"महत्त्वाची बातमी ?" चंद्रशेखर आश्चर्यानें घुटमळल्यासारखें करून उद्गारला. पण लगेच त्याच्या डोळ्यांत, कोणत्याही बिकट प्रसंगीं उफाळणारी, धाडसी बेदरकारपणाची चमक खेळली; व त्यानें हंसून तिला म्हटलें, "हरकत कसली आली आहे ? आपल्या धाकट्या भावाचं घर आहे हें, प्रमिलाताई !"

---

## प्रकरण ३२ वें

# अश्रूंचा मुका निरोप



चंद्रशेखरच्या त्या अभ्यासाच्या खोलींत पाऊल टाकतांच, प्रमिलेला आपण अगदीं निराळ्या, अगदीं नवीन जगांत प्रवेश केल्यासारखा वाटला. करारीपणाचें जें प्रखर तेज त्याच्या डोळ्यांत सांठविलेलें होतें, तें त्या खोलींतील प्रत्येक वस्तूनें जणुं कांहीं आत्मसात् केलें आहे, असा तिला भास झाला; व आपल्या भयविह्वल मन:स्थितीची तिला लाज वाटली. खोलीच्या मधोमध असलेल्या मोठ्या टेबलावर पुष्कळसे टाईप केलेले कागद पडलेले होते. आणि, ते वाऱ्यानें उडून जाऊं नयेत म्हणूनच कीं काय, त्यांच्यावर पेपरवेटच्या ऐवजीं रिव्हॉल्वर ठेवलेला होता. तें दृश्य पहातांच प्रमिला दचकली. रावसाहेबांच्या खिशांत तिनें मधांशीं रिव्हॉल्वर पाहिला होता,—नव्हे ती नेहमींच पहात असे. पण, इथें तें हत्यार आपल्या दृष्टीस पडेल, अशी मात्र तिची कल्पना नव्हती. त्या रिव्हॉल्वरच्या भोंवतीं पडलेल्या चमेलीच्या फुलांचा परिमळ सर्व खोलीभर दरवळला होता. दिव्याच्या प्रकाशांत झगझगणारा तो काळसर रिव्हॉल्वर आणि त्याच्याजवळ असलेलीं तीं चमेलीचीं शुभ्रकोमल फुलें!—प्रमिलेला वाटलें, चंद्रशेखरच्या हृदयांत कठोर निश्चय आणि कोमल भावना यांचा असाच मिलाफ झालेला असेल काय? त्या रिव्हॉल्वरच्या थोडा पलीकडे मार्क्सचा फोटो होता; व तीं चमेलीचीं फुलें टेबलाच्या दुसऱ्या टोंकाला असलेल्या त्याच्या आईच्या फोटोभोंवतीं पसरलेलीं होतीं. प्रमिलेनें त्या दोन्ही फोटोंकडे पाहिलें; व वर आल्याबरोबर घाईघाईनें टाईपरायटरजवळ जाऊन अपुरें राहिलेलें पत्र उभ्यानेंच टाईप करण्यांत गर्क झालेल्या त्या युवकाकडे आपली दृष्टि फेंकली. आणि, तिच्या मनांत विचार आला—

तोंच त्यानें तिला इंग्रजींत म्हटलें, "आपण बसा ना खुर्चीवर, प्रमिलाताई.—मी हें एवढं पत्र पुरं करून बोलतों आपल्याशीं—"

टाईपरायटरमधील अक्षरांवरून त्याचीं बोटें वेगानें फिरत होतीं; व अत्यंत विनयानें, पण तिच्याकडे वळून न पहातां, त्यानें तें वाक्य उच्चारलें होतें.

त्याच्या त्या वर्तनाचा प्रमिलेला मोठा चमत्कार वाटला. आपण एवढ्या अपरात्रीं इतकी महत्त्वाची बातमी घेऊन आलों, आणि तिच्याबद्दल अवाक्षरानेंही चौकशी न करितां चंद्रशेखर आधीं आपलें पत्र टाईप करण्याच्या उद्योगाला लागला, याचा अर्थ काय ? आपण आणलेल्या बातमीची त्याला कांहींच परवा नाहीं कीं काय ? किंवा पूर्वीच कोणी तरी या गोष्टीची कल्पना त्याला आणून दिलेली आहे ?—अशी शंका तिच्या मनांत आली. तिला एकवार असेंही वाटलें कीं, आल्यासारखें झटकन एकदां याला काय सांगावयाचें तें सांगून, इथून लवकर निघून जावें; आपण फार वेळ इथें रहाणें इष्ट नव्हे. पण, त्याच्या कामांत व्यत्यय आणण्याचा धीर तिला झाला नाहीं; व एक प्रकारच्या विस्मययुक्त जिज्ञासेनें त्याच्या हालचालींकडे पहात ती स्तब्ध उभी राहिली.

इतक्यांत त्यानें तें पुरें झालेलें पत्र टाईपरायटरवरून काढून, जवळच ठेवलेल्या वेताच्या पेटींतील एक पाकिट घेतलें; व तें टाईपरायटरवर लावीत तिच्याकडे पाहून तो हंसत हंसत म्हणाला, "अगदीं निकडीचं पत्र होतं म्हणून पुरं केलं इतक्या गडबडीनं.—एवढा पत्ता टाईप केला कीं सुटलों एकदांचा !" इतकें बोलून तो पुन्हा टाईपरायटरकडे वळला; व पत्ता टाईप करून होतांच त्या पाकिटांत तें पत्र घालीत त्यानें तिला इंग्रजींत म्हटलें, "आमच्याकडे येण्याचा आपला हा पहिलाच प्रसंग आहे. पण, ही वेळ इतकी चमत्कारिक आहे कीं, मला आपलं कांहींच स्वागत करतां येत नाहीं, याबद्दल वाईट वाटतं—"

"आतांच तुम्ही म्हणालांत ना चंद्रशेखर, मी तुमचा धाकटा भाऊ आहें म्हणून ? मग हा शिष्टाचार कशाला ? शिवाय आज मी इतकी विलक्षण बातमी आणली आहे कीं, तुम्ही घरीं भेटलांत हेंच मला मुळीं मोठं स्वागत वाटतंय.—मला कांहीं आशा नव्हती फारशी तुमची भेट होण्याची—"

"होय, खरं आहे आपलं म्हणणं. मी आतांच परळहून सभा आटोपून आलों.—पण प्रमिलाताई, आपण उभ्या किती वेळ रहाणार ?"

"तुमचा यूनियनशीं तसा कांहीं प्रत्यक्ष संबंध नाहीं ना, चंद्रशेखर ? मग तुम्ही संपांत कां एवढा भाग घेतां ?" त्यानें दाखविलेल्या खुर्चीवर बसत प्रमिलेनें म्हटलें.

" संबंध नाहीं खराच. इतकंच नव्हे, तर यूनियनच्या सध्यांच्या अधिकाऱ्यांशीं माझं कोणत्याच बाबतींत जुळत नाहीं, पुढंही कधीं जुळण्यासारखं नाहीं. पण एक अनुभव घेतलेला असावा, म्हणून मी मुद्दामच त्यांच्यांत मिळून मिसळून काम करतोंय—"

" पण यूनियनच्या लोकांपेक्षां सध्यां तुमच्याच नांवाचा बोभाटा वर्तमानपत्रांत जास्त आहे—"

" तेंही साहजिकच आहे. यूनियनच्या पुढाऱ्यांपेक्षां माझी भाषा साहजिकच थोडी जहाल असते; अन् संपांत इतर गिरण्यांनीं सामील व्हावं म्हणूनही माझी सारखी खटपट चालली आहे. शिवाय अलीकडे वर्तमानपत्रांनीं जसं कांहीं मला पुढं आणायचं ठरवून हातार्शी धरलंय.—विशेषतः आपल्या टाइम्सनं!—अन् त्याचं फळ बहुधा लवकरच पडेल माझ्या पदरांत." बोलतां बोलतां तो मनःपूर्वक हंसला.

" तुम्हांला कल्पना आहे, मी कसली बातमी आणली आहे याची ?"

"होय.—आपण अपरात्रीं आलां एवढयावरून पुष्कळशी कल्पना आली मला. शिवाय, तें पत्र माझ्या टेबलावरून नाहींसं झालं, त्या दिवसापासून मी दिवसच मोजतोंय म्हणा ना!" तो पुन्हा एकदां हंसला.

" चंद्रशेखर, तुमच्या नांवाचं वॉरंट सुटलंय अन् त्यावर उद्यांची तारीख आहे—"

" आपण स्वतः आपल्या डोळयांनीं पाहिलं तें वॉरंट ?"

" होय."

" कुठं ? "

" जिथं पहाणं शक्य होतं तिथंच!"

तिचें तें उत्तर ऐकतांच, आपल्या प्रश्नाची अयुक्तता त्याच्या लक्षांत येऊन, तो थोडा वरमला; व क्षणैक थांबून त्यानें पुन्हा विचारलें, " वॉरंट फक्त माझ्याच नांवाचं निघालंय का आणखीही कांहीं वॉरंटं निघालीं आहेत ?"

" नाहीं. फक्त तुमच्या एकट्याच्या नांवाचं वॉरंट पाहिलं मी रावसाहेबांच्या खिशांत—"

"आपली खात्री आहे, दुसऱ्या कुणाला पकडायचा त्यांचा विचार नाहीं, म्हणून ? "

"तें मी कसं सांगूं ? पण फक्त तुमच्या नांवाचं वॉरंट मी बघितलं; अन् तुम्हांलाच पकडण्याच्या गोष्टी ते नेहमीं बोलत असतात.—का ? तुमचे आणखी कांहीं सहकारी पकडले जातील असं वाटतं तुम्हांला ?—"

"होय.—म्हणूनच मी इतकं खोदखोदून विचारतोंय. ते जर पकडले जाणार असतील, तर मला एकट्याला इशारा मिळून काय उपयोग ? "

"नाहीं. मला खात्रीनं वाटतं, तुम्ही एकटेच पकडले जाणार. रावसाहेबांनीं तुमच्याशिवाय कधींही दुसऱ्या कोणाविषयीं माहिती काढण्याची उत्सुकता दर्शविलेली नाहीं—"

"आनंदाची गोष्ट आहे.—एका बळीवर भागतंय हें कांहीं थोडं नव्हे!—पण वॉरंट कोणत्या कलमाखालीं काढलंय हें लक्षांत आहे आपल्या ? "

"हो.—१२१ अ." तिनें प्रत्येक अक्षर अगदीं संथपणानें उच्चारित म्हटलें.

"वा!—बंड करण्याची काडीइतकीसुद्धां खटपट न करतां बंडखोरीचा आरोप आणि तोही एवढ्या थोरल्या बलाढ्य साम्राज्यसत्तेकडून!—सरकारनं मोठा बहुमान केला म्हणायचा माझा!" तो जोरानें हंसला. पण तितक्यांत त्याच्या चेहऱ्यावरून विषादाची सूक्ष्म छाया झटकन उमटून गेली.

त्याच्या चेहऱ्यांत झालेला तो फरक प्रमिलेच्या लक्षांत आला; व क्षणभर थांबून तिनें त्याला विचारलें, "मग तुम्ही काय करायचं ठरवतां आहां ? "

"अजून तर कांहीं नाहीं. आतांच बातमी सांगितली आपण मला.—याच्यापुढंच काय तें ठरवायचं." नंतर थोडासा घुटमळून तो तिला म्हणाला, "पण प्रमिलाताई, आपण ही बातमी मला सांगितलीत हे आपले उपकार झाले माझ्यावर फार.—आपण माझ्यासाठीं स्वतःचा जीव किती धोक्यांत घातला आहे, याची कल्पना आहे मला—"

ते शब्द उच्चारीत असतांना त्याच्या आवाजांत, एरवीं सहसा कधीं न आढळणारें, विलक्षण मार्दव उत्पन्न झालें; व तेवढें बोलून तो स्तब्ध राहिला.

प्रमिलाही स्तब्ध होती.

अशा रीतीनें कांहीं क्षण स्तब्धतेंत गेल्यावर, तिनें उसासा टाकून त्याला म्हटलें, " येतें आतां मी—"

ती उठून दारापर्यंत गेली.—इतक्यांत तिच्या मनांत काय आलें कोण जाणें !—ती मागें वळली; व आपल्या बरोबर यावयाला निघालेल्या त्या युवकाला इंग्रजींत म्हणाली, " चंद्रशेखर, यानंतर कदाचित् आपली भेट पुन्हा कधींही होणार नाहीं.—माझ्याशीं या वेळीं हस्तांदोलन करायला तुम्हांला आवडणार नाहीं का ?"

चंद्रशेखरनें मुकाट्यानें आपला हात पुढें केला.

पण, त्याच्याशीं इंग्रजी पद्धतीनें हस्तांदोलन न करितां, प्रमिलेनें त्याचा हात आपल्या दोन्ही हातांत घट्ट धरला; व अत्यंत कातर आवाजांत ती त्याला म्हणाली, " चंद्रशेखर, जें काय करायचं तें जपून करा. मला फार कठीण दिसतंय पुढचं सारं—"

तिनें ते शब्द उच्चारले व तिच्या डोळयांतील अश्रु टपटपां त्याच्या हातांवर पडले. आणि, तो कांहीं बोलणार, तोंच त्याचा हात सोडून देऊन ती एकदम खोलींतून बाहेर पडली.

बागेच्या फाटकाजवळ येतांच तिनें आपल्या मस्तकावरील पदर थोडा पुढें ओढला. इतक्यांत चंद्रशेखरनें पुढें होऊन बागेचें फाटक उघडलें. त्याबरोबर ती बाहेर पडली; व त्याच्याशीं जाण्यापूर्वी कांहीं तरी बोलावें या हेतूनें उभी राहिली. तोंच चंद्रशेखर तिला म्हणाला, " मी येतोंय आपल्या बरोबर आपल्याला पोंचवायला—"

" नको नको, मी एकटीच जातें.—मी एकट्यानं जाण्यापेक्षां तुम्ही बरोबर येण्यांत जास्त धोका आहे—"

" एवढ्या अपरात्रीं आपण एकट्या जाणार ? या वेळीं मी बरोबर येण्यांत कसला धोका आहे ?—निदान मी गिरगांवच्या रस्त्यापर्यंत तरी येतों—"

" नको. तुम्ही थोडा वेळ इथं उभे राहिलांत म्हणजे पुरे आहे. मला बहुधा व्हिक्टोरिया मिळेल; अन् गिरगांवच्या रस्त्याला लागल्यावर कांहीं भीति नाहीं. बरं मी येतें आतां—"

एवढें बोलून प्रमिला लगेच चालावयाला लागली. निर्मनुष्य झालेल्या त्या भयाण रस्त्यावर तिची ती धूसर वस्त्रानें आच्छादिलेली मूर्ति दिव्यांच्या

विरळ प्रकाशांत हलत्या छायेसारखी दिसत होती. क्षणोक्षणीं दूर होत चाललेल्या त्या मूर्तीकडे चंद्रशेखर निश्चल दृष्टीनें पहात होता. ती अपरात्र, तिचें तें अचानक आपल्या घरीं येणें, तिनें आणलेली ती अपेक्षित पण भीषण बातमी, अखेरचा निरोप घेतांना आपल्या हातावर पडलेले ते तिचे अश्रु!—गेले तीन चार दिवस अहोरात्र जिवापाड काम करून शिणलेल्या चंद्रशेखरच्या श्रांत चित्ताला ते सारे प्रसंग स्वप्नासारखे वाटले; व गेल्या चार महिन्यांत आपल्या विषयींच्या तिच्या वृत्तींत झालेलें परिवर्तन लक्षांत येऊन, भावी संकटाच्या जाणिवेनें ग्रासलेल्या त्याच्या मनाला त्या दुर्धर स्थितींतही एक प्रकारचा आनंद झाला. प्रमिला आपल्या शब्दाला इतक्या निष्ठेनें जागेल, अशी त्याला खात्री नव्हती. त्यामुळें, तिच्यावर आपण धाडसानें टाकलेला विश्वास सार्थकीं लागला, व तेवढयापुरती तरी रावसाहेबांच्या कुटिलतेवर आपण मात केली, या कल्पनेनें त्याला फार समाधान झालें. त्या अभिमानाच्या ऊर्मीत तो गर्क असतां, गस्त घालणाऱ्या शिपायाच्या वहाणांचा कर्कश आवाज त्याच्या कानांवर आला. त्या आवाजानें त्याला त्या तंद्रेंतून जागें केलें; व बागेचें फाटक बंद करून तो वर आला.

खोलींत पाऊल ठेवल्याबरोबर, क्षणाक्षणानें जवळ येत असलेलें उद्यांचें संकट त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहून, त्याच्यावर आलेली श्रांततेची आणि अभिमानाची तंद्री नाहींशी झाली. तो टेबलाजवळ गेला; आपल्या आईचा फोटो उचलून त्याचें त्यानें चुंबन घेतलें; व त्या फोटो भोंवतीं पडलेलीं तीं शुभ्रशीतल फुलें त्यानें आपल्या डोळ्यांवर हळूच दाबलीं. पण त्यांच्या मृदु स्पर्शानें त्याच्या मनःस्तापाची धग कमी झाली नाहीं. उलट वाढलीच. त्या क्षणापर्यंत जे दुःखद विचार त्याच्या मनाला शिवले नव्हते, त्यांच्या ऊर्मीनीं त्याचें हृदय आतां भरून आलें. जणुं कांहीं, त्या फुलांनीं आपल्या कोमल स्पर्शानें त्याच्या हृदयांतील साऱ्या कोमल भावना जागृत केल्या. त्याला असें वाटलें कीं, ज्या या खोलींत बसून आपण आपल्या जीविताचीं ध्येयें निश्चित केलीं, त्यांची पूर्तता करण्याची पात्रता आपल्या अंगीं यावी म्हणून अहोरात्र परिश्रम केले आणि बहुजनसमाजाच्या दास्यमोचनाच्या चळवळीचीं उज्ज्वल कल्पनाचित्रें रेखाटलीं, ती ही खोली कदाचित् यापुढें आपल्याला कायमची अंतरेल;—हीं

फुलें, हे फोटो, हीं पुस्तकें यांतलें कांहींसुद्धां कदाचित् आपल्या पुन्हा दृष्टीस पडणार नाहीं; आपल्याविषयींच्या आकसामुळें कदाचित् या घरावर सुद्धां सरकारची वक्र दृष्टि पडून आपली आई, आपला भाऊ देशोधडीला लागतील;—काल्पनिक अशा एका कार्यक्रमाच्या मागें लागल्यामुळें त्यांच्या दुर्दशेला मात्र आपण कारण होऊं आणि आपल्या आईला उतारवयांत अपमानाचें जिणें कंठावें लागेल. अशा प्रकारचे अनेक विचार त्याच्या मनांत आले; व त्याच्या संतप्त नेत्रांतून गळणाऱ्या अश्रूंनीं त्याच्या हातांतील तीं हंसरीं, नाजूक फुलें भिजून, भाजून निघालीं.

पण त्याच्या मनाची ती अवस्था कांहीं क्षणच टिकली. टेबलावरील घड्याळाची टिकटिक त्याला सारखी सुचवीत होती कीं, जात असलेला प्रत्येक क्षण महत्त्वाचा आहे. त्याच्या बाजूला असलेला तो मार्क्सचा,—जगांतील सर्व समाजसत्तावादी क्रांतिकारकांच्या गुरूचा,—एका काल्पनिक कार्यक्रमाच्या पूर्ततेसाठीं स्वतःच्या बुद्धिशक्तींना आमरण राबवून तो अखेर मूर्तावस्थेला आणणाऱ्या कर्मवीराचा फोटो!—त्या फोटोकडे दृष्टि जातांच चंद्रशेखरला आपल्या डोळयांत दाटलेल्या आंसवांची लाज वाटली, आपल्या मनाला ग्रासणाऱ्या दुबळ्या विचारांचा राग आला.—ध्येयनिष्ठेसाठीं मार्क्सनें अज्ञातवास पत्करला, सारें आयुष्य दारिद्र्यांत पिचत घालविलें, पोटच्या गोळयांना उपासमारीनें आलेला मृत्यु उघड्या डोळयांनीं पाहिला.—त्याचें तें दिव्य चरित्र, त्या चरित्राची त्याच्या डोळयांत एकवटलेली दीप्ति!—ती दीप्ति पहातांच चंद्रशेखरचा स्वाभिमान जागृत झाला, त्याची ध्येयनिष्ठा प्रस्फुरित झाली.—काल्पनिक कार्यक्रमाचें खुनी मृगजळ! होय, त्या मृगजळामागें लागून आजपर्यंत किती तरी ध्येयवाद्यांनीं व्यवहाराच्या रखरखीत वाळवंटावर आपले देह टाकले आहेत. पण तें खरोखरीच मृगजळ आहे का? मार्क्स आणि बुखारिन, लेनिन आणि वीरेन्द्र यांनीं काय केवळ मृगजळामागें लागण्यांत आपल्या आयुष्याचा अपव्यय केला?—खचित नाहीं. साम्यवादाचा कार्यक्रम आज संकल्पावस्थेंत असेल. मार्क्स आणि एंजल्स यांनीं ज्या वेळीं आपला जाहीरनामा प्रसिद्ध केला आणि दलितांच्या दास्यविमोचनाचें रणशिंग फुंकलें, त्या वेळीं तरी साम्यवादाचा कार्यक्रम कल्पनावस्थेंतच होता ना? युरोपांत जर तो कार्यक्रम यशस्वी होऊं शकला, रशियांतल्या झारशाहीसारख्या पुरातन

अरेरावी सत्तेचें जर त्या कार्यक्रमामुळें उच्चाटन होऊं शकलें, तर हिंदुस्थानांत तो कार्यक्रम कां यशस्वी होणार नाहीं ?—फक्त प्रयत्न, आत्माहुतीच्या तयारीनें प्रयत्न मात्र अविरत केले पाहिजेत.—चंद्रशेखरच्या मनांत विद्युद्वेगानें हे सारे विचार येऊन गेले; मार्क्सच्या त्या फोटोसमोर आपण घेतलेल्या शपथेची त्याला आठवण झाली; व त्याच्या मनाचा निश्चय होऊन तो पुढल्या उद्योगाला लागला.

त्यानें टेबलाचा खण उघडून त्यांतून सारे कागदपत्र बाहेर काढले; व त्यांतील महत्त्वाचीं पत्रें एकवार घाईघाईनें चाळून, बाकीचे कागद फाडून टोपलींत टाकले. नंतर त्यानें कपाटांतून स्पिरिटचा दिवा बाहेर काढून तो पेटविला; आणि बाजूला काढून ठेवलेलें प्रत्येक पत्र त्याच्यावर धरून जाळलें.

तें काम झाल्यावर तो उठला; व पुन्हा टेबलापाशीं जाऊन उभा राहिला.

आंत आणि बाहेर या वेळीं विलक्षण स्तब्धता नांदत होती. फक्त त्याच्या हृदयाची धडधड आणि त्या घड्याळाची टिकटिक एवढे दोनच काय ते आवाज त्या स्तब्धतेचा भंग करीत होते. काळाची गति दाखविण्यासाठीं टिकटिकणारें तें घड्याळ आणि भावनांच्या आवेगानें धडधडणारें त्याचें हृदय,—त्यांच्या सहकारितेनें होत असलेला तो स्तब्धतेचा भंग किती अर्थपूर्ण होता !

कांहीं क्षण विचारांत घालविल्यावर चंद्रशेखरनें कपडे बदलून, गोवानीज पद्धतीचा साहेबी पोषाख केला. आणि पायांत बूट घालण्यासाठीं म्हणून तो खुर्चीवर बसला.

पण, त्याच्या मनांत काय कल्पना आली कोण जाणें !—ते बूट त्यानें बाजूला सारले व तो खालीं उतरून आपल्या आईच्या शयनमंदिरांत गेला.

तिथें शेजारीं शेजारीं टाकलेल्या लोखंडी खाटांवर त्याची आई आणि धाकटा भाऊ निजलेला होता.

त्या खोलींत पाऊल टाकतांच चंद्रशेखरच्या हृदयांतील साऱ्या भावना उचंबळून आल्या आणि त्याच्या डोळ्यांत पुन्हा अश्रु उभे राहिले. तिथें भिंतींतील प्रशस्त महिरपींत उभें केलेलें तें दत्ताचें भव्य चित्र, त्या चित्राभोंवतीं सोडलेल्या त्या सुंदर पुष्पमाला, त्याच्या दोहों बाजूंना तेवत असलेले ते शांत नंदादीप, त्यांच्या सौम्य प्रभेंत रम्यतर दिसणारें त्याच्या आईचें तें प्रसन्न मुखमंडल;—पावित्र्य, परिमळ, प्रकाश आणि प्रेमळपणा यांनीं युक्त असें तें गंभीर दृश्य पहातांच त्याच्या

मनाला त्या संत्रस्त स्थितींतही एक प्रकारचा विसांवा वाटला; व बाळपणांतल्या मधुर स्मृतींनीं त्याचें हृदय भरून आलें.—आज आपला देवावर विश्वास उरलेला नाहीं. पण, लहानपणीं, मॅट्रिकच्या वर्गांत जाईपर्यंत, या चित्रापुढें बसून आपण कसे तास न् तास घालविले आहेत; भजनाच्या वेळीं आईच्या डोळ्यांतून वाहा-णाऱ्या अश्रुधारांत आपलेही अश्रु कसे मिसळत असत; भक्तीच्या उद्रेकांत सर्व भावनांचा लय होऊन आपल्या मनाला कसा विरंगुळा वाटत असे;—हें सर्व त्याला आठवलें. आणि, कदाचित् यापुढें कधींही हें दृश्य पुन्हा आपल्याला पहावयाला मिळणार नाहीं, असा विचार त्याच्या मनांत येऊन गेला. त्याबरोबर, त्या स्मृतीनीं चित्त हळुवार होऊन, त्यानें त्या दृश्याला वंदन केलें.

आणि तो हळूच आपल्या आईच्या खाटेजवळ गेला. त्यानें त्या खाटेला अलगत आपलें मस्तक टेंकलें; व अगदीं अस्पष्ट असा हुंदका त्याच्या तोंडून बाहेर पडला. त्याला क्षणैक असें वाटलें कीं, आईला जागी करावी, तिच्या कानांवर सारा प्रकार घालावा व तिचा निरोप घेऊन मग घरांतून बाहेर पडावें. घर सोडून बेपत्ता झाल्यानेंच आपली झाली तर या संकटांतून सुटका होईल, अशी जर आपण तिची खात्री करून दिली, तर आपल्या वियोगाचें दुःख सोसा-वयाला ती निमूटपणें तयार होईल. पण लगेच त्याच्या मनांत अशी शंका आली कीं, तिला उठवून तिची समजूत घालीपर्यंत कदाचित् पहांटसुद्धां होईल. आणि मग —मग आपला पुढचा बेत कसा तडीला जाणार ? ही शंका मनांत येतांच आईला उठविण्याची त्याला झालेली उत्कट इच्छा ओसरली. त्याला असें वाटलें कीं, आपण जरी तिला या उतारवयांत सोडून गेलों, तरी तिच्या आशेला दुसरा आधार आहे.—आणि त्या आधाराकडे, तिच्या शेजारच्या खाटेवर निजलेल्या आपल्या धाकट्या भावाकडे त्याची दृष्टि गेली. नंदादीपाच्या मंद प्रकाशांत काळयाभोर मऊ केंसांनीं गुरफटलेलें त्याचें तोंड अत्यंत मनोहर दिसत होतें. चंद्रशेखर तिथून उठून त्याच्या खाटेजवळ गेला; व आपले ओंठ त्याच्या केंसांवर अगदीं हळूच टेंकून त्यानें त्या निद्रिस्त किशोराच्या मस्तकाचें चुंबन घेतलें. आणि, त्याच्या तोंडून अगदीं न कळत, अगदीं आपोआप असे उद्गार बाहेर पडले, "दत्ता, दत्ता, आतां तूंच आईला माझ्या जागीं आहेस. तूंच बॅरिस्टर हो, तूंच तिला सुखाचे दिवस दाखव अन् तिचे पांग फेड—"

त्याच्या तोंडून ते उद्गार निघून गेले; आणि त्याचा तोच दचकला. त्याला वाटलें, दत्ता जागा तर होणार नाहीं? पण, मध्यरात्रींच्या गाढ, निःस्वप्न झोपेंत मग्न असलेल्या त्या किशोराच्या फार तर अंतर्मनानें त्यानें कळवळून उच्चारलेले ते शब्द ग्रहण केले असतील. त्यामुळें त्याची झोंप चाळवली नाहीं. त्याच्या खाटेजवळून चंद्रशेखर लगेच उठला. पण त्याचे पाय घोटाळत होते, हृदय भरून आलें होतें, आंसवांनीं भरलेल्या डोळ्यांना दिसेनासें झालें होतें. तो पुन्हा आईच्या खाटेजवळ जाऊन खालीं बसला. आणि, अगदीं हलुवारपणानें, तिच्या पायावरील शाल बाजूला करून, त्यानें तिच्या मृदुलोष्ण पाउलाचें चुंबन घेतलें.

त्याच्या ओंठांचा स्पर्श तिच्या पाउलाला होतांच ती किंचित् चाळवल्यासारखी झाली. चंद्रशेखरला वाटलें कीं, ती आतां जागी होणार. तोंच ती झोंपेंतच कुशीला झाली; व तिचें संथ श्वसन पूर्ववत् चालू झालें.

त्यावरोबर, हा मोह आतां आंवरला पाहिजे असें वाटूनच कीं काय, आपले डोळे पुसून चंद्रशेखर वर आला; त्यानें घाईघाईनें तो रिव्हाल्वर आणि मघांशीं टाईप केलेलें तें पत्र खिशांत घातलें; व बागेचें फाटक उघडून तो बाहेर पडला.

रस्त्यावर आल्यावर त्यानें आपल्या डोक्यावरील किरिस्तावी टोपी, घराकडे एकवार डोळे भरून पहावें म्हणून, मागें सारली.

पण, त्याच्या डोळ्यांत अश्रूंचा एवढा पूर लोटला कीं, त्याला भोंवतालचें कांहींच दिसेनासें झालें.

---

प्रकरण ३३ वें

## ज्वाळा भडकल्या



‘सुभान, सुभान,—’

चंद्रशेखरनें अगदीं खालच्या आवाजांत हांक मारली; व आपल्या हांकेबरोबर खोलींत हालचाल सुरू झाल्यासारखी वाटल्यामुळें आतां लवकरच दार उघडेल, या आशेनें तो थांबला. रात्रभर झालेल्या अलोचन जागरणामुळें त्याच्या डोळ्यांची सारखी आग होत होती. पण, तेवढ्या अपरात्रीं आपल्याला व्हिक्टोरिया

मेळून पहांट होण्यापूर्वीच परळ गांठतां आलें, या गोष्टीमुळें त्याला इतकें समाधान गालें होतें कीं, त्याच्या भरांत तो गेल्या सात आठ तासांत झालेला सारा शीण वेसरून गेला. त्या चाळींच्या गटापासून बऱ्याच अंतरावर तो व्हिक्टोरियांतून ग्रालीं उतरला. आणि, ती वेळ जरी कामगारांच्या साखरझोंपेची होती, तरी भापलें आगमन कोणाच्या नजरेस येऊं नये, म्हणून तो अगदीं हलक्या पावलांनीं जिना चढून वर आला. तरी सुद्धां त्या चाळीच्या अरुंद, घाणेरड्या गॅलरींत कड्यावर अस्ताव्यस्त निजलेल्या एका इसमाला चंद्रशेखरचा पाय लागून त्याची गोंप चाळवली. पण दिवसभर काबाडकष्ट करून शिणलेल्या शरीराला पहांटेच्या ांड झोंपेची सुस्ती ही नशेसारखी असते. आणि, मनुष्य त्या सुस्तींतून चाळवला ाला, तरी त्याला उठण्याची इच्छा सहसा होत नाहीं. जणुं कांहीं, शरीराला नरूर ती विश्रांति मिळाल्यामुळें उल्लसित झालेलें अंतर्मन, आपल्या अतृप्त, गूढ ासनांचें कोड पुरवण्यासाठीं, या वेळीं स्वप्नांच्या रम्य सृष्टींत संचार करीत नसल्याकारणानें, त्या मनोमय विलासाची धुंदी मनुष्याच्या डोळ्यांवर चढून याला जाग नकोसा वाटतो. तसेंच त्या इसमाचें झालें. चंद्रशेखरचा ढका लागून भापली झोंप चाळवतांच त्यानें एक शिवी तोंडांतल्या तोंडांत हांसडली; अंगा-रून दूर झालेलें मळकट पांघरूण तोंडावरून लपेटून घेतलें; व तो कुशीवर ोऊन पुन्हा घोरूं लागला. पण, त्याचें तें घोरणें पुन्हा सुरू होण्यापूर्वीच त्याच्या ाळवण्यानें घाबरलेला चंद्रशेखर सुभानच्या खोलीपर्यंत जाऊन पोंचला होता.

आपल्या हांकेमुळें कुणी उठतें कीं काय, हें पहाण्यासाठीं चंद्रशेखरनें कानोसा ातला. पण, मधांशीं जी हालचाल सुरू झाल्यासारखी वाटत होती, ती आतां ांबली होती. त्यामुळें त्याची निराशा झाली. क्षणभर तो भिंतीला टेकून स्वस्थ भा राहिला. पण, आपलें तें तशा रीतीनें वेळ घालवीत उभें राहणें किती ातुक आहे, याची त्याला जाणीव होती. म्हणून त्यानें पुन्हा जरा जोरानें हांका ारल्या; व दारावर थापही दिली. चंद्रशेखरचा हात त्या दाराला लागतांच याची लापट झालेली कडी खळकन निसटून तें आंत ढकललें गेलें; व उंबर-ठ्याच्या अगदीं जवळच निजलेल्या माणसाच्या पायाला त्याचा ढका लागला. याबरोबर तो इसम शिवी हांसडून उटला; व डोळे चोळीत चोळीत त्यानें ागानें विचारलें—

"कोण हवं आहे रे तुला? अन् ही काय वेळ आहे का लोकांचीं दारं ठोठावायची?—"

"सुभान, अरे नीट डोळे तर उघडून पहा जरा! मी उभा आहें तुझ्या-समोर." चंद्रशेखर त्या अर्धवट उघडलेल्या दारांतून आंत शिरण्याचा प्रयत्न करीत म्हणाला.

त्याचा तो ओळखीचा आवाज कानांवर पडतांच, सुभाननें डोळ्यांवरला हात काढून त्याच्याकडे न्याहाळून पाहिलें; व तो चकित होऊन उद्गारला, "हें काय? साहेब, या वेळीं आपण इकडे कुठें?"

"आधीं मला आंत तर येऊं दे. मग सांगतों तुला सारं कांहीं."

परंतु त्या खोलींत प्रवेश करणें कांहीं सोपें नव्हतें. धुरानें कळकटलेल्या तिच्या भिंतींचा खालचा भाग डबे, भांडीं, गाडगीं, लांकडें इत्यादि संसारी वस्तूंच्या मांडणावळीनें झांकून गेला होता; व वरच्या भागाला कोंपऱ्या कोंपऱ्यांतून कोळिष्टकांच्या काळ्या तंतुमय झालरी लागलेल्या होत्या. खोलीच्या मधोमध सुभाच्या दोरांवर चिरगुटांच्या घड्या टाकून बनविलेला झोळीवजा पाळणा लोंबत होता. दारिद्र्याच्या खंगलेल्या तोंडावर अस्वच्छतेची अवकळा पसरून पुष्कळदां जो भेसूरपणा त्याला येत असतो, तो मात्र त्या खोलींत नांदत नव्हता. कारण, राहीला स्वच्छतेची चाड फार असल्यामुळें, त्यांच्या त्या गरिबीच्या संसारावर ती अवकळा अद्याप चढलेली नव्हती. तथापि, त्या टीचभर खोलींत टापटिपीनें मांडलेलेंही तें सामान जागेच्या अपुरेपणामुळें अडगळीसारखें भासत होतें. त्या अडगळींत या वेळीं अंथरुणाची भर पडली होती. दिवसा बसकर म्हणून व रात्रीं बिछायतीसाठीं उपयोगी पडणाऱ्या त्या अंथरुणानें एका बाजूनें चुलीचा चिमुकला ओटा तर दुसऱ्या बाजूनें दाराचा झिजून गेलेला उंबरठा गांठला होता. श्रीमंतांच्या दिवाणखान्यांतली चिरेबंदी जमीन जशी सुंदर गालिच्यांनीं आच्छादिलेली असते, तसा त्या खोलींतील जागोजाग उखरलेल्या भुईचा, सामान ठेऊन शिल्लक उरलेला, सारा भाग त्या अंथरुणानें झांकलेला होता. तें गुंडाळण्यासाठीं म्हणून सुभान मागें वळून आपल्या बायकोला हांक मारणार, तोंच चंद्रशेखरनें त्याला म्हटलें—

"कशाला उठवतोस राहीला? आणखी अर्ध्या तासानं उठायचंच आहे तिला. तोंपर्यंत आपण या अंथरुणावर बसूं न् मी तुला सारी हकिकत सांगतों—"

त्याचे ते उद्गार ऐकतांच सुभाननें उंबरठ्याला भिडलेलें अंथरूण थोडें आंत दुमडून घेतलें; व ते दोघे त्याच्यावर बसले. आंत आल्याबरोबर चंद्रशेखरनें त्या लापट दाराला कडी घालून तें जितकें बंद करणें शक्य होतें तितकें केलें. आणि, तो सुभानचा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाला, "सुभान, गड्या आजचा दिवस मी इथंच तुझ्या या खोलींत रहाणार आहें!—"

"आपण अन् माझ्या या खोलींत रहाणार, साहेब?"

"होय, सुभान. निदान आजचा सारा दिवस तरी मी इथं काढणार आहें—"

असें म्हणून त्यानें सुभानला सारी हकिकत सांगितली; व पोलीसच्या पुढील हालचालींची कल्पना येण्यासाठीं आजचा दिवस किंवा जरूर तर आणखीही एक दोन दिवस आपला तिथें गुप्त रीतीनें राहण्याचा बेत त्यानें सुभानच्या कानांवर घातला. गेल्या सहा महिन्यांत त्याचा अनेक कामगारांशीं संबंध आलेला होता. पण, सुभान हा त्याचा गांवकरी व त्यांतही शिक्षणाचा त्याला थोडा जास्त संस्कार झालेला असल्यामुळें, त्याच्यावर चंद्रशेखरचा लोभ विशेष जडला. त्याचे सारे अवगुण, त्याला असलेलें ताडी पिण्याचें बेसुमार व्यसन चंद्रशेखरला माहीत होतें. पण, त्याच्या बुद्धीची तरतरी, कोणताही नवीन विचार ग्रहण करण्याची त्याची पात्रता, मजुरांच्या चळवळीविषयीं त्याला वाटणारा उत्साह आणि आपल्यावर असलेली त्याची निष्ठा लक्षांत घेऊन चंद्रशेखरनें कामगारांचा प्रतिनिधि म्हणून त्याला आपल्या क्लबांत घेतलें होतें. पिठेवाला आणि पठाण यांच्या तावडींतून सुभानला त्यानें दोन वेळां सोडविला होता. त्यामुळें सुभान व त्याची बायको या दोघांचीही त्याच्यावर विलक्षण भक्ति जडली होती. म्हणून आज त्या भक्तीवर विसंबून रहाण्याचा बेत चंद्रशेखरनें केला. त्यानें सांगितलेली ती बातमी ऐकून सुभानला नवल वाटलें नाहीं. पण त्याच्या त्या धाडसी कल्पनेचें मात्र त्याला आश्चर्य वाटलें. किंबहुना ती कल्पना त्याला अशक्य वाटली. आणि तो चंद्रशेखरला म्हणाला,

"साहेब, माझे बहुतेक शेजारी आपल्याला ओळखतात. अशा स्थितींत आपलं इथं लपून रहाणं कसं जमणार ?—"

"तूं आणि राही कामावर जातांना रोजच्याप्रमाणं बाहेरून दाराला कुलूप लावून जा. आजच्या दिवसाचाच काय तो प्रश्न आहे. संध्याकाळीं तुम्ही परत आल्यावर ठरवूं पुढं काय करायचं तें.—पण सुभान, खरं सांग—तुझी तयारी आहे ना मला घरांत ठेवून घ्यायची ?—"

"साहेब, आपण दोनदां मला चौकीवरून सोडवून परत आणलंय.—अन् आपल्यावर एवढा प्रसंग गुदरला असतां एक दिवस आपल्याला घरांत न ठेऊन घेण्याइतका का मी बेमान आहें ?"

"तुला कदाचित् मला ठेवून घेण्यांत धोका वाटत नसेल, सुभान. पण राहीला ? तिची खात्री आहे तुला ?"

"साहेब, मी एक वेळ उलटेन आपल्यावर. पण तिची आपल्यावर किती भक्ति आहे, याची कल्पना नाहीं आपल्याला !—ती नेहमीं म्हणत असते, माझ्या कपाळचं कुंकूं अन् तोंडचा घांस साहेबांनीं कायम राखला. साहेब, आम्ही गरीब असलों, व्यसनी असलों, तरी आम्हांला प्रसंग समजतो, माणसाची किंमत कळते. प्रसंग आला, तर स्वतःवर—पोटच्या गोळ्यावर सुद्धां आम्ही पाणी सोडूं.—पण आपल्याला नाहीं दगा देणार—"

इतकें बोलून सुभान एकदम आपल्या बायकोजवळ गेला; व तिला हलवून म्हणाला, "ऊठ बरं आधीं. अन् आपल्या घरीं कोण आलंय तें पहा—"

त्याच्या त्या चमत्कारिक, भावनोत्कट आवाजांत उच्चारलेल्या शब्दांनीं मुलाला कुशींत घेऊन निजलेली राही दचकून जागी झाली; व त्याच्या अंगावर पांघरूण घालून तिनें आपल्या नवऱ्याशेजारीं अंथरुणावर बसलेल्या त्या पाहुण्याकडे बघितलें. पण, खोलींत अद्याप बराच काळोख असल्यामुळें तिला, आज पूर्वी कधीं न पाहिलेल्या पोषाखांत असलेला, चंद्रशेखर ओळखूं आला नाहीं.

इतक्यांत सुभाननें उशागती असलेली घासलेटची बत्ती पेटवून ती चंद्रशेखरच्या समोर ठेवली. त्याबरोबर त्याची ओळख पटून तिच्या तोंडून आश्चर्यानें उद्गार निघाला—

" साहेब आज या वेळीं इकडे कुठें ?"

" आज तुमच्याच घरीं रहाणार आहे मी राही," चंद्रशेखरनें हंसून उत्तर दिलें.

त्याचें तें उत्तर ऐकून तिनें लाजून मान खालीं घातली.

तेव्हां चंद्रशेखरनें तिला साऱ्या गोष्टींची कल्पना आणून दिली; व शेवटीं विचारलें, "मग मी राहूं ना एक दोन दिवस इथं, राही ? तुला अवघड नाहीं ना वाटणार मी राहिल्यानं ?"

" खुशाल रहा, साहेब. आपण दोन वेळां मला चुडेदान दिलंय. आपल्या-पायीं कसलाही प्रसंग आमच्यावर आला, तरी तो आम्ही आनंदानं सोसूं. आम्ही गरीब म्हणून आमचा भरंवसा आपल्याला वाटत नसेल, तर हें पहा—"

इतकें बोलून तिनें जवळच निजलेल्या आपल्या मुलाला झटकन उचलून चंद्रशेखरच्या समोर ठेवला; व त्याच्या अंगावर हात ठेवून ती उद्गारली—

" या पोराच्या अंगावर हात ठेऊन मी सांगतें आपल्याला—"

पण तिला पुढें बोलवेना. तिचें तें कृत्य पाहून विस्मित झालेल्या सुभाननेंही सहजस्फूर्तीनें मुलाच्या अंगावर आपले हात ठेवले.

तें दृश्य पाहून चंद्रशेखरचे डोळे पाण्यानें भरून आले; व तो म्हणाला, " पुरे पुरे, राही.—माझा तुमच्यावर विश्वास नसता तर मी एवढ्या रात्रीं कशाला आलों असतों इथं ?—पण तुम्हांला साऱ्या गोष्टींची कल्पना असावी, म्हणून विचारलं मी—"

आणि त्यानें त्या निद्रिस्त अर्भकाला अलगत उचलून त्याचे मटामट मुके घेतले.

तें त्यांचें बोलणें होत आहे, तों पहांट झाली; व त्या खोलीच्या एका बाजूला असलेल्या खिडक्यांतून अरुणाचा क्षीण प्रकाश आंत आला. त्याबरोबर मुलाला पाळण्यांत निजवून राही उठली; वत्तींतील तेल चुलीमधल्या सर्पणावर ओतून तिनें विस्तव पेटविला; व ती जेवणाच्या तयारीला लागली. चंद्रशेखरसारखा पाहुणा घरीं आलेला, म्हणून तिनें आज भाकरी मुद्दाम ताज्या केल्या; व दोन कांदेही त्यांच्याबरोबर खाण्यासाठीं काढले. नंतर तिनें त्या अंथरुणाचें चुलीच्या

बाजूकडे आलेलें शेंव नीट दुमडून त्याचें मऊ बसकर तयार केलें. आणि, ज्या थाळींत तिचा नवरा नेहमीं जेवीत असे, ती घरांतली सगळयांत चांगली थाळी तिनें पाहुण्यासाठीं मांडून, त्यांत लशणीचें तिखट, कोंकणांतून आणलेली सुकोशी वगैरे तोंडीलावणीं मुद्दाम काढून वाढलीं. त्या थाळीपासून थोड्या अंतरावर आपल्या नवऱ्यासाठीं वेळणी मांडून, तिच्यांत सारें वाढप मावण्यासारखें नसल्यामुळें, कागदाच्या एका मळक्या कपट्यावर त्याच्यासाठीं तिखट वगैरे वाढून ठेवलें. तिची ही सारी तयारी होत आहे, तोंच सुभान नळावरून पाणी घेऊन आला. त्या तयारीकडे त्यानें साभिप्राय पाहिलें; व पलीकडच्या बाजूला हात उशाशीं घेऊन लवंडलेल्या चंद्रशेखरकडे दृष्टि फेंकली. जणुं कांहीं, आपल्याबरोबर जेवावयाला बसण्याची गोष्ट त्याच्यापाशीं काढणें कितपत योग्य होईल, हें सुभाननें स्वतःच्या मनाशीं अशा रीतीनें अजमावून पाहिलें. इतक्यांत राहीनें भात उकरावयाला सुरवात केल्यामुळें तो चंद्रशेखरजवळ जाऊन म्हणाला, "साहेब, आपण दोन घांस खातां ना आमच्याबरोबर ?"

त्याच्या त्या उद्गारांत संकोच आणि अगत्य यांचें असें कांहीं हृदयस्पर्शी मिश्रण झालेलें होतें कीं, डोळयांवर सुस्ती असल्यामुळें त्यांचा निश्चित असा अर्थबोध मनाला झालेला नसतांही, चंद्रशेखर गडबडीनें उठून म्हणाला, "हो.—तुमची जायची वेळ झाली असेल ना रे आतां ?"

त्यानें घाईघाईनें डोळ्यांना पाणी लावून चूळ भरली; व तो सुभाननें दाखविलेल्या त्या थाळीजवळ जाऊन बसला. आणि त्यांचें जेवण सुरू झालें. अनशुतीचा लेशमात्र सुद्धां संस्कार न झालेल्या जाड्या तांदुळांच्या त्या फडफडीत भाताचा घांस त्यानें घेतला; व तो तोंडांतल्या तोंडांत फिरूं लागल्यामुळें चव आणण्यासाठीं म्हणून लशणीच्या तिखटाचें एक बोट त्यानें जिभेला लावलें. त्याबरोबर त्याच्या डोळयांत पाणी येऊन त्याचा चेहरा लाल झाला. त्याची ती अवस्था पाहून तीं नवराबायको अगदीं ओशाळून गेलीं; व राहीनें झटकन एका लहानशा डब्यांत असलेला गुळाचा पोफळा एवढा खडा काढून तो साराच्या सारा त्याला वाढला.

तेव्हां, चंद्रशेखर डोळे पुसून तिला हंसत हंसत म्हणाला, "माझ्या तोंडाला तिखटाची संवय नाहीं, त्यामुळं प्रथम जीभ झणझणली थोडीशी. पण मागाहून

चांगली चव आली. ती आतां या गुळानं जाणार सारी!—आणि मी जर आणखी दोन तीन दिवस इथं राहिलों, तर रोज कुटून तूं गूळ वाढणार मला, राही?—"

ते शब्द त्यानें हंसत हंसत उच्चारले. पण, त्या नवराबायकोंना आपल्याविषयीं वाटणारें प्रेम पाहून त्याला आलेला गंहिवर त्याच्या त्या हास्यांतूनही उमटला; व त्याच्या डोळ्यांत पुन्हा अश्रु आले. परंतु, सुभान आणि राही यांचेही डोळे भरून येण्याच्या बेतांत आहेत हें त्याच्या लक्षांत आल्यामुळें, तो पुन्हा हंसून म्हणाला, "ही कांदाभाकर किती रुचकर लागते रे सुभान!—मी गेले सहा महिने तुमच्याबरोबर काम करतोंय; पण तुमच्या या जेवणाला इतकी चव असते, असं वाटलं नव्हतं कधीं मला—"

परंतु, त्या कोरड्या, रुक्ष अन्नाचा प्रत्येक घांस घेतांना त्याला मनस्वी त्रास होत होता. तरीसुद्धां राहीनें वाढलेले ते सारे पदार्थ त्यानें खाल्ले; व शेवटीं पेलाभर पाणी पिऊन तो उठला. तो हात धुवून अंथरुणावर येऊन बसतांच, सुभाननें त्याच्या हातावर ओल्या पोफळाचें खांड ठेवलें; व तीं नवराबायको कामावर जाण्याच्या तयारीला लागलीं. गिरणींत जावयाला निघालेले त्यांचे शेजारी दारावरून जातां जातां त्यांना साद घालीत होते. आणि, तांबडें फुटल्यानंतर रात्रभर स्तब्ध असलेला वृक्ष जसा पक्ष्यांच्या किलबिलाटानें गजबजून जावा, तशी ती सारी चाळ या वेळीं कामगारांच्या हालचालीनें गडबडून गेली होती. रात्रभर पीत राहिल्यामुळें सुस्त होऊन पडलेल्या मुलाला राहीनें पाळण्यांतून उचलून खांद्यावर टाकलें; व सुभानही दुपारच्या न्याहारीचा डबा घेऊन निघाला. पण, चंद्रशेखरनें पहांटे म्हटल्याप्रमाणें दाराला बाहेरून कुलूप लावणें कितपत योग्य होईल, या शंकेनें तीं दोघें घुटमळलीं.

परंतु, चंद्रशेखर त्यांना लगेच म्हणाला, "तुम्ही कुलूप लावा दाराला बाहेरून.—नाहीं तर घरांत कोण पाहुणा बसलाय याची चौकशी सुरू होईल उगाच! नाहीं तरी मी आतां तुम्ही परत येईपर्यंत स्वस्थ झोंप काढणार आहे—"

इतकें बोलून तो खरोखरीच त्या अंथरुणावर लेटला.

त्याबरोबर तीं दोघें बाहेर पडलीं; व त्यांनीं दाराला बाहेरून कुलूप घातलें.

त्यांना कुलूप घालून जावयाला संकोच वाटूं नये, म्हणून चंद्रशेखर अंथरुणावर लवंडला खरा. पण, हात उशागतीं घेऊन त्यावर डोकें टेकतांच त्याला एकदम गाढ झोंप लागली. गिरण्यांच्या त्या भागांत संपाची वावटळ सुरू झाल्यापासून गेले चार पांच दिवस अहोरात्र केलेले परिश्रम आणि काल मध्यरात्रीपासून त्याला झालेला विलक्षण मनस्ताप यामुळें त्याचें शरीर आणि मन हीं दोनीही इतकीं थकून गेलीं होतीं कीं, तें गोळाभर कदन्न आणि पेलाभर पाणी पोटांत जातांच, निद्रेनें त्याच्यावर आपली झांपड टाकली. त्या झोंपेतून कदाचित् तो खरोखरीच संध्याकाळपर्यंत उठला नसता. पण, दुपारीं चारच्या सुमारास आपले केंस कोणी तरी ओढीत आहे असा भास झाल्यामुळें, तो दचकून उठला. तों सुभानचा मुलगा आपल्या केंसांशीं खेळत असून पलीकडे उभी असलेली राही तें दृश्य कौतुकानें पहात आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानें झटकन् उठून मनगटावरील घड्याळाकडे पाहिलें; व तो आश्चर्यानें राहीला म्हणाला—

"इतक्या लवकर कशी आलीस तूं आज, राही? आतां तर चार वाजलेले दिसताहेत या घड्याळांत—"

बोलतां बोलतां आपल्या हातांतल्या घड्याळाकडे आतुरतेनें पहात असलेल्या त्या मुलाला उचलून चंद्रशेखरनें त्याचा मुका घेतला; व घड्याळाचा सोन्याचा पट्टा काढून तो त्याला खेळावयाला दिला.

"आज आमची गिरण संपांत सामील झाली आहे, साहेब! मी आतांच आलें तिथून—"

"कां बरं?"

"सकाळीं सहा सात माणसांना पकडलं म्हणतात. ती बातमी दुपारीं सगळीकडे झाली न् संपवाले आमच्या गिरणीभोंवतीं जमा झाले. त्याबरोबर सारीं माणसं बाहेर पडलीं." एवढें बोलून ती घुटमळली; व किंचित् लाजून तिनें म्हटलें, "त्यांचें न् इतर कांहीं लोकांचीं भाषणं झालीं अन् आतां ते सारे इतर गिरण्यांतून संप पाडण्यासाठीं हिंडताहेत—"

"कोण माणसं पकडलीं त्यांचीं नांवं माहीत आहेत तुला ?"

"नाहीं. पण आपल्याबरोबर आमच्याकडे येत असत ते दोघे,—त्यांना पकडलं अन् आपल्या बंगल्यावरही छापा घातला म्हणतात. म्हणूनच मी आल्या-बरोबर उठवलं आपल्याला, साहेब!"

जणुं कांहीं, त्याची झोंपमोड करण्यांत आपली कांहीं चूक झालेली नाहीं, हें दर्शविण्यासाठींच तिनें तें शेवटचें वाक्य उच्चारलें होतें.

तिनें दिलेल्या त्या अर्धवट माहितीमुळें चंद्रशेखरचें मन अत्यंत अस्वस्थ झालें. तिच्या त्या उद्गारांवरून त्याला एवढा बोध निश्चित झाला कीं, आपले दोघे सहकारी तरी खास पकडले गेले आहेत. आणि, प्रमिलेशीं काल रात्रीं झालेलें वॉरंटासंबंधाचें बोलणें आठवून त्याला एकदम अशी शंका आली कीं, तिनें मुद्दाम तर आपल्याला अपुरी माहिती दिली नसेल ना ? तिची इच्छा फक्त आपल्याला मदत करण्याची, आपल्यावरलें संकट टाळण्याची होती. तेव्हां, आपल्या प्रमाणेंच आपल्या मित्रांवरही वॉरंटें निघालीं आहेत, हें माहित असूनसुद्धां फक्त आपल्या संबंधाचीच तेवढी बातमी तिनें आपल्याला सांगितली नसेल कशा-वरून ? पण ती त्याची शंका क्षणभरच टिकली. आपलें तिच्याशीं झालेलें सारें बोलणें,—इतर कोणावरही वॉरंट निघालें नसल्याबद्दल तिनें निक्षून दिलेली ग्वाही त्याला आठवली. आणि, त्याला असें वाटलें कीं, एक तर इतर वॉरंटें निघाल्याची माहिती तिला मिळालेली नसावी; किंवा आपण हातीं न लागल्या-मुळें आपला तपास काढण्यासाठीं पोलिसांनीं आकसानें आपल्या सहकाऱ्यांना पकडलें असावें.

ही कल्पना मनांत येतांच चंद्रशेखरच्या जिवाची अतिशयच तळमळ झाली. त्या कल्पनेच्या पाठोपाठ त्याच्या मनांत लगेच अशी शंका आली कीं, आपल्या या इतर सहकाऱ्यांप्रमाणें केशव तर पकडला गेला नसेल ना ? त्याचे आणि आपले संबंध किती जिव्हाळ्याचे आहेत, हें रावसाहेबांना माहित होतें. तो जिव्हाळा लक्षांत घेऊन, त्याच्याकडून कदाचित् आपला शोध काढतां येईल, अशा अंदाजानें त्यांनीं त्याला तर अटक केली नसेल ?—ती शंका मनांत आली मात्र.—आणि, माहिती मिळविण्यासाठीं कच्च्या कैद्यांवर पोलीस जे अघोर अत्याचार नेहमीं करितात, त्यांचीं त्यानें आजपर्यंत वाचलेलीं सारीं भीषण वर्णनें त्याच्या डोळ्यां-

पुढें उभीं राहिलीं. साधा गुन्हा असला, तरी पोलीस कबुली काढण्यासाठीं आरोपीची वाटेल तशी गांजणूक करितात. आणि, आपल्यावर तर बंड केल्याचा, कट रचल्याचा आरोप ! अशा स्थितींत आपला पत्ता काढण्यासाठीं, आपल्या उद्योगांची माहिती मिळविण्यासाठीं आपल्या सहकाऱ्यांचा, बिचाऱ्या निरपराधी केशवचा किती छळ करण्यांत येईल !—अरेरे, कुठून आपल्याला स्वतः बेपत्ता होऊन इतरांना दुःखाच्या खाईत लोटण्याची ही बुद्धि सुचली ? दुर्दैव असें कीं, आपल्या सहकाऱ्यांना किंवा केशवला आपण कुठें गेलों आहों, याची कांहींच कल्पना नाहीं. आणि त्यामुळें आपला पत्ता लागेपर्यंत त्यांचा सारखा छळ होत राहणार !—आपल्यासाठीं त्यांनीं छळ सोसावयाचा ? निरपराधी केशवनें, ज्याला शब्दांचा सुद्धां कठोरपणा कधीं सहन करवला नाहीं, त्या कोंवळ्या मनाच्या केशवनें आपल्यासाठीं यमयातना सोसावयाच्या ?—मग आपण स्वतंत्र राहण्यांत, लपून छपून जिणें कंठण्यांत किंवा वीरेंद्रांप्रमाणें परदेशीं जाऊन तिथून चळवळीचीं सूत्रें हलविण्यांत काय अर्थ आहे ? कोणती माणुसकी आहे ?—आपल्या मित्रांचा बळी देऊन आपण स्वतंत्र रहाणार ?

नाहीं, असें कधींही घडणार नाहीं. त्यापेक्षां आपण स्वतः पोलिसच्या स्वाधीन झालेलें काय वाईट ? आपण जर पोलिसच्या स्वाधीन झालों, तर निरपराधी केशव बहुतेक सुटेल आणि आपल्या सहकाऱ्यांचाही छळ होणार नाही.

हा विचार मनांत येतांच चंद्रशेखर ताडकन उठला; आपल्या खिशांतून गॉगल्स काढून ते त्यानें नीट डोळ्यांवर बसविले; कपाळ झांकलें जाईल अशा बेतानें टोपी डोक्यावर झुकती ठेवली; व तो पायांत बूट घालावयाला लागला.

त्याच्या त्या हालचालींमुळें चुलीपाशीं चहा करण्यांत गुंतलेल्या राहीचें लक्ष त्याच्याकडे वेधलें; व ती पुढें येऊन त्याला म्हणाली, " आपण बाहेर चाललां ? मला तर अगदीं बजावून सांगितलंय त्यांनीं कीं, मी घरीं परत येईपर्यंत साहेबांना कुठं जाऊं देऊं नकोस म्हणून ? "

" खरं आहे त्याचं म्हणणं.—पण बाहेर काय गडबड चालू आहे, ती पाहून येतों थोडीशी. निदान बातमी तर सारी नीट कळली पाहिजे ? "

" मला वाटतं आपण बाहेर जाऊं नये. कदाचित् आपण ओळखले जाल. म्हणजे सारंच संपलं—"

झालें होतें; घोड्यांच्या टापांचा आवाज सारखा कानांवर येत होता; व भेदरलेल्या पक्ष्यानें उडतां उडतां मध्येंच जसा चीत्कार करावा, त्याप्रमाणें पळत येणारे कामगार, पाठीशीं पोलिस नाहीं असें बघून, मधून मधून आरोळ्या मारीत होते. झपाट्यानें लोपत चाललेल्या संधिप्रकाशांत घाबरलेल्या लोकांची ती धांवपळ अतिशय भीषण दिसत होती. तें दृश्य पहात असतां चंद्रशेखरच्या मनांत क्षणैक अशी कल्पना येऊन गेली कीं, त्या जमावांत शिरून आपण लोकांना दिलासा द्यावा, जखमी कामगारांची विचारपूस करावी व पोलिस अधिकाऱ्यांना चार समजुतीच्या गोष्टी सांगाव्या. पण, अशा चमत्कारिक परिस्थितींत आपण प्रकट झालों व लोक जर त्यामुळें अधिक क्षुब्ध झाले तर ?—तर पुन्हा गोळीबार आणि पुन्हा धरपकड !—आतांपर्यंत सांडलें त्यापेक्षां जास्त रक्त कदाचित् आप॰ जाहीर रीतीनें पकडले जात असतां सांडावयाचें ! निरपराधी लोकांचें जमिनीवर पडणारें रक्त !—त्या निरागस रक्तांत, धर्मराजाच्या पवित्र रक्ताप्रमाणें, अन्यायाला जाळून टाकण्याचें सामर्थ्य असतें.—पण, त्या सामर्थ्याचा प्रत्यय पहाण्याची, ती चित्शक्ति इरेला घालण्याची वेळ अजून आलेली नाहीं.—आजचा प्रसंग हा फक्त आपल्या एकट्याच्या आत्माहुतीनें स्फूर्तीचा स्फुलिंग फुलवून ठेवण्याचा आहे. एका व्यक्तीच्या अभिमानाखातर अनेक व्यक्तींचें रक्त व्यर्थ सांडण्याचा नाहीं.—हा विचार मनांत येतांच तो परत फिरला व थोडें अलीकडे येऊन तिथें उभ्या असलेल्या व्हिक्टोरियावाल्याला त्यानें खूण केली.

त्या गर्दीतून वाट काढून त्यानें गाडी जवळ आणतांच चंद्रशेखर मुकाट्यानें आंत बसला.

त्याबरोबर त्या व्हिक्टोरियावाल्यानें घोड्याचा लगाम खेंचून त्याला विचारलें, " कुठं जायचं साहेब ? "

" पोलिस कमिशनरच्या ऑफिसांत, " चंद्रशेखरनें उत्तर दिलें. आणि, आपल्या मनावरला असह्य झालेला भार उतरल्यासारखा वाटून, एक दीर्घ उसासा टाकला.

---

प्रकरण ३४ वें

# आहुति



तीं दोघें ठरलेल्या वेळीं तिथें येऊन दाखल झालीं. पण तुरुंगाचे मुख्य अधिकारी अद्याप आलेले नव्हते. आणि, ते स्वतः हजर होऊन त्यांनीं सम... हुकूम दिल्याशिवाय मला तुमची कैद्याशीं भेट करून देतां येत नाहीं, असें जेलरनें त्यांना सांगितलें.

" सुपरिंटेंडंट केव्हां येतील ? " केशवनें अधीरतेनें विचारलें.

" तें नक्की सांगतां येत नाहीं. आज कांहीं त्यांचा ... नाहीं त्यामुळं कदाचित् वेळ लागेल.—मांजरेकर काळ्या ... नाहीं तर मी भेट करून दिली असती त्यां... —तुम्ही वाटल्यास बसा इथं साहेब येईपर्यंत. " समोर असलेल्या खुर्च्यांकडे बोट दाखवून जेलरनें म्हटलें.

पण केशव मुकाट्यानें उभा होता. जेलरनें दाखविलेल्या त्या अनपेक्षित सौजन्याबद्दल त्याचे आभार मानण्याचेंही त्याला सुचलें नाहीं. आपण एवढ्या बड्या अधिकाऱ्याचें पत्र घेऊन आलों असतां, अशा तऱ्हेचें उत्तर आपल्याला मिळेल, अशी त्याची कल्पना नव्हती. त्यामुळें जेलरनें संभावितपणानें दिलेला तो नकार ऐकून त्याच्या मनाचा हिरमोड झाला.

त्याचें तें तशा रीतीनें आपल्या समोर स्तब्ध उभें राहणें जेलरला मोठें चमत्कारिक वाटलें; व म्हातारपणामुळें क्षीण झालेले आपले डोळे आकुंचित करून तो त्याच्याकडे विस्मयानें पाहूं लागला. तेव्हां, सुमतीनें त्याला भानावर आणण्याच्या उद्देशानें म्हटलें, " बसूं या आपण सुपरिंटेंडंट येईपर्यंत इथं.—आज भेट झाली नाहीं तर पुन्हा कदाचित् कधींच भेटण्याची संधि मिळणार नाहीं आपल्याला—"

तिचे ते उद्गार ऐकतांच, जणुं कांहीं आपण स्वप्नांतच आहों अशा रीतीनें तो एक शब्दही न बोलतां खुर्चीवर बसला.